प्रकाशक -
लालचंद हिराचंद
जैनसस्कृति संरक्षक संघ
७३४, प. मंगळवारपेठ सोलापूर.

## जीवराज जैन ग्रंथमालेचा परिचय.

सोलापूर निवासी पूज्य ब्रह्मचारी जीवराज गौतमचंद दोशी यांनी १९४० साली आपल्या न्यायोपार्जित संपत्तीचा विनियोग जैनधर्म व समाज यांच्या उन्नतीसाठी करण्याचे निश्चित केले. त्यासाठी त्यांनी देशभर प्रवास करून अनेक विद्वानांची भेट घेतली व त्यांची मते मिळविली. नंतर १९४१ च्या उन्हाळयाच्या सुट्टीत सिद्धक्षेत्र गजपंथ ( नासिक ) येथे एक विद्वत्संमेलन भरविण्यांत येऊन विचारविनिमय करण्यांत आला व ' जैन संस्कृति सरंक्षक संघ" या संस्थेची स्थापना करण्यांत आली. पूज्य ब्रह्मचारीजींनी त्यासाठी त्यावेळी ३०,००० रुपये दिले. त्यांची परिग्रहनिवृत्ति पुढे वाढत गेली आणि १९४४ साली यांनी दोन लाख रुपयांची आपली सर्व संपत्ति संघाला विश्वस्त-निधि रूपाने अर्पण केली. त्या संघातर्फे जीवराज जैन ग्रंथमालेचें संपादन होत आहे. प्राकृत संस्कृतादि ग्रथ त्यांतून प्रकाशित होतात. १९५४ च्या संघाच्या वार्षिक बैठकीत याच मालेत मराठी विभाग निर्माण करून पूज्य जीवराजजींनी त्या-साठी पुनः १० हजार रुपये संघाच्या स्वाधीन केले. त्या द्रव्यांतून या ग्रंथ-मालेच्या मराठी विभागाचे कार्य चालू आहे. दि. १६-१-१९५७ रोजी पू. ब्रह्मचारीजींनी सर्वस्वाचा त्याग करून अत्यंत सावधानपूर्वक समाधिमरण स्वीकारले. या ग्रंथमालेतून आजपर्यंत हिंदी विभागातून ३५ ग्रंथ व मराठी-५२ ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

प्रस्तुत ग्रथ जीवराज जैन ग्रंथमाला मराठी विभागाचे १९ वें प्रकाशनची द्वितीय आवृत्ति आहे.

मुद्रक -
तिरुपती प्रिंटर्स
सुपर मार्केट,
सोलापूर.

द्वितीयवृत्ति
प्रति १०००

# प्रकाशकीय निवेदन

श्री जीवराज जैन ग्रंथमालेच्या मराठी विभागांतून आजपर्यंत ५० प्रकाशने बाहेर पडली असून आज हे अत्यंत मोलाचे एकोणवीसावें प्रकाशनाचें द्वितीय आवृत्ती 'जैनधर्म' बाहेर पडत आहे.

वाराणसी येथील स्याद्वाद महाविद्यालयाचे प्रमुख आणि आंतर-भारतीय कीर्तीचे गण्यमान्य विद्वान् पं. कैलाशचंद्रजी यांनी सदहू ग्रंथ १९४८ मध्ये प्रथम प्रसिद्ध केला. आजपर्यन्त ग्रंथाच्या तीन आवृत्त्या निघाल्या. मराठीत आज हें भाषांतर प्रसिद्ध होत आहे.

स्व. पू. ब्र. जीवराज बाबांच्या इच्छेनुरूप जैनसंस्कृति-संरक्षक संघाने आजपर्यंत अनेक ग्रंथ अनेक भाषेंत प्रकाशित केले आहेत. त्यामुळे जैन इतिहास, वाङ्मय, तत्त्वज्ञान इत्यादिकांच्या अभ्यासकांना मोठें क्षेत्र निर्माण झाले आहे.

तरी पण संपूर्ण जैन संस्कृतीचे वैभव एका दृष्टिक्षेपांत समोर उभे करणाऱ्या व नव्या अभिरुचीला मानवणाऱ्या आणि सहजसुलभ अशा एखाद्या ग्रंथाची उणीव सारखी जाणवत होतीच.

जैन विद्यार्थ्यांकडून अनेक पाठ्यपुस्तकांचा अभ्यास करवून व परीक्षा घेऊन त्यांच्या पदरी जैनधर्मांची तत्त्वे घालण्याचा प्रयत्न सतत चालू ठेऊनहि त्यांना आवश्यक तो दृष्टिकोण लाभलेला क्वचितच आढळतो. कारण जैनतत्त्वज्ञानाच्या कांही कांही अंगांचाच त्यांनी अभ्यास केलेला असतो व इतर अंगांशी ते अगदीच अस्पृष्ट राहिलेले असतात.

निरनिराळ्या अंगांची बरीचशी पुस्तके पाठ्यक्रमांत नेमणें हे वेळेच्या अभावी शक्य होत नाही, कारण लौकिक शिक्षणाचे ओझेंहि

सांभाळणें त्यांना प्राप्त असतें. त्याकडे दुर्लक्ष करता येत नाही.

अजैन आणि जैन धर्माभ्यासी लोकांची सारखी मागणी असते की, असे एकच एक पुस्तक द्या की, जें वाचून जैन संस्कृतीसंबंधीची संपूर्ण माहिती मिळू शकेल. अशा संकलनात्मक सुबोध पुस्तकाची नितांत आवश्यकता वाटत होतीच.

जैन विद्यार्थी, जैनलोक, आणि जैन संस्कृतीसंबंधी जिज्ञासा असलेल्या सर्व प्रकारच्या वाचकांना देता येईल अशा प्रकारचा हा ग्रंथ असल्याचे आढळताच जीवराज ग्रंथमालेच्या मराठी विभागाच्या संचालकांनी या ग्रंथाचे मराठी भाषांतर प्रकाशित करण्याचा निर्णय घेतला.

प्रथम पंडितजींची त्यासाठी परवानगी मिळविण्यांत आली. त्यांनी ती उदारतेने दिली, त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. तसेच हिंदी ग्रंथ प्रकाशन भा. दि. जैन संघ, मथुरा कडूनहि औदार्यपूर्वक ग्रंथाचा मराठी अनुवाद करण्यास परवानगी मिळाली याबद्दल दक्षिणेचा हा संघ उत्तरेच्या संघाचा आभारी आहे.

त्यानंतर हे महत्वाचे पण जबाबदारीचें काम पार पाडण्यासाठी योग्य व्यक्तीचा शोध करण्यांत आला. कारंजा म. ब्र. आश्रमचे प्रमुख कार्यकर्ते श्री. प्रेमचंद देवचंद शहा, एम्. ए एल्.एल्. बी. साहित्याचार्य ह्यांनी ती जबाबदारी पत्करून ते कार्य पूर्ण केले त्याबद्दल संस्था त्यांची ऋणी आहे. तसेच ग्रंथमालेचे श्रेष्ठ आणि ज्येष्ठ संपादक विद्वद्वर्य प्रा. डॉ. ए. एन्. उपाध्ये ह्यांनी वेळोवेळीं मार्गदर्शन केले आहे त्यांचेहि मी अंतःकरणपूर्वक आभार मानीत आहें.

जैनधर्म किंवा संस्कृतीसंबंधाने आजपर्यंत अनेक अजैन पाश्चात्य व पौर्वात्य तथाकथित विद्वानांनी एवं उच्च पदवी-विभूषितांनी अनेक

ठिकाणी जे कांही लिहून ठेवले आहे तें बहुभाग चुकीचेंच लिहिले आहे ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे.

जाणतां किंवा अजाणतां जें काही लिहिलें गेले ते न्यून अति-रिक्त, विपरीत इत्यादि दोषांनी ठासून भरलेलें आहे. हीच पुस्तके शाळा कॉलेजमधून पाठ्यपुस्तकें म्हणून शिकविलीं जातात व आधीच असलेले गैरसमज अधिक वाढीस लागतात. त्यामुळे परस्पर द्वेष आणि कलह निर्माण होतात.

सर्व धर्मांना एकाच काळीं आपआपल्या स्वतंत्र अस्तित्वाने व वैशिष्टयाने एकाच स्थळीं समाविष्ट करून गुण्यागोविंदाने नांदविण्याचें वैशिष्टय भारतीय संस्कृतींत आहे ह्याची साक्ष इतिहास देत आहे. ह्यामुळेच आज आपण एकमेकांना संपूर्ण रीतीने नीट समजून घेणें है या पूर्वीच्या कोणत्याहि काळापेक्षा अधिकच आवश्यक झालें आहे.

ह्या दृष्टीने जैनसंस्कृति संरक्षक संघाचा हा उपक्रम जैन अजैन वाचकांना, अभ्यासकांना, इतिहासज्ञांना व पाठ्यपुस्तकलेखना उपयुक्त ठरेल अशी आशा आहे.

मंत्री

वालचंद देवचंद शहा

य

# मूळ लेखकाचे दोन शब्द

वास्तविक पाहतां जैनधर्माचें साहित्य विपुल आहे. परंतु जें ( एकच ) पुस्तक वाचलें असतां सर्वसामान्य लोकांस जैन धर्माचा परिचय होऊं शकेल अशा पुस्तकाची उणीव भासत होती. याचा अनुभव सर्वांनाच येत होता. ( विशेषतः ) उज्जैनचे श्रीमान् शेठ लालचंदजी सेठी यांनी असें पुस्तक लिहिणाऱ्याला एक हजार रु. चें पारितोषिक देण्याची घोषणा स्वतःहूनच केलेली होती. अशा प्रकारची ( जैनधर्मात भासणाऱ्या वाङ्मयाची ) उणीव मलाहि डांचत होती. त्यामुळे या गोष्टीकडे मीं लक्ष लावलें व त्याचेंच फळ म्हणजे हे पुस्तक होय.

प्रत्येक धर्माची दोन रूपें असतात. एक विचारात्मक व दुसरा आचारात्मक. प्रथम रूपास "दर्शन" म्हणतात; तर दुसऱ्या रूपास "धर्म" म्हणतात. दार्शनिक स्वरूपाचा अभ्यास करणाऱ्यास या दोन्हीं स्वरूपांची माहिती असणे आवश्यक आहे. म्हणूनच या पुस्तकांत जैनधर्माचें तत्त्वज्ञान व आचार यांची माहिती तर दिलेली आहेच; पण त्याबरोबरच साहित्य, इतिहास, पंथभेद, पर्व, तीर्थक्षेत्र इ. समजून घेण्यायोग्य इतर बाबींचीहि माहिती दिली आहे, त्यामुळे हे पुस्तक वाचल्याने वाचकांस जैनधर्मासंबंधीच्या सर्व अंगोपांगांचे साधारण ज्ञान होऊं शकेल व त्यासाठी त्यास इकडे तिकडे भटकण्याची जरूरी नाही. या पुस्तकांत जैनधर्माशी संबंध असलेल्या ज्या विषयांची चर्चा केली आहे तें सर्वच विषय सर्व लोकांना आवडतील हें शक्य नाही; कारण "भिन्नरुचिर्हि लोकः म्हणूनच निरनिराळ्या आवडीच्या लोकांना त्यांच्या त्यांच्या आवडीनुसार जैनधर्माची माहिती प्राप्त होऊं शकेल अशाप्रकारचा प्रयत्न यांत केला आहे.

भारतीय विद्वानांची सर्व साधारणतः अशी समजूत आहे की,

भारतातील प्रचलित प्रत्येक धर्माचे मूळ उपनिषद आहे. आमच्या कल्पनेप्रमाणे अशा प्रकारचें आग्रही मत होण्यात श्रद्धामूलक विचार-परंपरेचेच प्राधान्य जास्त अनुभवास येतें. या पुस्तकाच्या शेवटी जैन-धर्माशी इतर धर्मांची तुलना करीत असतांना या विचारसरणीची आलोचना आम्ही केलेली आहेच तत्त्वजिज्ञासूंना आमची साग्रह विनंति आहे कीं या विचार-परंपरेवर नव्या दृष्टीने विचार करून तत्त्वाचें स्वरूप समजून घ्यावे.

श्री संपूर्णानंद यांची विद्वत्ता व अध्ययन-शीलता ह्या गुणांमुळे त्यांच्यावर माझी गाढ श्रद्धा आहे. त्यांनी या पुस्तकांचें प्राक्कथन लिहावे अशी माझी इच्छा होती. धर्मबंधु प्रा. खुशालचंदजी जैन यांच्या जवळ मी ही इच्छा प्रगट केली व उत्तर प्रदेशच्या मंत्री-पदाचा भार सांभाळत असतांनाहि त्यांनीं माझी ही प्रार्थना मान्य केली. ह्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

हे पुस्तक लिहिण्यांत ज्या ग्रंथांची व मासिक पत्रकें, साप्ताहिकें, पाक्षिकें इ. वर्तमान पत्रांची आम्हांस विशेष मदत झाली त्या सर्व लेखकांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांतल्या त्यांत प्रो. ग्लेजनप ह्यांच्या "जैनधर्म" या पुस्तकाची आम्हांस बरीच मदत झाली. त्या पुस्तकाचे निरीक्षण करूनच या पुस्तकाची अनुक्रमणिका तयार केली आहे. श्रीयुत नाथूरामजी प्रेमी ह्यांच्या "जैनसाहित्य और इतिहास" ह्या पुस्तकाचा "संप्रदाय-पंथ" हें प्रकरण लिहतांना विशेष उपयोग झाला. "जैनहितैषी" च्या एका जुन्या अंकांत जगत्-कर्तृत्वाबाबत स्व. बाबू सूरजभानु वकील ह्यांचा एक लेख प्रकाशित झाला होता. तो मला फारच आवडला. ह्या पुस्तकांतील "हें विश्व व त्याची व्यवस्था" हें प्रकरण त्याच्याच आधारावर लिहिलें आहे, ह्या बद्दल त्या सर्व अधिकारी लेखकांचा मी आभारी आहे,

शेवटी वाचकांना अशी विनंति आहे की, ह्या पुस्तकासंबंधी कांही सूचना करावयाची असेल तर ती अवश्य करावी. दुसऱ्या आवृत्तीत त्याचा शक्यतो उपयोग केला जाऊ शकेल.

श्रुतपंचमी
वीरनिर्वाण संवत् २४७४ } कैलाशचंद्र शास्त्री

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना –

ज्यावेळी मीं 'जैनधर्म' पुस्तक लिहून समाप्त केलें, त्यावेळी मला स्वप्नांतहि अशी कल्पना नव्हती की. ह्या पुस्तकाचा इतका बहुमान होईल व अवघ्या सहा महिन्यांतच ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति प्रकाशित करावी लागेल.

पुष्कळशा वर्तमान पत्रांनी, मासिकांनी व प्रतिष्ठित विद्वानांनी याची मुक्तकंठाने स्तुति केली आहे. ज्या ज्या वाचकांनी हें पुस्तक वाचलें त्यांनी प्रत्यक्ष किंवा परोक्ष ह्या पुस्तकाची प्रशंसा केली नाही असा वाचक विरळाच असेल.

काशी हिन्दु विश्व-विद्यालयासारख्या सुप्रसिद्ध शिक्षण संस्थेने 'दर्शन शास्त्र' विषयाच्या बी. ए. ( ऑनर्स ) चा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी हे पुस्तक नियुक्त केले आहे. जैन कॉलेज बडौत इ. अनेक महाविद्यालयें व शाळांनी जैनधर्माच्या अभ्यासाठी आपल्या पाठ्य-क्रमांत ह्या पुस्तकास स्थान दिले आहे. ह्याप्रमाणे शैक्षणिक क्षेत्रांतहि ह्या पुस्तकास स्थान व प्रसिद्धि मिळाली आहे.

उज्जैनचे साहित्य-प्रेमी श्रीमान् शेठ लालचंदजी सेठी यांनी ७५० रु. चा पुरस्कार देऊन लेखकाचा बहुमान केला आहे. अनेक विद्वान वाचकांनी आपआपल्या कांही उपयुक्त सूचना केल्या त्यांस

अनुसरून ह्या दुसऱ्या आवृत्तीत कांही फेरफार व वाढ करून ह्या आवृत्तीत "जैनकला व पुरातत्त्व" व "जैनाचार्य" ही दोन प्रकरणें घातलेली आहेत. तसेच शेवटी जैन पारिभाषिक शब्दांचे एक परिशिष्टहि जोडले आहे. पहिले प्रकरण लिहिण्यांत मुनिश्री कांतिसागरजी ह्यांचे विशेष सहाय्य झाले आहे.

ज्या महाशयांनी ह्याप्रकारे माझा उत्साह वाढविला त्या सर्वांचे मी हार्दिक आभार मानतो.

आश्विन – २००६ } विनीत – लेखक

## तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

'जैनधर्म' ह्या पुस्तकाची तिसरी आवृत्ति वाचकांना सादर करीत आहोत. गेल्या एका वर्षापासून ह्या पुस्तकाच्या प्रती संपल्या होत्या. वाचकांचें व पुस्तकविक्रेत्याचे तगादे सारखे लागलेले होते. पुस्तकाचे प्रकाशन सुरूं होतांच पुस्तकाची वाढती तातडीची मागणी सुरूं झालेली होती. ह्यावरून वाचकांना हे पुस्तक किती आवडले हे सहज समजू शकेल. अ. भा. राजस्थान जैन संघाने अशी एक सूचना पाठविली होती की, " जैनधर्मक्षात्रधर्म–वीरधर्म आहे, अशा प्रकारचे क्षत्रिय लोकांना अत्यंत आकर्षक होईल असे एक प्रकरण लिहिले जावे.' व पुस्तकांचे नांव '**जैनधर्म (क्षात्रधर्म-भारताचा सार्वलौकिक सनातन आत्मधर्म**' असें असावे. त्यास अनुसरून या आवृत्तीत 'काही जैनवीर' हे नवीन प्रकरण घातले आहे. पुस्तकाचे नांव बदलणें इष्ट वाटले नाही, कारण त्यांत अहंकाराची उबग वाटली.

ह्या आवृत्तीत दुसऱ्याहि काहीं सुधारणा केल्या आहेत. इतिहास

विभाग पुनः व्यवस्थित लिहिला आहे व त्यांत 'कालाचूरि राज्यांतील जैनधर्म' व 'विजयनगर राज्यांतील जैनधर्म' ही दोन प्रकरणें नवीन घातली आहेत. पूर्वीच्या आवृत्तीतील 'विविध' प्रकरण बदलून त्या ऐवजी 'सामाजिक स्वरूप' हे प्रकरण या आवृत्तीत घातले आहे. तसेच 'स्थानकवासी संप्रदाय' व 'मूर्तिपूजाविरोधी तेरापंथी संप्रदाय' ही दोन प्रकरणे पुनः लिहिली आहेत. कारण वरील संप्रदायांच्या व्यक्तीकडून तशा प्रकारच्या सूचना आल्या होत्या. वरील सर्व सुधारणांमुळे ही आवृत्ति पूर्वीच्या आवृत्तीपेक्षाहि अधिक उपयुक्त ठरेल अशी अपेक्षा आहे.

का. कृ. ११ }
२०११ }

विनीत
लेखक

# प्राक्कथन.

मी जैनधर्माचा अनुयायी नाही, त्यामुळें ज्यावेळी श्री. पं. कैलाशचंद्रजी जैन यानी प्रस्तुत जैनधर्म ग्रंथाचे प्राक्कथन लिहिण्यासाठी म्हटले त्यावेळी मला संकोच वाटला. परंतु ग्रंथ वाचून पूर्ण केल्यावर मात्र तो संकोच आपोआप दूर झाला. हा ग्रंथ असा आहे की, ज्याचे प्राक्कथन लिहितांना मला स्वतःला प्रसन्नतेचे अनुभवन होत आहे. हा ग्रंथ आकाराने एकूण लहान असूनहि यामध्ये जैनधर्मासंबंधीच्या मुख्य मुख्य सर्वच बाबींना समावेश केला गेला आहे. अशा ग्रंथामध्ये आप-आपल्या मतांच्या समर्थनाबरोबरच कांही कांही ठिकाणी परमतामधील दोष दाखविणे जवळ जवळ अपरिहार्य होते. किमानपक्षी स्वतःच्या मतांची आलोचना करणाऱ्या आलोचकांची समीक्षा करावीच लागते. प्रस्तुत ग्रंथामध्ये स्याद्वाद सिद्धांतासंबंधी ग्रंथलेखकाच्या अभिप्रायानुसार आंकलन करण्यामध्ये श्रीमत् शंकराचार्य यांनी जी अन्यथा धारणा केली त्याबद्दल लेखकाने निर्देश केला आहे, परंतु असे उल्लेख करतांना कुठेहि शिष्टसंप्रदायाचे उल्लंघन केलेले नाही. अलीकडे आम्ही भारतीय या बाबतींत हे जवळ जवळ विसरलो आहोत की, गंभीर विषयाच्या प्रतिपादनसमयी अभद्र भाषेचा प्रयोग निंद्य आहे व सिद्धांताचे खण्डन सिद्धांताच्या प्रतिपादकावर चिखल न उडविता केले जाऊ शकते. हा ग्रंथ या बाबतीत एक अनुकरणीय अपवाद आहे.

भारतीय संस्कृतीच्या संवर्धनामध्ये त्या महाभागांनी आपला उल्लेखनीय वाटा उचलला आहे की, ज्यांना जैन शास्त्रांपासून स्फूर्ति मिळालेली होती. वास्तुकला, मूर्तिकला, साहित्य इत्यादि सर्वांवरच जैन विचारसरणीची खोलवर छाप पडलेली आहे. जैन विद्वान् आणि श्राव-कानी ज्या प्राणपणाने आपल्या शास्त्रनिधीचे संरक्षण केले ती आमच्या

इतिहासाची अमरकथा आहे. अतएव जैन विचार-प्रणालीचा खराखुरा परिचय सुशिक्षित वर्गात व्हावयास पाहिजेच काही बाबी अशा आहेत की, ज्यामध्ये जैनाना स्वाभाविकच विशेष आवड असेल. दिगंबर-श्वेतांबर मतमतांतरांत सर्वांना रुचि असू शकत नाही तसेच खानपानादिकांच्या व व्रतादिकांच्या नियमोपनियमाविषयी सांगोपांग माहितीची सर्वांना सारखीच आवश्यकता भासेल असेहि नाही. परंतु जे लोक धर्म दर्शनाचे अध्ययन करतात; त्यांनी या बाबतीत माहिती करून घेणे आवश्यक आहे की आत्मा, परमात्मा, विश्व, मोक्ष इत्यादी महत्वाच्या प्रश्नांबाबत जैनाचार्यांनी काय सांगितले आहे. विशेष मूलग्राही व विस्तृत अध्ययनासाठी तर मोठ्या मूळ ग्रंथाचे आलोढन करावेच लागेल. परंतु प्रारंभिक ज्ञानासाठी हा लहानसा ग्रंथ अत्यंत उपयोगी असाच आहे.

जैनदर्शन हे 'जगत्' सत्य मानते. ही बाब शांकर अद्वैतवादाच्या विरूद्ध असली तरी आस्तिक विचारप्रवाहाशी विसंगत नाही त्याचे अनीश्वरवादी असणे यात मूलतः दोषास्पद असें काही नाही. परम आस्तिक सांख्य व मीमांसा-शास्त्राच्या प्रवर्तकाना सुद्धा ईश्वराची सत्ता स्वीकार करणें हे अनावश्यक असल्यासारखे वाटते. वेदांना प्रमाण न मानल्यामुळे जैनदर्शनाची गणना नास्तिक-विचार-शास्त्रांमध्ये केली गेली आहे. परंतु कर्मसिद्धांत, पुनर्जन्म, तपश्चरण, योग, देवादि वादांत विश्वास व इतरहि कित्येक बाबी अशा आहेत की, ज्या थोड्याफार फरकाने भारतीय आस्तिक दर्शन व जैन आणि बौद्ध दर्शन यांची समान वैचारिक संपत्ति आहे. या सर्वांचा मूळ स्त्रोत एकच आहे आर्य जमातीला आपल्या मूळ पूर्वजापासून जी आध्यात्मिक विचारसरणीची पैतृक संपत्ति प्राप्त झाली होती ती प्रथमतः उपनिषदांमध्ये प्रगट झाली व पुढे देशकालभेदपरत्वें किंचित् नवें रूप धारण करून तीच वस्तु

भगवान् महावीर आणि गौतमांच्या द्वारे आमच्या पुढे आली आहे.

अनेकांतवाद अथवा सप्तभंगीन्याय हा जैनदर्शनाचा मुख्य सिद्धांत आहे. प्रत्येक वस्तुमात्राचे जे सात 'अन्त' अथवा स्वरूप जैनशास्त्रांमध्ये सांगितले गेले आहेत त्यांना त्याच रूपामध्ये स्वीकार करण्यांत आपत्ति उभी होऊ शकते. कांही विद्वान् सुद्धा सातांपैकी कांही धर्मांना गौण मानतात. सर्वसाधारण श्रेणीच्या मनुष्याच्या लक्षांत ही बाब उतरणें कठीण आहे की, एकाच पदार्थाच्या ठायीं एकाच वेळी 'ती आहेहि' आणि 'ती नाहीहि' या दोन परस्पर विरूद्ध धर्मांची सत्ता आहे हे कसे म्हणता येईल. परंतु ही बाब सकृद्दर्शनी कठीण वाटली तरी वस्तु–स्थिति मात्र अशीच आहे. जी लेखणी माझ्या हातामध्ये आहे ती टेबलावर नाही. ज्या बालकाचे अस्तित्व आज आहे त्याचे अस्तित्व काल नव्हते, जी वस्तु पुस्तकरूपानें आहे ती खुर्चीरूपाने नाही. जी एक विवक्षित घटना कुणा एकासाठी भूतकालिक आहे ती दुसऱ्यासाठी वर्तमान-कालीन व तिसऱ्यासाठी भविष्यकालीन आहे. अखण्ड ब्रह्म ही वस्तु एक-रस व एकान्तिक असो! परंतु अनुभवामध्ये येणाऱ्या विश्वामध्ये संपूर्ण पदार्थ मग तो कितीहि सूक्ष्म असो–एकान्तिक नाही, अनैकान्तिक आहे. शंकराचार्यजींनी या वस्तुस्वरूपाला स्वीकार केले नाही. त्यामुळे मायेला त्यांनी सत् व असत् या स्वरुपाहून वेगळी व विलक्षण तसेच अनिर्वचनीया असे म्हटले आहे. व्यक्तिशः मी सप्तभंगी न्यायास केसाच्याहि सूक्ष्मविश्लेषणाप्रमाणें आवश्यकतेपेक्षाहि अधिक खोली-मात्र स्वीकार करतो म्हणून चिद्विलासमध्ये मी मायेला सत् असत्-स्वरूप एवं अनिर्वचनीया मानले आहे.

असो ! सर्व लोक या प्रश्नांच्या तळाला पोहोचण्याची इच्छा करणारहि नाहीत. तथापि मी अशी आशा करतो की, ते या सरळ

सुबोध व उपादेयस्वरूप ग्रंथाचा आदरच करतील. अशा ग्रंथरचना आम्हांस परस्परांना एक दुस-याच्या जवळ आणतात -अशीहि एक वेळ होती की, 'हस्तिना पीडचमानोऽपि न विशेज्जैनमंदिरम् ।' सारखा वाक्प्रयोग बाहेर पडे. जैनामध्ये सुद्धा या प्रकारचे वाक्प्रयोग रूढ झाले असतील परंतु आज ते दिवस गेले. काळाचा पडदा पडला आहे आज आम्हाला दार्शनिक व उपासनासंबंधी बाबतीत विचारविभेद ठेवूनहि परस्पराविषयी खरे मित्रत्वाचे नाते कायम ठेवावयाचे आहे.

आपआपल्या दृष्टीला अनुसरून आम्ही वाटेल त्या संप्रदायांमध्ये असूं परंतु आम्हाला ही बाब नेहमीच दृष्टिसमोर ठेवावी लागणार आहे की, कपिल, व्यास, शंकराचार्य, वुद्ध व वर्धमान महावीर प्रत्येक भारतीयास आदरणीय आहेत. तसेच या सर्वांच्या जीवनापासून आम्हास तो धडा मिळतो की, जो आमच्या चारित्र्याला वर उचलून घेण्यासाठी व परमार्थाच्या-निश्रेयसाच्या मार्गावर घेऊन जाण्यासाठी समर्थ आहे.

वैशाख शु. १
२००५

संपूर्णानंद

# अनुक्रमणिका

※

# जैनांचा मूल मंत्र.

**णमो अरिहंताणं, णमो सिद्धाणं, णमो आइरियाणं ।**
**णमो उवज्झायाणं, णमो लोए सव्व साहूणं ॥**

अर्हंतांना नमस्कार, सिद्धांना नमस्कार, आचार्यांना
नमस्कार, उपाध्यायांना नमस्कार लोकांतील
सर्व साधूंना नमस्कार

मंत्र माहात्म्य.

**एसो पंच णमुक्कारो, सव्व पावप्पणासणो ।**
**मंगलाणं च सव्वेसिं, पढमं हवइ मंगलं ॥**

हा पंच नमस्कार मंत्र सर्व पापाचा नाश
करणारा आहे व सर्व मंगलामध्ये
आदि—मंगल आहे.



ॐ नमः सिद्धेभ्यः ।

# जैनधर्म

## १ इतिहास

### १ – प्रारंभ

असाहि एक काळ होता की, जेव्हा जैनधर्म हा बौद्धधर्माची शाखा आहे अशी समजूत दृढ झालेली होती. परंतु ही गैरसमजूत आता नाहीशी झालेली आहे. जैनधर्म हा बौद्धधर्माहून वेगळा व स्वतंत्र तर आहेच पण तो त्याहूनहि प्राचीन[1] आहे, हे आता नवीन संशोधनांच्या

---

१ हा गैरसमज नाहीसा करण्याचे श्रेय, स्व. डॉ. हर्मन याकोबी याना आहे. त्यांनी आपल्या जैनसूत्रांच्या प्रस्तावनेत याबद्दल बराच सविस्तर विचार केला आहे. ते लिहितात 'ह्या मताशी आता सर्वजण सहमत आहेत की, जे महावीर किंवा वर्धमान, या नांवाने प्रसिद्ध आहेत ते 'नातपुत्त' असून बुद्धसमकालीन होते. ज्यांना 'अर्हत' किंवा 'जैन' समजले जाई; अशा निर्ग्रंथांचे अस्तित्व नातपुत्तांच्याहि अगोदर होते, ही गोष्ट बुद्ध ग्रंथांतून मिळणाऱ्या पुराव्यावरून अधिक दृढ होते. बौद्ध धर्माच्या उत्पत्तीच्या वेळी निर्ग्रंथ संप्रदाय हा मोठा (प्रभावशाली) संप्रदाय समजला जात असावा. बौद्धपिटकांत कांही निर्ग्रंथ, बुद्ध व त्यांच्या शिष्यांशी विरोध करीत असलेले व कांही बुद्धाचे अनुयायी झाल्याचे लिहिले आहे. त्यावरून वरील अनुमान आपणास करता येते. या उलट निर्ग्रंथ संप्रदाय हा नवीन संप्रदाय आहे आणि नातपुत्त हे या संप्रदायाचे संस्थापक आहेत, असा उल्लेख किंवा असे एखादे सूचक वाक्य या ग्रंथात कोठेच आढळत नाही. यावरून आपणास हे अनुमान करता येते की, बुद्धाचा जन्म होण्याच्या अगोदरच अतिप्राचीन काळापासून निर्ग्रंथांचे अस्तित्व होते.

आधारे सिद्ध झालेले आहे. (जैनधर्माचे) शेवटचे तीर्थंकर भ० महावीर यांना आता जैनधर्माचे संस्थापक म्हणून समजले जात नाही. त्यांच्या अगोदर २५० वर्षे होऊन गेलेले भ० पार्श्वनाथ हे ऐतिहासिक थोर पुरुष असल्याचे आता सर्वमान्य झाले आहे.

याप्रमाणे जैनधर्माचा प्रारंभकाल[1] निश्चितपणे इ. स.पू. ८००वर्षे मानला गेला आहे. परंतु भ० पार्श्वनाथांना जैनधर्माचे संस्थापक मानणारे जसे कांही विद्वान् आहेत, त्याचप्रमाणे त्यांच्या अगोदरहि जैनधर्माचे अस्तित्व मानणारे कांही विद्वान् आहेतच. उदा. या बाबतीत स्व. जर्मन डॉ. हर्मन याकोबी आणि सुप्रसिद्ध भारतीय तत्त्वज्ञानी श्री. डॉ. राधाकृष्णन् यांची मते उल्लेखनीय आहेत.डॉ.याकोबी[2] लिहितात"याला

---

१ उत्तराध्ययन सूत्रांच्या प्राक्कथनांत डॉ.चार्पेंटर लिहितात-(या गोष्टीचे) " आपणांस स्मरण राहिले पाहिजे की, जैनधर्म भ. महावीराहूनहि प्राचीन आहे व महावीरांचे आदरणीय पूर्वज पार्श्वनाथ निश्चितपणे वास्तविक स्वरूपांतील व्यक्ति होते. त्यामुळे जैनधर्माची मूलतत्वे भ० महावीरांच्याहि पुष्कळ अगोदर निश्चित झालेली होती."

'बिब्लोग्राफिया जैन' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत डॉ. गैरीनॉट लिहितात- " पार्श्वनाथ ऐतिहासिक पुरुष होते, यांत कांही शंका नाही. जैनांच्या (मान्यते) प्रमाणे त्यांचे आयुष्य १०० वर्षांचे होते व महावीरांच्या अगोदर २५० वर्षे ते निर्वाणास गेले आहेत. म्हणून त्यांचा कार्यकाल इ. स. पू. ८०० हा होता. महावीरांचे आईवडील पार्श्वनाथांचा धर्म पाळीत होते. "

२ There is nothing to prove that Parshva was the founder of Jainism. Jain tradition is unanimous in making Rishabha the first Tirthankar [ as its

कांहीच पुरावा नाही की, भ० पार्श्वनाथ हे जैनधर्माचे संस्थापक होते. जैन-परंपरा प्रथम तीर्थंकर भ. ऋषभनाथांना एकमताने जैनधर्माचे संस्थापक मानते. या मतात ऐतिहासिक सत्य असण्याची शक्यता आहे." श्री. डॉ. राधाकृष्णन विशेष जोर देऊन लिहितात[1] की, "जैनपरंपरा कित्येक शतकांपूर्वी होऊन गेलेल्या ऋषभदेवापासून आपल्या धर्माची उत्पत्ति झाल्याचे सांगते व ही गोष्ट कित्येक शतकापूर्वीची आहे. इ. स. पूर्वी पहिल्या शतकात प्रथम तीर्थंकर भ०ऋषभदेवांची पूजा होत असे,या गोष्टीचे पुरावे मिळतात. जैनधर्म हा वर्धमान आणि पार्श्वनाथ यांच्या पूर्वीहि प्रचलित होता, यांत कांहीच शंका नाही. यजुर्वेदांत ऋषभदेव, अजितनाथ व अरिष्टनेमी या तीन तीर्थंकरांचा नामोल्लेख आहे. ऋषभदेव जैनधर्माचे संस्थापक होते या गोष्टीस भागवत पुराणांतूनहि पुष्टी मिळते."

वरील दोन मतांवरून ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होते कीं, भ. पार्श्वनाथहि जैनधर्माचे संस्थापक नव्हते तर जैनधर्म त्यांच्याहि अगोदर

---

founder ]. There may be something historical in the tradition which makes him the first Tirthankar :- **Indian Antiquary** Vol. IX P: 163

१ There is evidence to show that so far back as the first century B. C. there were people who were worshipping Rishabhadeva, the first Tirthankara There is no doubt that Jainism prevailed even before Vardhamana or Parsvanath. The Yajurveda mentions the names of three Tirthankars- Rishabha, Ajitnath, and Arishtanemi. The Bhagavata Puran endorses the view that Rishabha was the founder of Jainism- **Indian Philosophy**. Vol. I. P. 287.

प्रचलित होता. त्याचप्रमाणे जैनमान्यतेप्रमाणे भ० ऋषभदेव हे पहिले तीर्थंकर होते आणि जैनेतर साहित्य व उपलब्ध ऐतिहासिक पुराव्यां-वरूनहि ही गोष्ट पूर्ण सिद्ध होते. हीच गोष्ट अधिक स्पष्टपणे पुढे देत आहोत.

## ◆ जैन-परंपरा ◆

जैनमताप्रमाणे या दृश्य जगांत कालचक्र सतत फिरत असते. कालाचा प्रवाह अनादि व अनंत आहे. तथापि या कालचक्राचे ६ भाग आहेत. १ अतिसुखरूप (सुषमा-सुषमा) २ सुखरूप (सुषमा) ३ सुख-दुःखरूप (सुषमा-दुषमा) ४ दुःख-सुखरूप (दुषमा-सुषमा) ५ दुःख रूप (दुषमा) ६ अतिदुःखरूप ( दुषमा-दुषमा ) ज्याप्रमाणे चालू लागलेल्या गाडीच्या चाकाचा प्रत्येक भाग खालून वर व वरून खाली जातो त्याचप्रमाणें कालाचे सहा भाग क्रमाक्रमाने सारखे फिरत असतात. म्हणजेच एकदा हे विश्व (कालचक्र) सुखाकडून दुःखाकडे जाते; तर दुसऱ्या वेळी दुःखाकडून सुखाकडे चढते. सुखाकडून दुःखाकडे कालचक्र फिरत असतांना त्याला ' अवसर्पिणी ' अथवा अवनतिकाल म्हणतात व दुःखा-कडून सुखाकडे कालचक्र फिरत असतांना त्या कालावधीस ' उत्सर्पिणी' अगर विकास काल म्हणतात. हा दोन्ही कालचक्रांचा अवधि लाखो-करोडो वर्षांहूनहि अधिक आहे. प्रत्येक अवसर्पिणी किंवा उत्सर्पिणी कालाच्या दुःखसुखरूपभागांत (दुखमा-सुषमा नांवाच्या कालखंडात) २४ तीर्थंकरांचा जन्म होतो. महापुरुष 'जिन' अवस्थेला प्राप्त होऊन जैनधर्माचा उपदेश देतात, म्हणून त्यांना ' तीर्थंकर ' अशी संज्ञा आहे. सध्या कालचक्राचा अवनतिमय ' अवसर्पिणी ' काल सुरू असून आतापर्यंत त्याचे सुरवातीचे चार कालखंड होऊन गेले आहेत व सध्या पांचवा कालखंड चालू आहे. चवथा विभाग संपला असल्यामुळे आता

या कालखण्डांत (उत्सर्पिणीचा तिसरा कालखंड येईपर्यंत) कोणीहि तीर्थकर होणार नाही. या युगांतील कालचक्रांत झालेल्या) २४ तीर्थकरांपैकी भ० ऋषभदेव पहिले व भ० महावीर हे शेवटचे तीर्थकार होते. तिसऱ्या कालविभागास जेव्हा तीन वर्ष ८॥ महिने बाकी राहिले तेव्हा भ० ऋषभदेवांचा निर्वाण झाला व चौथ्या कालविभागांत जेव्हा तेवढाच काल शिल्लक राहिला, तेव्हा भ. महावीर निर्वाणास गेले. या दोन्हीचा मध्यकाल एक कोडा कोडी सागर सांगितला (समजला) जातो. याप्रमाणे जैनपरंपरेला अनुसरून या युगांत जैनधर्माचे प्रथम प्रवर्तक भ. ऋषभदेव होते. प्राचीनांतल्या प्राचीन जैनशास्त्रांचेहि याबाबतीत एकमत असून त्यांत भ. ऋषभदेवांचे जीवन–चरित्र अत्यंत विस्तारानें वर्णिलें आहे.

## ◆ जैनेतर साहित्य ◆

जैनेतर साहित्यांत श्रीमद्भागवताचे नांव उल्लेखनीय आहे. त्याच्या पांचव्या स्कंधांत अध्याय २।६ मध्ये ऋषभदेवांचे सुंदर वर्णन आहे व ते जैनसाहित्यांतील वर्णनाशी कांही प्रमाणात (बरेंचसे) मिळते जुळते आहे. त्यांत लिहिले आहे की, "मनुष्यसंख्या वाढली नाही, असे पाहून ब्रह्मांने स्वयंभू मनु व सत्यरूपा यांना उत्पन्न केले. त्यापासून त्यांना प्रियव्रत नांवाचा मुलगा झाला. प्रियव्रताला अग्नीध्र हा मुलगा झाला. अग्नीध्राच्या येथे नाभीचा जन्म झाला. नाभीचा मरुदेवीशी विवाह झाला नाभी व मरूदेवी पासून ऋषभदेव जन्माला आले. 'ऋषभदेवांना' इंद्राने दिलेल्या 'जयंति' नांवाच्या पत्नीपासून शंभर मुले झाली व मोठा मुलगा 'भरत' याचा राज्याभिषेक करवून त्यांनी स्वतः संन्यास (दीक्षा) घेतला. त्यावेळी शरीराशिवाय दुसरा कोणताहि परिग्रह त्यांच्याजवळ नव्हता व ते दिगंबर (नग्न) स्वरूपांत विहार करीत होते. मौनाने

राहात होते. कोणी भिवविले, मारले, थुंकले, दगड फेकले अगर मल-मूत्रहि टाकले, तरी तिकडे त्यांचे लक्ष नसे. हे शरीर म्हणजे अमंगल पदार्थाचे माहेर घर असे समजून अहंभाव, व ममताभावाचा त्याग करून ते एकाकीच विहार करीत असत. कामदेवासारखे अति सुंदर असलेले त्यांचे शरीर बरेच मलीन झाले होते, त्यांचे क्रियाकर्म व तप-श्चरण अत्यंत उग्र होते. शरीरादिकांचे सुख सोडून त्यांनी 'आजगर' नांवाचे कठीण व्रत स्वीकारले होते. याप्रमाणे कैवल्यपति भ. ऋषभदेव निरंतर परमानंदाचा अनुभव घेत घेत कौंक, वेंक, कुटक, द. कर्नाटक इ. देशांत विहार करून कुटकाचल पर्वताच्या उपवनांत उन्मनी पुरुषा-प्रमाणे नग्न दिगंबर होऊन तपश्चर्या करूं लागले. या जंगलांत वांबूंच्या घर्षणाने आग लागली व त्यांचे शरीर त्यांतच भस्म झाले."

याप्रमाणे ऋषभदेवांचे वर्णन करून भागवतकार पुढे लिहतात[1]-"या ऋषभदेवांचे चरित्र ऐकून कोंक, वेंक, कुटक इ. देशांचा राजा अर्हन् त्यांच्या उपदेशाने कलियुगांत जेव्हा अधर्म पुष्कळ माजेल, तेव्हा स्वधर्म सोडून कुमार्गी पाखंड मताचा (जैनधर्माचा) प्रचार करील. तुच्छ मानव मायेने विमोहित होऊन व शुद्ध आचार सोडून ईश्वराची अवज्ञा करणारी व्रते धारण करतील. स्नान वा आचमन कांहीहि करणार नाहीत. ब्रह्म,

१ "यस्य किलानुचरितमुपाकर्ण्य कोङ्कवेङ्ककुटकानां राजा अर्हन्नामोपशिक्ष्य कलावधर्मे उत्कृष्यमाणे भवितव्येन विमोहितः स्वधर्मपथमकुतोभयमपहाय कुपथपाखण्डमसमंजसं निजमनीषया मन्दः सम्प्रवर्तयिष्यते ॥९॥ येन वाव कलौ मनुजापसदा देवमायामोहिताः स्वविधिनियोगशौच-चारित्रविहीना देवहेलना-न्यपव्रतानि निजेच्छया गृण्हाना अस्नानाचमनशौचकेशोल्लुंचनादीनि कलिनाऽ-धर्मबहुलेनोपहतधियो ब्रह्म-ब्राह्मण-यज्ञ-पुरुषलोकविदूषकाः प्रायेण भविष्यन्ति॥१० ते च ह्यर्वाक्तनया निजलोकयात्रयाऽन्धपरम्परया श्वस्ताः तमस्यन्धे स्वयमेव पतिष्यन्ति। अयमवतारो रजसोपप्लुतकैवल्योपशिक्षणार्थः॥" स्क. ५, अ. ६ ॥

ब्राह्मण, यज्ञ असल्या गोष्टींचे निंदक वाढतील व वेदविरूद्ध आचरण करून नरकांत पडतील. हा ऋषभावतार रजोगुणयुक्त मनुष्यांना मोक्ष-मार्ग शिकविण्यासाठी झाला."

श्रीमद्भागवतांतील वरील माहितीतला धार्मिक विरोधामुळे लिहिलेला भाग गाळला तर त्यांतून एक गोष्ट निश्चित ध्वनित होते की, ऋषभदेवांनीच जैनधर्माचा उपदेश केला होता. कारण जैन तीर्थंकरांनाच केवलज्ञान प्राप्त झाल्यावर 'जिन' 'अर्हत्' अशी नांवें पडलीं आणि या अवस्थेंतूनच ते धर्मोपदेश करीत असल्यामुळे, त्या अवस्थेवरूनच त्यांच्या उपदेशास ' जैनधर्म ' किंवा ' आर्हतधर्म ' हीं नांवें पडलींत. अशीहि शक्यता आहे की, दक्षिणेंत जैनधर्माचा अधिक प्रचार पाहून भागवत–कारांनी वरील कपोल कल्पित कल्पना केली असावी. सरळ त्यांनी ऋषभ-देवांपासूनच, जैनधर्माची उत्पत्ति सांगितली असती तर जैनधर्माबद्दल चांगले वाईट म्हणण्याची संधी त्यांना मिळाली नसती. असो! ऋषभ–देवांनी आपल्या पुत्रांना दिलेला उपदेश श्रीमत्भागवतांत दिला आहे. तोहि पुष्कळशा प्रमाणांत जैनधर्मानुकूलच आहे. त्याचा सारांश असा–

(१) हे पुत्रांनो! मनुष्य लोकांत शरीरधाऱ्यांना हें शरीर त्रास-दायक आहे. तें भोग भोगण्यासाठी नाही म्हणून दिव्य तप करा. त्यानेच अनंत सुखाची प्राप्ति होते.

(२) जो माझ्यावर प्रेम करतो, कामासक्त लोकांवर, पुत्र, मित्र कलत्रादिकांवर ममत्व ठेवीत नाही व लोकांवर गरजेला अनुसरून ( कामापुरचीच–यथायथा ) आसक्ति ठेवतो, तोच समदर्शी प्रशांत व साधू होय.

(३) जो इंद्रियांच्या तृप्तीसाठी सर्व प्रयत्न करतो त्याला चांगला (सज्जन) म्हणतां येत नाही. कारण हें शरीरसुद्धा आत्मक्लेशकारक आहे.

(४) जोपर्यंत साधु आत्मतत्त्वाला जाणीत नाही, तोपर्यंत तो अज्ञानीच आहे. (समजावा.) जोपर्यंत जीव बाह्य क्रियाकांडांतच लीन राहतो, तोपर्यंत शरीर व मन यांच्या द्वारे आत्म्यास सर्व कर्मांचा बंध होत असतो.

(५) गुणांवर लक्ष ठेऊन, व्यवहार न ठेवल्याने विद्वान् प्रमादी व अज्ञानी बनून, ऐंद्रियिक सुखप्रधान अशा निवासस्थानीं राहून, या जीवास अनेक प्रकारचे त्रास–संताप भोगावे लागतात.

(६) पुरुषांची स्त्रीसंबंधीची कामभावना हीच हृदयांतली मोठी ग्रंथी (गांठ) आहे. यामुळेच या जीवास घर, शेत, मुलेंबाळें, कुटुंब, धन इ. संबंधी मोह उत्पन्न होतो.

(७) हृदयाची अशी ग्रंथी असलेल्या या मनाचें बंधन जेव्हा ढिलें होतें, तेव्हा या जीवाची संसारापासून सुटका होऊं लागते व शेवटी तो मुक्त होतो व परमलोक (मोक्षपद) प्राप्त करतो.

(८) जेव्हा सार व असार यांतील फरक दाखविणारी आणि अज्ञानांधरकाराचा नाश करणारी अशी माझी भक्ती करतो, व (विषय) तृष्णा आणि सुखदुःखांचा त्याग करून खरें तत्त्व समजण्याची इच्छा करतो तसेच तपद्वारां सर्व प्रकाराच्या क्रियापासून निवृत्त होतो तेव्हा जीव मुक्त होतो.

(९) विषयोपभोग भोगण्याची तीव्र आसक्तीच अंधकूपा (प्रमाणे) जीवाला नरकांत टाकते.

(१०) तीव्र इच्छा निर्मिणारें व पराकोटीची कामना असलेलें व दृष्टिविरहित हें जग आपलें खरें कल्याण कशांत आहे हें ओळखत नाही.

(११) जो दुष्ट सन्मार्ग सोडून कुमार्गाने जातो, त्याला दयाळु, विद्वान् लोक कुमार्गाने जाऊं देत नाहीत.

(१२) हे पुत्रांनो! सर्व स्थावर जंगम (त्रस) जीवमात्रांना माझ्याप्रमाणेंच समजून समभावानें वागणेंच योग्य आहे.

वरील सर्व प्रकारचा उपदेश जैनधर्मास अनुसरूनच आहे. विशेपत: त्यांतील ४ क्रमांकाचा उपदेश तर विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे. यांत क्रियाकांडास कर्मबंधाचे कारण मानलें आहे. जैनधर्मानुसार, मन, वचन, कायेची प्रवृत्ति रोकल्याशिवाय कर्मबंधापासून सुटका नाही. वैदिक धर्मांत ही गोष्ट मानलेली नाही. शरीरादिकांवर ममत्व नसणे, तत्त्वज्ञानपूर्वक तप करणें. प्राणिमात्रांस आपल्यासारखे समजणे, कामवासनेच्या आहारीं न जाणें, इ. सर्व बाबी खरोखर जैनधर्मच होत. यावरून श्रीमद् भागवतानुसारहि श्री. ऋपभदेवापासूनच जैनधर्माची सुरवात झाली ही गोप्ट निश्चित ध्वनित होते. इतर हिंदुपुराणांत सुद्धा जैनधर्माच्या उत्पत्तीसंबंधी बहुधा अशाच प्रकारचें वर्णन आढळतें. भ. महावीर अगर पार्श्वनाथ यांच्यापासून जैनधर्माची उत्पत्ति दाखविणारा असा एकहि ग्रंथ अद्यापि आढळत नाहीं. बहुतेक उपलब्ध पुराणसाहित्य भ. महावीरानंतरच झालेलें आहे. तथापि त्यांत जैनधर्नाची चर्चा होत असतांना भ. महावीर किंवा पार्श्वनाथ यांचा नामोल्लेखहि आढळत नाही. यावरूनहि जैनधर्म संस्थापक या दोघांपैकी एकहि नाही, ही एक गोप्ट निश्चित होते. हें मत हिंदुधर्मास एकमताने मान्य आहे.

याशिवाय आम्हांस एक गोष्ट अशी दिसून येते की, हिंदुधर्माच्या अवतारांत इतर भारतधर्मीय पूज्य पुरुपांना अवतार म्हणून त्यांचा अंतर्भाव केला गेला आहे. इ. स. पू ६ व्या शतकांतील भ. वर्धमान समकालीन बुद्धांनाहि या अवतार–मालिकेंत स्थान आहे. पण भ महावीरांचें (वर्धमान) नांव समकालीन असूनहि त्यांत समाविप्ट नाही. याचें कारण अगदी उघड आहे. की, ते जैनधर्म संस्थापक नव्हते. हिंदुधर्मात जैनधर्म संस्थापक म्हणून मान्यता मिळालेल्या भ. ऋषभदेवांना प्रथम पासनच

८ वे अवतार म्हणून मानलें गेले आहे. बुद्धाप्रमाणे भ. महावीरहि जर जैनधर्म संस्थापक असते, तर त्यांचें नांव या अवतार नामावलींतून वगळलें गेलें नसतें. त्यांना या अवतारांत समाविष्ट न करण्याने व भ. ऋषभदेवांना ८ वा अवतार मानण्याने या गोष्टीचें समर्थन होते की, हिंदुधर्माने अतिप्राचीन काळापासून भ. ऋषभदेवांनाच जैनधर्म प्रतिष्ठापक मानलें आहे. यांच्यानंतर झालेल्या भ. अजितनाथ व अरिष्टनेमी तीर्थंकरांचा उल्लेख यजुर्वेदांत मिळतो, त्याचेंहि कारण तेंच आहे.

## ◆ ऐतिहासिक सामुग्री ◆

याप्रमाणे जैन व जैनेतर साहित्यावरून भ. ऋषभदेवच जैनधर्माचे मुख्यप्रवर्तक होते, ही गोष्ट स्पष्ट होते. प्राचीन शिलालेखावरूनहि ही गोष्ट निश्चितपणें सिद्ध होते की, भ. ऋषभदेव जैनधर्माचे प्रथम तीर्थंकर होते व भ. महावीरांच्या वेळींहि ऋषभदेवांच्या मूर्तीची पूजा जैन लोक करीत होते. मथुरेच्या जवळील कंकाली नांवाच्या टेकडीच्या खोदकामांत डॉ. फुहररना जे शिलालेख सापडले ते जवळ जवळ २००० वर्षांचे प्राचीन आहेत. आणि त्यावर इंडो– सिथियन ( Indo-Sithian ) राजा कनिष्क, हविष्क व वासुदेवाचा संवत आहे. त्यांत भ. ऋषभदेवांच्या पूजेबद्दल दान दिल्याचा उल्लेख आहे. श्री. व्हिसेंट ए. स्मिथ यांचें असें म्हणणें आहे की, "मथुरेला मिळालेली ऐतिहासिक

---

१–The discoveries have to a very large extent supplied corroboration to the written Jain tradition and they offer tangible incontrovertible proof of the antiquity of the Jain religion and of its early existance very much in its present from. The series of twentyfour pontiffs [ Tirthankaras ], each with his

सामुग्री, ही जैनमताच्या समर्थनावर बराच प्रकाश टाकून जैनधर्माच्या प्राचीनतेबाबत भरभक्कम पुरावे उपस्थित करते. याचप्रमाणे जैनधर्म प्राचीन काळीहि याच रूपांत विद्यमान होता ही गोष्टहि स्पष्ट होते. इ. स. च्या प्रारंभीहि आपापल्या विशेप चिन्हांसह चोवीस तीर्थकरांच्या मान्यतेवर दृढ विश्वास होता."

या शिलालेखापेक्षाहि प्राचीन व महत्वपूर्ण असा शिलालेख खंडगिरी, उदयगिरी (ओरिसा) च्या हत्ती गुफेंत सांपडला आहे. हा लेख जैनसम्राट खारवेलने लिहविला होता. या २१०० वर्षापूर्वीच्या प्राचीन जैन शिलालेखावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, मगधाधिपति पुष्यमित्राचा पूर्वाधिकारी राजा नंद याने कलिंग देश जिंकल्यावर कुलपरंपरागत चालत आलेली व चलसंपत्ति म्हणून समजली जाणारी भ. ऋषभदेवांची मूर्ति, 'जयसिंह' म्हणून नेली. नंदराजानंतर ३०० वर्षांनी पुष्यमित्रापासून हीच मूर्ति खारवेलने मिळविली. जेव्हा खारवेलने मगधावर चढाई केली व त्याला जिंकले तेव्हा मगधाधिपति पुष्यमित्राने खारवेलला ही प्रतिमा देऊन खुष केले. जर जैनधर्माचा प्रारंभ भ. महावीर किंवा भ. पार्श्वनाथापासून झाला असता, तर त्याच्या कांही कालानंतरची किंवा त्यांच्यावेळची प्रतिमा, त्यांचीच केली गेली असती. परंतु जेव्हा अशा प्राचीन शिलालेखांत प्रथम तीर्थकरांच्या प्रतिमेचा स्पष्ट व प्रामाणिक उल्लेक इतिहासासह मिळतो, तेव्हा भ. ऋषभदेवांना पहिले तीर्थंकर म्हणून जे मानले जाते त्यांत निश्चित तथ्य आहे, असे मानणे भाग आहे.

---

distinctive emblem, was evidently firmly believed in at the beginning of the Christian era: – The Jain stup..........Mathura Intro. P. 6.

आता असा प्रश्न उद्भवतो की ते केव्हा झाले ?

वर सांगितल्याप्रमाणे जैनमान्यतेप्रमाणे आदि तीर्थंकर भ. ऋषभदेव या अवसर्पिणी कालाच्या तिसऱ्या भागांत झाले व त्या (अवसर्पिणी) कालाचा आता पांचवा भाग चालू आहे. म्हणून त्यांना होऊन लाखो, करोडो वर्षे होऊन गेली. हिंदुमान्यतेप्रमाणेहि जेव्हा ब्रह्मदेवाने सृष्टीच्या आरंभी स्वयंभू मनु व सत्यरूपास जन्मास घातले, तेव्हा भ. ऋषभदेव त्यांच्यानंतर पांचव्या पिढींत झाले व याप्रमाणे ते पहिल्या सत्ययुगाच्या शेवटी झाले व आतांपर्यंत २८ सत्ययुगे झाली आहेत. यावरूनहि त्यांच्या प्राचीनतेची कल्पना करतां येते, यावरून जैनधर्माचा अस्तित्वकाल फार प्राचीन आहे.' भारत वर्षात जेव्हा आर्यांचे आगमन झाले, त्यावेळी जी द्रवीड संस्कृति भारतांत अस्तित्वांत होती, ती वास्तविक जैनसंस्कृतीच होती व म्हणूनच जैनपरंपरेत नंतर (पुढे) जे संघ कायम झाले त्यांत एक द्रवीड संघहि होता.

## ◆ २ श्री ऋषभदेव ◆

जैनमान्यतेप्रमाणे कालचक्राच्या पूर्वोक्त ६ भागांपैकी, पहिल्या व दुसऱ्या भागांत कोणताहि धर्म अगर राजा किंवा समाज असत नाही. एका कुटुंबांत पति व पत्नी हे युगल (जोडी) असते. आजुबाजूला असलेल्या झाडांना कल्पवृक्ष म्हटले जाते; या कल्पवृक्षापासूनच त्यांना

---

१ मेजर जनरल जे. सी. आर्. फर्लांग महोदय आपल्या The short Study in Science of Comparative Religion पुस्तकांत लिहीतात. 'येशू ख्रिस्ताच्या अगणित वर्षे अगोदर जैनधर्माचा भारतात प्रसार झाला होता. आर्य लोक जेव्हा मध्य भारतात आले, तेव्हा येथे जैनलोक राहात होते.'

त्यांच्या जीवनास आवश्यक असे पदार्थ मिळतात. त्यावरच ते संतुष्ट असतात. मरणाच्या अगोदर एक पुत्रास व मुलीस जन्म देऊन ते (परलोकीं) जातात. दोन्हीं वालकें आपापला आंगठा चोखूनच मोठे होतात व मोठे झाल्यावर पतिपत्नीच्या रूपांत राहतात. तिसऱ्या कालाचा बराच भाग व्यतीत होईपर्यंत अशीच परिस्थिती कायम राहते व यास 'भोगभूमीचा काल' म्हणतात. कारण या माणसांचें जीवन भोगप्रधान असतें. त्यांना आपल्या जीवन निर्वाहासाठी कांहीहि उद्योग करावा लागत नाही. परंतु यानंतर परिवर्तनास प्रारंभ होतो. हळूहळू त्या वृक्षापासून जीवनावश्यक वस्तू मिळणें कठीण होत जातें व परस्परांत भांडणें होऊं लागतात. तेव्हा १४ मनूंची उत्पत्ती होते. त्यांतील पांचवा मनु वृक्षांची मर्यादा नेमून देतो. पण त्याहि सरहद्दीवर जेव्हा भांडणतंटे होऊं लागतात तेव्हा सहावा मनु सीमेवर चिन्ह करून देतो. आतांपर्यंत पशूंकडून कामे कशी करून घ्यावींत हे त्यांना माहित नव्हतें व त्याची आवश्य-कताहि त्यांना नव्हती; पण आता ७ व्या मनूने त्यांना घोड्यावर चढणें वगैरे शिकविलें. प्रथम मुलगा जन्मास येतांच आईवडील मरून जात असत. पण आता तसें होणें वंद झालें. तेव्हा पुढील मनूंनी मुलाबाळांचे पालनपोषण कसें करावें तें त्यांना शिकविलें. इकडे तिकडे जाण्याचा प्रसंग येऊं लागला तेव्हा रस्त्यांत नदी, नाले लागत, ते कसे ओलांडावे याची पंचाईत पडूं लागली, तेव्हा १२ व्या मनूने पूल, नावा वगैरेंच्या सहाय्याने पैलतीरास जाण्याचें शिक्षण दिलें.

प्रथम कोणी गुन्हे करीत नसत, त्यामुळे न्यायालयें, शिक्षा वगैरेंचीहि आवश्यकता नव्हती. परंतु आपणांस आवश्यक अशा पदार्थांची कमतरता भासूं लागली, तेव्हा गुन्हे करण्याची प्रवृत्ति सुरूं झाली व त्यामुळे दंड-व्यवस्था, न्यायदानाची गरज निर्माण झाली. प्रथम पांच मनूंच्या वेळी नुसते 'हा!' म्हणणेंच अपराध्यांना पुरें होत असे पण पुढे एवढ्यानेच

जेव्हा भागेनासे झाले तेव्हा 'हा मा! असें करूं नकोस!' असा इषारा देणें भाग पडूं लागलें. परंतु एवढ्यावरूनहि पुढे काम भागेना तेव्हा शेवटच्या ५ कुलंकरांच्या वेळीं गुन्हेगारांच्या "हा मा धिक्!" असा धिक्कार करावा लागला. याप्रकारें १४ मनूंनी मनुष्यांच्या अडी-अडचणी व आपत्ति दूर करीत करीत सामाजिक व्यवस्थेचा पाया घातला.

चौदावा मनूचें नांव नाभीराज होतें. यांच्या वेळी जन्मणाऱ्या मुलांचें नाळ फार लांब होत असे. तेव्हा ती कापावी हे त्यांनी दाखविलें. यावरूनच त्यांना 'नाभी' हे नांव पडलें. त्यांच्या पत्नीचें नांव मरुदेवी असें होतें. त्यांच्या पासून ऋषभदेव जन्मले. हेच जैन-धर्माचे आद्यप्रवर्तक होत. यांच्यावेळीच गांव, शहर इ. सुव्यवस्था स्थापिली गेली. लौकिक शास्त्र व लोकव्यवहार यांचें शिक्षण यांनीच दिलें व अहिंसामूलक धर्माची स्थापना केली.[1] यामुळेच यांना 'आदिब्रह्मा' असेंहि म्हटलें आहे.

ज्यावेळी हे ( ऋषभभगवान ) गर्भात होते त्यावेळी देवतांनी सुवर्णाची वृष्टि केली म्हणून यांना हिरण्यगर्भ[2] असेंहि म्हणतात. ज्यावर आतापर्यंत सर्वांची उपजीविका चाले, असे कल्पवृक्ष नष्ट झाले होते व

---

१– 'पुरगामपट्टणादी लोयियसत्थं च लोयववहारो ।
धम्मो वि दयामूलो विणिम्मियो आदिवह्मेण ॥ ८०२ ॥

—त्रि. सा. ।

२–'हिरण्यवृष्टिरिष्टाभूद् गर्भस्थेऽपि यतस्त्वयि ।
हिरण्यगर्भ इत्युच्चैर्गीर्वाणैर्गीयसे त्वतः ॥ २०६ ॥
आकन्तीक्षुरसं प्रीत्या बाहुल्येन त्वयि प्रभो ।
प्रजाः प्रभो यतस्तस्मादिक्ष्वाकुरिति कीर्त्यसे ॥ २१० ॥'

—स० ८, हरि० पु० ।

नवीन उगवणाऱ्या वनस्पतीचा उपयोग कसा करावा हे माहीत नव्हते. त्यामुळे भ. ऋषभदेवांच्या वेळी प्रजेसमोर कठीण समस्या निर्माण झालेली होती. तेव्हा उगवलेल्या ऊंसाचा रस कसा काढावा हे यांनीच शिकविले. यावरून यांच्या वंशाला 'इक्ष्वाकु वंश' नाव पडले व त्या वंशाचे हे मूळ पुरुष समजले गेले. तसेच यांनी प्रजेस[1] असि, मसि, कृषी, वाणिज्य, सेवा व शिल्प अशा ६ प्रकारांनी उपजीविका करण्यास शिकविले. यावरून त्यांना 'प्रजापति' असेहि संबोधिले जाते. सामाजिक व्यवस्था चालावी म्हणून यांनी तीन वर्गाची (वर्णाची) स्थापना केली. ज्यांच्याकडे रक्षणाचे काम सोपविले गेले, ते 'क्षत्रिय' म्हणविले गेले. शेती, व्यापार, गोपालन वगैरे कामावर ज्यांची नियुक्ति झाली, ते 'वैश्य' व जे सेवावृत्ति करण्यायोग्य समजले गेले त्यांना 'शूद्र' हे नांव दिले.

भ. ऋषभदेवांना दोन पत्नी होत्या. एकीचे नांव सुनंदा व दुसरी नंदा. त्यांच्यापासून त्यांना १०० मुले व दोन मुली झाल्या. मोठ्या मुलाचे नांव भरत. हेच भरत राजे या भारत वर्षाचे प्रथम चक्रवर्ती झाले.

एके दिवशी भ. ऋषभदेव राजसिंहासनावर आरुढ झालेले होते. राजसभा भरलेली होती व नीलांजना नांवाची अप्सरा नृत्य करीत होती. नृत्य चालू असतांनाच एकाकी नीलांजनेचा मृत्यु झाला. या आकस्मिक घटनेने भ. ऋषभदेवांच्या मनावर परिणाम होऊन ते विरक्त झाले. तेव्हा तावडतोब सर्व पुत्रांवर राज्यकारभार सोपवून त्यांनी दीक्षा घेतली. सहा महिन्यांसाठी तप आरंभून कायोत्सर्ग सुरू केला. त्यांना पाहून अनेक राजांनी सुद्धा दीक्षा घेतली. परंतु त्यांना भूक, तहानेचे कष्ट सहन

१–'प्रजापतिर्यः प्रथमं जिजीविषुः शशास कृष्यादिसु कर्मसु प्रजाः'
—स्वयं० स्तो०

झाले नाहीत व ते भ्रष्ट झाले. सहा महिन्यांनी जेव्हा भगवंतांच्या समाधीचा काळ संपला, तेव्हा आहारासाठी त्यांनी विहार सुरु केला. त्यांच्या धीरगंभीर, दिगंबर रूपास पाहण्यास सर्व प्रजा उत्साहाने बाहेर आली. कोणी त्यांना वस्त्र भेट देई तर कोणी आभूषणे भेट देऊं लागला. कोणी हत्ती, घोडे घेऊन त्यांच्या सेवेस हजर राहात असत. परंतु त्यांना भिक्षा (आहार) देण्याचा विधी कोणास माहित नव्हता या प्रमाणे विहार करीत करीत सहा महिने लोटले. असाच विहार चालू असतां, एक दिवस भ. ऋषभदेव हस्तिनापुरास जाऊन पोहोचले. तेथील राजे 'श्रेयांस' मोठे उदार दानी (दानवीर) होते त्यांनी भगवंतांचा सत्कार केला. आदरपूर्वक भगवंतांना आवाहन (प्रतिग्रह) करून उच्चासनावर वसविले, त्यांचे पादप्रक्षालन केले. पूजा झाल्यावर नमस्कार करून म्हणाले, 'हे भगवन् ! हा इक्षुरस प्रासुक आहे, निर्दोप आहे. आपण याचा स्वीकार करावा' तेव्हा भगवंतांनी उभे राहून ओंजळीत रस घेऊन प्राशन केला. त्यावेळी लोकांत झालेला आनंद वर्णनातीत आहे. हा आहार वैशाख शु।। ३ ला झाला. त्यावरूनच या तिथीस 'अक्षय तृतीया' हे नाव पडले. आहार करून भगवान पुन्हा अरण्यांत गेले व आत्मध्यानांत लीन झाले. एकेवेळी भगवान पुरिमताल शहराच्या उद्यानांत ध्यानस्थ वसलेले होते. त्यावेळी त्यांना केवलज्ञानाची प्राप्ति झाली. याप्रमाणे 'जिनपद' प्राप्त करून घेऊन भगवंत पुष्कळशा शिष्यगणांच्या समुदायावरोवर धर्मोपदेश देत देत विहार करू लागले. त्यांच्या या व्याख्यान सभेला समवसरण म्हटले जाते. यात सर्वात मोठी विशेषता ही की, समवसरणांत पशूंनासुद्धा उपदेश ऐकण्यास स्वतंत्र स्थान होतें. वाघ सिंहासारखे क्रूर ? भयानक पशू सुद्धा शांत राहून उपदेश ऐकत होतें. भगवंताचा उपदेश (दिव्यध्वनी) सर्वांना समजत असे. याप्रमाणे अखेरपर्यंत प्राणीमात्राना त्यांच्या हितांचा उपदेश देऊन

भ. ऋषभदेव कैलासपर्वतावरून मुक्त झाले. ते जैनधर्माचे पहिले तीर्थंकर होत. हिंदू पुराणांतहि त्यांचें वर्णन मिळतें आणि या युगांत त्यांच्या पासून जैनधर्माचा इतिहास उपलब्ध आहे.

## ◆ जैनधर्माचे अन्य प्रवर्तक ◆

भ. ऋषभदेवानंतर जैनधर्मात धर्मप्रवर्तक असे २३ तीर्थंकर होऊन गेले, त्यापैकी दुसरे अजितनाथ, चौथे अभिनंदननाथ, पांचवे सुमतिनाथ व चौदावें अनंतनाथ यांचा जन्म अयोध्यानगरींत झाला. तिसऱ्या संभवनाथांचा जन्म श्रावस्ती नगरींत झाला. सहाव्या पद्मप्रभूंचा जन्म कौशांबी नगरींत झाला. सातवे सुपार्श्वनाथ व २३ वे पार्श्वनाथ यांचा जन्म वाराणसी (काशी–बनारस) मध्ये झाला. आठव्या चंद्रप्रभूंचा जन्म चंद्रपुरीत झाला. नवव्या पुष्पदंतांचा जन्म काकंदी शहरांत झाला दहाव्या शीतलनाथांचा जन्म भद्दलपुरांत झाला. ११ व्या श्रेयांसनाथांचा जन्म सिंहपुरी (सारनाथ)ला झाला. बाराव्या वासुपूज्य स्वामींचा जन्म चंपापुरीत झाला. तेराव्या विमलनाथांचा जन्म कंपिला नगरींत झाला. १५ व्या धर्मनाथांचा जन्म रत्नपुरींत झाला. १६ वे शांतिनाथ, १७ वे कुंथुनाथ, १८ वे अरहनाथ यांचा जन्म हस्तिनापूरला झाला. १९ वे मल्लि-नाथ व २१ वे नेमिनाथ यांचा जन्म मिथिलापुरींत २० व्या मुनि-सुव्रतांचा जन्म राजगृही येथे झाला.

यांपैकी धर्मनाथ, अरहनाथ व कुंथुनाथ यांचा जन्म कुरुवंशांत, मुनि-सुव्रतांचा हरिवंशांत व इतर सर्वांचा जन्म इक्ष्वाकु वंशांत झाला. सर्वांनीच भ. ऋषभदेवाप्रमाणें दीक्षा घेऊन तपश्चरण केले व केवलज्ञानाची प्राप्ति करून त्यांच्याप्रमाणेच विहार करून धर्मोपदेश केला व शेवटी निर्वाणपदाची प्राप्ति करून घेतली. त्यापैकी भ वासुपूज्य नाथांचें निर्वाण चंपापुरींत झालें भ. नेमिनाथांचें गिरनार येथे व भ महावीरांचें निर्वाण

पावापुरी येथे व बाकी सर्व तीर्थकरांचें निर्वाण सम्मेदशिखर येथे झाले. पैकी शेवटच्या तीन तीर्थकरांचे वर्णन पुढे दिले आहे.

## ◆ भगवान नेमिनाथ ◆

भ. नेमिनाथ २२ वे तीर्थंकर होते. हे श्रीकृष्णांचे चुलतभाऊ होत शौरीपुरचे राजे अंधकवृष्णींना १० पुत्र होते. सर्वात मोठ्या पुत्राचे नांव समुद्रविजय व धाकट्या पुत्रांचे नांव वसुदेव होते. समुद्रविजयाचे घरी नेमिनाथांचा जन्म झाला व वसुदेवांच्या येथे श्रीकृष्णाचा जन्म झाला. जरासंधाच्या भयानें सर्व यादव शौरीपुर सोडून द्वारका नगरीत राहू लागले. तेथे जुनागडच्या राजाची मुलगी राजमती हिच्याबरोबर नेमिनाथांचा विवाह ठरला होता. मोठ्या तयारीने वरात जुनागडच्या जवळ पोहोचली. नेमिनाथ पुष्कळशा राजपुत्रांबरोबर रथात बसून आजुबाजूंची शोभा पहात होते. एका बाजूस त्यांची दृष्टि गेली. तेव्हा त्यांनी पाहिलें की, एका कोंडवाड्यांत बरेचसे पशू कोंडले गेले आहेत. ते बाहेर निघण्याच्या प्रयत्न करीत होते. पण बाहेर येण्यास मार्ग नव्हता. तेव्हा नेमिनाथांनी सारथ्याला तावडतोब रथ थांबविण्यास सांगून विचारले. "हे इतके पशू याप्रमाणे कां कोंडले आहेत?" "वरातीत आलेल्या पाहुण्यांच्या आतिथ्यासाठी या पशूंचा वध करावयाचा आहे. त्यासाठी त्यांना या कोंडवड्यांत कोंडले आहे." हे ऐकून भ. नेमिनाथांच्या कोमल हृदयास धक्का बसला. ते म्हणाले "जर माझ्या विवाहाच्या निमित्ताने इतक्या पशूंचे जीवन संकटात असेल तर धिक्कार असो अशा विवाहास! आंता मी विवाह करणार नाही." ते तावडतोब रथांतून खाली उतरले आणि मुकुट कडीकुंडलादि अलंकाराना टाकून देऊन वनांकडे निघाले. जमलेंल्या वऱ्हाडी मंडळींनी ही घटना जेव्हा ऐकली तेव्हा एकच कोलाहल माजला. जुनागडच्या अंतःपुरात

जेव्हा ही वार्ता पसरली तेव्हा राजमती मूंर्च्छितच पडली. कितीतरी लोक भगवान नेमिनाथ यांना परत आणण्यास गेले. पण व्यर्थ ! जवळच असलेल्या गिरनार पर्वतावर ते चढले व सहस्त्राम्रवनांत भ०ऋषभदेवा-प्रमाणेच सर्व परिग्रह सोडून व दिगंबर होऊन आत्मध्यानांत लीन झाले आणि केवलज्ञानाची प्राप्ति करून गिरनार[1] क्षेत्रीच निर्वाणास गेले.

## ◆ भगवान पार्श्वनाथ ◆

हे २३ वे तीर्थंकर होत. यांचा जन्म साधारणतः ३००० वर्षापूर्वी वाराणसी नगरीत झाला. हेहि राजपुत्र होते. सुरवातीपासूनच यांची प्रवृत्ति वैराग्यमार्गाकडे अधिक होती. आईवडिलांनी कितीतरी वेळां विवाहाचा प्रश्न त्यांच्यापुढे काढला. परंतु त्यांनी तो नेहमीच हंसण्यावर नेला. एकेवेळी गंगानदीच्या कांठाने ते फिरत होते. त्यावेळी कांही तपस्वी आगटी पेटवून भोवती तप करीत बसले होते. स्वामी त्यांच्याजवळ गेलें व म्हणाले 'ही लांकडें जाळून निष्कारण जीवहिंसा कां करितां?' राजकुमारची ही गोष्ट ऐकून तपस्वी क्रोधाविष्ट झाले. आणि म्हणाले 'कोठे आहेत जीव? जेव्हा त्यानी तपस्व्याजवळची कुऱ्हाड घेऊन त्या जळत्या लांकडाचे तुकडे केले. तेव्हा त्यांतून जळू लागलेली नागनागि-णीची जोडी बाहेर निघाली. ते मरणासन्न अवस्थेत असल्यामुळे त्यांच्या कानांत मूल-मंत्र देऊन स्वामी दुःखी होऊन निघून गेले. या घटनेने त्यांच्या मनास अति वेदना झाल्या व जीविताच्या अनित्यतेने त्यांचे

---

१ महाभारतांत सुद्धा लिहिले आहे की,--

*युगे युगे महापुण्य दृश्यते द्वारिका पुरी ।*
अवतीर्णो हरिर्यत्र प्रभासशशिभूषण: ।।
रेवताद्री जिनो नेमिर्युगादिर्विमलाचले ।
ऋषीणामाश्रमादेव मुक्तिमार्गस्य कारणम ।।

मन अधिकच उदास झाले. राजसुखास तिलांजलि देऊन त्यांनी दीक्षा घेतली. एकेवेळी अहिक्षेत्र वनांमध्ये ते ध्यानस्थ बसले असतां, त्यांचा पूर्वजन्मीचा वैरी कोणी देव वरून कोठें जात होता; स्वामींना पाहतांच पूर्वीचा त्याचा वैरभाव एकदम जागृत झाला व तो त्यांच्यावर वीटा, दगड, वगैरेंचा वर्षाव करू लागला. परंतु अशा विघ्नांनीहि त्यांनी आपले ध्यान सोडले नाही. हे पाहून चिडून त्याने मुसळधार वर्षा करण्यास सुरवात केली. आकाशांतील मेघांनी भयानक रूप धारण केले. घनघोर मेघगर्जना होऊन वीज कडाडू लागली आणि कडाक्याच्या मेघगर्जनेने सर्वांची हृदये भीतीने गांगरून गेली, पृथ्वीवर सर्वत्र पाणी वाहू लागले अशा या घोर उपसर्गाच्या वेळी, जें नागनागिणी मरून पाताळलोकांत धरणेंद्र व पद्मावती होऊन जन्मले होते ते आपल्या या उपकारकर्त्यावर उपसर्ग होऊ लागलेला जाणून तात्काळ त्या ठिकाणी आले. पद्मावतीने आपल्या मुकुटावर भगवंतांना उचलून धरले व धरणेंद्राने सहस्त्रफणाधारी नागाचे रूप धारण करून भगवतावर आपला फणा पसरला. या प्रकारे या उपद्रवापासून त्यांचे रक्षण केलें. तत्क्षणीच भ० पार्श्वनाथांना केवलज्ञानाची प्राप्ति झाली. हे पाहून भगवंतापुढे त्या पूर्वजन्मीच्या वैऱ्याने लोटांगण घेऊन साष्टांग प्रणिपात केला व क्षमायाचना केली. पुढे जवळ जवळ ७० वर्षेपर्यंत ठिकठिकाणी विहार करून धर्मोपदेश केल्यानंतर ते आपल्या वयाच्या १०० व्या वर्षी सम्मेदशिखरावरून निर्वाणपदास प्राप्त झाले. त्यांच्याच नांवाने सम्मेदशिखरचा पर्वत आज 'पारसनाथ हिल्' या नांवाने ओळखला जातो. यांच्या ज्या मूर्ति केल्या जातात, त्यावर उक्त घटनेची स्मृति म्हणून त्यांच्या डोक्यावर फणायुक्त सर्प बनविलेला असतो. जैनेतर लोकांत यांची बरीच प्रसिद्धि आहे व कोठे कोठे तर जैन म्हणजे पार्श्वनाथांचाच भक्त असे समजले जाते.

## ◆ भगवान महावीर ◆

हे अंतिम तीर्थकर होत. सुमारे इ. स. पू. ६०० च्या काळात बिहार प्रांतातील कुंडलपूर येथे राजा सिद्धार्थाच्या घरी यांचा जन्म झाला. यांची मातोश्री त्रिशलादेवी वैशाली नगरीचे राजे चेटक यांची मुलगी होती. महावीरांचा जन्म चैत्र शु॥१३ला झाला.या दिवशी संपूर्ण भारतवर्षात ठिकठिकाणी महावीर जयंती मोठ्या प्रमाणावर अत्यंत उत्साहाने साजरी होते. ते नांवाप्रमाणेच खरोखर 'महा–वीर' होते. आपल्या लहानपणी ते एकेवेळी बालमित्रासह खेळत असतां अचानक एक मोठा साप कोठून तरी निघाला व यांच्याकडे येऊ लागला. इतर मुलांची भीतीने गाळण उडाली. त्यांना पळतां भुई थोडी झाली. परंतु महावीरांनी मात्र त्यास पकडून त्याचा सर्व गर्व उतरविला. ते जन्मत: विशेष ज्ञानी होते. एके वेळी एक मुनीश्वर त्यांना पाहण्यास आले पण तेथे येताच त्यांच्या मनांत ज्या कांही शास्त्रविषयक शंका होत्या त्या आपोआप दूर झाल्या. ते मोठे झाल्यावर त्यांच्या विवा–हाचा प्रश्न उपस्थित झाला. परंतु महावीरांचे चित्त दुसरीकडेच लागलेले होते. त्यावेळी यज्ञादिकांचा खूपच जोर होता व मोठ्या प्रमाणांत यज्ञांत पशूंचे बलिदान चाललेले होतें. बिचारे मूकपशू धर्माच्या नांवावर सारखे कापले जात होते. 'वैदिकी हिंसा हिंसा न भवति' अशा स्वरूपाची स्वार्थी लोकांनी आपली सोय केलेली होती. पण दयासागर महावीरांच्या कानापर्यंत त्या पशूंचा करूण आवाज पोहोचला व राज–पुत्र महावीरांचे हृदय त्यांच्या रक्षणासाठी तडफडून जागे झाले. धर्माच्या नांवावर चाललेल्या कोणत्याहि दुष्कृत्याचा विरोध किती तीव्र असतो हे सांगण्याची आवश्यकता नाही पण महावीर हे महा–वीरच होते. आमल्या वयाच्या ३० व्या वर्षी त्यांनी घर सोडले व

वनाचा मार्ग पत्करला. भ० ऋषभदेवाप्रमाणे दीक्षा घेऊन ते ध्यानस्थ झाले. त्यांच्या जन्मादिकांचे वर्णन करणाऱ्या कांही प्राचीन [१]गाथा मिळतात त्यांचा भावार्थ पुढील प्रमाणे आहे.

भावार्थः– ज्यांची देवादिकांकडून पूजा होत असे, ज्यांनी अच्युत स्वर्गामध्ये दिव्य भोगांचा भोग घेतला, अशा महावीर जिनेंद्रांचा जीव ७२ वर्षांचे आयुष्य गांठी बांधून पुष्पोत्तर नामक विमानांतून च्युत होऊन आषाढ शुद्ध षष्ठीस कुंडलपुर नगराचे राजे सिद्धार्थ यांच्या घरी नाथ–

---

१ "सुरमहिदोच्चुदकप्पे भोगं दिव्वाणुभागमणभूदो ।
पुप्फुत्तरणामादो विमाणदो जो चुदो संतो ॥
बाहत्तरिवासाणि य थोवविहीणाणि लद्धपरमाऊ ।
आसाढजोण्हपक्खे छट्ठीए जोणिमुवयादो ॥
कुण्डपुरपुरवरिस्सरसिद्धत्थक्खत्तियस्स णाहकुले ।
तिसिलाए देवीए देवीसदसेवमाणाए ॥
अच्छित्ता णवमासे अट्ठ य दिवसे चइत्तसियपक्खे ।
तेरसिए रत्तीए जादुत्तरफग्गुणीए दु ॥
मणुवत्तणसुहमतुलं देवकयं सेविऊण वासाइँ ।
अट्ठावीसं सत्त य मासे दिवसे य बारसमं ॥
आभिणिबोहियबुद्धो छट्ठेण य मग्गसीसबहुलाए ।
दसमीए णिक्खंतो सुरमहिदो णिक्खमणपुज्जो ॥
गमइय छदुमत्थत्तं बारसवासाणि पंचमासे य ।
पण्णारसाणि दिणाणि य तिरदणसुद्धो महावीरो ॥
उजुकूलणदीतीरे जंभीयगामे बहिं सिलावट्टे ।
छट्ठेणादावेंते अवरण्हे पादछायाए ॥
वइसाहजोण्हपक्खे दसमीए खवयसेढिमारूढो ।
हंतूण घाइकम्मं केवलणाणं समावण्णो ॥

वंशात त्रिशलादेवीच्या गर्भात आल्यावर नऊ महिने आठ दिवसांनी चैत्र शु.॥ १३ स रात्री उत्तरा फाल्गुनी नक्षत्र असतांना जन्माला आला.

२८ वर्ष ७ महिने १२ दिवसापर्यंत देवादिकांनी भोगावे असे अनुपम सुख भोगून ज्यांना आभिनिबोधिक ज्ञान झाले आहे व जे देवादिकांनी पूजिले जातात अशा महावीर भगवानांनी सहा उपवास करून, कार्तिक वद्य ॥ १० स नग्न दिगंबर दीक्षा घेतली. पुढे या स्थितीत १२ वर्ष ५ महिने १५ दिवसपर्यंत दिव्यज्ञानपूर्व छद्मस्थ अवस्थेमध्ये तपस्या करून रत्नत्रय–शुद्ध भ० महावीरांनी जृंभिक गांवाच्या बाहेर ऋजुकूला नदीच्या किनाऱ्यावर सहा उपवास करून व शिलाखंडावर आतापनयोग करीत असताना, अपराह्णि ज्यावेळी छाया पादप्रमाण असते त्यावेळी वैशाख शु. ॥ १० स क्षपकश्रेणीवर आरोहण केले. चार घातिया कर्मांचा नाश करूनच केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतली.

केवलज्ञान झाल्यावर भ० महावीरानी ६६ दिवसापर्यंत मौनपूर्वक विहार केला. कारण तोपर्यंत त्यांना गणधर (भगवंताचा उपदेश लक्षात ठेऊन ते संकलन करणारे ) कोणी मिळाले नाहीत. विहार करीत असताना ते मगध देशाची राजधानी राजगृही या ठिकाणी आले व नगराबाहेर विपुलाचल पर्वतावर थांबले. त्यावेळी राजगृहीत राजे श्रेणिक राणी चेलनेबरोबर राज्य करीत होते.

त्या ठिकाणी आषाढ शु ॥ १५ स ( ही गुरुपौर्णिमा होय ) [1]इंद्रभूति नावांचे गौतम गोत्रीय वेदवेदांग्गः पारंगत सच्छील विद्वान्

१ गोत्तेण गोदमो चाउव्वेय–संडगवि ।
णामेण इंदभूदिति सीलव वम्हणुत्तमो ॥

–धवला १ ख०, पृ० ६५ ।

ब्राह्मणोत्तम जीव–अजीवादि विषयक संदेह दूर करण्यासाठी महावीरांच्या जवळ आले. त्यांची शंका दूर होताच त्यांनी भ. महावीरांच्या चरणाजवळ दीक्षा घेतली व ते त्यांचे मुख्य गणधर बनले.

त्यानंतर प्रातःकाळी भ. महावीरांनी पहिला उपदेश दिला. त्याचा उल्लेख प्राचीन [1]गाथेमधून पुढील प्रमाणे आहे.

[2]पंचशैलपूर (पांच पर्वतांनी सुशोभित असल्यामुळे राजगृहीस 'पंचशैलपूर' किंवा 'पंचपहाडी' असेहि म्हणतात.) येथे रम्य व नाना प्रकारच्या वृक्षराजींनी सुशोभित आणि देवदानवांकडून वंदित अशा 'विपुल' पर्वतावर भ. महावीरांनी भव्यजनांना उपदेश दिला.

---

१ 'पंचसेलपुरे रम्मे विउले पव्वदुत्तमे ।
णाणादुमसमाइण्णे देवदाणववंदिदे ।।
महावीरेणत्थो कहिओ भवियलोयस्स ।
—धव० १ खं०, पृ० ६१ ।

[1]'वर्षाच्या पहिल्याच महिन्यांत म्हणजे आषाढ महिन्यांच्या वद्य पक्षांत प्रतिपदेच्या दिवशी प्रातःकाळी अभिजित् नक्षत्राचे वेळी धर्म-तीर्थाची उत्पत्ति झाली.'

[2]'याप्रमाणे जिनश्रेष्ठ महावीरांनी सुमारे बेचाळीसाव्या वर्षी राग, द्वेष भय इ० विकार नाहीसे करून त्यांनी धर्मोपदेश दिला.'

भ. महावीरांनी ३० वर्षेपर्यंत अनेक देशदेशांतरी विहार करून धर्मोपदेश दिला. जेथे ते जात असत त्या ठिकाणी त्याचे समवसरण (उपदेश सभा) भरत असे व त्यांत हिंस्त्र पशूसुद्धा बसून उपदेश ग्रहण करीत. इतकेच नव्हे तर आपले वमनस्य व क्रौर्य सोडून देऊन मित्र-भावाने व शांतपणे राहून उपदेश श्रवण करीत असत.

याप्रमाणे भगवान कोशल, पंचाल, कलिंग, कुरुजांगल, कंबोज, वाल्हिक; सिंधू गांधार इ ठिकाणी विहार करून शेवटी ते [3]पावानगरी (पावापुरी–बिहार) या ठिकाणी आले.

---

१ 'वासस्स पढममासे पढमे पक्खम्हि सावणे बहुले ।
पाडिवदपुव्वदिवसे तित्थुप्पत्ती दु अभिजिह्मि ॥'
—धव० १ खं०, पृ० ६३

२ 'णिस्संसयकरो वीरो महावीरो जिणुत्तमो ।
रागदोसभयादीदो धम्मतित्थस्स कारओ ॥' — ज. ध. १ खं०, पृ. ७३

३ श्रीमत् पूज्यपाद विरचित संस्कृत निर्वाण- भक्तिमध्ये खालील प्रमाणे खुलासा आला आहे—

एकोणतीस वर्षे पाच महिने व वीस दिवसपर्यंत ऋषी, मुनी, यति, व अनगार या चार प्रकारच्या मुनीवरोबर व बारा गणांबरोबर (सभा) विहार करून भ. महावीरांनी पावापुर येथे [1]अश्विन व॥ १४ च्या दिवशी स्वाति नक्षत्र असतांना रात्रीचे वेळी बाकीच्या चार अघातिया कर्ममलाचा नाश करून निर्वाणपद मिळविले.

सध्या जैनांत जो वीरनिर्वाण संवत प्रचलित आहे त्यास अनुसरून इ. स. पू. ५२७ मध्ये भगवंतांनी मुक्ति प्राप्त करून घेतली असे समजले जाते. पण कांही [2]प्राचीन ग्रंथात शक राजाच्या ६०५ वर्षे ५ महिने अगोदर भ. महावीर निर्वाणास गेल्याचा उल्लेख मिळतो व यावरूनहि याच काळाची पुष्टि होते.

---

[1] पावापुरस्य बहिरुन्नतभूमिदेशे पद्मोत्पलाकुलवतां सरसां हि मध्ये ।
श्रीवर्धमानजिनदेव इति प्रतीतो निर्वाणमाप भगवान् प्रविधूतपाप्मा ॥२४॥"

अर्थ— पावापुरच्या बाहेर असलेल्या कमलव्याप्त सरोवरांच्या मध्यभागी असलेल्या उन्नत भूप्रदेशावर (पर्वतावर) कर्मांचा नाश करून भ. महावीराना निर्वाण प्राप्ति झाली व तेथून अश्विन वद्य ॥ १४ स रात्री म्हणजेच अमावस्येच्या प्रातःकाळी सूर्योदयाच्या अगोदर मुक्तिलाभ करून घेतला. याबाबतीत पुढील श्लोक लिहिले आहेत.

१ ' णिव्वाणे वीरजिणे छव्वाससदेसु पंचवरिसेसु ।
पणमासेसु गदेसु संजादो सगणिओ अहवा ॥१४९९॥"

— त्रि० प्र० ।

२ वासाणूणत्तीसं पंच य मासे य वीस दिवसे य ।
चउविह अणगारेहि य बारहदिणेहि (गणेहि) विहरित्त ॥
पच्छा पावणयरे कत्तियमासस्स किन्हचोद्दसिए ।
सादीए रत्तीए सेसरयं छेत्तु णिव्वाओ ॥ ३ ॥"

—ज० धव० खं०, १, पृ० ८१

### ◆ ४ भगवान महावीरानंतरची जैनधर्माची स्थिति. ◆

भ. महावीरानंतरची व जैन व बौद्ध साहित्यात जी कांही माहिती ळते त्यावरून हे स्पष्ट दिसून येते की, महावीर हे एक महापुरुष ते व तत्कालीन जनसमूहावर त्यांचा मानसिक व आध्यात्मिक प्रभाव ाच खोलवर रुजलेला होता. त्यांचा प्रभाव, व्यापक दृष्टिकोण व स्पृहता यांचाच हा परिणाम आहे की, आजहि जैनधर्म आपल्या म–भूमिमध्ये (भारतामध्ये) मूळ धरून कायम आहे; उलट बौद्धधर्म त्येक शतकापूर्वीच येथून लुप्तप्राय झाला.

भ० महावीरांचा अनेक राजघराण्यावरहि चांगला प्रभाव होता. 'ज्ञातृवंशी' होते व त्यांची माता लिच्छवी गणतंत्राचे प्रमुख राजा ेक यांची मुलगी होती· इ. स. पू. ६ व्या शतकांत पूर्व भारतात च्छवी राजवंश गण्यमान्य वंशापैकी होता. त्यांचे घराणे बलशाही जघराणे म्हणून समजले जात होते. डॉ. याकोबीनी लिहिलें आहे , "जेव्हा चंपाचा राजा कुणिकने मोठ्या सेनेसहित राजा चेटका– र आक्रमण करण्याची तयारी केली, तेव्हा चेटकाने काशी कौशल रेच्या १८ राजाना व 'लिच्छवी' आणि 'मल्लांना' बोलावून त्यांना चारले की, तुम्ही कुणिकची इच्छा पूर्ण करणार? कां त्याच्याशी ढण्यास तयार होणार? महावीरांच्या निर्वाणानंतर या घटनेच्या ृतिसाठी १८ राजानी मिळून एक मोठा उत्सवहि केला." यावरून ष्ट होते की, त्यावेळेसचे प्रमुख राजवंश प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणे हावीरांच्या कार्यामुळे प्रभावित झालेले होते. याशिवाय भ० महा– रांचे अकरा प्रधान शिष्य होतें. त्यांत प्रमुख गौतम गणधर होते. ० महावीरानंतर त्यांच्या शिष्यगणामध्ये तीन केवलज्ञानी होते. प्रथम तम गणधर, दुसरे सुधर्मस्वामी व तिसरे जंबूस्वामी. त्यानंतर पांच

श्रुतकेवली झाले. १ विष्णु २ नंदिमित्र ३ अपराजित ४ गोवर्धन व पांचवे भद्रबाहू. अंतिम श्रुतकेवली भद्रबाहू मगधात दुष्काळ पडल्यानंतर आपला मोठा जैन संघ घेऊन दक्षिणेकडे विहार करू लागले. त्यामुळे तामिळ, आंध्र व कर्नाटक प्रदेशात जैनधर्माचा मोठा प्रभाव झाला.

म्हणून भ० महावीरानंतरच्या जैनधर्माच्या परिस्थितीचा परिचय करून देण्यासाठी तिची दोन विभागात विभागणी करणे अयोग्य ठरणार नाही. १ उत्तर भारतातील जैनधर्माची स्थिति व २ दक्षिण भारतातील जैनधर्माची स्थिति.

## ◆ उत्तर भारतातील जैनधर्म ◆

उत्तर भारताच्या निरनिराळ्या प्रांतातील ही स्थिति व त्याचा राजघराण्यावरील प्रभाव पाहण्यापूर्वी तेथील एकूण स्थितीचे विहंगमावलोकन करणे अयोग्य ठरणार नाही.

निरनिराळ्या बौद्धइतिहास तज्ज्ञांच्या लिहिण्यावरून असे दिसून येते की,बुद्ध निर्वाणानंतर प्रथम शतकात उत्तर भारतातील निरनिराळ्या विभागात जैनलोक प्रमुख होते. चीनी यात्रेकरू ह्युएनत्संग इ. स. च्या ७ व्या शतकांत भारतात आला. त्यानें नालंदाच्या विहाराचे वर्णन करतांना आपल्या यात्रावर्णनात लिहिले आहे की, 'ज्योतिष विद्यातज्ज्ञ अशा एक निर्ग्रथ (जैन) साधूनी नव्या घटनेच्या यशस्वितेची भविष्य वाणी वर्तविली होती.' यावरून त्याकाळी मगध राज्यात जैनधर्म पसरलेला होता हे स्पष्ट दिसते. जैन धर्माच्या उन्नतीचा दुसरा प्रमुख पुरावा म्हणजे 'अशोकाची घोषणा' हा होय. या घोषणेत निर्ग्रंथांना दान करण्याची आज्ञा केली आहे. सुरवातीस 'निर्ग्रंथ' याच नांवाने जैन प्रसिद्धीस आलेले होते. वरील घोषणेवरून अशोकाचे वेळी जैननिर्ग्रंथ

पात्र मानले जात होते व त्यांचा इतका प्रभाव होता की, अशोका-लाहि त्यांचा प्रमुख पात्र रूपाने निर्देश करणे आवश्यक समजावे लागले.

उत्तर भारतात जैनधर्माच्या प्रगतीच्या दृष्टीने कलिंगाचें नांव उल्लेखनीय आहे. इ. स. पू. २ ऱ्या शतकांतील प्रसिद्ध असा सम्राट खारवेलचा शिलालेख कलिंगमधील जैनधर्माच्या वैभवशाली भरभराटीला निश्चितपणे दाखवितो. श्री रंगास्वामी अयंगारांच्या मताप्रमाणे बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी अशोकने आपल्या राजवटीमध्ये जो उत्साह दाखविला व वाहून घेतले, त्याचा परिणाम असा झाला की, मगधातील जैनधर्माचें केंद्र स्वाभाविकपणे हलवले जाऊन ते कलिंग येथे गेले. ह्युएनत्संगच्या वेळेपर्यंतहि जैनधर्मांचा येथें चांगलाच प्रभाव होता.

खारवेलाच्या शिलालेखाप्रमाणे प्रसिद्ध असलेल्या मथुरेच्या शिलालेखावरून असें स्पष्ट दिसून येते की, इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अगदी सुरवातीपासून 'मथुरा' हे जैनधर्मांचे प्रसिद्ध केंद्र आहे.

याप्रमाणे भ. महावीरांच्या निर्वाणानंतर जवळ जवळ पांच शतके-पर्यंत जैनधर्म उत्तर भारतातील निरनिराळ्या प्रदेशात प्रभावशाली असून प्रभावक रीतीने प्रगति करीत होता. पण पुढे सातव्या शतका-पासून मात्र त्याच्या अवनतीस प्रारंभ झाला.

यापुढे उत्तर भारतातील प्रत्येक प्रांतात, भ. महावीरानंतरच्या जैन धर्मांच्या स्थितीचा परिचय करून देताना ज्यांनी जैनधर्माचा अंगीकार केला, जे जैन धर्मीय होते किंवा ज्यांच्या सहाय्याने जैनधर्म चांगला फुलला व फळास आला, अशाच राजवंशाचा व प्रमुख राजाचा परिचय करून दिला जाईल पण त्या अगोदर उत्तर भारतातील प्रारं-भिक इतिहासाचे अवलोकन करणे अनुचित होणार नाही,

भ महावीरांच्या वेळी मगधाच्या सिंहासनावर शिशुनागवंशी राजे 'बिंबिसार' उर्फ 'श्रेणिक' विराजमान होते. त्यांचा उत्तराधिकारी त्यांचा पुत्र अजातशत्रु (कुणिक) होता. अजातशत्रूने आपले आजे चेटकाच्याच राज्यावर आक्रमण करून वैशाली व लिच्छवी देश मगध साम्राज्यात विलीन करून घेतले व राजगृहीच्या ऐवजी वैशाली ही राजधानी बनविली. अजातशत्रूचा मुलगा उदयन याने 'पाटलीपुत्र' ही मगधाची राजधानी केली. या वंशाचा नाश झाल्यावर मगधाचे राज्य नंद वंशाने घेतले व नंतर चंद्रगुप्त मौर्याने नंदांचे सिंहासन काबीज केले. चंद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा बिंदुसार व त्यानंतर अशोक गादीवर आला. अशोकानंतर त्याचे चार उत्तराधिकारी येथे राज्य करीत होते. शेवटचा मौर्य सम्राट बृहद्रथ यास त्याचा सेनापति पुष्यमित्र याने मारून सिंहासन काबीज केले. व याप्रमाणे श्रृंगवंशाचे राज्य सुरू झाले.

पुष्यमित्र मगधाच्या गादीवर येताच त्यास दोन प्रबल शत्रूशी सामना करावा लागला. १ वायव्य सरहद्द प्रांताकडून 'मनींद्र' याने त्याच्या राज्यावर आक्रमण केले. व दक्षिणेकडून कलिंगराजा 'खारवेलने' स्वारी केली. तिसऱ्या पिढीनंतर श्रृंगवंश हाहि नाहीसा झाला व त्यानंतर दक्षिणेकडील आंध्राचे राज्य सुरू झाले. इ. सनाच्या ४थ्या शतकाच्या प्रारंभी आंध्रापैकी एक अधिकारी उपाधिगुप्त याने गुप्त वंशाचा पाया घातला. असो या प्रकारे उत्तरेकडील इतिहासाची सर्व साधारण रूपरेषा आहे. त्याचे विस्तृत वर्णन पुढे देत आहोतच.

### ◆ १ बिहार प्रांतातील जैनधर्म ◆

बिहार ही भ० महावीरांची जन्मभूमि, तपोभूमि व निर्वाणभूमि आहे, त्याबरोबरच ती त्यांची कर्मभूमीहि आहे. तेथील राजघराण्याशी

त्यांचा कौटुंबिक संबंधहि होता. त्यामुळे त्यांचेवेळी व त्यांच्यानंतरहि तेथे जैनधर्माचा चांगला प्रसार झाला. कित्येक राजे व राजघराणे यांनीहि तो धर्म स्वीकारला. त्यापैकी कांहीचा परिचय पाहू.

## ◆ राजा चेटक ◆

जैन साहित्यांत वैशालीचा राजा चेटक अतिप्रसिद्ध आहे. कारण एकतर हा राजा भ. महावीरांचा मोठा उपासक होता व दुसरे म्हणजे भ. महावीरांची माता देवी त्रिशला ही चेटक राजाची मुलगी होती. त्यास ८ मुली होत्या व त्यांचा तत्कालीन प्रमुख राजघराण्यांत विवाह झाला होता. सिंधुसौवीर देशाचा उदयन,अवन्तीनरेश प्रद्योत,कौशांबीचा राजा शतानीक, चंपदेशाचा राजा दधिवाहन व मगधच राजा श्रेणिक (बिंबिसार) हे सर्व चेटक राजाचे जांवई होते. जैन साहित्यांतील 'कुणिक' बौद्ध साहित्यांतील 'अजातशत्रु' या नांवाने प्रसिद्ध मगध–सम्राट व त्याचप्रमाणे जैन, बौद्ध व ब्राह्मण संप्रदायाच्या कथासाहित्यांतील प्रसिद्ध राजा 'उदयन' हे दोन्ही चेटक राजाचे सख्खे दौहित्र (नातु) होते. राजा चेटक भारताच्या तत्कालीन गणसत्ताक राज्यांतील एका मुख्य राज्याचे नायक होते व ते जैन श्रावक होते. त्यांची अशी प्रतिज्ञा होती की, जैनाशिवाय दुसऱ्या कोणाशी आपल्या मुलींचा विवाह करावयाचा नाही. राज उदयनास जैन साहित्यात जैन श्रावक म्हणूनच संबोधिले आहे. उदयनाच्या राणीने आपल्या महालांत एक चैत्यालय निर्माण केलें. होतें व त्यात दररोज जिनेंद्र भगवंतांची पूजा होत असे. सुरवातीस राजा उदयन तापसधर्मीयांचा भक्त होता परंतु पुढे हळूहळू त्याची जिनेंद्र भगवंतावर श्रद्धा जडू लागली होती.

स्व. डॉ. याकोबी लिहितात की, चेटक जैनधर्माचा महान आश्रयदाता होता. त्यामुळे वैशाली हे जैनधर्माचे मोठे संरक्षक केंद्र बनलेले होते, म्हणून बौद्धांनी त्यास पाखंडी लोकांचा मठ असे म्हटलेले आहे.

## राजा श्रेणिक ( इ. स. पू. ६०१ ते ५५२ )

भारताच्या इतिहासांत अतिप्रसिद्ध मगधाधिपति राजा बिंबिसार हा जैनसाहित्यांत राजा 'श्रेणिक' या नांवाने प्रसिद्धीस आला आहे. हा राजा प्रथम बौद्ध धर्मानुयायी होता. एकेवेळी कोणी चित्रकाराने त्यास एका राजकन्येचे चित्र भेट दिले. ते चित्र पाहून राजा मोहित झाला व चित्रकारास त्या मुलीच्या वडीलांचे नांव विचारले तेव्हा ती वैशालीच्या चेटक राजाची सर्वात लहान मुलगी ' चेलना ' आहे, असे त्यास समजून आले. श्रेणिक राजाने चेटकाजवळ तिची मागणी केली. परंतु विधर्मी राजास मी आपली कन्या देऊ शकत नाही व राजा श्रेणिक हा विधर्मी असल्यामुळे त्यास ती कन्या देता येत नाही. असे सांगून त्याने श्रेणिकाची मागणी फेटाळली. तेव्हा श्रेणिकाचा मोठा मुलगा अभयकुमार याने कुशलतेने चेलनेचे हरण केले व तिला आपल्या वडिलांच्या स्वाधीन केले. त्या दोघांचाहि विवाह झाला. हळूहळू चेलनेने राजा श्रेणिकाचे मन जैनधर्माकडे वळविले व तो भ० महावीरांचा अनुयायी झाला. तसेच महावीरांच्या उपदेशसंस्थेचा तो सर्वांत मुख्य असा श्रोता बनला. कोणत्याहि प्राचीन जैन कथासाहित्यांत राजा श्रेणिकाने प्रश्न विचारल्यावर भगवंतानी अमुक अमुक उत्तर दिले. असा उल्लेख मिळतो. चेलनेपासून श्रेणिकास कुणिक (अजातशत्रु) नांवाचा पुत्र झाला. जेव्हा कुणिक मगधाच्या सिंहासनावर बसला तेव्हा त्याने आपले वडील श्रेणिक यांना कैद करुन पिंजऱ्यांत बंद केले. एक दिवस कुणिक हा आपल्या मुलाशी लडिवाळपणे खेळत होता; त्याच्याजवळ त्याची आई चेलना हीहि बसलेली होती त्याने आपल्या आईस विचारले "आई! ज्याप्रमाणे मी आपल्या मुलावर प्रेम करतो तसे दुसरे कोणी आपल्या मुलांवर करीत असेल काय ?" तो प्रश्न ऐकून चेलनेच्या डोळयांत अश्रू

चमकले. कुणिकने त्याचे कारण विचारले तेव्हा ती म्हणाली ' बाळा! तुझ्या वडिलांचे तुझ्यावर फारच प्रेम होते. तू जेव्हा फार लहान होतास तेव्हा तुझ्या हाताच्या बोटास फार त्रास होत होता, रात्रभर तुला झोप येत नसे. त्यावेळी तुझे वडील रक्त आणि पू यांनी भरलेले तुझे बोट आपल्या तोंडात ठेऊन झोपत व त्यामुळे तुला शांति मिळत असे." हे एकताच कुणिकने डोळे उघडले व आपल्या कृत्याचा पश्चाताप होऊन व पिंपरा तोडून बाहेर काढण्यासाठी तो कुऱ्हाड घेऊन निघाला. अशा अवस्थेत त्यास येत असलेला पाहून हा मला मारण्यासच येऊ लागला आहे असे समजून तो येण्याच्या आंतच श्रेणिकाने पिंजऱ्यावर आपले डोके जोरात आपटले व तो मेला. पुढे जेव्हा (८२,००० वर्षांनी) पुनः जैनधर्माचे तीर्थंकर होऊ लागतील तेव्हा 'राजा श्रेणिकच' प्रथम तीर्थंकर होतील.

## ◆ अजातशत्रु (इ. स. पू. ५५२ ते ५१८) ◆

बौद्ध साहित्यात अजातशत्रूने बौद्ध धर्माचा अंगीकार केल्याचा उल्लेख मिळत असला तरी संशोधनातून असे दिसून येते की, अजात-शत्रु हा जैन धर्माकडे अधिक आकृष्ट होता. स्व. डॉ. याकोबाजी जैनसूत्रा-च्या प्रस्तावनेत लिहितात 'अजातशत्रूने आपल्या राजवटीच्या सुरवातीस बौद्धाना कसलीच सहानूभूति दाखविली नव्हती. तरी बुद्ध निर्वाणाच्या आठ वर्षे अगोदरपासून त्याने बुद्धास आश्रय देणे सुरू केले. परंतु त्यावेळी तो सद्‌भावनेपूर्वक बौद्ध धर्मानुयायी झाला होता असे आम्हास वाटत नाही; कारण असे की, जो मनुष्य उघडपणे आपल्या वडिलांचा खून करू शकतो व त्याचप्रमाणे आपल्या आजोबा बरोबर लढाई करतो तो अध्यात्मज्ञासाठी फार भुकेलेला होता असे आम्ही मानू शकत नाही. त्याचे धर्मपरिवर्तन करण्याचा उद्देश काय होता, याचें आपण सहजासहजी अनुमान करू शकतो. मुख्य गोष्ट अशी होती की, त्याने आपले

आजोबा वैशालीचे राजे यांच्या बरोबर युद्ध केले होते. हा राजा भ. महावीरांचा मामा होता व जैनाचा संरक्षक होता. अशा प्रकारे त्यावर चढाई केल्यामुळे अजातशत्रु हा जैनांची सहानुभूति गमाऊनच बसलेला होता. म्हणून प्रतिस्पर्धी बौद्धधर्मास मिळण्याचे त्याने ठरविले होते." यापुढे डॉ. याकोबी असेहि लिहितात की,'अजातशत्रूने वैशाली जिंकलेली होती. व दुसरी गोष्ट म्हणजे नंद व मौर्य साम्राज्याचा पाया उभा केला होता. याप्रकारे मगध साम्राज्याची सीमा वाढविल्यामुळे जैन व बौद्ध या दोन्ही धर्मांना आपल्या प्रसारासाठी नवीन क्षेत्र खुले झाले होते. त्यामुळे ते दोन्हीहि लगेच त्या क्षेत्रात पसरले. ज्यावेळी दुसरे संप्रदाय स्थानीय व तात्पुरते महत्व प्राप्त करून राहिलेले होते, अशावेळी हे दोन्ही धर्म इतकी मोठी सफलता प्राप्त करण्यास समर्थ झाले हे. याचे दुसरे मुख्य कोणतेच कारण नसून हा केवळ एक मंगलकारी राजनैतिक संबंध होता." आमच्या मताप्रमाणेच जैन व बौद्धाच्या सफलतेचे कारण केवळ राजनैतिक संबंध एवढेच नव्हते. त्याशिवाय आणखीहि कारणे असली तरी हे एक त्यापैकी प्रबल कारण होते एवढेच! असो.

## ◆ नंदवंश इ. ( स. पू. ३०५ ) ◆

उदायीच्या नंतर मगधाच्या सिंहसनावर नंदवंशाने आपला अधिकर प्राप्त केला. महाराज खारवेलच्या शिलालेखावरून असे दिसून येते की, महाराज नंदानी आपल्या राज्यकालांत कलिंग देशावर चढाई केली होती व त्यांनी कलिंग राजघराण्यांतील श्री. ऋषभदेवांची प्रतिमा उचलून आणली. या घटनेनंतर ३०० वर्षांनी कलिंगाधिपति खारवेल याने जेव्हा मगधावर स्वारी करून तो भाग जिंकला, तेव्हा तत्कालीन मगधाधिपति पुष्यमित्राने ती प्रतिमा खारवलेला परत देऊन त्यास खुष केले. अशा प्रकारे एक उच्च प्रतिमा ३०० वर्षेपर्यंत एका

राजघराण्यांत सुरक्षित राहते याचा अर्थ असा की, नंदवंशांत त्या मूर्तीची पूजा होत असावी. जर असे नसते व नंदवंश हा जैनधर्माचा विरोधी असतां, तर ही मूर्ति अशाप्रकारे इतके दिवस सुरक्षित राहिली नसती. 'मुद्रा-राक्षसांत' असाहि उल्लेख आहे की, चाणक्यानें नंद राजाचा मंत्री जो "राक्षस" त्यास विश्वासांत घेऊन फसविण्यासाठी आपला एक हेर जीवसिद्धीं' यास क्षपणक बनवून पाठविले होते. क्षपणकाचा अर्थ नग्न जैन साधू असा कोशग्रंथामध्ये आढळतो. म्हणून नंदाचा मंत्री राक्षस हा जैन होता व राजा नंदहि जैन असण्याचा संभव दिसतो.

## मौर्यसम्राट चंद्रगुप्त ( इ. स. पू. ३२० )

मौर्यसम्राट चंद्रगुप्त हे जैन होते. यांच्यावेळी मगधांत बारा वर्षाचा दुष्काळ पडला होता. त्यावेळी आपल्या पुत्रावर राज्यभार सोपवून आपले धर्मगुरु जैनाचार्य भद्रबाहू यांच्याबरोबर ते दक्षिणेकडे गेले. व तपःसाधना करून बारा वर्षानंतर चंद्रगिरी पर्वतावर स्वर्गवासी पावलें. याला अनेक ऐतिहासिक पुरावे मिळतात. अतिप्राचीन जैनग्रंथ 'तिलोयपण्णत्ती' यांत लिहिले आहे की "मुकुटधारी राजांमध्ये शेवटचे चंद्रगुप्त यांनी जिनदीक्षा घेतली व यांच्यानंतर कोणत्याच मुकुटधारी राजाने जिनदीक्षा घेतली नाही." (पृ. १४६)

सुरवातीस इतिहासज्ञ या गोष्टीच्या सत्यतेवर विश्वास ठेवीत नव्हते. परंतु जेव्हा म्हैसूर राज्यांतील श्रवणबेळगोळा येथील चंद्रगिरी पर्वतावरील लेख प्रकाशात आलें, तेव्हा इतिहासज्ञांना ही गोष्ट स्वीकारावी लागली. लेंवीस राईस यांनीं सर्वप्रथम या शिलालेखांचे संशोधन करून त्यांचा अनुवाद केला. त्यामुळे विद्वानांचे संशोधनकार्य बरेच सुलभ झाले. 'चंद्रगुप्त जैन होता व तो दक्षिणेकडे आला होता' या त्यांच्या मताचे मि. थॉमस सारख्या प्रमुख विद्वानांनी प्रभावी

समर्थन केले आहे. 'जैनधर्म किंवा अशोकपूर्व धर्म[1]' या आपल्या लेखात ते म्हणतात. 'चंद्रगुप्त जैन होता' ही गोष्ट लेखकांनी सहज स्वाभाविक बाब यास्वरूपानेच मानली आहे: यासाठी कोणत्याहि प्रमाणाची आवश्यकता नाही इतकी ही सत्य घटना आहे. कारण या घटनेचे लेखी पुरावे सापेक्षतः प्राचीन आहेत व स्पष्टपणे संदेह-रहित आहेत. कारण त्यांच्या सूचीत अशोकाचे नांव नाही. अशोक आपले पितामह चंद्रगुप्तापेक्षा अधिक शक्तीशाली होता व जैनलोक त्याच्या बाबतीत सप्रमाण असा दावा करू शकत होते की, तो जैन-धर्माचा चांगला बलशाली आधार व आश्रयदाता होता. कदाचित् आशोकानें आपले धर्मपरिवर्तन तर केले नसावे? [2]मेगॅस्थिनीसची-साक्ष सुद्धा हेच सुचित करतें की, चंद्रगुप्ताने श्रमणांची धार्मिक शिक्षा दीक्षा स्वीकारली होती व ब्राह्मण धर्मीय सिद्धांत तो मानीत नव्हता. याप्रमाणे साधारणतः सर्व विद्वान या विषयांत एकमत आहेत की, चंद्रगुप्त जैन होता.

चंद्रगुप्तांनी राज्यत्याग केल्यावर ते श्रवणबेळगोळा येथे जैनसाधू होऊन मरण पावलें या गोष्टीचे समर्थन स्व. डॉ. व्ही. ए. स्मिथ यांनी आपल्या 'भारतवर्षाचा प्राचीन इतिहास' नामक ग्रंथाच्या प्रथम आवृत्ती मध्ये केले आहे. चंद्रगुप्ताच्या मृत्यूबद्दल लिहीत असतांना ते म्हणतात " चंद्रगुप्त लहान वयांतच राजसिंहासनावर बसला होता. आणि त्याने फक्त २४ वर्षे राज्य केले होते म्हणून ५० व्या वर्षापूर्वीच तो बहुतेक मेला असावा.' याप्रमाणे त्याच्या मृत्युकाळा संबंधी अनिश्चितता आहे. तो कशाप्रकारें मेला हे इतिहासज्ञ सांगू शकत नाहीत. जर तो रणांगणावर

१ जर्नल ऑफ दी रॉयल सीरीज लेख नं. ८

२ स्टडीज इन् साऊथ इंडियन जैनिझम् पा. २२

मेला असता किंवा चांगल्या अवस्थेत मेला असता तर या घटनेचा उल्लेख मिळाला असता. लेवीस राईसने शोधलेल्या श्रवणबेळगोळाच्या शिलालेखाना अविश्वनीय मानले तर जैनांची सर्व परंपरा व उल्लेख हे अविश्वनीय मानावे लागतील व इतिहासज्ञांनी इतके दूर जाणे अति आपत्तिजनक होईल. अशा अवस्थेत लेवीस राईस म्हणतात. त्याप्रमाणे जर आम्ही विश्वास केला की, "चंद्रगुप्त जैन व्रते धारण करून महान् आचार्य भद्रबाहूबरोबर चंद्रगिरी पर्वतावर गेले होते" तर त्यात कसलीच चूक होणार नाही. याच पुस्तकाच्या दुसऱ्या आवृतीत त्यांनी आपले मत बदलले परंतु तिसऱ्या आवृतीत त्यांनी आपली चूक पुन्हा सुधारली व लिहिले की, "माझी आता खात्री होऊ लागली आहे की, जैनाचे हे म्हणणे बहुतेक मुख्य मुख्य बाबतीत यथार्थ असून चंद्रगुप्त खरोखर राज्यत्याग करून जैन मुनि झाले होते."

स्वर्गीय श्री. के. पी. जयस्वाल लिहितात की, "चंद्रगुप्त आपल्या कारकीर्दीच्या शेवटी शेवटी जैन झाले होते व नंतर राज्यत्याग करून त्यांनी जैनदीक्षा घेतली होती व मुनी अवस्थेत ते मरण पावले हे जैनांचे म्हणणे न मानण्यास कोणतेहि कारण नाही. असे मानणारा मी कांही पहिलाच व्यक्ती नाही. मि. राईस की, ज्यानी श्रवण-बेळगोळयाच्या शिलालेखाचे पूर्णपणे अध्ययन केले आहे. त्यांनी या मतास पूर्णपणे अनुकूल असे आपले मत प्रदर्शित केले आहे." मि. व्ही. स्मिथ[1] हेहि शेंवटी या मताकडे झुकलेले होते.

## ◆ सम्राट अशोक ( इ. स. पू. २७७ ) ◆

सम्राट अशोक चंद्रगुप्ताचा नातू होता. जैनग्रंथात हा जैन असल्याचें

१ जर्नल ऑफ दी बिहार ओरिसा रीसर्च सोसायटी अंक ३

अनेक पुरारावे मिळतात. कांही विद्वानाचे (इंडियन अँटिक्वेरी; अंक ५) असे मत आहे की, अशोक सुरवातीस जैनधर्मोपासक होता व नंतर बुद्ध झाला या बाबतीत अशोकाच्या कांही लेखाचे प्रमाण दिले जाते, परंतु त्यात तो स्पष्टपणें बृद्ध झाल्याचें कांही उल्लेख आढळत नाहींत. उलट जैनसिद्धांताचे अनुकरणच त्यात अधिक होते. याचे उपनाव 'देवाना पिय पियदसि' असे आढळते. 'देवाना पिय' हे विशेषण विशेषतः जैन-ग्रंथात राजाची उपाधि म्हणून दिले जाते. परंतु अशोकाच्या २२ व्या वर्षाच्या 'भावरा च्या प्रशस्तीत ते बौद्ध असल्याचे स्पप्ट प्रमाण आहे. पण तेथे त्याची पदवी म्हणून फक्त 'पियदसि' एवढेंच लिहिले आहे, त्यात 'देवांना पिय' असे लिहिले नाही तेव्हा मध्यंतरीच तो जैनाचा बौद्ध झाला आसावा. विद्वानाचे असेहि मत[1] आहे की, अशोकने अहिंसेच्या बाबतीत जे नियम प्रचलित केलें होते तें बौद्धापेक्षा जैनाशीच अधिक मिळते जूळतें आहेत. उदा: पुष्कळसे पक्षी व चतुष्पाद जे उपयोगामध्ये येत नाहीत त्यांना किंवा खाण्यामध्य येत नाहीत त्यांना सुद्धा मारण्याचा निशेध करणे' तसेच 'केवळ अनर्थ व हिंसा यासाठी जंगल जाळण्याचा केलेला निशेध व कांही खास तिथी व पर्व यावेळी बंद केलेली जीवहिंसा या गोष्टी जैनत्वाच्या द्योतक आहेत.' बौद्ध शास्त्राचें अधिकारी तज्ज्ञ प्रो. कर्नल असे म्हणतात की, 'अशोकाच्या राज्य-नीतीत संशोधन करूनहि बौद्धाचा प्रभाव मिळत नाही, तसेच मितव्ययी जीवनाशी संबंधी अशा त्याच्या आज्ञा किंवा जाहीर घोषणा बौद्धापेक्षा जैनतत्वाशीच अधिक मिळत्या जुळत्या आहेत.'

---

१ अर्ली फेथ ऑफ अशोक

## सम्राट संप्रति (इ. स. पू. २२०)

[1]संप्रति हा अशोकाचा नातू होता व यास जैनाचार्य 'सुहस्ति' यांनी उज्जैनमध्ये जैनधर्माची दीक्षा दिली होती. त्यानंतर अशोकाने बौद्ध धर्मासाठी जे केले तेच संप्रतीने जैनधर्मासाठीं केले होतें. वायव्य सरहद्दीकडील अनार्य देशांतहि संप्रतीने जैनधर्माचे प्रचारक पाठविले. तेथे जैनसाधूसाठी अनेक विहार स्थापन केले. अशोकाप्रमाणेच त्यानेहि अनेक मोठमोठ्या इमारती बांधविल्या. राजपुतान्यामधील कित्येक जैन कलाकृती तत्कालीन असल्याचे सांगतात. कांही विद्वानांच्या मताप्रमाणे अशोकाच्या नांवाने प्रसिद्ध असलेले शिलालेख हे सुद्धा संप्रतीने लिहविलें असावेत.

याप्रमाणे महावीर स्वामीपासून ४०० वर्षेपर्यंत जैनधर्मी राजा श्रेणिक, महाराज चंद्रगुप्त मौर्य व त्याचे पुत्रादिकांनी भारतवर्ष व त्याच्या बाहेरहि राज्य केले. याकाळांत जैनधर्माचा व्यापक प्रमाणावर प्रभावी प्रचार राहिला. यानंतर मौर्य साम्राज्याचा ऱ्हास होऊ लागला व या घराण्यांतील अंतिम सम्राट वृहद्रथ यास त्याचा ब्राह्मण सेनापति पुष्यमित्र याने त्यास ठार मारून राजसत्ता आपल्या हातात घेतली. याने मात्र श्रमणावर बराचसा अत्याचार केला व त्यांचे विहार व स्तूप नष्ट केले.

१ भारतीय इतिहासकी रूपरेखा या ग्रंथांत पृ. ६१६ वर खालीलप्रमाणे उल्लेख आढळतो.

" कुणालसुनुस्त्रिखण्डभरताधिपः परमार्हतो अनार्यदेशेष्वपि प्रवर्तितश्रमणविहार सम्प्रति महाराजाऽसौ अभवत् । "

म्हणजे कुणालचा पुत्र महाराजा संप्रति हा भारताच्या तीन खंडांचा स्वामी होता व अर्हत् भगवंताचा भक्त–जैन होता. याने अनार्य देशांतहि श्रवण जैन मुनींचा विहार करविला होता.

## २ ओरिसांतील जैनधर्म.

### कलिंग चक्रवर्ती खारवेल (इ. स. पू. १७४)

कलिंग येथे अतिप्राचीन काळापासून जैनधर्माचा प्रभाव होता· स. पू. ४२४ च्या आसपास मगध सम्राट नंदाने कलिंग जिंकून तेथून जिनेंद्र भगवंताची मूर्ति मगध येथे नेली होती. सम्राट संप्रतीच्या वेळी चेदीवंशाचे पुनः राज्य झाले. खारवेल हा या वंशातील प्रसिद्ध सम्राट होता. कलिंग चक्रवर्ती महाराज खारवेल यांचे तत्कालीन राजकारणांत सर्वात अधिक महत्व होते. त्यांच्या हत्ती गुंफेत आढळणाऱ्या शिलालेखाचा उल्लेख अगोदर आला आहेच· त्या लेखाप्रमाणे खारवेल जैन होता एवढेच नव्हे तर ओरिसाचें सर्व राष्ट्रच त्यावेळी प्रामुख्यानें जैनमय होते. स्व. के.पी.जायस्वाल हें लिहितात '[1]ओरिसांत जैनधर्माचा प्रवेश शिशुनागवंशी राजा नंदनवर्धन याच्यावेळी झाला होता.खारवेलच्या वेळेच्या अगोदरच उदयगिरि पर्वतावर अर्हतांचे मंदिर होते. याचा उल्लेख खारवेलच्या लेखात आला आहेच. यावरून असे दिसून येते की खारवेलच्या वेळी जैनधर्म कित्येक शतकांपर्यंत ओरिसाचा राष्ट्रीय धर्म राहिलेला होता.'

महाराजा खारवेलास १५ व्या वर्षी युवराजपद प्राप्त झाले व २४ व्या वर्षी त्यांचा महाराज्याभिषेक झाला. त्यानंतर दुसऱ्याच वर्षी त्याने सालकर्णीची पर्वा न करतां पश्चिमेकडे आपले सैन्य पाठविले व त्या सेनेने मूषिक नगरास पराजित केले. चवथ्या वर्षी खारवेलने पुनः पश्चिमेकडे स्वारी केली तेंव्हा रठ्ठिकांच्या भुजकांनी आपले मुकुट व छत्रभृंगार देऊन ते त्याच्या चरणी नतमस्तक झाले. बाक्त्रीचा यवन

१ जर्नल बि० उ० रीसर्च सो० भाग ३ रा. पृष्टांक ४४८

राजा दिमित एक मोठे सैन्य घेऊन मध्यप्रदेशावर चालून आला होता. खारवेलने त्याच्याशी सामना करून त्यास पळता भुई थोडी करून टाकली. मध्यप्रदेशांतून यवनांचे पूर्ण उच्चाटन करण्याचे श्रेय पूर्णपणें खारवेलकडेच जाते. १२ व्या वर्षी त्याने पंजाबवर चढाई केली. सातकर्णीच्या राज्यावर दोन स्वाऱ्या केल्यावर व यवनराजा दिमित याला मध्यप्रदेशांतून पिटाळून लावल्यावर खारवेल तत्कालीन सर्व राजेलोकांमध्ये प्रमुख मानला जाऊ लागला होता. आतापर्यंत त्याने आपल्या कलिंग देशाच्या आसपास पश्चिमेकडील मुषिकराज्य व महाराष्ट्रावर आणि उत्तरेकडे जवळ असलेल्या मगधावरच स्वारी केली होती. परंतु आतां त्याने उत्तर व दक्षिणेकडे अति दूरदूर दिग्विजय करण्यास सुरुवात केली. त्याची सत्ता चारहि दिशांस भारताच्या अंतिम सीमेपर्यंत पोहोचली. १२ व्या वर्षी त्याने उत्तरापथच्या राज्यांना जेरीस आणले. मगधावर चढाई केल्यावर मगधचा राजा पुष्यमित्र यास दातीं तृण धरावयास लावून नतमस्तक केले आणि राजा नंदानी नेलेली कलिंग येथील जिनमूर्ती पुन: कलिंगांत स्थापन केली. या महाविजयानंतर त्याने जेव्हा शुंग व सातवाहन आणि उत्तरपथचे यवन व सर्वांना शरण आणले तेव्हा खारवेलने जैनधर्माचे महान् अनुष्ठान केले. त्याने भारतवर्षातील जैनमुनी, जैनतपस्वी, ऋषी व विद्वान पंडित याना बोलावून एक धर्मसंमेलन केले. जैनसंघाने खारवेलास त्याचे महाविजय लक्षांत घेऊन 'खेमराजा', 'भिकुराजा', 'धर्मराजा' इ. पदव्या दिल्या. राजा खारवेलच्या कारकीर्दीमध्ये जैनधर्माचा महान् उत्कर्ष साधला गेला.

या शिलालेखांत सं. १६५ दिला आहे. हा संवत स्व. जायस्वाल यांनी मौर्य संवत् म्हणून सिद्ध केला आहे. हा महाराजा चंद्रगुप्ताच्या राज्यरोहण (इ. स. पू. ३२१) काळापासून सुरू झालेला आहे. एका

राजाने, दुसऱ्या स्वतंत्र राजाने सुरू केलेल्या संवताचा उपयोग का करावा? या बाबत श्री. जयस्वालजीचे म्हणणे असे आहे की, चंद्रगुप्त जैन होता हे जैन शिलालेखावरून सिद्धच आहे. तेव्हा एका जैन राजाने चालविलेल्या संवताचा उपयोग दुसऱ्या जैन राजाने केला तर त्यांत आश्चर्य कसले?

याप्रमाणें बिहार व ओरिसा येथे भ. महावीरानंतरहि जैनधर्माचा बऱ्याच प्रमणांत उत्कर्ष झाला इ. स. ३०८ मध्ये पाटीलपुत्राजवळील एका गावाच्या छोटचा राजाने चंद्रगुप्तास लिच्छवी वंशाची कन्या कुमारदेवी दिलेली होती. हा लिच्छवी वंश वैशालीच्या त्या चेटक राजाचा वंश आहे की, ज्याने महावीर स्वामींचे पिता श्री. राजा सिद्धार्थ व मगधचे राजा श्रेणिक वगैरेना आपल्या मुली दिल्या होत्या. अशा गौरवशाली वंशांतील कन्येशी आपला विवाह होतो, ही गोष्ट सम्राट चंद्रगुप्ताने गौरवास्पद मानलेली होती. वास्तविक या संबंधामुळेच ते महाराजा झाले. त्यांनी आपल्या नाण्यावर "लिच्छवी यांची पुत्री" म्हणून आपल्या स्त्रीची मूर्ति काढलेली हाती. त्यांचे वंशज, लिच्छवी वंश आपले मामकुळ आहे या गोष्टीचा अभिमान बाळगीत असत. परंतु पुढे एका बुद्ध साधूच्या उपदेशाने या चंद्रगुप्ताने बौद्धधर्म स्वीकारला. व पुढे त्याचा मुलगा समुद्रगुप्त याने ब्राह्मणधर्म स्वीकारला. तरीहि इ. स. ६२९ मध्ये आलेला चीनी यात्री ह्युएनत्संग याने नालंदा, वैशाली, राजगृह, पुंडवर्धन या ठिकाणी अनेक निर्ग्रंथ साधू पाहिलेले होते. कलिंग देश जैनांचे मुख्य केंद्र असल्याचे तो म्हणतो. यावरून स्पष्ट आहे की, खारवेलानंतरहि इतक्या दीर्घ काळापर्यंत जैनधर्म कलिंगांत प्रचलित होता. सम्राट खारवेलानंतर इतका प्रभावशाली असा जैन राजा झाला नाही. जरी जैनधर्म पुढे साधारणतः सर्व राजवंशमध्ये फळला,

फुलन्ग्र व अनेक राजांनी त्यास सहाय्यहि दिले, तरीहि ज्याना आपण पूर्ण जैन म्हणू शकू असे जैन राजे पुढे कमी कमीच होत गेले.

### ◆ ३ बंगालमधील जैनधर्म. ◆

कांही विद्वानांच्या दृष्टीने, जैनधर्माचे मूळस्थान व पवित्र स्थानहि मगध व पश्चिम बंगाल हे समजले जाते. यावेळी बंगालमध्ये बौद्ध धर्मापेक्षा जैनधर्माचा विशेष प्रचार झालेला दिसतो. तेथील मानभूम, सिंहभूम वीरभूम व वर्द्धमान इ. जिल्ह्याची नावे भ० महावीर व वर्धमान या नांवावरच आधारलेली आहेत. तेव्हा हळूहळू जैनधर्माचा लोप होत गेला, तेव्हा त्याची जागा बौद्धधर्मानें घेतली. बंगालच्या पश्चिम भागात जी सराक जाति आढळून येते ती जैन श्रावकाची पूर्वस्मृति करून देते. आजूनहि पुष्कळसे जैनमंदिराचे अवशेष, जैनमूर्ति, शिलालेख वगैरे जैन स्मृतिचिन्हे बंगालच्या भिन्न भिन्न भागात आढळून येतात, श्रीयुत के डी. मित्र यांच्या संशोधनात त्यांना सुंदरवनाच्या जवळ एकाच जागीच १० जैनमूर्ति मिळाल्या. बांकुरा व वीरभूम या जिल्ह्यात अजूनहि जैन-मूर्ती मिळाल्याचे समाचार मिळाले आहेत. श्री. राखलदास बॅनर्जी यानी हे क्षेत्र तत्कालीन जैनांचे प्रधान केंद्र असल्याचे दाखविले आहे. पूर्व बंगालच्या फरीदपूर जिल्ह्यातील एका गावात सन १९४० मध्ये दोन फूट तीन इंचाची एक जैन मूर्ति निघाली आहे. बंगालच्या कांही भागात मोठमोठ्या जैनमूर्ति भैरवाच्या नावाने अद्यापि पूजिल्या जातात. बांकुडा, मानभूम वगैरे ठिकाणी व खेड्या पाड्याने अजूनहि जैनमंदिराचे अवशेष आढळून येतात. मानभूम येथील पंचकोटच्या राज्याच्या स्वाधीन असलेल्या अनेक गावात विशाल जैनमूर्तिची पूजा हिंदु पुरोहित किंवा ब्राह्मण करीत आहेत. मूर्ति 'भैरव' नावाने ओळखल्या जातात व शूद्र जातीचे लोक तेथे पशूबलीहि करतात. या सर्व मूर्तिवर अजूनहि जैन

लेख मिळतात या प्रकारची एक लेखयुक्त मूर्ति स्व. राखलदास बॅनर्जी हे पंचकोटच्या महाराजापासून घेऊन गेले होते.

शांतिनिकेतनचे आचार्य स्व. क्षितिमोहनसेन विश्ववाणीच्या 'जैन संकृति' अंकात (पृष्ठ नं २०४ वर) लिहितात. "वारकाईने पाहिले असता, बंगालच्या धर्मात, आचारात व व्रतांत जैनधर्माचा प्रभाव दिसून येतो. जैनाचे अनेक शुद्ध बंगालीत रूढ झालेले आहेत. प्राचीन बंगाली लिपीची पुष्कळशी अक्षरे विशेषतः जोडाक्षरे देवनागरीशी जुळत नाहीत. तर ती प्राचीन जैन लिपीशीच अधिक मिळती आहेत."

## ◆ ४ गुजरातमधील जैनधर्म. ◆

[१] गुजराथशी जैनधर्माचा संबंध अति प्राचीन आहे. २२ वे तीर्थंकर श्री नेंमिनाथ यांनी येथल्याच गिरनार पर्वतावर जिनदीक्षा घेऊन मुक्ति प्राप्त करून घेतली आहे. येथल्या वल्लभी नगरात वीर निर्वाण सं ९९३ मध्ये एकत्रित झालेल्या श्वेतांबर संघाने आपल्या आगम ग्रंथाना व्यवस्थित स्वरूप देण्याकरिता लिपीबद्ध केले. ज्याप्रमाणे दक्षिण भारतात दि. जैनाचे प्राबल्य राहिले, त्याचप्रमाणेच गुजरातमध्ये श्वेतांबर जैनांचे प्राबल्य राहिले. गुजरातमध्येहि अनेक जैनधर्मावलंबी राजवंश झाले. राष्ट्रकूटाचे राज्यहि गुजराथेत राहिले. गुजराथेतील संजान संस्थानात मिळालेंल्या एका शिलालेंखात पहिल्या अमोघवर्षाची स्तुति केली आहे. अमोघवर्षाचे गुरु श्री. जिनसेनाचार्य यांनी आपल्या जयधवलाच्या

---

१ Architecture of Ahamadabad ' यात लिहिलें आहे की, ' गुजराथेत जैनधर्म केव्हापासून सुरू झाला किंवा कोठून झाला हे माहिती नाही. परंतु आमच्या माहितीप्रमाणे हा प्रांत या धर्माचे अत्यंत उपयोगी केंद्र व मुख्य स्थान आहे.'

टीकेच्या प्रशस्तीत अमोघवर्षाचा उल्लेख 'गुर्जरनरेंद्र'[1] या नावाने केला आहे. यावरून हें स्पष्ट आहे की, अमोघवर्षाने गुजराथेवरहि राज्य केले व त्याच्या राज्यांत जैनधर्म चांगलाच वहरला.

राष्ट्रकूटाच्या हातांतून निघून गुजराथ, पश्चिमी चालुक्यांच्या हातात गेला पुढे चावडा वंशीय वनराजाने यावर आपला अधिकार जमविला. त्याचे लालनपालन एका जैन साधूच्या देखरेखीखाली झालें. त्यामुळे तो जैनधर्मी झाला. जेंव्हा या राजाने अणहिलवाडयाची स्थापना केली, तेव्हा तेथे जैनमंत्राचाच उपयोग केला गेला व तेथे त्याने एक जैन मंदिरहि बांधविलें. चावडा वंशांतूत निघुन गुजराथ पुन्हा चालुक्यांच्या हातात आला. हे लोकहि जैनधर्माचे पालन करीत होते. यांचा पहिला राजा मूळराज याने अणहिलवाडा येथे एक जैनमंदिर बांधलें. पहिल्या भीमाच्यावेळी त्याचा सेनापति विमल याने अबू पर्वतावर प्रसिद्ध जैन-मंदिर बांधविले. त्यास 'विमलवसही' म्हणतात. सिद्धराज जयसिंह हा अतिप्रसिद्ध राजा झाला. याच्यावर जैनाचार्य हेमचंद्राचा अतिप्रभाव होता. याच्याच नांवावर आचार्यांनी आपल्या 'सिद्धहेम व्याकरणा'ची रचना केली. याने जैनधर्म स्वीकारला नसला तरी आचार्यांच्या सांग-ण्यावरून सिद्धपूर येथे महावीर स्वामीचे मंदिर बांधविले व गिरनार पर्वताची यात्रा सुद्धा केली.

जयसिंहानंतर कुमारपाल हा गुजराथच्या गादीवर बसला. याच्यावर हेमचंद्राचार्याचा चांगलाच प्रभाव पडला व याने हळूहळू जैनधर्म स्वीकारला, यानंतर या राजानें मांसाहार व शिकार खेळण्याचाहि त्याग केला व आपल्या राज्यांत पशुहिंसा, मांसाहार व मद्यपान यांना वंदी केली. कसायांना आमदानी तीन वर्षाची अगाऊ देण्यांत आली व

---

[1] देखा—जयधवला प्रथमखण्डाकी प्रस्तावना पृष्ठ ७४

ब्राह्मणांना यज्ञात पशूंच्या ऐवजी धान्य टाकून हवन करण्याची आज्ञा दिली गेली. याने अनेक जैन-तीर्थांच्या यात्रा केल्या व पुष्कळशी जैन मंदिरे बांधविली. याच्या कारकीर्दीमध्येच आचार्य हेमचंद्रांनी अनेक ग्रंथांची रचना केलेली आहे.

चालुक्यांचा अस्त झाल्यावर तेराव्या शतकांत वघेलाचे राज्य आले. यांच्यावेळी वस्तुपाल व तेजपाल नांवाच्या जैन मंत्र्यांनी अबू येथील प्रसिद्ध मंदिरे बांधविली. तसेच शत्रुंजय व गिरनार पर्वतावरहि जैन मंदिरे बांधविली. याप्रमाणे गुजराथमध्येहि राजाश्रय मिळाल्याने जैनधर्माची बरीच उन्नति झाली.

याप्रमामाणे भ. महावीरानंतर विहार, ओरिसा, गुजराथ वगैरे ठिकाणी जवळजवळ २००० वर्षेपर्यंत जैनधर्माची चांगलीच भरभराट झाली. यावेळी अनेक प्रभावशाली जैनाचार्यांनी उपदेश शास्त्रलेख व शास्त्रार्थ यांच्या द्वारे जैनधर्माचा खूप प्रचार केला. एकट्या संमत-भद्राचार्यांनी सर्व भारतवर्षात विहार करून अनेक राजदरबारांमध्ये आपल्या प्रभावी वक्तृत्वाने व सूक्ष्म तार्किक शक्तीने प्रभाव पाडला होता. तसेच इतर भागांतहि मिळणाऱ्या जैन स्मारकांवरून जैनधर्माचा बराच विस्तार झाल्याचे पुरावे आढळून येतात.

## ५ राजपुतान्यांतील जैनधर्म

स्व. ओझाजी यांनी आपल्या राजपुतान्याच्या इतिहासांत लिहिले आहे की,'अजमेर जिल्ह्याच्या वर्ली नामक गांवात वीर सं.८४ (इ.स.पू ४४३) चा एक शिलालेख मिळाला आहे, तो अजमेरच्या म्यूझियममध्ये सुरक्षित आहे. यावरून असे अनुमान निघते की, अशोकाच्या अगोदरहि राजपुतान्यांत जैनधर्माचा प्रसार झालेला होता. जैन लेखकांचे असे मत आहे की, राजा संप्रतीने जैन धर्माची खूप भरभराट केली. राजपुताना व

त्याच्या आसपासच्या प्रदेशात अनेक जैन मंदिरे बांधविली. विक्रम संवताच्या दुसऱ्या शतकात केलेल्या मथुरेच्या कंकाली टीलेच्या जैन-स्तूपावरून व तेथील दुसऱ्या कांही ठिकाणाहून प्राप्त झालेल्या प्राचीन शिलालेख व मूर्तीवरून असे दिसून येतें की, त्यावेळी राजपुतान्यात जैन-धर्माचा चांगला प्रचार झालेला होता.'

ओसवाल, खंडेलवाल,बघेरवाल,पल्लीवाल इ. प्रसिद्ध प्रसिद्ध जैन जातीचे उगमस्थान राजपुतानाच मानलें जाते. चितोडचा प्राचीन कीर्तिस्तंभ जैनानीच बनविलेला आहे. उदयपूरच्या राज्यातील केशरीया नाथ हे जैनांचे प्राचीन पवित्र स्थान असून त्याची पूजा, वंदना जैनेतरहि करतात.[1] राजपुतान्यात जैनानी ज्या चातुर्याने व कौशल्याने राजपद, मंत्रिपद व सेनापतिपद राबविले. त्यामुळे राजपुतान्याच्या इतिहासात त्याचें नांव अमर झाले आहे. राजपुतन्याचे ढुंढारी हिंदीचे असे कांही धार्मिक जैन विद्वान् निर्माण केले की, ज्यांनी संस्कृत, प्राकृत भाषेतील ग्रंथावर प्रामाणिक हिंदी टीका लिहून लोकावर अत्यंत उपकार केलें आहेत. राजपुतन्याच्या जेसलमिर, जयपूर, नागौर, आमेर इ. ठिकाणी पुष्कळसे प्राचीन शास्त्रभंडार आजहि आहेत.

### ◆ ६ मध्य प्रांतातील जैनधर्म ◆

मध्यप्रांतात सर्वात मोठा राजवंश 'कलचूरी' वंश होता. याचे प्राबल्य ८ व्या ९ व्या शतकात फारच होते. हे कलचूरी राजे सुरवातीस जैन धर्माचे पोषक होते. काही शिलालेखात असा उल्लेख मिळतो की, कलभ्र लोकांनी तामीळ देशावर चढाई केली व तेथील राजांना पराजित करून त्यावर आपले राज्य जमविले. प्रो. रामस्वामी अय्यंगार[2] यांनी असे सिद्ध

---

१ राजपुताने के जैनवीर

२ Studies in South Indian Jainism P. 53-56

केले आहे की, हे कलभ्रवंशी राजे जैनधर्माचे पक्के अनुयायी होते. हे तामीळ देशात गेल्यावर तेथे त्यानी जैनधर्माची बरीच उन्नत्ति केली. हा कालभ्रवंश कलचुरी वंशाची शाखा असल्याचे समजले जाते. यांचे वंशज नागपूरच्या आसपास जैनकलार म्हणून अजूनहि आहेत. एकेवेळी हे जैन होते. मध्यप्रांताचे कलचुरी नरेश जैनधर्माचे पोषक होते. याचें आणखीहि एक प्रमाण असे आहे की, यांचा राष्ट्रकूट राजाशी घनिष्ठ संबंध होता. दोन्ही राजवंशात अनेक विवाहसंबंध झाले होते. तसेच राष्ट्रकूट राजे जैनधर्मोपासकहि होते.

कालचुरीची राजधानी त्रिपुरी व रतनपूर येथे आजहि अनेक प्राचीन जैनमूर्ति व भग्नावशेष मिळतात. या प्रांतात अनेक जैनतीर्थ आहेत. बैतूल जिल्ह्यात मुक्तागिरि, सागर जिल्ह्यात दमोहजवळ कुंडलपूर निमाड जिल्ह्यात सिद्धवरकूट क्षेत्र ही सर्व आपल्या नैसर्गिक सौदर्याने खुलून दिसतात. भेलसा चवळील 'वीसनगर' हे जैनाचे अतिप्राचीन स्थान आहे. हे शीतलनाथ तीर्थंकरांची जन्मभूमी असल्यामुळे अतिशय-क्षेत्र समजले जाते. जैनग्रंथात याचा उल्लेख 'भद्दलपूर' नावानें ओळखला जातो.

बुंदेलखंडातहि अनेक जैनतीर्थ आहेत, यांत सोनागिर, देवगड, नैनागिर, द्रोणगिरि हे उल्लेखनीय आहेत. खजुराहाची प्रसिद्ध जैनमंदिरे आजहि यात्रेकरुंचे मन आकृष्ट करून घेतात १७ व्या शतकापासून येथे जैनधर्माचा ऱ्हास सुरू झाला. येथे एकेवेळी लाखो जैनी होते. पण आता जैनधर्माचा पत्ता फक्त जैनमंदिराचे भग्नावशेष व भग्न जैन-मूर्तिवरूनच समजून घ्यावा लागतो.

## ◆ ७ उत्तर प्रदेशातील जैनधर्म ◆

उत्तर प्रदेशात जैनधर्माचे केंद्र या दृष्टीने मथरेचे नाव उल्लेखनीय

आहे. येथील कंकाली टीलमध्ये जे लेख आढळले आहेत, ते इ. स. पू. २ ऱ्या शतकापासून ते ५ व्या शतकापर्यंतचे आहेत. या दृष्टीने ते अति प्राचीन आहेत. यावरून असे आढळून येते कीं, इतक्या दीर्घ कालावधीपर्यंत मथुरा नगरी हे जैनधर्माचे प्रमुख केंद्र होते. या शिलालेखावरून जैनधर्माच्या इतिहासावर स्पष्टपणे प्रकाश पडतो. व यावरून असे दिसून येते की, जैनधर्माचें सिद्धान्त व त्याची व्यवस्था ही अतिप्राचीन आहे. येथील प्राचीनतम शिलालेखावरून येथला स्तूप किती शतकापूर्वीचा जुना आहे. या बाबतीत मि. फुहरर् लिहितात[1] हा स्तूप इतका प्राचीन आहे की, हा ज्यावेळी लिहिला ती वेळ व या स्तूपाची प्रारंभीची माहिती ही विस्मृतप्राय झालेली होती.'

वास्तविक उत्तर प्रदेशातील जैनधर्माचा इतिहास अगदीच अंधःकारमय आहे. म्हणून उत्तर प्रदेशाच्याराजाचा जैनधर्माशी कसा संबंध होता हे स्पष्टपणे सांगता येत नाही. तरीहि उत्तर प्रदेशात सर्वत्र जी प्राचीन जैन ऐतिहासिक सामुग्री मिळते, त्यावरून हे स्पष्ट दिसून येते की, येथें जैन धर्माचा चांगला प्रभाव होता व अनेक राजांनी त्यास आश्रय दिलेला होता. उदा. हर्षवर्धन हा अत्यंत प्रतापशाली राजा होता. जवळ जवळ सर्व उत्तर प्रदेशात याचे राज्य पसरले होते. याने ५ वर्षे पर्यंत प्रयागमध्यें धार्मिक महोत्सव केला व त्यात त्यांने जैनधर्माच्या धार्मिक पुरुषाचा चांगला आदरसत्कार केल्याचे दिसते.

जे राजे जैनधर्माचे पालन करीत नव्हते, परंतु जैनधर्माच्या मार्गात बाधाहि आणीत नव्हते अशा धर्मसहिष्णु राजांच्या काळातहि जैनधर्माची बरीचशी उन्नति झाली. सर्व उत्तरभारत व मध्य-भारतातील

---

१. म्यूझियम रीपोर्ट, १८९०–९१ ।

सर्व प्रदेशात आजहि सापडणारी जैनधर्माची चिन्हे व अवशेष या गोष्टीला साक्ष आहेत उत्तर प्रदेशात ज्या जिल्ह्यात आज नाममात्र जैन राहिले आहेत, त्याठिकाणीहि प्राचीन जैनसंस्कृतीचे कांही अवशेष सापडतात. उदा. गोरखपूर जिह्यात देवरिया तालुक्यात कुहाउ व खुखुंद यांचे नाव उल्लेखनीय आहे. अलाहाबादच्या नैऋत्येस ११ मैलावर देवरिया व भीता येथे बरेचसे प्राचीन खंडावशेप सापडतात. कनिगहॅम् साहेबाचे असे म्हणणे आहे की, येथे यादव वंशाचें उदयन राजे राहत होते व ते जैनधर्माचे पालन करीत होते. त्यांनी श्री. महावीर स्वामीची एक मूर्ति बनविली होती व ती घेण्यासाठी उज्जयनीचा राजा व उदयन यांच्यात मोठे युद्ध झालें.

वलरामपूर (अयोध्या) च्या पश्चिमेस १२ मैलावर 'सहेठमहेठ' नावाचे ठिकाण आहे. येथे खोदकाम झाले होते व हेच ठिकाण श्रावस्ती नगरी आहे (असे दिसून आले). या बावतीत डॉ. फुहरर् लिहितात की, ११ व्या शतकामध्ये श्रावस्तीत जैनधर्माची बरीच भरभराट झालेली होती, कारण येथील खोदकामात तीर्थंकरांच्या कित्येक मूर्ती आढळल्या असून त्यावर संवत् १११२ ते ११३३ खोदल्याचे आढळते. सुहृध्वज हे श्रावस्तीच्या जैन राजापैकी शेवटचे राजे होत. हे महंमद गझनींच्या वेळी झालेले होतें.

वरेली जिल्ह्यात 'अहिच्छत्र' नावाचे एक जैन तीर्थस्थान आहे. तेथे राज्य करणारे मोरध्वज नावाचे राजे जैन होतें असे सांगतात. एकेकाळी येथे जैन धर्माची वरीचशी भरभराट झालेली होती. याच्या आसपासच्या खेड्यातही बऱ्याचशा जैनमूर्ती सापडल्या आहेत.

याचप्रमाणे इटावाच्या ईशान्येस २७ मैलावर 'परवा' नावाचे एक ठिकाण आहे येथेहि जैनमंदिराचे भग्नावशेष सापडतात. डॉ. फुहरर् यांचे असे म्हणणे आहे की, एकेवेळी येथे जैनाचे प्रसिद्ध शहर आलभी हे

वसलेले होते. ग्वाल्हेच्या किल्ल्यांतहि विशाल जैनमूर्ती मोठ्या प्रमाणांत सांपडतात. ही गोष्ट प्राचीन राजघराण्यांचा जैनधर्माशी संबंध असल्याचें सूचित करते.

याप्रमाणे उत्तर भारतांतील उल्लेखनीय जैन राजांचा उल्लेख मिळत नसला तरी अनेक राजांचा जैनधर्माशी सहयोग असल्याचे सूचित होते. व महावीरांच्या पश्चातहि जैनधर्म तेथे चांगला उत्कर्षाप्रत गेला होता ही गोष्ट स्पष्ट होते.

## ८ दक्षिण भारतातील जैनधर्म

उत्तर भारतांतील जैनधर्माच्या स्थिती माहिती दिल्यानंतर आता दक्षिण भारतांतील जैनधर्माची स्थिति पाहणे ओघानेच येत. चंद्रगुप्त मौर्याच्या वेळी उत्तर भारतांत १२ वर्षाचा भयंकर दुष्काळ पडल्यानंतर जैनाचार्य भद्रबाहू यांनी आपल्या विशाल जैनसंघाबरोबर दक्षिण भारताकडे विहार केला होता. त्यावेळी जैनधर्माचा द. हिंदुस्थानांत चांगलाच प्रसार होता व भद्रबाहूंना असा पूर्ण विश्वास होता की, येथे त्यांच्या संघास कोणत्याहि प्रकारे त्रास होणार नाही. असे नसते तर इतक्या मोठ्या संघाला बरोबर घेऊन दक्षिण भारताकडे जाण्याचे त्यांनी साहस केले नसते. जैनसंघाच्या या यात्रेने द, भारतांत जैनधर्म अधिकच जास्त पसरण्यास चांगला वाव मिळाला.

श्रवण संस्कृति ही वैदिक संस्कृतीपेक्षा नेहमी अधिक उदार राहिली आहे. भाषा व अधिकाराचे कडक बंधन वैदिक संस्कृतीत आढळत होते तसे श्रमण संस्कृतीत नव्हते. जैन तीर्थकरांनी नेहमी आपल्या उपदेशाचे माध्यम 'लोकभाषा' हेच ठरविले होते जैन–साधू हे जैनधर्माचे चालते फिरते प्रचारक असतात. त्यांना जनतेकडून केवळ

आपल्या शरीराच्या स्थैर्यासाठी दिवसांतून एक वेळ जे कांही नीरस परंतु शुद्ध भोजन मिळते. त्याच्या कितीतरीपट मूल्य ते सत्‌शिक्षण व सदुपदेशाच्या रूपाने जनतेला देतात व इतर रिकाम्या वेळी साहित्याची निर्मिती करून पुढच्या पिढीकरितां सत्‌शिक्षणाचा चांगला वारसा आपल्या मागे ठेवतात. अशा प्रकारच्या कर्मठ व जनहिततत्पर साधूंचा समागम ज्या देशास मिळाला, त्या देशांत यांच्या प्रचाराचा कांही प्रभाव होणार नाही ही गोष्ट सुतरां अशक्य. त्याचा परिणाम असा झाला की, उत्तर भारतांतील या जैनसंघाच्या दक्षिणेकडील यात्रेने द. भारतातील जैनांत[1] एक विशिष्ट क्रांति निर्माण केली. त्यांचे साहित्य बरेच समृद्ध होते व ती भूमी जैनाचार्यांची खाण व जैन संस्कृतीच्या संरक्षणाचे व संवर्धनाचे केंद्र

---

१ प्रो. रामस्वामी अय्यंगार आपल्या 'स्टडीज इन् साऊथ इंडियन जैनिझम्' या पुस्तकात लिहितात- 'सुशिक्षित जैन साधू आपापले लहान लहान समूह करून सर्व दक्षिण भागांत पसरलेले होते. दक्षिणेकडील भाषेत आपले धार्मिक साहित्य निर्माण करून आपले धार्मिक विचार हळू हळू पण स्थायी रूपाने त्यांनी जनतेत पसरविले. परंतु लौकिक कार्यात हे साधू निव्वळ उदासीन राहत असत, अशी कल्पना करणे ही मोठी चूक आहे. त्यांचा संसाराशी संबंध नव्हता ही गोष्ट एका दृष्टीने खरी आहे. परंतु मेगॅस्थिनीसच्या वर्णनावरून असे दिसून येते की, इ. स पू. चौथ्या शतकापर्यंतचे राजे लोक आपल्या दूतांना पाठवून वनवासी जैन श्रमणांकडून राजकीय घटनाबद्दल स्वतंत्रपणें त्यांची सल्लामसलत घेत असत. जैन गुरूंच्या नेतृत्वाखाली राज्यांची स्थापना झालेली होती व ती राज्ये कित्येक शतकेपर्यंत जैनधर्माशी सहिष्णुतेनें वागत असत. परंतु जैनधर्म-ग्रंथांत रक्तपाताच्या निषेधावर जों आत्यंतिक जोर दिला आहे, त्यामुळे संपूर्ण जैन जमाती राजनैतिकदृष्ट्या अधोगतीस पोहोचल्या.' पा १०५-१०६.

वनलेले होते.

जैनधर्माच्या प्रचाराच्या दृष्टीने द. भारत, तामीळ व कर्नाटक या दोन भागांत विभक्त केला जाऊ शकतो. तामीळ प्रांतात चोल, व पांड्य राजानी जैनधर्मास चांगला आश्रय दिला. खारवेलच्या शिला-लेखांवरून असे दिसून येते की, सम्राट खारवेलच्या राज्याभिषेकाच्या-वेळी पांड्य राजाने कित्येक जहाजे भरून त्यांना भेट पाठविली होती. सम्राट खारवेल जैन होता व पांड्य राजेहि जैन होते. पांड्य वंशाने जैनधर्मास केवळ आश्रय दिला एवढेच नव्हे तर त्यांचे आचार व विचार सुद्धा स्वीकारले. म्हणूनच त्यांची राजधानी मदुरा द भारतातील जैनाचे प्रमुख स्थान वनलेली होती. तामीळ ग्रंथ 'नालिदियर' च्या वावतीत असे सांगतात की, उत्तर भारतात दुष्काळ पडल्यानंतर आठ हजार जैन साधू पांड्य देशात आले होते. जेव्हा ते तेथून परत जाऊं लागले तेव्हा पांड्य राजानी त्यांना तेथेच ठेवण्याची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हा एकेदिवशी ते रात्रीच्या वेळी पांड्य राजांची राजधानी सोडून निघाले. परंतु जात असताना प्रत्येक साधूने एकएका ताडपत्रावर एकएक पद्य लिहिले. ही सर्व एकत्रित करूनच 'नालिदियर' ग्रंथ तयार झाला. जैनाचार्य पूज्यपादचे शिष्य वज्रनंदी यांनी पांड्यांची राजधानी मदुरा येथे एका विशाल जैनसंघाची स्थापना केली. तामीळ साहित्यांतील 'कुरल' नांवाचा नीतिग्रंथ सर्वात चांगला समजला जातो. याला 'तामीळ वेद' म्हणतात. याचे ग्रंथकारहि एक जैनाचार्यच असून त्यांचें एक नांव कुंदकुंद असे होते. पल्लव-वंशीय शिवस्कंदवर्मा महाराज हे त्यांचे शिष्य होते. इ. स. च्या १० व्या शतकापर्यंत राज्य करणाऱ्या महाप्रतापी पल्लव राजांची जैनांवर कृपादृष्टि होती. यांची राजधानी कांची ही सर्व धर्मांचे स्थान होते. चीनी यात्रेकरू ह्युएनत्संग ७ व्या शतकांत कांची येथे आला होता. त्याने येथे वाढलेले जे जे धर्म पाहिले

त्यांत जैनधर्माचाहि उल्लेख आहे. यावरूनहि कांची हे जैनांचे मुख्य स्थान होते. हे सिद्ध होते. येथे जैन राजवंशानें पुष्कळ वर्षेपर्यंत राज्य केले. याप्रमाणे तामीळ देशाच्या प्रत्येक अंगप्रत्यंगात जैनांचा महत्वपूर्ण भाग होता. [1]सर वॉल्टर इलियट् यांच्या मताप्रमाणे दक्षिणेकडील कला व कारागिरीवर जैनधर्माचा बराचसा प्रभाव आहे. पण त्यापेक्षाहि त्यांचा अधिक जास्त प्रभाव तामीळ साहित्यावर पडलेला आहे. बिशप कॉल्डवेल[2] याचे असे म्हणणे आहे की, जैनांच्या उन्नतीचे युग हेच तामीळ साहित्याचेहि मोठे युग होते. त्यांनी तामीळ, कानडी व इतर लोकभाषांचा उपयोग केला. त्यामुळे ते लोकांच्या संसर्गात अधिक आले व जैनधर्माच्या सिद्धांताचाहि त्यांही सर्वसाधारण लोकात अधिकच प्रचार केला.

एकेवेळी कानडी व तेलगु प्रदेशापासून ते ओरिसापर्यंत जैन धर्माचा चांगला प्रभाव होता. शेषगिरिराव यांनी आपल्या ' आंध्र कर्नल जैनिझम् ' यांत जो काव्यसंग्रह प्रकाशित केला आहे त्यावरून असे दिसून येते की, आजच्या विजगापट्टम् कृष्ण व नेलोर वगैरे प्रदेशांत प्राचीनकाळी जैनधर्म पसरलेला होता व तेथे त्यांची पुष्कळशी मंदिरे होती

परंतु जैनधर्माचे सर्वात महत्वपूर्ण स्थान कर्नाटक प्रांताच्या इतिहासांत दिसून येते हा प्रांत प्राचीन काळापासूनच दिगंबर जैन

---

१ Coins of Southern India [ London 1886 ]
P. No. 38-40-126.

२. " Comparative Grammar" of the Dravidian or South Indian family of languages "
तिसरी आवृत्ति (लंडन १९१३).

संप्रदायाचे मुख्य केंद्र होते. या प्रांतात मौर्य साम्राज्यानंतर आंध्र वंशाचे राज्य होतें व आंध्र राजेहि जैनधर्मीच होते. आंध्र वंशाच्या पश्चात् वायव्येकडे कंदबाचे व ईशान्येकडे पल्लवांचे राज्य होते. येथे कदंब वंशाचे अनेक शिलालेख मिळाले आहेत त्यातील अनेक लेखात जैनांना दान केल्याचा उल्लेख मिळतो. या राजवंशाचा धर्म जैनधर्म होता. सन १९२२–२३ च्या एपिग्राफी रिपोर्टात लिहिल्याप्रमाणे" ज्यांनी पल्लवांच्या पश्चात् तुळुव देशात राज्य केले ते वनवासीचे प्राचीन कदंब व चालुक्य राजे निःसंशय जैन होते व ही वरीचशी शक्यता आहे की, प्राचीन पल्लव जैन होते. कारण संस्कृतात 'मत्तविलास' नावाचे प्रहसन आहे. ते पल्लवराज महेंद्रवर्मा याने लिहिल्याचें सांगतात. या ग्रंथात यावेळच्या प्रचलित संप्रदायाची चेष्टा केलेली आहे. विशेषतः पाशुपत कापालिक व एका बौद्ध भिक्षूस हास्य–पात्र बनवून कुचेष्टा केलेली दिसते. पण यांत जैनांना सामील केलेले नाही यावरूनहि असे दिसून येते की, ज्यावेळी महेंद्रवर्मा हा ग्रंथ लिहित होता, त्यावेळी तो जैन होता व नंतर शैव झाला असावा. कारण शैव संप्रदायातहि याची प्रसिद्ध आहे की, शैव साधु अप्परंग याने महेंद्रवर्मास शैव बनविले होते[2] सारांश, कदंबाप्रमाणे चालुक्यहि जैनधर्माचे प्रमुख आश्रयदाते होते.[3] चालुक्यानी अनेक जैन मंदिरे

१. " Early kadambas Banbasi and Chalukyas, who succeeded pallavas as overlords of Tuluva were undoubtedly Jains and it is probable that early pallavas were the same"

२. साउथ इंडियन हिस्ट्री अँड कल्चर,' भा. १ पृ. ५८४.

३ Smith's :– Early Histrory of India, P, 444,

बांधविली व जीर्णोद्धारहि केला, त्यांना दान दिले व कानडीचे प्रसिद्ध जैन कवि आदिपंप यांचा चांगला सन्मान केला.

याशिवाय इतिहासावरून असेहि दिसते की, कर्नाटकात स्त्रिया-नीही जैनधर्माच्या प्रचारात भाग घेतला होता. या स्त्रियात कांही राजघराण्यातीलहि स्त्रिया होत्या आणि साधारण घराण्यातील स्त्रियांची सेवाहि उल्लेखनीय आहे. परमगूलची पत्नी 'कंदाच्छि' यांचे नाव उल्लेखनीय आहे. तिने श्रीपुर नावाच्या ठिकाणी उत्तरेस एक जैनमंदिर बांधविले. परमगूलच्या विनंतीप्रमाणे गंगननृपति श्रीपुरुप याने या मंदिरास एक गाव व कांही भू-भागहि दान म्हणून दिला. या स्त्रीचा गंगराज परिवारावर चांगला प्रभाव होता. दुसरी उल्लेखनीय स्त्री 'जक्कियब्बे' ही होती. ही सत्तरसनागार्जुनाची पत्नी होती. तो नागर विभागाचा प्रशासक होता. पति मेल्यानंतर त्याच्या जागेवर राजानें पत्नीची नियुक्ती केली. पत्नीने अपूर्व साहस व पराक्रमाचा परिचय दिला आणि सल्लेखना-पूर्वक प्राणविसर्जन केले.

इ. स. च्या १० व्या शतकात पश्चिमी चालुक्य राजा तैलपचा सेनापति मल्लप होता. त्याची मुलगी अत्तिमब्वे ही आदर्श धर्मचारिणी होती. तिने आपल्या खर्चानें सोन्याच्या आणि किंमती रत्नांच्या १५०० बनविल्या होत्या. राजेंद्र कोंगाल्व याची आई पोचब्वरासी हिने मूर्ती इ. स.१०५० मध्ये एक बसई (मंदिर) बांधविली.

कदंब राजा कीर्तिदेव याची पहिली पत्नी माललदेवी हिचे स्थानहि धर्मप्रेमी महिलांत फार मोठे होते. हिने इ. स. १०७७ मध्ये पद्मनंदी सिद्धांतदेवाकडून पार्श्वनाथ चैत्यालय बनविले. व प्रमुख ब्राह्मणांना बोलाऊन घेऊन त्यांच्याकडूनच त्या जिनालयाचे नाव 'ब्रह्मजिनालय' असे ठेविले.

नागरखंडीच्या धार्मिक इतिहासांत चट्टलदेवीचे विशिष्ट स्थान आहे. ही सांतर परिवारातील होती. सांतर परिवार हा जैन मतावलंवी असून त्याचे धर्मप्रेमहि अतिप्रसिद्ध होते. या चट्टलदेवीने सांतरांची राजधानी पोंबुच्चपूर येथे मंदिर बांधवून अनेक परोपकारी कृत्ये केली.

येथे द. भारताच्या राजकीय इतिहासावर थोडी माहिती देणे योग्य ठरेल. गंगाराजाने म्हैसूरच्या एका मोठ्या भागावर इ. स. च्या दुसऱ्या शतकापासून ते अकराव्या शतकापर्यंत राज्य केले. व त्यानंतर त्यांचा चोल राजांनी पराभव केला; परंतु चोलराजे दीर्घकालपर्यंत राज्य करू शकले नाहीत. होयसाल यांनी त्याला हाकलून दिले. व आपला स्वतंत्र राजवंश स्थापित करून त्याने ११ते १४ व्या शतकापर्यंत राज्य केले.

प्राचीन चालुक्यांनी ६ व्या शतकाच्या आसपास राज्य स्थापित केलें व प्रवल शासनाचा कांही काळ गेल्यावर त्याचे पूर्वीय चालुक्य व पश्चिमीय चालुक्य असे दोन भाग झाले. पूर्वीय चालुक्यांनी इ. स. ७५० पासून ११ व्या शतकापर्यंत राज्य केले व त्यानंतर त्याचे राज्य चोल राजानी आपल्या राज्यांत विलीन करून घेतले. पश्चिमीय चालुक्य राज्य इ. स. ७५० च्या सुमारास राष्ट्रकूटांनी कावीज केले.

राष्ट्रकूटांनी इ. स. ९७३ पर्यन्त आपली स्वतंत्रता कायम ठेवली व त्यानंतर पश्चिमी चालुक्यांनी त्यांचा पराभव केला. चालुक्यांनी जवळ जवळ दोनशे वर्षे राज्य केले व त्यानंतर कालाचूरी यांनी त्याचा पराभव करून ३० वर्षे राज्य केले.[1] या प्रत्येक राजवंशाच्या वेळेचे जैनधर्माच्या स्थितीचे वर्णन स्वतंत्रपणे पाहू.

---

१ 'Studies in South Indian Jainism' P. 107

## ◆ गंगवंश. ◆

या वंशाची स्थापना इ. स. च्या दुसऱ्या शतकांत जैनाचार्य सिंहनंदी यानी केली होती. यांचा पहिला राजा माधव असून त्यास कोंगणीवर्मा म्हणत. मुष्कार अथवा मुखार यांचे वेळी जैनधर्म हा राजधर्म होता. ३ ऱ्या व ४ थ्या राजांना सोडून त्यांचे बाकीचे पूर्वज निश्चितपणे जैनधर्म सहाय्यक होते. माधवाचा उत्तराधिकारी अवनीत हा जैन होता व त्याचा उत्तराधिकारी दुर्विनीत हा प्रसिद्ध वैयाकरणी जैनाचार्य पूज्यपाद यांचा शिष्य होता.

इ. स. च्या ४ थ्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंतच्या अनेक शिलालेखावरून ही गोष्ट स्पष्ट होते की, गंगवंशाच्या शासकांनी जैन-मंदिरे बांधली, जैनप्रतिमाची स्थापना केली व जैनतपस्वीकरिता अनेक गुंफा तयार केल्या व जैनाचार्याना दान दिले.

या वंशातील एका राजाचे नाव मारसिंह-२ (दुसरा) असे होते. याच्या काळात चेर, चोल व पांड्य या वंशावर पूर्णविजय मिळविला गेला. हा जैनसिद्धांताचा खरा अनुयायी होता. ऐश्वर्यपूर्वक राज्य केल्यानर याने राजपद सोडून धारवाड प्रांतातील बांकापूर या ठिकाणी आपले गुरु अजितसेन यांच्यासमोर समाधिपूर्वक प्राणत्याग केला. एका शिलालेखाच्या आधारे याच्या मरणाचा सन इ. स. ९७५ हा निश्चित केला गेला आहे.

चामुंडराय हा मारसिह द्वितीय याचा सुयोग्य मंत्री होता, राजा मेल्यावर त्याचा मुलगा राजा राजमल्लाचा मंत्री व सेनापति झाला. या मंत्र्याच्या शौर्यामुळेच मारसिंह अनेक विजय मिळवू शकला, श्रवणबेळगोळ (म्हैसूर) येथील एका शिलालेखात याची बरीचशी प्रशंसा केलेली आहे. धर्मधुरंघर, वीरमार्तंड, रणरंगसिंह, सुभटचूडामणि इ. त्यास अनेक

उपाधि होत्या. हा अति शूरवीर व धार्मिक होता. चामुंडरायाने श्रवण-वेळगोळ येथील विंध्यगिरी पर्वतावर गोम्मटस्वामींची एक अतिविशाल व सुंदर अशी मूर्ति स्थापन केली. ही मूर्ति जगातील अनेक आश्चर्यापैकी एक आश्चर्य म्हणून समजली जाते. आपल्या म्हातारपणात चामुंडरायाने आपला बराचसा वेळ धार्मिक कार्यात घालविला. चामुंडराय हा जैन-धर्मोपासक तर होताच पण चांगला मर्मज्ञ व विद्वानहि होता. त्याचा कानडी भाषेतील 'त्रिषष्ठिलक्षण महापुराण' हा ग्रंथ अतिप्रसिद्ध आहे. संस्कृतमध्ये 'चारित्रसार' नांवाचा त्याने लिहिलेला ग्रंथ आहे. चामुंड-रायाची जैनधर्माच्या थोर महापुरुषात (कार्यकर्त्यात) गणना केली जाते. याचेवेळी जैनसाहित्याचीहि चांगली वाढ झाली होती. सिद्धांत ग्रंथाचा सारभूत असा 'श्रीगोम्मटसार' नांवाचा एक उच्चकोटीचा जैनग्रंथ त्याच्या निमित्तानेच लिहिला गेला होता व त्यांच्या गोम्मटराय या नांवावर या ग्रंथाचे नामकरण केले गेले होते. कानडीतील प्रसिद्ध कवि 'रन्न' याचाहि हा चांगला आश्रयदाता होता.

गंगपरिवारातील स्त्रियाहि आपल्या धर्मशीलतेसाठी अतिप्रसिद्ध होत्या. एका प्रशस्तीत गंग महादेवी ही 'जिनेंद्राच्या चरण कमलातील लुब्धभ्रमरी' असल्याचे लिहिले आहे. ही महिला भुजबल गंग हेम्माडी मान्धाता राजाची पत्नी होती. राजा मारसिंहाच्या छोटया वहिणीचे नाव 'सुग्गिपव्वरसी' हे होते. ही जैनमुनींची अति भक्त असून ती त्यांना आहारदान करीत असे.

जेव्हा चोलराजाने इ. स. १००४ मध्ये गंग राजाची राजधानी तलकाद ही जिंकली, तेव्हापासून या वंशाचा प्रताप कमी कमी होत गेला. नंतरहि या वंशातील राजाने राज्य केले. परंतु ते आपले डोके वर काढू शकले नाहीत. यामुळे जैनधर्माचीहि बरीचशी हानी झाली.

## २ होयसल्ल वंश.

या वंशाच्या उन्नतीत एका जैन मुनीचा हात होता. या वंशाचा पूर्वज राजा 'सल' हा होता. एकेवेळी हा राजा आपल्या कुल-देवीच्या मंदिरात 'सुदत्त' नावाच्या जैनसाधूजवळ विद्या ग्रहण करीत होता. अचानक वनातून एका वाघाने 'सल' राजावर हल्ला केला. साधूने एक दंडा सलजवळ देऊन म्हटले 'पोप सल' (मार सल) तेव्हा सलने वाघास मारले. या घटनेच्या स्मरणार्थ त्याने आपले नाव 'पोपसल' असे ठेवले व नंतर हेच नाव 'होयसलले' झाले.

गंगवंशाप्रमाणे या वंशाचे राजेहि विट्टिदेव पर्यंत जैनधर्मीच राहिले. व त्यांनी जैनधर्माकिरिता पुष्कळसे प्रयत्न केले.[१] दिवाणबहाद्दुर कृष्ण-स्वामी अय्यंगार यांनी 'विष्णुवर्धन विट्टिदेव' यांच्या वेळच्या म्हैसूर राज्याच्या धार्मिक स्थितीबद्दल पुढीलप्रमाणे लिहिले आहे. त्यावेळी म्हैसूर प्रायः जैनमय होते. गंगराजे हे जैनधर्माचे अनुयायी होते. परंतु जवळजवळ इ. स. १००० मध्ये जैनांच्या विरुद्ध वातावरणाने जोर पकडला. त्यावेळी चोलानी म्हैसूर जिंकण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे गंगवाडी व नोलववाडीचा मोठा प्रदेश चोलांच्या कबजात गेला. अशाप्रकारे म्हैसूर प्रदेशात चोलांचा शैवधर्म व चालुक्यांच्या जैनधर्म यांचा परस्पर सामना होऊ लागला. जेव्हा विष्णुवर्धनने म्हैसूरच्या राजकारणात भाग घेतला, त्यावेळी म्हैसूरची धार्मिक स्थिति अनिश्चित होती. जरी अद्यापीहि जैनधर्म प्रबल होता, तरीहि शैवधर्म व वैष्णवधर्माचेहि अनुयायी होते. इ. स. १११६ च्या सुमारास विट्टीदेव यास रामानुजाचार्यांनी वैष्णव बनविले व त्याने आपले नाव 'विष्णुवर्धन'

---

१. Ancient India, P. 738–739

असे ठेवले. विष्णुवर्धनाची पहिली पत्नी शांतलदेवी हीहि जैन होती. श्रवणबेळगोळ व इतर ठिकाणी मिळालेल्या शिलालेखांवरून तिच्या धर्मकार्याची खूप प्रशंसा केली गेली आहे. शांतलदेवीचे वडील कट्टर शैव व आई जैन होती. ती मेल्यावर जेव्हा तिचे आईवडील मेले तेव्हा त्यांचा हा जांवई आपल्या धर्मापासून च्युत झाला व असे असले तरी जैनधर्माबद्दल त्याची सहानुभूति कायम होती. त्याने आपल्या विजयाच्या स्मारकाप्रीत्यर्थ हलेबीड येथील मंदिरांत स्थापना केलेल्या जैनमूर्तीचे नाव 'विजय–पार्श्वनाथ' असे ठेवले. त्याचे मंत्री गंगराज हे जैनधर्माचें मोठे आधारस्तंभ होते. त्यांची धार्मिकता व दानवीरता यांचे वर्णन अनेक शिलालेखातून मिळते. त्यांच्या पत्नीचे नावहि जैनधर्म प्रचारा–बाबत अतिप्रसिद्ध आहे. तिने जैनमंदिरे बांधविली व त्यासाठी गंगराजाने उदारतेपूर्वक भूमिदान केले. विट्टिदेवानंतर नरसिंह (पहिला) हा राजा झाला. याचे मंत्री हुल्लप यानेहि जैनधर्माची पुष्कळ प्रगति केली.

त्याने जैनांचा गेलेला प्रभाव पुन्हा एकदा स्थापण्याचा प्रयत्न केला. परंतु होयसाल[१] राजांनी संरक्षण दिलेल्या वैष्णव धर्माची द्रुतगतीने होणारी प्रगति; रामानुज व कांही शैव नेत्यांनी व्यवस्थित पण क्रमबद्ध केलेला विरोध आणि लिंगायतांचे भयंकर आक्रमण यामुळे म्हैसूर प्रदेशांत जैनधर्मांची अवनति व पतन झाले. परंतु जैनधर्माचे तेथून समूळ उच्चाटन झाले, अशी कल्पना चुकूनहि करता येत नाही परंतु वैष्णव व इतर वैदिक संप्रदायांच्या क्रमिक विकासामुळे जैनाचे चैतन्य पूर्ववत् राहिले नाही. तसे पाहिले तर जैनधर्मानुयायांची संख्या यावेळीहि पुष्कळ होती. परंतु राजकारणात त्यांचा प्रभाव आता पडत नव्हता.

---

१. Studies in South Indian Jainism.

नंतरच्या म्हैसूरच्या राजानी जैनांना कसलेच कष्ट दिले नाहीत. इतकेच नव्हे तर त्यांना सहाय्यहि केले. मुस्लिम राज्यकर्ता हैदर यानेहि जैन-मंदिराना कांही गावांचे दान दिले. मात्र श्रवणबेळगोळ व इतर ठिकाणी होणारे महोत्सव मात्र त्याने बंद केले होते.

## ◆ राष्ट्रकूट वंश. ◆

राष्ट्रकूट राजे त्यावेळच्या राजांत अति प्रतापशाली राजे होते. यांच्या आश्रयाने जैन धर्माची चांगलीच भरभराट झाली. त्याची राजधानी सुरवातीस नाशिकजवळ होती व नंतर मान्यखेट ही त्यांनी आपली राजधानी केली. या वंशाच्या जैनधर्मी राजामध्ये अमोघवर्ष (पहिला) याचे नाव उल्लेखनीय आहे. हा राजा दिगंबर जैनधर्माचा भक्त होता. आपल्या शेवटच्या अवस्थेत त्याने राज्यकारभार सोडून जिनदीक्षा घेतली. याचे गुरु प्रसिद्ध जैनाचार्य जिनसेन होते. त्याचे शिष्य श्री. गुणभद्र यांनी आपल्या उत्तर पुराणांत असे लिहिले आहे की, अमोघवर्ष हा आपले गुरु जिनसेनाचार्य यांच्या चरणकमलांची वंदना करून आपण पवित्र झालो असे मानीत असे. याने जैनमंदिरास खूप दान दिले व जैन साहित्याचीहि याचेवेळी चांगली भरभराट झाली. दिगंबर जैन सिद्धांत-ग्रंथाच्या धवल व जयधवला नांवाच्या टीकेचे नामकरण याच्याच धवल व अतिशय धवल या नावावरुन झाले असे समजले जाते. शाकटायन वैयाकरणाने आपल्या 'शाकटायन' नामक जैनव्याकरणावर याच्याच नांवाने 'अमोघवृत्ति' नावाचीटीका लिहिली. याच्यावेळी जैनाचार्य महावीर यानी आपल्या 'गणितसार-संग्रह' या नावाचा ग्रंथ लिहिला. त्याच्या सुरवातीस अमोघवर्षाचा महिमा वर्णिलेली आहे अमोघवर्षाने स्वतःच 'प्रश्नोत्तर रत्नमाला' या नांवाचे एक पुस्तक लिहिले आहे. स्वामी जिनसेनाचार्यांनीहि अनेक ग्रंथ

लिहिले. अमोघवर्षाने जिनसेनाचार्यांचे शिष्य गुणभद्र यांनाहि चांगला आश्रय दिला. गुणभद्राचार्यांनी आपल्या गुरूचा अपुरा राहिलेला ग्रंथ 'आदिपुराण' हा पूर्ण केला व दुसरेहि अनेक ग्रंथ लिहिले.

अमोघवर्षाचा पुत्र अकालवर्ष हाहि जैनधर्म–भक्त होता. याचवेळी गुणभद्राच्याचार्यांनी आपले 'उत्तरपुराण' पूर्ण केले. अकालवर्षाने जैनमंदिरांना दान देऊन जैन विद्वानांचा सन्मान केला. जेंव्हा पश्चिम चाल्युक्याने राष्ट्रकुटांच्या सत्तेचा अंत केला. तेव्हा या वंशाचा शेवटचा राजा इंद्र याने आपले राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न केला. पण त्यास मिळाले नाही. शेवटी त्याने 'जिनदीक्षा' धारण करून श्रवण–वेळगोळ येथे समाधिपूर्वक प्राणत्याग केला. 'लोकादित्य' हा याचा सामंत व वनवास देशाचा राजा होता. गुणभद्राचार्यांनी जैनधर्माची वृद्धि करणारा व महान् यशस्वी असे याचे वर्णन केले आहे.

### ४ कालाचूरि राज्यात जैनांचा ( विनाश )

राष्ट्रकूटानंतर राज्यकारभार पश्चिमीय चालुक्यांच्या हातात आला त्यावेळी जैनधर्माचा प्रभाव नष्ट झालेला होता. जर त्या भागात प्रचलित असलेल्या दंतकथेवर विश्वास ठेवला तर असे कष्टाने म्हणावे लागते की, जैनमंदिरातील जैनमूर्ती फेकून दिल्या व त्याच्या जागी पौराणिक देवतांच्या मूर्ती स्थापन केल्या[1] गेल्या.

चालूक्याचे राज्य फार थोडा वेळच टिकले. कारण कालाचूरी यांनी त्यांना हाकलून दिले. याचेहि राज्य फारच थोडा वेळ राहिले असले तरी जैनधर्माच्या विनाशाच्या दृष्टीने हे विचारणीय आहे, महान कालाचूरी राजा विज्जल हा जैन होता. परंतु याचा काळ लिंगायत संप्रदायाचा उद्‌गम व शिवभक्तीचे पुनर्जीवन या दृष्टीने उल्लेखनीय आहे. विज्जलचा अत्याचा-

१ Studies in South Indian Jainism, P. 512

मंत्री 'वसव' याच्या नेतृत्वाखाली या संप्रदायाने जैनांना फारच त्रास दिला.

विज्जलराज चरित्राप्रमाणे वसव याने आपला स्वामी जैनराजा विज्जल याच्या खुनासाठी कोणताहि प्रयत्न शिल्लक ठेवला नाही त्यामुळे राजाने त्यास देशातून हाकलले व निराश होऊन तो स्वतःच एका विहीरीत पडून मेला. परंतु त्याच्या या प्राणत्यागास 'धर्मासाठी वलिदान' असे रूप दिले. लिंगायत पुढाऱ्यांनी संप्रदायाबाबत ललित व सरळ भाषेत साहित्य तयार करून देशात सर्वत्र वितरण केले आणि ज्या लिंगायत पुढाऱ्यांनी कालाचूयी साम्राज्यातील जैनाचा नाश करण्यात बराच भाग घेतला, त्यांच्या नावाने चोहोकडे कपोलकल्पित गोष्टी लिहिल्या गेल्या. अशाच प्रकारची यावेळच्या शिलालेखात लिहिलेली एक कथा पुढे देत आहोत.

शिव व पार्वती एका शैव संतावरोवर कैलास पर्वतावर विहार करीत होते. इतक्यात नारद आले व त्यानी जैन व बौद्धाच्या वाढत असलेल्या शक्तीची माहिती त्यांना दिली. शिवानें वीरभद्रास आज्ञा दिली की, तुम्ही पृथ्वीवर संसारात जाऊन मानव-योनीत जन्म घ्या, व या धर्माचा नायनाट करा. आज्ञेनुसार 'वीरभद्राने' पुरुषोत्तम भट्ट नावाच्या व्यक्तीस स्वप्नात दृष्टांत दिला की, मी तुमच्या घरी पुत्ररूपानें जन्म घेईन, स्वप्न खरे झाले. बालकाचे नाव राम ठेवले व शैवरूपाने त्याचे लालनपालन झाले. शिवभक्त असल्यामुळे त्यास 'एकांतद रामैय्या' असे म्हणण्यात येऊ लागले. दंतकथेनुसार हा रामैय्या त्या देशातील जैनधर्माच्या विनाशास जबाबदार आहे.

कथेत लिहिले आहे, एक दिवस रामैय्या शिवाची पूजा करीत होता. त्यावेळी जैनाने त्यास आव्हान दिले की, त्याने आपल्या

देवतेचे देवत्व सिद्ध करावे. रामैय्याने हे आव्हान स्वीकारले व त्यावेळी असे निश्चित ठरले की, रामैय्याने आपले डोके कापून पुनः जोडून द्यावे. जर तो असे करील तर जैनांनी आपले मंदिर खाली करून तो देश सोडून निघून जावे असे वचन दिले. रामैय्यानें आपले शिर कापून पुन्हा जोडले व जैनांना आपले वचन पूर्ण करण्यास सांगितले; परंतु ते त्यांनी स्वीकारले नाही. तेव्हा रामैय्याने जैनमंदिरे नष्ट भ्रष्ट करण्यास सुरुवात केली. जैनानी विज्जलकडे जाऊन तक्रार केली तेव्हा विज्जल शैवावर खूप रागवला; परंतु रामैय्याने विज्जलास आपला चमत्कार दाखवून शैव बनविले. विज्जलने जैनांना आदेश दिला की, शैवाबरोबर शांतीपूर्वक वागावे.[1] कलचूरी राज्यांत जैनांच्या घातपाताच्या साक्ष देणाऱ्या अनेक प्रकारच्या घटना व कथा शैवग्रंथांत आढळतात.

## ५ विजयनगरचे राज्य

याप्रमाणे द. भारतांत जैनधर्माचा राजाश्रय जरी निघून गेला, तरी गुणग्राही राजे लोक जैनगुरू, विद्वान् व नेत्यांचा योग्य आदर करीत असत. अशा राजामध्ये विजयनगरच्या साम्राज्याच्या शासकाचे नाव उल्लेखनीय आहे; हे राज्य वैदिक धर्मास पोषक होते. परंतु याचे राजे निनिराळ्या मतांच्या लोकाशी उदारतेपूर्वक व्यवहार करीत असत. तसेच या राज्याच्या उच्च पदस्थ अधिकारीं वर्गामध्ये अधिकतर जैनधर्मावलंबी होते. त्यामुळेहि राजांना जैनधर्माकडे विशेष लक्ष ठेवणें जरूर होते.

दुसऱ्या हरिहरचा सेनापति इरुगप्प हा कट्टर जैनधर्मानुयायी होता. त्याने ५९ वर्षेपर्यंत विजयनगरच्या राज्यांतील उच्च अधिकारपदे

1 Studies in South India Jainism, P. 113.

भूषविली व कर्तव्ये चांगल्याप्रकारे पार पाडली. आणि जैनधर्माच्या उन्नतिसाठीहि अनेक प्रयत्न केले. त्याच्या दुसऱ्या सहयोग्यांनीहि जैन धर्माच्या उन्नतीस चांगले सहाय्य दिले व त्याच्या प्रचारास हातभार लावला.

विजयनगरच्या राण्याहि जैनधर्माचे पालन करीत असत. श्रवणबेळगोळच्या एका शिलालेखावरून देवराय महाराजांची राणी भीमादेवी ही जैन असल्याचे दिसून येतें.

१९६८ च्या एका शिलालेखावरून असे दिसते की, जैनांनी पहिल्या बुक्करायाजवळ प्रार्थना केली की, वैष्णव लोक जैनावर अन्याय करतात तेव्हा राजाने योग्य चौकशी करून जैन व वैष्णव याचे सूत जमवून दिले आणि पुढीलप्रमाणे आज्ञा जाहीर केली 'हा जैनधर्म पूर्वीप्रमाणे पंच महा-शब्द व कळसांचा अधिकारी आहे. जर कोणी वैष्णव कोणत्याहि प्रकारे जैनांना त्रास देतील तर वैष्णवाने आपल्या वैष्णव धर्माचीच हानि झाली असे समजले पाहिजे. वैष्णव लोकांनी जागोजागी ही सूचना अमलांत आणावयाचे निश्चित करावे की, जोपर्यंत सूर्य व चंद्राचे अस्तित्व आहे तोपर्यंत वैष्णव लोकांनी जैनदर्शनाची रक्षा करावी. वैष्णव व जैन एकच आहेत. परस्परांस त्यानी अलग समजू नये...... वैष्णव व जैन यांच्यापासून जे कर घेतले जातात, त्यातून श्रवणबेळगोळच्या रक्षकांची नियुक्ती केली जाईल व ही नियुक्ती वैष्णवांकडून होईल. तसेच त्यातून जे द्रव्य बाचेल त्यातून जैनमंदिरांची दुरुस्ती व रंगसफेती वगैरे केली जाईल. याप्रमाणे त्यांनी दरवर्षी धन-दान देण्यापासून चुकू नये व यश आणि सन्मान यांची प्राप्ती करून घ्यावी. जे या राजाच्या आज्ञेचे उल्लंघन करतील ते राजद्रोही, संघद्रोही व संप्रदायद्रोही समजले जातील.'

एक दुसऱ्या शिलालेखावरून जैन व वीरशैव यांच्यात वाद-विवाद झाल्याचे आढळते. हा लेख इ. स. १६३८ चा आहे. यांत सुरवातीस जैनधर्माची प्रशंसा असून याची समाप्ति शिवाच्या प्रशंसेनें झाली आहे.

घटना अशी होती की, कोणी वीरशैवाने विजयपार्श्व वसतीच्या खांबावर शिवलिंगाची स्थापना केली व विजयप्पा नांवाच्या एका धनिक जैन व्यापाऱ्याने ती नष्ट केली. त्यामुळे पुष्कळशी प्रक्षुब्धता वाढली व जैनांनी वीरशैवाच्या नेत्याजवळ या प्रकरणाचा योग्य तो निकाल लावण्याची प्रार्थना केली. त्यात असे ठरले की, प्रथम जैन लोकांनी विभूति व बेलपत्र शिवलिंगास चढवून आपले आराधन-पूजन करावे व वीरशैवानी त्यांच्याशी आपला बंधुभाव व सहृदयता प्रदर्शित करण्यासाठी वरील निर्णयात अशी पुस्ती जोडली की, 'जो कोणी जैनधर्माचा विरोध करील तो शिवद्रोही समजला जाईल. तो विभूति, रुद्राक्ष व काशी, रामेश्वर येथील शिवलिंगाचा द्रोही समजला जाईल' शिलालेखाच्या शेवटी 'जिनशासनाचा जयजयकार होवो' या आशयाचे वाक्य लिहिले आहे. अशा प्रकारे १४ व्या शतकापासून सांप्रदायिक द्वेष कांही कमी झाला व जैनधर्माचा दक्षिण भारतातून समूळ नाश झाला नसला तरी तो जवळजवळ क्षीणप्रभ झाला.



# प्रकरण २ रे.

# सिद्धान्त

## १ जैनधर्म काय आहे?

जैनधर्माचे सिद्धान्त जाणून घेण्यापूर्वी जैनधर्म म्हणजे काय? याची प्रथम ओळख होणे आपणास जरूर आहे. 'जैनधर्म' हा शब्द 'जैन' व 'धर्म' या दोन शब्दांच्या मिलाफाने तयार झालेला आहे. ज्याप्रमाणे 'विष्णूला देव मानणारे वैष्णव' आणि 'शिवाला देव मानणारे शैव' म्हणविले जातात, आणि त्यांच्या धर्मास 'वैष्णव धर्म' किंवा 'शैवधर्म' म्हणतात. त्याचप्रमाणे जिनाला देव समजणाऱ्यांना 'जैन' म्हणतात व त्यांच्या धर्मास 'जैनधर्म' म्हणतात. साधारणपणें जैनधर्माचा हाच अर्थ समजला जातो. परंतु याचा यापेक्षाहि अत्यंत महत्वपूर्ण असा अर्थ आहे. 'जिनांनी सांगितलेला ( उपदेशिलेला ) धर्म' अर्थात् जिनेंद्र भगवंतांनी जो धर्म सांगितला किंवा ज्याच्या उपदेश केला तो धर्म 'जैनधर्म' होय. शैवधर्म किंवा वैष्णवधर्म यांच्या बाबतीत हा अर्थ लागू होत नाही; कारण शिव किंवा विष्णु यांनी स्वतः कोणत्याहि धर्माचा उपदेश केलेला नाही. त्यांना देव म्हणून मानले गेले आणि नंतर अनेक देवतांच्या ऐवजी एक ईश्वर मानण्याच्या भावनेला जेव्हा जास्त महत्व आले, तेव्हा दोघांनाहि ईश्वराचीच रूपे म्हटली गेली. नंतर श्रीकृष्णांना विष्णूचा पूर्णावतार समजण्यात आले. त्यांच्या भक्तांचा धर्म हा मूलतः वेदाने सांगितलेला क्रियाकांडात्मकच आहे. परंतु 'जिन' हे ईश्वरीय अवतार समजले जात नाहीत. ते स्वतःच आपल्या पुरुषार्थाने कामक्रोधादिक विकार जिंकून 'जिन' बनले आहेत, 'जिन' शब्दाचा अर्थ आहे—जिंकणारा. ज्याने आपल्या आत्मिक

विकारावर पूर्णपणे विजय प्राप्त केलेला आहे, त्यानाच 'जिन' म्हणतात. जिनेंद्र भगवान आपल्या सारख्या मानवी प्राण्यातूनच उन्नत होत होत 'जिनरुप' बनतात. प्रत्येक जीवात्मा हा परमात्मा होऊ शकतो. जीवात्मा व परमात्मा यांच्यात एवढाच फरक आहे की. जीवात्मा अशुद्ध असतो. कामक्रोधादि विकारानी व कारणभूत कर्मांनी पछाडलेला असतो. त्यामुळे परमात्म्यात असणारे स्वभाविक गुण, अनत ज्ञान, अनंत दर्शन, अनंत सुख व अनंत वीर्य हे जीवाम्यात व्यक्त स्वरूपात असत नाहीत. ज्यावेळी तो आपल्या कर्माचा नाश करतो, त्यावेळी त्यास वरील स्वाभाविक गुणांची प्राप्ति होऊन तो 'परमात्मा' होतो त्यानाच 'जिन' असे म्हणतात. अशाप्रकारे जिन झालेला प्रत्येक जीव 'सर्वज्ञ' आणि 'वीतराग' होतो. त्याला सर्व वस्तूचे ज्ञान असते व त्यांच्यातील सर्व आत्मिक रागद्वेपादि विकार समूळ नष्ट झालेले असतात. अशा अवस्थेत त्याने जो उपदेश केलेला असतो तो प्रामाणिक असतो, कारण अप्रामाणिकपणाची अज्ञान आणि रागद्वेष ही दोनच कारणे असतात. मनुष्य अज्ञानामुळे, एखाद्या वस्तूचे ज्ञान नसल्यामुळे असमंजसपणाने, किंवा समजत असूनहि रागद्वेषादि विकाराला बळी पडून चुकीचे अगर खोटे बोलतो. जैन पुराणात व महाभारतात यासंबंधी एक गोष्ट आली आहे.

जैन पुराणानुसार नारद, पर्वत व वसू हे तीन गुरूबन्धु होते. त्यापैकी 'पर्वत' हा गुरूचा मुलगा होता व इतर दोघे त्याच्या वडिलाचे शिष्य होते. एकेवेळी 'अजैर्यष्टव्यं' या पदाच्या अर्थासंबंधी नारद आणि पर्वत यांच्यात वादविवाद सुरू झाला. महाभारतानुसार देव आणि ऋषीमध्ये वाद सुरू झाला. पर्वत किंवा देव यांनी (अज शद्बाचा अर्थ बकरा असा घेऊन) 'बकऱ्यांचे हवन करावे' असा अर्थ लावला. उलटपक्षी नारद व ऋषीनी 'जुन्या धान्यानें यज्ञहोम करावेत' असा

अर्थ लावला. दोन्ही पक्ष राजा वसूकडे गेले. वसु सत्य बोलणारा म्हणून प्रसिद्ध होता. त्यामुळे त्याचे सिंहासन पृथ्वीवर अधर राहत असे. वसूला खरा अर्थ माहित होता. परंतु गुरुपुत्र पर्वत व देवांच्या प्रेमामुळे पर्वतांने लावलेला अर्थ बरोबर आहे असा खोटा निर्णय दिला. या खोट्या निर्णयामुळे (अप्रामाणिक बोलण्याने) वसूचे सिंहासन पृथ्वीच्या पोटात गडप झाले. पर्वताने केवळ अज्ञानामुळे 'अजैर्यष्टयं' चा अर्थ चुकीचा लावला, परंतु वसूने माहित असूनहि गुरुपुत्राच्या प्रेमामुळे पक्षपाताने वरील खोटा अर्थ लावला. सारांश, खोटे बोलण्याची अज्ञान व रागद्वेष ही दोनच कारणे संभवतात. ही दोन्ही नाहीशी झाली असल्यामुळे 'जिन' सत्यवादी असतात. त्यांच्या सत्यवादित्वाचे प्रबळ प्रमाण म्हणजे त्यांनी प्रतिपादिलेला 'स्याद्वाद' सिद्धांत होय. तो वस्तूचे 'पूर्ण' किंवा 'अपूर्ण, परंतु सत्यदर्शन करणाऱ्या सर्व व्यक्तींना यथार्थ न्याय देणारा योग्य मार्ग दाखवितो.

प्रत्येक धर्माची दोन अंगे असतात. विचार व आचार जैनधर्माच्या विचाराचे मूळ स्याद्वाद व आचाराचे मूळ अहिंसा आहे कोणाच्याहि विचारावर अन्याय होऊ नये कोणत्याहि प्राणि–मात्राच्या जीवनाचा खेळ होऊ नये,हे या दोन सिद्धांतांचें मर्म आहे. सर्वांनी सर्वांचे विचार समजून घ्यावेत व सर्वांनी सर्व प्राणीमात्रांचे रक्षण करावे, हे जिनांच्या उपदेशाचे मूळ आहे म्हणून त्यांना ' हितो-पदेशी' म्हणतात. कोणतीहि एक विशिष्ट व्यक्ती, वर्ग किंवा संप्रदाय यांचीच फक्त हिताची दृष्टि ठेऊन ते हितोपदेश देत नाहीत. उदा. फक्त मनुष्यांच्या हिताच्या दृष्टीनेच ते सांगत नाहीत, तर सर्व त्रस–स्थावर (चराचर) प्राण्यांच्या बाबत उपदेशितात. म्हणूनच त्यांचा मूळमंत्र–'मा हिंस्यात्सर्वभूतानि' कोणत्याहि प्राण्यांची हिंसा करू नका हा आहे; त्यांच्या वीतराग (सम) दृष्टीमध्ये पशू हे वध्य आहेत

व इतर अवध्य आहेत असे मुळीच नाही. ते सर्वांना समान लेखतात. ब्राह्मणांची पूजा करावी किंवा चांडाळाचा तिरस्कार करावा असाहि ते उपदेश करीत नाहीत. अशाप्रकारे ते ' वीतराग ', ' सर्वज्ञ ' आणि ' हितोपदेशी ' ' जिन ' असतात व त्यांनी उपदेशिलेला धर्म तोच जैनधर्म आहे.

इतर धर्मांनीहि सर्वज्ञालाच आपापल्या धर्माचे प्रवर्तक मानलेले आहे. कारण जो अल्पज्ञ किंवा अज्ञानी आहे त्याच्याकडून सार्वत्रिक किंवा सार्वदेशिक सत्य उपदेश मिळण्याची आशा करणे शक्य नाही. त्यांनी 'ईश्वर', 'खुदा' किंवा 'गॉड' यांना सर्वज्ञ मानून, त्यांनाच आपापल्या धर्माचे प्रवर्तक मानलेले आहे. त्यांतूनहि जे ईश्वराला मानत नाहीत, त्यांनी वेदाला आपल्या धर्माने मूळ मानले आहे. परंतु कोण्या पुरुषाने त्यांची रचना केली असे ते मानत नाहीत. ते वेदांना'अपौरुषेय' मानतात. याप्रमाणे सर्व धर्मांनी मानवाला ' अल्पज्ञ ' मानून त्यास आपल्या धर्माचे प्रवर्तक मानलेले नाही. परंतु मानव माध्यम असल्याशिवाय एकतर ईश्वरीय ज्ञानाची प्राप्ति होऊ शकत नाही आणि त्याच्या अर्थाचा उपदेशहि होऊ शकत नाही, कारण ईश्वर स्वत: शरीररहित असल्यामुळे, आपण आपले ज्ञान कोणत्या ना कोणत्या पुरुषाद्वारेच सांगू शकतो, आणि त्याचा उपदेशहि मनुष्यच करू शकतो. परंतु जर तो पुरुष अल्पज्ञ असेल किंवा रागी-द्वेषी असेल तर त्याच्या उपदेशांत भ्रमहि होऊ शकतो, म्हणून त्याला कमीतकमी विशिष्ट ज्ञानीहि मानणे भाग पडते. हे सर्व यासाठी सांगितले आहे की, ते धर्म पुरुषाची सर्वज्ञता मानीत नाहीत. त्यांच्या दृष्टीने मनुष्याच्या आत्म्याचा इतका विकास होऊ शकत नाही. परंतु जैनधर्म अशा प्रकारच्या कोणत्याहि ईश्वरीय सत्तेवर विश्वास ठेवीत नाही. तो ' जीवात्मा ' हा सर्वज्ञ होऊ शकतो असे मानतो, म्हणून जैनधर्म कोणी ईश्वर किंवा

कोण्या एका स्वयंसिद्ध शास्त्राने सांगितलेला धर्म नव्हे. परंतु एकेकाळी सर्वसामान्य माणसाप्रमाणे अल्पज्ञ व रागद्वेषी असलेल्या, परंतु पुरुषार्थाच्या जोरावर ज्याने आपली अल्पज्ञता व रागद्वेप नाहीसे करून आपला आत्मा मुक्त केला आहे व जो याप्रमाणे सर्वज्ञ व वीतरागी वनला आहे, अशा मानवाने सांगितलेला हा धर्म आहे. म्हणून अशाप्रकारे 'जिन' स्वरूप झालेल्या मानवांच्या अनुभवाचा सारच जैनधर्म आहे.

आता आपण धर्म शब्दासंबंधी विचार करू. धर्म शब्दाचे दोन अर्थ दिसून येतात:– एक वस्तूच्या स्वभावास धर्म म्हणतात उदा.–अग्नीचा धर्म जाळणे (दाहकता) हा आहे, पाण्याचा धर्म शीतलता, वायूचा धर्म वाहणे, त्याप्रमाणेच चैतन्य हा आत्म्याचा धर्म आहे. किंवा धर्म याचा दुसरा अर्थ आचार, म्हणजेच विशुद्ध चारित्राला धर्म म्हणतात. ज्यामुळे अभ्युदय किंवा निश्रेयस–मोक्षाची प्राप्ति होते त्याला धर्म म्हणतात. आचार किंवा चारित्राने यांची प्राप्ति होत असल्यामुळे चारित्रालाहि **धर्म** म्हणतात. याप्रमाणे **धर्म** शब्दाचे दोन अर्थांचा बोध होतो. १ वस्तुस्वभाव २ चारित्र किंवा आचार. यापैकी स्वभावरूप धर्म तर जड किंवा चेतन सर्व पदार्थामध्ये असतो. कारण ज्याचा कोणातच स्वभाव नाही अशी कोणतीच वस्तु या संसारात नाही. पण आचाररूप धर्म हा चैतन्यरूप आत्म्यांतच आढळतो. म्हणून धर्माचा संबंध आत्म्याशी आहे. प्रत्येक तत्वज्ञ धर्म–प्रवर्तकाने केवळ आचाररूप धर्माचाच उपदेश केलेला नाही, तर वस्तु स्वभावरूप धर्माचाहि उपदेश केलेला आहे; त्यास 'दर्शन' असे म्हणतात. म्हणून प्रत्येक धर्मास आपले एक विशिष्ट 'दर्शन' आहे. या दर्शनांत आत्मा काय आहे ? परलोक काय आहे ? विश्व काय आहे? ईश्वराचे स्वरूप काय आहे ? इत्यादि अनेक प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला आहे आणि धर्माच्या सहाय्याने आत्म्याला परमात्मा बनविण्याचा मार्ग दाखविला आहे. जरी दर्शन

व धर्म किंवा वस्तुस्वभावरूप धर्म किंवा आचाररूप धर्म हे दोन्ही वेगवेगळे विषय आहेत, तरी या दोन्हींचा परस्पर घनिष्ट संबंध आहे.उदा:—जेव्हा आचाररूप धर्म आत्म्यास परमात्मा बनविण्याचा मार्ग दाखवितो,तेव्हा हे जाणणे आवश्यक होते की, आत्मा आणि परमात्मा यांचा स्वभाव (स्वरूप) काय आहे ? आणि या दोहोंमध्ये फरक काय व कां आहे? हे जाणल्या-शिवाय आचाराचे पालन तितके लाभप्रद होत नाही. ज्याप्रमाणें सोन्याचे गुण व स्वभाव माहित नसलेल्या माणसाने सोने शुद्ध करण्याचा प्रयत्न केला. तरी तो प्रयत्न यशस्वी होत नाही,त्याप्रमाणेच हे आहे तसेच ही सर्वश्रुत गोष्ट आहे की,विचाराला अनुसरूनच मनुष्याचा आचार असतो उदा:— जो 'आत्मा किंवा परलोक नाही' असे मानतो त्याचा आचार नेहमी भोगप्रधान असतो; आणि जो आत्मा व परलोक मानतो किंवा जीवमात्र आपापल्या शुभाशुभ कर्मानुसार फळ भोगतो असे समजतो,त्याचा आचार याच्या अगदी उलट असतो. म्हणून विचारांचा मनुष्यांच्या आचारावर बराच प्रभाव पडतो. म्हणूनच दर्शनाचा धर्मावर फार मोठ्या प्रमाणांत परिणाम होतो आणि एक समजल्याशिवाय दुसऱ्याचे स्वरूप समजू शकत नाही. म्हणून 'जैनधर्म' हे एक 'दर्शन' असून त्यास 'जैनदर्शन' म्हणतात.परंतु ज्याअर्थी ती वस्तु स्वभावरूप धर्मात अंतर्भूत होते,त्याअर्थी त्यास आम्ही धर्माचे एक अंग समजतो आणि म्हणून 'जैनधर्म' या शब्दावरून जिनदेवांनी सांगितलेला विचार व आचाररूप धर्म असे दोन्ही अर्थ समजावेत.

दुसऱ्या प्रकाराने सांगावयाचे तर धर्माचे एक 'साध्यरूप' धर्म व दुसरा 'साधनरूप' धर्म असे दोन भेद आहेत परमात्मतत्व साध्यरूप धर्म आहे आणि आचार किंवा चारित्र साधनरूप धर्म आहे, कारण आचार किंवा चारित्राच्या सहाय्यानेच आत्मा 'परमात्मा' होतो. म्हणून येथे दोन्ही प्रकारच्या धर्माचे निरूपण केले आहे.

## २. जैनधर्माचे प्राणभूत तत्व

### अनेकांतवाद

वर सांगितलेच आहे की, जैन विचारधारेचे मूलतत्व 'स्याद्वाद' किंवा 'अनेकांतवाद' आहे. म्हणून प्रथम त्याची माहिती लक्षांत घेणें आवश्यक आहे, जैन धारणेला अनुसरून या विश्वाचे मूलभूत तत्व दोन प्रकारांत विभागले गेले आहे-एक जीवतत्व व दुसरे अजीव किंवा जड तत्व. अजीव किंवा जड तत्वहि पांच प्रकारांनी विभागलेले आहे. १ पुद्गल २ धर्म ३ अधर्म ४ आकाश व ५ काल. याप्रमाणे हा सर्व संसार या सहा तत्वांनी बनलेला आहे. या सहांना 'षड्द्रव्ये' म्हणतात. या सहा द्रव्यांशिवाय संसारांत दुसरे कांहीहि नाही; आणि जे कांही आहे. त्या सर्वांचा समावेश या सहा द्रव्यांत होतो. इतर दार्शनिकांनी (तत्ववेत्त्यांनी) गुण, क्रिया. संबंध इ. जी तत्वे मानली आहेत, ती सर्व जैनमताप्रमाणें द्रव्यांपासून वेगळी नसून द्रव्याच्याच त्या अवस्था आहेत. कारण ज्याला अस्तित्व आहे (जे-सत् आहे) ते सर्व द्रव्य आहे. सत् हेच द्रव्याचे लक्षण आहे. जैनमताप्रमाणे 'असत्' किंवा 'अभाव' नांवाचे असे स्वतंत्र तत्व नाही.परंतु जे सत् आहे,ते दुसऱ्या दृष्टीने असत्हि आहे. कोणतीहि वस्तु केवळ सत्स्वरूपच नाही अगर केवळ असत्स्वरूपहि नाही. जर प्रत्येक वस्तूला केवळ सत्स्वरूपच मानले तर सर्व वस्तु संपूर्णपणें सत् स्वरूप असल्यामुळे, वस्तु–वस्तूंमध्ये जो फरक दिसतो त्याचा अभाव होईल; व त्याचा लोप झाल्यामुळे सर्व वस्तू सर्व–स्वरूप होतील. उदा:–घट आणि पट (वस्त्र) या दोन स्वतंत्र वस्तु आहेत. घट हीहि वस्तु आहे व पट हीहि वस्तु आहे. पण आपण जेव्हा कोण्या एकास घट आणण्यास सांगतो तेव्हा तो घट आणतो, पट वा वस्त्रे नव्हे ! आणि जेव्हा त्यास पट आणण्यास सांगतो तेव्हा तो पटच आणतो, घट आणीत नाही. यावरून ही गोष्ट सिद्ध होते की, घट हा घटच आहे

पट नाही. आणि पट हे पटच आहे घट नाही. घट हा पट नाही व पट हे घट नाही. परंतु अस्तित्व मात्र दोघांचेहि आहे. हे दोघांचेहि अस्तित्व आपापल्या मर्यादेने सीमित आहे. त्याच्याबाहेर मात्र नाही. जर वस्तु आपापल्या मर्यादांचे उल्लंघन करतील, तर केवळ घटांचीच आणि पटांचीच गोष्ट काय तर सर्व-पूर्ण वस्तु सर्वरूप होतील, आणि त्यामुळे संकर दोष उत्पन्न होईल. म्हणून प्रत्येक वस्तु .स्व–रूपाच्या अपेक्षेने 'सत्' असल्याचे सांगितले आहे व पर–रूपाच्या अपेक्षेने 'असत्' मानली आहे. हेच तत्व गुरूशिष्यांच्या संवाद रूपाने खाली दिले आहे, त्यावरून वाचकांना या तत्वाची अधिक स्पष्ट कल्पना येऊ शकेल.

गुरु– एक मनुष्य आपल्या नोकरास आज्ञा करतो की 'घट घेऊन ये.' तेव्हा तो सेवक तावडतोब घट आणतो. आणि तो जेव्हा त्यास वस्त्र आणण्यास सांगतो तेव्हा तो वस्त्र घेऊन येतो. हा व्यवहार आपण दररोज पाहत असतोच. परंतु यावर आपण कधी या गोष्टीचा विचार केला आहे काय की. ऐकणारा 'घट' हा शब्द ऐकून घटच कां आणतो? किंवा 'वस्त्र ' शब्द ऐकून वस्त्रच कां आणतो?

शिष्य–घटास घट म्हणतात आणि वस्त्रास वस्त्र म्हणतात म्हणून ज्या वस्तूचे नांव उच्चारले जाते तीच वस्तु तो चाकर घेऊन येतो.

गुरु– पण घटास घटच कां म्हणतात? वस्त्राला घट कां म्हणत नाहीत?

शिष्य– घटाचे काम घटच करू शकतो, वस्त्राला ते शक्य नाही.

गुरु– घटाचे काम घटच कां करतो? वस्त्र ते काम कां करीत नाही?

शिष्य– हा तर वस्तूचा स्वभाव आहे त्यात असा प्रश्न उद्भवूच शकत नाही.

गुरु– मग काय तुम्हाला असे म्हणावयाचे आहे की घटाचा जो

स्वभाव तो वस्त्राचा नाही आणि जो वस्त्राचा आहे तो घटाचा नाही?

शिष्य– होय गुरुजी! प्रत्येक वस्तूचा आपला असा कांही विशिष्ट स्वभाव आहे.

गुरु– तर मग आता असे सांगा की, घटाला 'असत्' हि कधी म्हणता येईल कां ?

शिष्य– होय! घट जर फुटला तर त्याला असत् म्हणता येईल.

गुरु– मोडतोड झाल्यावर तर प्रत्येक वस्तूला 'असत्' म्हणता येईल; परंतु घट असतांनाहि त्याला असत् म्हणता येईल काय?

शिष्य– नाही! कधीहि नाही! जे 'आहे' ते 'नाही' कसे होऊ शकेल?

गुरु– (नदीच्या) काठावर येऊन पुन्हा आपण काठ सोडला! आताच आपण स्वत: सांगितले आहे की, प्रत्येक वस्तूचा स्वभाव निर–निराळा आहे, आणि तो स्वभाव त्या वस्तूतच असतो, दुसऱ्यात नसतो.

शिष्य– होय गुरुजी! हे तर मी अजूनहि कबूल करतो कारण असे जर मानले नाही तर अग्नि पाणी होईल आणि पाणी अग्नि बनेल. कापड माती बनेल व माती कापडरूप होईल. कोणतीच वस्तु आपापल्या स्वभावात स्थिर राहू शकणार नाही.

गुरु– आपलच म्हणण जर अशा रीतीने सांगितल की, प्रत्येक वस्तु आपापल्या स्वभावाने स्थित आहे, दुसऱ्याच्या स्वभावाने नाही तर त्यात आपणाला कांही बाधा वाटणार नाही ना?

शिष्य– नाही! यात कांही बाधा येणार नाही.

गुरु– तर पुन्हा आता आपणास पहिला प्रश्न विचारतो की, विद्यमान असलेल्या घटाला असत् म्हणता येईल काय?

शिष्य– ( गप्प बसतो )

गुरु– कां! गप्प कां बसलात! पुन्हा गोंधळून गेलात की काय?

शिष्य—विद्यमान असलेल्या घटाला दुसऱ्याच्या स्वभावाच्या अपेक्षेनें असत् म्हणतां येईल.

गुरु— आता आपण ठिकाणावर आलात. जेव्हा आपण एखाद्या वस्तूला 'सत्' म्हणतो, तेव्हा आपण ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे की, त्या वस्तूच्या स्वरूपाच्या अपेक्षेने तिला सत् म्हटले आहे ,दुसऱ्या वस्तूच्या स्वरूपाच्या अपेक्षेने संसारांतील प्रत्येक वस्तु असत् आहे. देवदत्ताचा मुलगा जगांतील सर्व मनुष्यांचा मुलगा नाही किंवा जगांतील सर्व मुलांचा बाप कांही देवदत्त नाही. तेव्हा देवदत्ताचा मुलगा हा पुत्र आहेहि आणि नाहीहि, असा यावरून आपण निष्कर्ष काढू शकत नाही काय? त्याचप्रमाणे देवदत्ताचा बाप वडिल आहेहि आणि नाहीहि. म्हणून या सृष्टीत जे कांही 'आहे',ते दुसऱ्या कोणत्या अपेक्षेने 'नाही' हि, सपूर्णपणे सत् व सर्वथा असत् अशी कोणतीहि वस्तु नाही.

परंतु जैनदर्शनाला अनुसरून जेव्हा एकच वस्तू 'सत्' हि आहे व 'असत्'हि आहे असे म्हटले जाते, तेव्हा ते ऐकून श्रोता प्रथमदर्शनी ही गोष्ट असंभवनीय समजतो व म्हणतो जे सत् आहे ते असत् कसे होऊ शकेल? परंतु ज्या दृष्टिकोनांतून जैनमत वस्तूस सत् आणि असत् समजते तो दृष्टिकोन समजून घेतला तर हे असंभवनीय आहे असे म्हणण्याचे धाडस कोणीहि करणार नाही. परंतु हे समजण्यास बादरायणासारख्या सूत्रकारांना आणि शंकराचार्यासारख्या भाष्यकारांनाहि जेथे भ्रम उत्पन्न झाला, तेथे साधारण लोक जर गोंधळून गेले तर त्यांत कांही आश्चर्य नाही.

बादरायणाच्या 'नैकस्मिन्नसंभवात्' (२–५–३३) या सूत्रावर व्याख्यान करताना स्वामी शंकराचार्यांनी या सिद्धांतावर जो सर्वात मोठा आरोप केला आहे तो 'अनिश्चिततेचा'. त्यांचे म्हणणे असे की 'वस्तू आहेहि आणि नाहीहि, असे म्हणणे अनिश्चिततेचे द्योतक आहे. त्यामुळे

वस्तूचे कोणतेच स्वरूप निश्चित असू शकत नाही. आणि अनिश्चितता ही संशयाची जननी आहे म्हणून ज्याअर्थी जैनसिद्धांताप्रमाणें वस्तु अनिश्चित आहे त्याअर्थी त्यांत निःसंशयरूप प्रवृति होऊ शकत नाही. परंतु वरील उदाहरणावरून या आरोपाचे निरसन आपोआप होऊन जाते. आपण व्यवहारांतहि परस्पर विरोधी दोन धर्म एकाच वस्तूत पाहतो. उदाः– भारत हा स्वदेश आहे व परदेशहि आहे. देवदत्त हा वडीलहि आहे, आणि मुलगाहि आहे. यांत कोणत्याच प्रकारची अनिश्चितता किंवा संशय नाही. भारतीयांच्या दृष्टीने भारत स्वदेश आहे व परदेशीयांच्या दृष्टीने तो परदेश आहे. जेव्हा कोणी भारतीय भारताला स्वदेश समजतो तेव्हा तो भारतवर्षाकडे फक्त आपल्या दृष्टिकोनांतून पाहतो. परकीयांच्या दृष्टिकोनांतून पाहत नाही. म्हणून त्याचे हे भारतदर्शन एकांगी आहे. ते यथार्थ पूर्ण बनविण्यासाठी (दर्शन घेण्यासाठी) निरनिराळे दृष्टिकोन लक्षात घेणें जरुरीचे आहे श्री. शंकराचार्य म्हणतात की 'एका धर्मीत (वस्तूत) परस्पर विरुद्ध अशा सत् व असत् धर्माचे अस्तित्व असणे असंभवनीय आहे. कारण सत् धर्म असतांना असत्-धर्म असू शकत नाही–राहू शकत नाही आणि असत् धर्म असतांना सत्–धर्म असू शकत नाही. म्हणून आर्हत् मत विसंगत आहे.' त्याचे हे म्हणणे कितपत सुसंगत आहे याचा निःपक्षपाती वाचकानीच विचार करावा.

## ◆ स्याद्वाद ◆

याप्रमाणे ज्याअर्थी प्रत्येक वस्तु परस्परविरोधी अशा गुणांचा (धर्मांचा) समूह आहे, त्याअर्थी त्या अनेक धर्मात्मक वस्तूंचे वर्णन शब्दांनी करणे कठीण असले तरी तशाप्रकारचे त्यांचे स्वरूप ओळखणे इतके कठिण नाही, कारण ज्ञान अनेक धर्मांना एकदम एकेवेळी जाणू

शकते. परंतु एकाचवेळी एक शद्ब वस्तूच्या एकाच धर्माचे आंशिक कथन करू शकतो. तसेच शद्बांची प्रवृत्ति वक्त्यावर अवलंबून आहे. वक्ता— वस्तूंच्या अनेक धर्मापैकी कोण्या एका धर्माला प्राधान्य देऊन बोलत असतो. उदा— एकाच वेळी देवदत्ताला त्याचा बाप हाका मारतो आणि त्याचवेळी त्याचा मुलगाहि त्यास बोलावतो. वडिल त्यास 'बाळ' म्हणून हाका मारील; तर त्याचवेळी मुलगा त्यास 'पिताजी' म्हणून संबोधील. पण देवदत्त हा कांही केवळ मुलगा नाही किंवा केवळ पिताहि नाही. तर तो पिता आणि पुत्र अशा दोन्ही स्वरूपाचा आहे. त्याच्या वडिलांच्या दृष्टीने देवदत्तांत पुत्रत्वाचा धर्म मुख्य आहे, आणि इतर गुण गौण आहेत, उलट मुलाच्या दृष्टिकोनातून देवदत्ताबावत पितृत्वाचा धर्म मुख्य असून बाकीचे धर्म गौण आहेत. कारण अनेक धर्मात्मक वस्तूतून ज्या धर्माची (गुणाची) बोलणाऱ्याची अपेक्षा असेल, त्या धर्मास तो प्राधान्य देतो व इतर धर्म गौण समजतो. म्हणून वस्तु अनेक धर्मात्मक असतानाहि वक्त्याच्या शद्बांत इतके सामर्थ्य नाही की, एका क्षणामध्ये तो त्या सर्व धर्माचे कथन करू शकेल म्हणून प्रत्येक वक्ता आपापल्या दृष्टीने प्रतिपादन करीत असतो हे समजून घेतले तर वस्तूचे स्वरूप समजण्यास श्रोत्याला त्यात कोणत्याहि प्रकारचा विपरीतपणा वा विसंगती वाटू नये यासाठी 'स्याद्वाद' तत्वाचा उगम आहे.

'स्याद्वाद' सिद्धांतानुसार एका विशिष्ट वस्तूतील एका विशिष्ट धर्मा बरोबरच इतर धर्माचाहि द्योतक असा 'स्यात्' शद्ब हा सर्व वाक्याबरोबर गुप्तपणे संबंधित असतो. हर एक वाक्य प्रयोगाच्या वेळी तो बोलला जावो वा न बोलला जावो.स्यात् शद्बाचा अर्थ 'कथंचित्' किंवा 'कांही विशिष्ट अपेक्षेने' असा आहे. म्हणूनच संसारात जे जे कांही आहे, ते ते कांही अपेक्षेने नाहीहि. ह्या अपेक्षावादाचा सूचक'स्यात्' हा शद्ब निपात-अव्यय

आहे. अनेकांतवादात या शद्बाचा प्रयोग आवश्यक आहे. कारण स्यात् शद्बाशिवाय अनेकांताची अमिव्यक्ति यथार्थ संभवत नाही. म्हणून अनेकांत–दृष्टीने प्रत्येक वस्तू 'स्यात् सत्' व 'स्यात् असत्' अशी आहे

कांही कांही विद्वान् 'स्यात्' शद्बाचा अर्थ 'कदाचित्' अशा अर्थाने करतात. परंतु कदाचित् हा शब्द अनिश्चिततेचा द्योतक आहे. उलट–पक्षी 'स्यात्' शद्ब एका निश्चित अपेक्षावादाचा सूचक आहे याप्रमाणे अनेकांत वादाचा फलितार्थ स्याद्वाद आहे. कारण स्याद्वादाशिवाय अनेकांताची अभिव्यक्ति शक्य नाही. म्हणून एकाच वस्तूच्या संबंधात उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या दृष्टिकोनाचा समन्वय 'स्याद्वाद' या शद्बात अभिप्रेत आहे.

वर लिहिलेलेच आहे की, शद्बाची प्रवृत्ति वक्त्याच्या बोलण्याचा उद्देशावर अवलंबून असते. म्हणून प्रत्येक वस्तूत दोन्ही धर्म असूनहि वक्ते आपापल्या अभिप्रायाप्रमाणे त्या त्या धर्मांचा उल्लेख करतात. उदा–दोन मनुष्य कांही वस्तू घेण्यासाठी दुकानावर जातात. तेथे एकाच वस्तूला एक चांगला म्हणतो तर दुसरा वाईट म्हणतो. त्यामुळे दोघात वाद उत्पन्न होतो. तेव्हा तिसरा मनुष्य त्यांना समजाविण्याचा प्रयत्नकरतो. 'भल्या माणसानो! कां उगीच भांडता! अहो हे चांगलेहि आहे, अन् वाईटहि तुमच्या मताने ही चांगली तर यांच्या मताने ती वाईटहि आहे.' अशा प्रकारे या तीन व्यक्ति तीन प्रकारची भाषा वापरतात. पहिल्याची भाषा 'विधिस्वरूप' आहे. दुसऱ्याची 'निषेधस्वरूप' आणि तिसऱ्याची 'विधि व निषेधरूप' अशी द्विविध आहे.

वस्तूतील ते दोन्ही धर्मांचे कथन जर कोणी एकदम करू म्हटले, तर ते शक्य होत नाही. कारण एक शद्ब एकाक्षणी 'विधी' किंवा 'निषेध' यापैकी कोणतातरी एकच अभिप्राय व्यक्त करू शकतो. अशा परिस्थितीत वस्तूचे संपूर्ण स्वरूप 'अवाच्य' असते. म्हणजेच शद्बाद्वारा वस्तूचे पूर्ण

स्वरूप एकदम सांगता येत नाही. या प्रकारच्या भाषा–व्यवहारांना 'स्यात् सत् एव', 'स्यात् असत् एव', 'स्यात् सत्-असत् एव' आणि 'स्यात् अवक्तव्यं एव' अशा पारिभाषिक संज्ञा आहेत. सप्तभंगीचे मूळ हेच चार भंग (प्रकार) आहेत. यांच्या सहयोगानेच स्याद्वादाचे सात प्रकार होतात. चवथा प्रकार 'स्यात् अवक्तव्यं' एव हा क्रमाने पहिल्या तीन प्रकारांना जोडला म्हणजे पांचवा, सहावा, व सातवा असे कथनाचे एकूण अपुनरुक्त सात प्रकार होतात, परंतु व्यवहारात मात्र मूलभूत चार प्रकारच्या वचनांचाच व्यवहार पाहण्यात येतो.

स्वामी शंकराचार्यांनी चवथा प्रकार जो'स्यात् अवक्तव्यं'यावरहि कांही आक्षेप घेतले आहेत. ते म्हणतात, 'वस्तु, ही अवक्तव्य असू शकत नाही. जर ती 'अवक्तव्य' असेल तर तिचे कथन केले जाणे शक्य नाही. त्यासंबंधी सांगितलेहि जाईल आणि ती अवक्तव्यहि म्हणविली जाईल, या दोन्ही गोष्टी परस्परविरुद्ध आहेत. परंतु जैनांनी वस्तु संपूर्णतः अवक्तव्य मानली असती तर शंकराचार्यांचा हा आक्षेप बरोबर होता. परंतु ते अपेक्षाभेदाने वस्तु कथंचित् अवक्तव्य मानतात. हे सुचविण्यासाठीच 'स्यात्' शब्द अवक्तव्याबरोबर जोडलेला आहे. यावरून वस्तु अवक्तव्यच नसून कांही एका दृष्टिकोनानेच ती अवक्तव्य आहे हा अभिप्राय स्पष्ट होतो. यावरून एक गोष्ट स्पष्ट आहे की, श्रीमत् शंकराचार्यांना स्याद्वादाचे बरोबर आकलन झालेले नाही. हे लक्षात घेऊन स्व. महामहोपाध्याय डॉ. गंगानाथ यांनी निष्पक्षपातपणे लिहिले आहे.–'शंकराचार्यांनी लिहिलेले जैनसिद्धांतांचे खंडन मी जेव्हा वाचले तेव्हापासून माझी अशी खात्री झाली आहे

१ "न चैषां पदार्थानामवक्तव्यत्वं संभवति । अवक्तव्यश्चेन्नोच्येरन् उच्यन्तो चावक्तव्याश्चेति विप्रतिषिद्धम् ।"–ब्रह्मसू० शाँ० २–२–३३ ।

की, जैनसिद्धांतात अशी कांही तत्त्वे आहेत, की जी वेदांताचे आचार्य समजू शकले नाहीत. जैनधर्माची थोडी बहुत मला जी ओळख झालेली आहे, त्यावरून मला असे निश्चित वाटते की, जर त्यांनी जैनधर्माची माहिती त्या धर्माच्या मूळ ग्रंथातून पाहिली असती तर जैनधर्माचा विरोध करण्यासारखी कोणतीच गोष्ट त्यांना आढळून आली नसती.

हिंदू-विश्व- विद्यालयातील दर्शन शास्त्राचे प्रमुख माजी प्राध्यापक श्री. फणिभूषण अधिकारी, यांनी स्याद्वाद महाविद्यालय काशीच्या वार्षिकोत्सवाच्या आपल्या अध्यक्षीय भाषणात खालील प्रमाणे म्हटलेले आहे. 'जैनधर्माच्या स्याद्वाद सिद्धांताबद्दल जितकी चुकीची गैरसमजूत पसरली आहे, तितकी दुसऱ्या कोणत्याच सिद्धांताबद्दल नाही. प्रत्यक्ष शंकराचार्यहि या दोषातून मुक्त नाहीत. त्यांनीहि या सिद्धांताबाबत अन्याय केला आहे. सर्वसामान्य अल्पज्ञानी माणसाच्या दृष्टीने ही गोष्ट एकप्रकारे क्षम्य होऊ शकेल. पण भारतातील या महाविद्वानांच्या दृष्टीने ही चूक अक्षम्यच म्हणावी लागेल. जरी या महर्षीबद्दल माझ्या मनात खूप आदर आहे, तरीहि असे दिसून येते की, त्यांनी या धर्मातील सिद्धांतशास्त्रांच्या मूलग्रंथांचे अध्ययन करण्याची दक्षता घेतलेली नाही.'

अशी स्थिति असतांना ज्यावेळी कांही विद्वान् जेव्हा 'शंकराचार्यांनी आपल्या शारीरिक भाष्यात स्याद्वादाचे मार्मिक खंडन अकाट्य युक्तीने केलेले आहे.' वगैरे लिहितात तेव्हा आम्हास अत्यंत आश्चर्य वाटते आणि त्याहिपेक्षा आश्चर्याची गोष्ट अशी आहे. की, हे विद्वान्

१ पहा भारतीय दर्शन (पं. बलदेव उपाध्याय) पृ. १७७,

अनेकांतवादास संशयवादाचे रूपांतर मानीत नाहीत. उलटपक्षी ही एक जैनदर्शनाची बहुमूल्य देणगी आहे असे मानतात. असो !

सप्तभंगी–वादाचा विकास शास्त्र-शाखेच्या दार्शनिक क्षेत्रात झाला असल्यामुळे त्याचा उपयोगहि तेथेच झाला. उपलब्ध जैन वाङमयांतील दार्शनिक क्षेत्रात सप्तभंगी वादाचा योग्य उपयोग करण्याचे प्रथम श्रेय स्वामी श्री. समंतभद्राचार्यांना आहे. त्यांनी आपल्या आप्तमीमांसेत[१] सांख्यांना 'सदैकांतवादी', माध्यमिकांना 'असदैकांतवादी', वैशेषिकांना 'सदसदैकांतवादी' आणि बौद्धांना 'अवक्तव्यैकांतवादी', अशाप्रकारे दाखवून मूल चार भंगांचा उपयोग केला आणि शिल्लक तीन भंगांचा उपयोग करण्याचा संकेत मात्र दिला. त्यानंतर त्यांच्या पश्चात् आप्त–मीमांसेवर 'अष्टशती' नांवाचे भाष्य लिहितांना श्री. अकलंकदेवांनी त्या तीन भंगांची माहिती देऊन त्यांचे कार्य पूर्ण केले. त्यांच्या मताने शंकराचार्यांचा अनिर्वचनीयवाद हा 'सदवक्तव्य',बौद्धांचा अन्यापोहवाद' हा 'असदवक्तव्य' आणि यौगांचा 'पदार्थवाद' हा 'सदसदवक्तव्य' या कोटींत समाविष्ट होतो. याप्रमाणे सातहि भंगांचा उपयोग होत असतो. हे त्यांनी दाखवून दिले.

## ◆ द्रव्य व्यवस्था. ◆

जैनधर्माचे मूलतत्त्व अनेकांतवाद व त्याचा उपसिद्धांत स्याद्वाद आणि सप्तभंगीवाद यांचा परिचय झाल्यावर आता जैनधर्म-सिद्धांतांत मानलेल्या द्रव्य व्यवस्थेचे निरूपण करू.–

द्रव्याचे लक्षण जरी 'सत्' हे आहे तरी प्रकारांतराने गुण आणि पर्यायांच्या समूहालाहि 'द्रव्य' म्हणतात. उदा:– जीव एक द्रव्य आहे.

---

१ कारिका नं. ९–२०.

त्यामध्ये सुख, ज्ञान वगैरे असंख्य गुण आहेत. आणि त्याच्या मनुष्य, स्त्री, नारकी, इत्यादि अनेक पर्यायीहि (अवस्था) आहेत. पण गुणपर्यायांचे द्रव्यापासून स्वतंत्र असे अस्तित्व नाही. गुण स्वतंत्र व पर्याय स्वतंत्र आणि त्यांच्या समुदायाने द्रव्य बनले आहे असे नाही. उलट अनादि–कालापासून द्रव्य गुणपर्यायात्मक स्वतंत्र सत्तारूप आहे. साधारणतः गुण नित्य आहेत. आणि पर्याय अनित्य आहेत. म्हणून द्रव्य 'नित्या–नित्यात्मक' आहे. जैनमताप्रमाणे 'सत्' चे लक्षण 'उत्पाद, व्यय आणि ध्रौव्य असे आहे. म्हणजेच ज्यांत प्रत्येक क्षणी उत्पत्ति, विनाश आणि स्थिरता एकदम असतात, त्यासच 'सत्' म्हणावे. उदाः–मातीपासून घट बनवीत असतांना मातीची पिंडरूप पर्याय (अवस्था) नष्ट होते आणि घटरूप पर्याय उत्पन्न होते व दोन्ही अवस्थेत मातीहि कायम आहेच. असे होवू शकत नाही की, एका क्षणात पिंडरूप पर्यायाचा नाश झाला व दुसऱ्या क्षणांत घटरूप पर्यायाची उत्पत्ति झाली. उलट–पक्षी ज्याक्षणी पहिल्या पिंडरूप पर्यायाचा नाश (व्यय) झाला, त्याच क्षणांत घटरूप पर्यायाची उत्पत्तीहि (उत्पाद) झालेली आहे. याप्रमाणे प्रत्येक समयांत पहिल्या पर्यायाचा नाश व दुसऱ्या पर्यायाची उत्पत्ति होत असूनहि द्रव्य मात्र कायमच (ध्रुवस्वरूप) आहे. म्हणून वस्तु ही प्रत्येक समयांत उत्पाद, व्यय आणि ध्रौव्यमय मानलेली आहे.

वरील विवेचनाचा मतितार्थ असा की, प्रत्येक वस्तु ही परिवर्तन-शील आहे. आणि त्यांतील परिवर्तन प्रत्येक क्षणी चालूच आहे. उदाः-एक मुलगा काही कालानंतर तरूण होतो व पुन्हा कांही कालांतराने तो म्हातारा बनतो. पण बाल्यावस्थेचे तारुण्य व तारुण्याचे वृद्धत्व हे एकदम झालेले नाही; तर प्रत्येक क्षणाक्षणांत त्या मुलाच्या अवस्थेत जे परिवर्तन होत असते, त्याचेच कांही कालानंतर तारुण्यांत वा वृद्ध–पणांत रूपांतर होऊन त्याप्रमाणे त्याचे स्वरूप दृष्टिगोचर होऊ लागते.

प्रत्येक क्षणांत होणारे परिवर्तन (फरक) इतके सूक्ष्म आहे की, आपण ते समजण्यास असमर्थ आहोत. आणि अशा प्रकारचा फरक एकसारखा होत असतांहि त्या मुलांत एकरूपता होतीच, की ज्यामुळे तो मोठा होऊनहि आपण त्याला 'तो हाच' म्हणून ओळखू शकतो. असे न मानता द्रव्याला जर केवळ नित्यच मानलें तर त्यात कोणत्याच प्रकारचा फरक(परिवर्तन) होऊ शकणार नाही.उलट त्यास जर केवळ अनित्यच मानले तर आत्मा संपूर्णत. क्षणिक होऊन प्रथम जाणलेल्याचे स्मरण वगैरे व्यापार त्यात राहू शकणार नाहीत. म्हणून प्रत्येक द्रव्य उत्पाद, व्यय व ध्रौव्य स्वभावात्मक आहे. द्रव्यांत गुण ध्रुव आहेत, आणि पर्याय उत्पादव्ययात्मक आहे, म्हणून द्रव्यास 'गुणपर्यायात्मक' किंवा 'उत्पाद–व्यय–ध्रौव्यात्मक' म्हणतात. दोन्हीचाहि अर्थ एकत्र आहे, दोन्ही लक्षणात फरक नाही. उलट एक लक्षण दुसऱ्या लक्षणाचे अभिव्यंजक मात्र आहे.

द्रव्याचे स्वरूप सांगतांना श्रीमदाचार्य कुंदकुंद स्वामी आपल्या प्रवचनसार ग्रंथामध्ये सांगतात–

'दवियदि गच्छदि ताइं ताइं सब्भावपज्जयाइं जं।
दविय तं भण्णंते अणण्णभूदं तु सत्तादो ।।९।।'

अर्थ–'द्रु' धातूपासून (ज्याचा अर्थ जाणे–प्राप्त होणे हा आहे) 'द्रव्य' शब्द बनलेला असून त्यावरून जे आपापल्या स्वभावरूप पर्यायाप्रत जाते,–प्राप्त होते त्याला द्रव्य असे म्हणतात. अशा प्रकारचे हें द्रव्य आपल्या सत्तेपासून (अस्तित्वापासून) भिन्न नाही; म्हणून द्रव्य अस्तित्वरूप (सत्‌रूप) आहे, असे सांगितले आहे आणि ज्याप्रमाणें पर्यायांचे परिवर्तन सतत होत राहील, एकामागून दुसरी, दुसरीपासून तिसरी इ. परिवर्तने घडत राहतील, त्याचप्रमाणे द्रव्याचे परिणमनहि

सतत घडत राहील, म्हणून द्रव्य हे अनादि व अनन्त आहे.

'दव्वं सल्लक्खणियं उप्पादव्वयधुवत्तसंजुत्तं ।
गुणपज्जयासयं वा जं तं भण्णंति सव्वण्हू ॥१०॥

अर्थ– जिनेंद्र भगवंतांनी 'सत्' हे द्रव्याचे लक्षण सांगितलेआहे; किंवा उत्पाद, व्यय व ध्रौव्य यांनी जे युक्त असेल ते द्रव्य होय. किंवा गुणपर्यायांचे जे आश्रयस्थान आहे त्यास द्रव्य म्हणावे.

द्रव्याच्या या तिन्ही लक्षणापैकी, कोणत्याहि एका लक्षणावरोवर शेष दोन्ही लक्षणे आपोआप त्यात समाविष्ट होतात. कारण जे सत् आहे तेच उत्पाद-व्यय-ध्रौव्यात्मक असून तेच गुणपर्यायांचा आधारहि आहे. आणि जे गुणपर्यायात्मक आहे तेच 'सत्' असून उत्पादव्यय–ध्रौव्ययुक्तहि आहे.

ज्याअर्थी सत् हे 'नित्यानित्यात्मक' आहे; त्यावरूनच सत् म्हटल्यावरोवर 'उत्पाद-व्यय-ध्रौव्य' हे अनुभवांत येतात. त्याचप्रमाणें ध्रुवत्वावरोवर म्हणजे गुणावरोवर उत्पाद-व्ययाची म्हणजेच विनाश–शील पर्यायाची एकात्मता आहे हे सिद्ध होते. त्याचप्रमाणे वस्तु उत्पाद-व्यय-ध्रौव्ययुक्त आहे असे सांगितल्याने तिची नित्या–नित्यात्मकता आणि गुणपर्याय–विशिष्टता आपोआप प्रगट होते. त्याचप्रमाणे वस्तूला गुणपर्यायात्मक सांगितल्याने गुणामुळें ध्रौव्याचा आणि पर्यायामुळे उत्पादविनाशाचा संकेत होतोच हेहि समजू शकते आणि त्यावरून द्रव्य नित्यानित्यात्मक 'सत्' आहे हे सिद्ध होते. म्हणून ही तिन्ही लक्षणे प्रकारांतराने द्रव्याचे विश्लेषण करतात. सांगितलेच आहे की,

' उप्पत्तीव विणासो दव्वस्सय णत्थि अत्थि सब्भावो ।
विगमुप्पादध्रुवत्तं करेंति तस्सेव पज्जाया ॥११॥'

अर्थ द्रव्य हे सत्स्वरूप असून त्या द्रव्याचा उत्पादव्यय होत नाही. परंतु त्याचे जे पर्याय आहेत तेच त्यामध्ये उत्पाद-व्यय-ध्रौव्य करतात. या सर्वांचा मतितार्थ असा की, द्रव्य हे उत्पन्नहि होत नाही. व नष्टहि होत नाही, परंतु त्याचे जे पर्याय आहेत ते उत्पन्न होतात व नष्टहि होतात. पण ते पर्याय द्रव्यापासून अभिन्न असल्यामुळे द्रव्यहि उत्पादव्ययात्मक आहे. जैनदर्शनाच्या या सिद्धांताचे प्रतिपादन महर्षि पतंजलीने आपल्या महाभाष्यांत खालीलप्रमाणे केले आहे.

'द्रव्यं नित्यम् आकृतिरनित्या । सुवर्णं कयाचिदाकृत्या युक्तं पिण्डो भवति, पिण्डाकृतिमुपमृद्य रुचकाः क्रियन्ते, रुचकाकृतिमुपमृद्यः कटका क्रियन्ते, कटकाकृतिमुपमृद्य स्वतिकाः क्रियन्ते । पुनरावृत्तः सुवर्णपिण्डः पुनरपरयाऽऽकृत्या युक्तः खदिरांगारसदृशे कुंडले भवतः । आकृतिरन्या च अन्या च भवति, द्रव्यं पुनस्तदेव, आकृत्युपमर्देनेन द्रव्यमेवावशिष्यते ।'

अर्थात्–'द्रव्य नित्य आहे आणि आकार म्हणजे पर्याय हा अनित्य आहे. सोने हे एका विशिष्ट आकाराने पिंडस्वरूप होते त्या पिंडाचा नाश करून त्यापासून माळ तयार केली जाते, माळेचा नाश करूनच तिचे कडे बनविले जाते, कडे तोडून त्याचे स्वस्तिक व स्वस्तिक गाळून त्याचा पुन्हा सुवर्णपिण्ड केला जातो, त्या पिण्डाचा नाश होऊन खदिरांगाराप्रमाणे असलेली दोन कुंडलेहि बनविली जातात. याप्रमाणे आकार बदलत राहतो, परंतु द्रव्य मात्र तेच आहे. आकार नष्ट झाला तरी द्रव्य हे शिल्लक राहतेच.'

यावरून द्रव्याची नित्यता आणि पर्यायांची अनित्यता सिद्ध होते. जैनदर्शन हे असेच मानते व त्यावरूनच द्रव्याचे लक्षण त्यांच्या (पतंजलीच्या) मताप्रमाणे उत्पाद-व्यय-ध्रौव्यात्मक असे त्रयात्मक आहे असे सांगते. आचार्य समंतभद्र स्वामींनी दोन दृष्टांत देऊन हीच गोष्ट स्पष्ट

केली आहे. तें आपल्या आप्तमीमांसेत लिहितात–

' घटमौलिसुवर्णार्थी नाशोत्पादस्थितिष्वयम् ।
शोकप्रमोदमाध्यस्थ्यं जनो याति सहेतुकम् ॥५९॥

एका राजास एक मुलगा व मुलगी होती. राजाजवळ एक सोन्याचा कुंभ होता. मुलीस कुंभ कायम असावा अशी इच्छा झाली. परंतु राजपुत्र कुंभ गाळून मुकुट करू इच्छीत होता. मुलाचा हट्ट पुरवून राजाने तो कुंभ गाळून मुकुट करविला. कुंभाचा नाश झालेला पाहून मुलगी कष्टी झाली. मुकुटाच्या उत्पत्तीने मुलगा प्रसन्न झाला. परंतु राजा सोन्याचा इच्छुक असल्यामुळे कुंभ गाळला जाऊन मुकुट झाला तरीहि सोने कायम राहिल्यामुळे त्याला हर्ष विषाद कांहीच झाला नाही. याप्रमाणे प्रत्येक वस्तु त्रयात्मक आहे. दुसरे उदाहरण असे–

'पयोव्रतो न दध्यत्ति न पयोऽत्ति दधिव्रतः ।
अगोरसव्रतो नोभे तस्मात्तत्त्वं त्रयात्मकम् ॥ ६० ॥

ज्याने केवळ दूध पिण्याचाच नियम केला आहे, तो दही खात नाही व ज्याने फक्त दही खाण्याचा नियम केला आहे, तो दूध पीत नाही आणि ज्याने सर्व गोरस खाण्याचा नियम केला आहे, तो दही किंवा दूध हे दोन्हीहि घेत नाही. कारण हे दोन्हीहि गोरसाचेच पर्याय आहेत. यावरून वस्तु उत्पादव्ययध्रौव्यरूप त्रयात्मक आहे मीमांसा दर्शनकार महामुनी श्री कुमारील हेहि वस्तु उत्पादव्ययध्रौव्य स्वरूप मानतात. त्याच्या समर्थनासाठी त्यांनीही स्वामी समंतभद्राचार्यांचा वरील दृष्टांतच घेतला आहे. ते लिहितात–

'वर्धमानकभंगे च रुचकः क्रियते यदा ।
तदा पूर्वार्थिनः शोकः प्रीतिश्चाप्युत्तरार्थिनः ॥ २१ ॥
हेमार्थिनस्तु माध्यस्थ्यं तस्माद्वस्तु त्रयात्मकम् ।
नोत्पादस्थितिभंगानामभावे स्यान्मतित्रयम् ॥ २२ ॥

न नाशेन विना शोको नोत्पा देन विना सुखम् ।
स्थित्या विना न माध्यस्थ्यं तेन सामान्यनित्यता ॥२३॥'
—मी० श्लो० वा०

अर्थः— सुवर्णाचा प्याला मोडून त्याची माळ बनविली गेली तेव्हा ज्याला प्याला पाहिजे असतो, तो कष्टी होतो व ज्याला माळेची आवश्यकता असते, तो आनंदित होतो. पण ज्याला सोन्याची इच्छा असते, तो हर्षविषाद कांहीच मानीत नाही. यावरून वस्तु त्रयात्मक आहे हे सिद्ध होते. जर उत्पाद व्यय स्थिति हे होणार नाहीत.तर तीन व्यक्तींचे तीन प्रकारचे भावहि संभवणार नाहीत. कारण प्याल्याचा नाश संभवला नसता तर प्याल्याची आवश्यकता असणाऱ्यास दुःख व्हावयास नको व माळेची उत्पत्ति संभवू शकत नसेल तर माळेची ज्यास आवश्यकता असते तो आनंदित व्हावयास नको. तसेच सोने जर टिकून राहणे शक्य नसेल तर सोन्याची इच्छा करणारा प्यालाचा विनाश व माळेची उत्पत्ति या दोन्ही अवस्थेत माध्यस्थ राहू शकणार नाही.म्हणून सामान्य-पणे वस्तु नित्य आहे. (विशेष अर्थात् पर्यायिरूपाने अनित्य आहे.)

सारांश, जैनसिद्धांतांत द्रव्यच एक तत्त्व असून द्रव्याचे सहा प्रकार आहेत आणि ते प्रत्येक समयांत उत्पाद, व्यय व ध्रौव्यस्वरूप आहे. म्हणून द्रव्यदृष्टीने ते नित्य आहे व पर्यायदृष्टीने अनित्य आहे. आता प्रत्येक द्रव्याचे विशेष स्वरूप पाहू—

## ◆ ४ जीवद्रव्य. ◆

जैनाचार्य श्री. कुंदकुंदस्वामींनी जीवांचे स्वरूप खालीलप्रमाणे सांगितले आहे.

' अरसमरूवमगधं अव्वत्तं चेदणागुणमसद्दं ।
जाण अलिंगग्गहणं जीवमणिद्दिट्ठसंठाणं ॥२–८०॥' —प्रवच.

ज्यामध्ये कसलाच रस नाही, रूप नाही, गंध नाही, म्हणून जे अव्यक्त आहे व जें शब्दरूपहि नाही आणि कोणत्याहि भौतिक साधनांनी जे जाणले जात नाही—व ज्याचा कोणताहि एखादा आकार नाही, अशा चैतन्यगुण—विशिष्ट द्रव्यास जीव म्हणतात.

याचा भावार्थ असा की, ज्याला चेतनागुण आहे तो जीव आहे. व हे जीवद्रव्य पुद्‌गल जड द्रव्यापासून भिन्न आहे. कारण पुद्‌गल द्रव्य स्पर्श, रस, गंध, वर्ण, या गुणांनी युक्त असून साकार असते. परंतु जीवद्रव्य अशा स्वरूपाचें नाही. म्हणून जीवद्रव्य जड तत्वापासून भिन्न असून एक वास्तविक पदार्थ आहे. आणखी असे की—

‘ जीवो त्ति हवदि चेदा उवओगविसेसिदो पहू कत्ता ।
भोत्ता य देहमत्तो ण हि मुत्तो कम्मसंजुत्तो ॥२७॥’— पंचास्तिकाय

हे जीव द्रव्य चैतन्यमय असून ज्ञान दर्शनरूप उपयोगमयी आहे प्रभु आहे, कर्ता आहे, भोक्ता आहे आपल्या शरीराच्या आकाराचा आहे आणि ते स्वयं मूर्तिक नसले तरी कर्मयुक्त आहे.

जैनमताप्रमाणे जीवद्रव्याबाबत ज्या प्रमुख बाबी मानल्या आहेत, त्या बहुतेकांचा समावेश या गाथेत आला आहे. त्याचा खुलासा खालीलप्रमाणें आहे.

—जीव चैतन्यमय आहे.

जीवाचे असाधारण लक्षण ‘चेतना’ आहे व ही चेतना ज्ञान,दर्शन स्वरूप आहे. म्हणजेच जाणतो व पाहतो तो जीव होय. सांख्यहि चेतनेला पुरुषाचे स्वरूप मानतात. परंतु ते चेतनेस ज्ञानस्वरूप मानीत नाहीत. त्यांच्या मताप्रमाणे ज्ञान हा प्रकृतीचा धर्म आहे. त्यांचे असे म्हणणे आहे की, ज्ञानाचा उदय केवळ पुरुषांतहि होत नाही व बुद्धीतहि

होत नाही. जेव्हा बाह्य पदार्थ ज्ञानेंद्रियांसमोर उपस्थित होतात, तेव्हा वृद्धि त्याच उपस्थित पदार्थाचा आकार धारण करते. त्यानंतरच जेव्हा वुद्धिमध्ये चैतन्यात्मक पुरुषाचे प्रतिबिंब पडते , तेव्हा ज्ञानाचा उदय होतो. परंतु जैनसिद्धांताप्रमाणे बुद्धि व चैतन्य यात फरक नाही त्यात हर्षविषाद इ. स्वरूप अनेक पर्याय धारण करणारा ज्ञानस्वरूप आत्माच अनुभवसिद्ध आहे. चैतन्य, बुद्धि, अध्यवसाय, ज्ञान इ. त्याचेच पर्याय म्हणविले जातात, म्हणून चैतन्य हे ज्ञानस्वरूपच आहे. त्याच्या दोन अवस्था होतात एक अंतर्मुख व दुसरी बहिर्मुख जेव्हा तो आत्म-स्वरूप ग्रहण करतो तेव्हा त्यास दर्शन म्हणतात. व जेव्हा तो बाह्य पदार्थांचे ग्रहण करतो तेव्हा त्यास ज्ञान म्हणतात. ज्ञान आणि दर्शन यात मुख्यतः हा भेद आहे की,. ज्ञानाच्या सहाय्याने 'हा घट आहे' 'हा पट आहे' इ. स्वरूप वस्तूचा आकार प्राकाराने सहित बोध होतो. दर्शनाच्या सहाय्याने असे होत नाही एवढेच. म्हणून जीव चैतन्यात्मक आहे, याचा आशय असा की जीव ज्ञान. दर्शनात्मक आहे; ज्ञानदर्शन हे जीवाचे गुण किंवा स्वभाव आहेत. त्यांच्याशिवाय कोणी जीव असू शकत नाही, जो जीव आहे तो ज्ञानवान आहे व ज्ञानवान आहे तो जीव आहे.

ज्याप्रमाणे अग्नि आपल्या उष्ण गुणाला सोडून असू शकत नाही, त्याचप्रमाणे जीवहि ज्ञान गुणाशिवाय असू शकत नाही. एकेंद्रिय वनस्पतिमध्ये राहणाऱ्या जीवापासून तो मुक्त जीवापर्यंत प्रत्येकात कमी अधिक प्रमाणात हे ज्ञान दर्शन आढळून येते. सर्वात कमी ज्ञान वनस्पतिकायिक जीवामध्ये आढळून येते, आणि सर्वात अधिक (पूर्ण ज्ञान ) मुक्त आत्म्यात असते.

जैनेतर दर्शनिकांपैकी नैय्यायिक व वैशेषिक हेहि ज्ञान जीवाचाच

गुण मानतात. परंतु त्यांच्या मताप्रमाणे गुण आणि गुणी हे दोन्ही दोन पृथक पदार्थ आहेत व या दोहोंचा परस्परांमध्ये समवाय संबंध आहे. यावरून त्यांच्या मताप्रमाणे आत्मा ज्ञानस्वरूप (ज्ञानमय) नाही. परंतु जीवात ज्ञानगुण समवायाने असतो म्हणूनच फक्त तो ज्ञानवान म्हटला जातो असे ठरते. परंतु जैनदर्शनाचे म्हणणे आहे की, जर आत्मा ज्ञानस्वरूप ज्ञानात्मक न मानला तर तो अज्ञानस्वरूप आहे अशी आपत्ति येईल आणि तो जर अज्ञानस्वरूप राहिला, तर आत्मा व जड पदार्थात कांहीहि फरक पडणार नाही, यावर नैय्यायिकांचे म्हणणे असे की, आत्म्याबरोबर तर ज्ञानाचा संबंध असतोच, परंतु जड घटादिक पदार्थाबरोबर मात्र ज्ञानाचा संबंध होत नाही. म्हणून आत्मा व जड पदार्थात स्वरूपभेद आहेच यावर जैन तत्वज्ञानी असे सांगतात की, जर आत्माहि ज्ञानस्वरूप नाही, आणि जड पदार्थहि ज्ञानस्वरूप नाहीत, तर ज्ञानाचा संबंध फक्त आत्म्याबरोबरच कां मानावा? जडाबरोबर कां मानू नये ? जर असे मानले की, आत्मा चेतन आहे म्हणून त्याबरोबर ज्ञानाचा संबंध होतो तर जैन सैद्धांतिकांचे त्यावर पुनः म्हणणे असे की' नैय्यायिक तर आत्म्याला स्वयंचेतन मानीत नाहीत, त्याचा चैतन्याशी संबंध असल्यामुळे तो चेतन आहे असे समजतात, अशा परिस्थितीत ज्ञानाप्रमाणे चैतन्याच्या संबंधाबाबतहि पुनः तोच प्रश्न उपस्थित होतो की, चैतन्याचा संबंध आत्म्याबरोबरच कां व्हावा ? घटादिकांशी कां होऊ नये? अशा सगळ्या आपत्तीतून बचाव होण्याचा एकच उपाय म्हणजे खुद्द आत्म्यासच चेतन व ज्ञानस्वरूप मानावयास पाहिजे. पंचास्तिकायांत म्हटलेहि आहे की,

'णाणी णाणं च सदा अत्थंतरिदो दु अण्णमण्णस्स ।
दोण्हं अचेदणत्तं पसजदि सम्मं जिणावमदं ॥८८॥

ण हि सो समवायादो अत्थंतरिदो दु णाणदो णाणी ।
अण्णाणीति य वयणं एगत्तप्पसाधकं होदि ॥४९॥ पंचास्तिकाय

अर्थः— जर ज्ञानी आणि ज्ञान यांना एकमेकांपासून सर्वथा भिन्न पदार्थ मानले तर दोन्हीहि अचेतन ठरतात. जर असे म्हटले की ज्ञानापासून आत्मा भिन्न असूनहि आत्मा ज्ञानगुणाच्या समवायाने ज्ञानी होतो तर असा प्रश्न निर्माण होतो की, ज्ञानाबरोबर समवाय संबंध होण्यापूर्वी आत्मा ज्ञानी होता की अज्ञानी? जर अज्ञानी होता असे मानले तर ज्ञानाशी त्याचा समवाय संबंध मानणे व्यर्थ ठरते, जर अज्ञानी होता असे मानले तर अज्ञानाच्या समवायानें तो अज्ञानी होता वा अज्ञानाबरोबर एकरूप तन्मय असल्यामुळें अज्ञानी होता ? अशा परिस्थितीत ज्याप्रमाणे अज्ञानी जीवामध्ये अज्ञानाचा समवाय मानणे व्यर्थ आहे, त्याचप्रमाणे तो अज्ञानी असल्यामुळे त्याबरोबर ज्ञानाचा समवाय संभवनीय नाही. म्हणून त्यास ज्ञानी असेहि म्हणता येत नाही. सारांश, अज्ञानाबरोबर एकरूप असल्यामुळे तो अज्ञानी ठरतो. अशा परिस्थितिमध्ये ज्याप्रमाणे अज्ञानाबरोबर एकमेक झाल्यामुळे आत्मा अज्ञानी ठरला, त्याचप्रमाणे ज्ञानाबरोबरच आत्म्याचे तन्मयत्व मानणेच श्रेयस्कर ठरते.

सारांश, जैनमताप्रमाणे गुण आणि गुणी यांचे प्रदेश निरनिराळे नाहीत. जे आत्म्याचे प्रदेश आहेत तेच ज्ञानादि गुणांचेहि आहेत. त्यामुळे गुणगुणीमध्ये प्रदेशभेद नाही. कारण निरनिराळे तेच मानले जातात की, ज्यांचे प्रदेशहि भिन्न भिन्न आहेत, म्हणून जे जाणते तेच ज्ञान आहे. म्हणून ज्ञानाच्या संबंधाने आत्मा ज्ञाता बनत नाही, तर ज्ञानच आत्मा आहे. म्हटलेच आहे की—

णाणं अप्प त्ति मदं वट्टदि णाणं विणा ण अप्पाणं ।
तम्हा णाणं अप्पा अप्पा णाणं व अण्णं वा ॥२७॥ प्रवचनसार—

अर्थात्:—ज्ञान आत्मा आहे असे मानले आहे. ज्याअर्थी ज्ञान आत्म्याशिवाय असू शकत नाही, त्याअर्थी ज्ञान आत्माच आहे. परंतु आत्म्यांत मात्र ज्ञानादि अनेक गुण असल्यामुळे तो ज्ञानस्वरूपहि आहे आणि अन्य गुणस्वरूपहि आहे.

—आत्माच आपला प्रभु आहे.

प्रत्येक जीव आपल्या अधोगति अगर प्रगतीला स्वतःच जबाबदार आहे. आपल्या क्रियाकर्मांनीच तो बांधला जातो अगर आपल्यात्र कृतींनीच तो बंधनातून मुक्त होतो. दुसरा कोणी त्याला बांधतहि नाही व बंधनांतूनहि त्याला दुसरा कोणी मुक्तहि करीत नाही. तो स्वतःच भिकारीहि बनू शकतो आणि स्वतःच भिकाऱ्याचा भगवानहि बनू शकतो. म्हणून तोच प्रभु अगर समर्थ म्हटला जातो.

—आत्माच आपला निर्माता आहे.

आपल्या स्वतःच्या कर्मांनी बांधल्या गेलेल्या कर्मांचे फल भोगत असतांना जीवाचे जे भाव होतात त्या भावाचा तो स्वतः कर्ता म्हटला जातो. त्याचे तात्पर्य असे की, जीवाचे भाव पांच प्रकारचे आहेत— औपशमिक, क्षायिक, क्षायोपशमिक, औदयिक व पारिणामिक. कर्माच्या उपशमामुळे अर्थात् कर्म उदयांत न आल्यामुळे जे भाव होतात त्यांना औपशमिक भाव म्हणतात. तसेच कर्माचा क्षय—विनाश झाल्या—मुळे जे भाव होतात ते क्षायिक भाव होत. कर्माचा क्षयोपशम झाल्या—मुळे (कांहीचा क्षय व कांहीचा उपशम झाल्यामुळे) जे भाव होतात, ते क्षयोपशमिक भाव होत. कर्माच्या उदयाने जे भाव होतात, ते औदयिक भाव होत व कर्माच्या निमित्ताशिवाय जे भाव असतात त्यांना पारिणामिक भाव म्हणतात. वास्तविक या सर्व भावांचा जीव हा स्वतःच

कर्ता आहे. कर्म त्यामध्ये निमित्त मात्र आहे. परंतु कर्माचे निमित्त मिळाल्याशिवाय वरील भाव होत नाहीत म्हणून त्या भावाचा कर्ता कर्महि आहे असे मानले जाते. सांख्य पुरुपास—आत्म्यास कर्ता मानीत नाहीत. त्यांच्या मतानुसार आत्मा अलिप्त व अकर्ता आहे. जगाच्या व्यापाराशी त्याचा कांहीहि संबंध नाही. त्यावर जैनदर्शनाचा असा आक्षेप आहे की, आत्मा जर अकर्ता असेल तर बंध व मोक्षाची कल्पना व्यर्थ ठरते, 'मी ऐकतो' इत्यादि प्रकारचा अनुभव सर्वास येतो. म्हणून आत्म्याचे अकर्तृत्व अनुभवविरुद्ध आहे, जर असे मानले की अशा प्रकारचा हा अनुभव निव्वळ अहंकारामुळे होतो तर ते म्हणणेहि बरोबर नाही. कारण सांख्य अनुभवास अहंकारजन्य मानीत नाहीत व अनुभव हा अहंकारजन्य नसल्यामुळे आत्म्याचे कर्तृत्व मानणे भाग पडते. म्हणून आत्मा आपला कर्ता आहे.

——आत्माच आपला भोक्ता आहे.

ज्याप्रमाणे जीव आपल्या भावाचा कर्ता आहे. त्याप्रमाणे त्याचा तो भोक्ताहि आहे. कारण जर आत्मा सुखदु:खाचा भोक्ता नसेल, तर सुखदु:खांचा अनुभवहि त्याला येणार नाही. अनुभूति हा चैतन्याचा धर्म आहे. सांख्यांचे म्हणणे असे आहे की, पुरुप स्वभावत: भोक्ता नाही परंतु त्यावर भोक्तृत्वाचा आरोप केला जातो. कारण सुखदु:खांचा अनुभव बुद्धिद्वारे होतो व बुद्धि जड आहे बुद्धीने समजलेल्या सुखदु:खांचे प्रति- बिंब शुद्ध स्वभावामध्ये पडते. म्हणून पुरुषास सुखदु:खाचा भोक्ता मानले जाते. यावर जैनांचे म्हणणे असे की, ज्याप्रमाणे स्फटिकांमध्ये जपा- पुष्पाचे प्रतिबिंब पडल्याबरोबर स्फटिक—मण्यात लाल रंगाचे परिणमन मानावे लागते, त्याप्रमाणेच पुरुषामध्ये सुखदु:खांचे प्रतिबिंब पडते. हे

मानण्याने अर्थात पुरुषामध्ये सुखदु:खरूप परिणाम होतात हे मानणेहि भाग पडते. त्याशिवाय सुखदु:खाची अनुभूति होऊ शकत नाही.

— जीव स्वदेह–परिमाण आहे.

जैन-मताप्रमाणे जीव शरीरप्रमाण मानलेला आहे. ज्याप्रमाणे दिवा संकुचित किंवा विस्तृत ठिकाणी ठेवला असतांना त्याला अनुसरून दिव्याचा प्रकाश संकोचरूप वा विस्ताररूप होतो, त्याप्रमाणे आत्म्यास मुंगी किंवा हत्तीप्रमाणे लहान किंवा मोठे जसे शरीर मिळाले असेल त्याप्रमाणे त्या शरीराच्या आकाराचा तो होतो. परंतु संकोच झाल्यामुळे आत्म्याच्या प्रदेशामध्ये कमतरता होत नाही किंवा विस्तार झाल्याने त्या प्रदेशात वाढ होत नाही. प्रत्येक अवस्थेत आत्मा ठराविक असंख्यांत प्रदेशीच असतो.

आत्म्यास शरीरप्रमाण मानल्यामुळे काही लोक असा आक्षेप घेतात की, शरीराच्या प्रत्येक प्रदेशात जर आत्म्याचा प्रदेश आहे तर त्या शरीराप्रमाणे आत्म्यासहि सावयव मानावे लागेल व सावयव मानल्यानें आत्म्याचा विनाश मानावा लागेल. ज्याप्रमाणे घट सावयव आहे व जेव्हा त्या अवयवांचा घटाशी असलेला संयोग नष्ट होतो, तेव्हा अवयवी घटाचाहि नाश होतो त्याचप्रमाणे आत्म्यास सावयव मानल्याने त्याचाहि नाश संभवतो. या आक्षेपास जैनाचार्यांचे उत्तर असे की, जैन–दर्शनात आत्म्यास कथंचित सावयवहि मानले आहे. परंतु त्याचे अवयव घटाच्या अवयवाप्रमाणे कारण–पूर्वक नाहीत अर्थात् घट एक द्रव्य नाही, ते अनेक द्रव्यमय आहे. अनेक परमाणूंच्या समूहाने घट बनलेला असून त्याचा प्रत्येक परमाणु एक द्रव्य आहे. म्हणून घटाचे अवयव त्यास कारणीभूत असलेल्या परमाणूंनी बनलेले आहेत. परंतु आत्म्याची अशी गोष्ट नाही. आत्मा एक अखंड व अविनाशी द्रव्य आहे. ते अनेक

द्रव्यांचा संयोग नाही. म्हणून घटाप्रमाणे आत्म्याच्या नाशाचा प्रसंग उत्पन्न होत नाही. जसे आकाश सर्वव्यापक अमूर्तिक द्रव्य आहे. परंतु जैनमताप्रमाणे त्याचेहि अनंत प्रदेश आहेत. कारण जर असे मानले नाही तर मथुरा, काशी, कलकत्ता इत्यादि सर्व एकप्रदेशवर्तीच होतील परंतु हे भिन्न भिन्न प्रदेशवर्ती आहेत. म्हणून हे स्वयंसिद्ध आहे की आकाश बहुप्रदेशी आहे. परंतु बहुप्रदेशी असूनहि आकाशाचा विनाश नाही व ते अनित्यहि नाही. त्याप्रमाणे आत्म्याचेहि जाणावे.

दुसरा आक्षेप असाहि घेतला जातो की, जर आत्मा शरीर-प्रमाण आहे, तर लहान मुलाच्या शरीर–प्रमाणाचा असलेला हा आत्मा तरुणाच्या शरीररूपाचा होऊन त्यात बदल कसा होतो ? जर बालकाच्या शरीरप्रमाणाला सोडून तो तरुणाच्या शरीराचा होतो तर शरीराप्रमाणें आत्माहि अनित्य आहे असे मानवयास पाहिजे, जर मुलाचा शरीराकार सोडल्याशिवायच तो तरुणाच्या शरीररूपाला धारण करीत असेल, तर हे असंभवनीय आहे. कारण एका परिमाणाला सोडल्याशिवाय दुसरे परिमाणरूप होत नाही. शिवाय जर जीव शरीरप्रमाण आहे, तर शरीराचा एखादा अंश कापला गेल्यावर त्या विशिष्ट भागापुरता आत्म्या-चाहि नाश झाला असे मानावे लागेल. त्याचे उत्तर असे की, आत्मा बालकाच्या शरीर–परिमाणास सोडूनच तरूणशरीर–प्रमाणाचा होतो. ज्याप्रमाणे साप आपला फणा पसरून स्वतःच फुगवून मोठा करतो, त्याप्रमाणेच आत्माहि आपल्या संकोच-विस्ताररूप गुणामुळे निरनिराळ्या वेळी भिन्न भिन्न आकाराचा होतो, व त्यामुळेच आत्म्यास अनित्यहि मानलेले आहे. परंतु द्रव्यदृष्टीने आत्मा नित्यच आहे. शरीराचा विनाश झाला असतांनाहि आत्मा नष्ट होत नाही–परंतु शरीराचा भाग तुटला तर आत्म्याचे प्रदेश त्या खंडित भागांत विस्ताररूप होतात. या खंडित भागामध्ये आत्म्याचे प्रदेश मानले नाहीत, तर शरिराच्या कापल्या

गेलेल्या भागांत जे कंप आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात ते आले नसते कारण त्या भागांत दुसरा आत्मा तर आलेला नाहीच व आत्म्याशिवाय परिस्पंदन (हालचाल) होणे शक्यहि नाही, कारण कांही काळाने जेव्हा आत्मप्रदेशांचा संकोच होतो तेव्हा खंडित झालेल्या भागात क्रिया असत नाही. यावरून शरिराचे दोन भाग झाले असतांहि आत्म्याचे दोन भेद होत नाहीत. म्हणून आत्मा शरीर–परिमाणाचा आहे–कारण मी सुखी आहे इ. स्वरूपाचे अनुभव शरीरांतच आत्म्याला होतात.याप्रमाणें आत्म्यास शरीरपरिमाणाचा मानून आत्म्याच्या व्यापकत्वाचा निरास जैन दार्शनिकांनी केलेला आहे. त्यांचे म्हणणे असे कीं, जर आत्मा व्यापक मानला तर त्यांत कोणतीच क्रिया संभवणार नाही. व क्रिये–शिवाय तो पापपुण्याचा कर्ताहि होऊ शकत नाही. आणि कर्तृत्वाशिवाय बंध व मोक्षाचीहि व्यवस्था जमणार नाही.

वद्ध–जीव कर्मांने संयुक्त आहे–

जैनमताप्रमाणे प्रत्येक संसारी आत्मा कर्मांनी वद्ध आहे हे कर्मबंधन त्याला कांही विशिष्ट समयी प्राप्त झालेले नाही. तर अनादि आहे. ज्याप्रमाणे खाणीतून सोने मातीसहितच निघते, त्याप्रमाणेच संसारी जीवात्मे अनादि काळापासून कर्मबंधनांत जखडलेले असल्याचे आढळून येते. जर अनादि काळापासून आत्मे शुद्ध असते, तर ते कर्मांनी बांधले गेले नसते. कारण आंतरिक अशुद्धि हीच कर्मबंधनास कारणीभूत आहे. या अशुद्धीशिवाय जर कर्मबंधन झाले असते, तर मुक्त आत्म्यांनाहि कर्मबंधन लागले असते, आणि मग मुक्तीसाठी होणारे प्रयत्न विफल ठरले असते.

याप्रमाणे जैनमताप्रमाणे जीव हा जाणणारा, पहाणारा,अमूर्तिक, कर्ता, भोक्ता, स्वदेहपरिमाणाचा व स्वतःच्या उत्थानपतनास स्वतःच जबाबदार असा आहे.

## –जीवाचे भेद–प्रभेद.

या जीवाचे मूल भेद दोन आहेत:– संसारी व मुक्त. कर्मबंधनाने वांधले गेलेले जे जीव एका गतींतून दुसऱ्या गतीत जन्म घेतात व मरतात ते संसारी; व या जन्ममरणांतून जे सुटले आहेत ते मुक्त होत. मुक्त जीवांमध्ये कसलाच भेदभाव नाही. त्या सर्वांचे गुणधर्म सारखे आहेत. परंतु संसारी जीवांचे अनेक भेदप्रभेद प्रत्ययाला येतात. संसारी जीव चार प्रकारचे आहेत. नारकी, तिर्यच, मनुष्य व देव. या पृथ्वीच्या खाली सात नरकभूमि आहेत. त्यांत राहणारे ते नारकी व वर स्वर्गादिकांत ज्यांचा निवास् आहे ते देव होत. आपण सर्व मनुष्य आहोत आणि पशु, पक्षी, कीटक, वृक्ष इ. सर्व तिर्यच म्हटले जातात. नारकी, देव व मनुष्यांना पांचहि ज्ञानेंद्रिये असतात. परंतु तिर्यचांना असे असत नाही. पृथ्वीकायिक, जलकायिक, अग्निकायिक, वायुकायिक व वनस्पतिकायिक जीवांना फक्त एक स्पर्शनेंद्रियच असते व त्याच्या सहाय्याने ते जाणतात. हे स्थावर जीव होत. जैनमतानुसार मनुष्य, पशू पक्षी, किडे हे तर जीव आहेतच; शिवाय पृथ्वी, जल, अग्नि, वायु व वनस्पति हीहि जीव सृष्टि आहे. मातीत किडे वगैरे जीव तर आहेतच ते वेगळे; परंतु माती पहाड वगैरे हे स्वतः पृथ्वीकायिक जीवांच्या शरीरांचे पिंड आहेत. त्यांचप्रमाणें पाण्यामध्ये दुर्विण वगैरे उपकरणाच्या सहाय्याने दिसणाऱ्या अनेक जंगम–त्रस जीवाव्यतिरिक्त जल हे स्वतःच जलकायिक जीवांच्या शरीराचे पिंड आहे. हीच गोष्ट अग्निकायिक वगैरे बावतीतहि जाणावी. अळी वगैरे जीवांना स्पर्शनेंद्रिय व रसनेंद्रिय ही दोन इंद्रिये असतात. मुंगी, ढेकूण वगैरेना स्पर्शनेंद्रिय, रसनेंद्रियं, घ्राणेंद्रिय अशी तीन इंद्रिये असतात. भुंगे माशा वगैरेना स्पर्शनरसन–घ्राण व चक्षु अशी चार इंद्रिये असतात. आणि साप, पशु, पक्षी आदींना पांचहि इंद्रिये असतात. या जीवांना त्या त्या इंद्रियांनी–

स्पर्श, रस, गंध, वर्ण व शब्द यांचे ज्ञान होते.या सर्व जीवांची योनी-जन्म शरीर वगैरेचे सविस्तर वर्णन जैन शास्त्रात केलेले आहे. या संबंधात हीहि बाब स्पष्ट करणे जरूर आहे की, जैनदर्शनानुसार जीवराशी अनंत आहे. व त्यांतील प्रत्येक जीवाचे अस्तित्व स्वतंत्र आहे. कारण जर सर्व जीवांचा मिळून एकच आत्मा असतां, तर एक सुखी झाल्याबरोबर सर्वच जीवांना सुखाचा लाभ झाला असता. अगर एकाच्या दु:खी होण्याने सर्वच दु:खी झाले असते. एक बद्ध झाला असतां सर्व बद्ध व एकाच्या मुक्तीबरोबर सर्व मुक्त झाले असते. जीवांची प्रत्यक्ष गोचर निरनिराळी अवस्था पाहून सांख्यांनीहि जीवांचे अनेकत्व मानलेले आहे व जैनदर्शनाचेहि हेच मत आहे

## ५ अजीव द्रव्य.

ज्या द्रव्यांमध्ये चैतन्य असत नाही, त्यांना अजीवद्रव्ये म्हणतात. ती पांच आहेत. त्यांची माहिती पुढीलप्रमाणे समजावी

१ पुद्गलद्रव्य:– येथे ही एक उल्लेखनीय गोष्ट आहे की, जैन–शास्त्रांतील पुद्गल शब्दाचा प्रयोग हा अगदी मौलिक व अभिनव आहे. इतर दर्शनशास्त्रांत हा शब्दप्रयोग आढळत नाही. ज्याची तूटफूट होते, जे जळू शकतात अगर ज्याचे विघटन होऊ शकते. ते सर्व पुद्गलद्रव्य होय. स्थूलमानाने आपण जे कांही पहातो ,खातो, पितो, ज्यांना स्पर्श करू शकतो, ज्यांचा वास घेतो, अगर जे ऐकतो, ते सर्व पुद्गल होय. म्हणून जैनशास्त्रांत रूप, रस, गंध व स्पर्शवान् पदार्थांना पुद्गल म्हटले आहे. याप्रमाणे आधुनिक वैज्ञानिकांनी मानलेले 'मॅटर' (Matter) व 'एनर्जी' (Energy) या दोन्हीचा पुद्गलांत समावेश होतो. परमाणू बाबतच्या आधुनिक शोधांशी ज्यांचा परिचय आहे, ते या शब्दाच्या निवडीबद्दल प्रशंसाच करतील. 'आधुनिक वैज्ञानिकांच्या मतानुसार सर्व अॅटम

(Atom) (परमाणु) इलेक्ट्रॉन, प्रोट्रॉन व न्यूट्रॉन यांचा समूह आहे. यूरेनियम हा एक धातु आहे. त्यातून नेहमी तीन प्रकारची किरणे बाहेर येतात. जेव्हा युरेनियमच्या एका अणूतून तीन्ही किरणे नाहीशी होतात, तेव्हा तो एका रेडियमच्या अणूत रूपांतरित होतो. त्याचप्रमाणे रेडियमचा अणु 'शिसे' या धातूत परिवर्तित होतो. हे परिवर्तन असे दाखविते की, इलेक्ट्रॉन व प्रोटॉन च्या विभागात 'मॅटर'चे एकरूप दुसऱ्या रूपात परिवर्तित होते. ह्या अदलाबदलीस व तूटफुटीस 'पुद्गल' हा शब्द योजिलेला आहे. सहाहि द्रव्यांपैकी हे एक पुद्गल द्रव्यच मूर्तिक आहे. बाकी सर्व अमूर्तिक आहेत न्यायदर्शनकार पृथ्वी, जल, तेज, आणि वायु यांना निरनिराळी द्रव्ये मानतात. कारण त्यांच्या मतानुसार पृथ्वीमध्ये रूप, रस, गंध व स्पर्श हे चारहि गुण आहेत. पाण्यात गंधाशिवाय इतर तीन गुण, तेजात गंध व रसाशिवाय इतर दोन गुण वायूत फक्त स्पर्श गुणच आढळून येतो. म्हणून या चारीहि द्रव्यांचे परमाणु निरनिराळे आहेत. अर्थात् पृथ्वीचे परमाणु निराळे जलाचे परमाणु निराळे, तेजाचे परमाणु निराळे व वायूचे परमाणु निराळे आहेत म्हणून चारींहि निरनिराळी द्रव्ये आहेत परंतु जैन मताप्रमाणे सर्व परमाणु एकजातीय असून, त्या सर्वांत चारहि गुण आढळतात. परंतु त्यापासून बनलेल्या पदार्थांत जर कोण्या एखाद्या गुणाचा अनुभव येत नसेल, तर त्याचे कारण त्या गुणाची अभिव्यक्ति न होणे हे आहे. उदा-पृथ्वीवर पाणी शिंपडल्याने गंध गुण व्यक्त होतो. यावरूनच हा गुण फक्त पृथ्वीतच आहे; असे म्हणता येत नाही आवळा खाल्यावर पाणी प्याल्याने पाण्याचा स्वाद गोड लागतो परंतु हा कांही केवळ पाण्याचाच स्वाद नाही, तर आवळ्याचाहि स्वाद त्यात मिळालेला असतोच. त्याच प्रमाणे इतर बाबतीतहि जाणावे. त्याशिवाय आणखी पाण्यापासून मोती उत्पन्न होतात, ते पार्थिव समजले जातात. जंगलात वांबूंच्या घर्षणाने

अग्नि उत्पन्न होतो. जंव खाण्यामध्ये आले असता वायूचा प्रकोप होतो. यावरून ही गोष्ट सिद्ध होते की, पृथ्वी, जल, अग्नि आणि वायु यांच्या परमाणूत भेद नाही जो कांही फरक असेल तो केवळ परिणमनाचाच (परिरर्तनाचा) भेद आहे. म्हणून सर्वांमध्ये स्पर्शादि चारीहि गुण मानावयास पाहिजेत. म्हणून पृथ्वी वगैरे चार द्रव्ये नसून ते एकच द्रव्य आहे. म्हणून म्हटले आहे.–

'आदेसमत्त मुत्तो धातुचदुक्कस्य कारणं जो दु ।
सो णेओ परमाणु परिणामगुणो समयद्दो ॥ ७८ ॥,– पंचास्ति. ।

अर्थ–जे पृथ्वी, जल, अग्नि आणि वायूचे कारण आहे तो परमाणु आहे. परमाणु स्वयं द्रव्य आहे व त्यात स्पर्श, रस, गंध वर्ण (रूप) हे चारहि गुण आहेत. म्हणूनच त्यास मूर्तिक म्हणतात. तो परमाणु अविभागी आहे कारण त्यास आदि अन्त किंवा मध्य नाही. म्हणून त्याचा पुन्हा दुसरा विभाग होत नाही. जैन सिद्धांतानुसार द्रव्य व गुणात प्रदेशभेद नसतो. जो परमाणूचा प्रदेश आहे तोच चार गुणांचाहि आहे म्हणून या चारहि गुणांना परमाणूपासून भिन्न करता येत नाही. असे असूनहि कांही द्रव्यांत एखाद्या विशिष्ट गुणाचा अनुभव येत नाही. त्यचे कारण परमाणूची परिणमनशीलता होय. परिवर्तन शील स्वभामुळे कोठे कोठे कांही गुणांची अभिव्यक्ति उत्कट स्वरूपात आढळून येत नाही. तर कोणत्या एका गुणाची उत्कटत्त्वाने अभिव्यक्ति आढळून येते. परंतु परमाणु हा शद्वरूप नाही.

पुद्गलाचे दोन भेद नाहेत. परमाणु व स्कंध प्राचीन शास्त्रात परमाणूचे स्वरूप खालीलप्रमाणे सांगितलेले आहे.–

'अत्तादि अत्तमज्झं अत्तंत्तं णेव इंदियगेज्झं ।
जं दव्वं अविभागी तं परमाण विजाणाहि ॥

अर्थ– जे स्वःच आदि, स्वतःच मध्य व स्वतःच अन्त स्वरूप आहे, म्हणजेच आदि, मध्य व अन्ताचा फरक ज्यात नाही व जो इंद्रियांच्या द्वारे ग्रहण केला जाऊ शकत नाही, त्या अविभागी द्रव्यास परमाणु समजावे.

सव्वेसिं खंधाणं जो अंतो तं वियाण परमाणू ।
सो सस्सदो असद्दो एक्को अविभागी मुत्तिभवो ॥ ७७ ॥ पश्चास्ति

सर्व स्कंधाचा जो अंतिम खण्ड आहे, अर्थात् पुन्हा ज्याचा दुसरा खंड होणार नाही, त्यास परमाणु म्हणावे, तो परमाणु नित्य आहे, शद्बरूप नाही, एकप्रदेशी आहे आणि अविभागी व मूर्तिक आहे.

'एयरसवण्णगंधं दो फासं सद्दकारणमसद्दं ।
खंधंतरिदं दव्वं परमाणूं तं वियाणाहि ॥ ८१ ॥ –पश्चास्ति.

ज्यात एक रस, एक रूप, (वर्ण) एक गंध व दोन स्पर्श गुण असतात, जो शद्बोत्पत्तीचे कारण आहे, परंतु स्वयं शद्बरूप नाही व स्कंधापासून ज्याचे स्वरूप निराळे आहे त्यास परमाणु म्हणावे.

वरील सर्व विवेचनावरून परमाणूसंबंधी अनेक गोष्टी समजून येतात, पुग्दलाच्या सर्वात लहान अविभागी अंशास परमाणु म्हणतात. तो एकप्रदेशी आहे. त्यामुळे त्याचा दुसरा विभाग होत नाही. त्यात एक रस, कोणतातरी एक वर्ण (रूप), एक गंध आणि शीत, उष्ण यापैकी कोणतातरी एक आणि स्निग्ध व रुक्ष यापैकी कोणतातरी एक असे दोन स्पर्श गुण असतात. जरी परमाणु नित्य आहे, तरीहि स्कंधांची मोडतोड होऊन त्याची उत्पत्ति होते. अर्थात् अनेक परमाणूंचा समूह असलेला स्कंध जेव्हा विघटित होतो, तेव्हा तो कमी कमी होत असता त्याचा अंत परमाणुरूपांत होतो. या दृष्टिने परमाणूंची उत्पत्ति मानलेली आहे. तथापि द्रव्यदृष्टीने परमाणु नित्यच आहे.

अनेक परमाणूंच्या बंधापासून जे द्रव्य बनते, त्यास स्कंध म्हणतात. दोन परमाणु मिळून होणाऱ्या स्कंधास द्व्यणुक, तीन परमाणूंच्या स्कंधास त्र्यणुक, याप्रमाणेच संख्यात, असंख्यात व अनन्त परमाणूंच्या बंधामुळे अनुक्रमे संख्यातप्रदेशी, असंख्यातप्रदेशी व अनन्तप्रदेशी स्कंध तयार होतात. आपण जे जे कांही पाहतो, ते सर्व स्कंधच आहेत. उन्हांत दिसून येणारे कण ते सुद्धा स्कंधच आहेत.

येथे हे सांगणे अनुचित होणार नाही की, आधुनिक रसायनशास्त्रांत जे 'अ‍ॅटम' मानले आहेत, ते जैन दर्शनसम्मत परमाणुसमान नाहीत. जरी सुरवातीस ज्याचे पुन्हा विभाजन होत नाही असाच अ‍ॅटमचा अर्थ घेतला गेला, तरी उलट आता ही गोष्ट सिद्ध झालेली आहे की, 'अ‍ॅटम' हा प्रोट्रॉन, न्युट्रॉन व इलेक्ट्रॉनचा एक पिण्ड आहे. उलट परमाणु हा मूळकण असून तो स्वतः दुसऱ्याशी संबंध नसतांना सुद्धा स्वतःचे अस्तित्त्व राखू शकतो.

पुद्गल द्रव्याच्या अनेक पर्यायी आहेत. उदा.—

'सद्दो बंधो सुहुमो थूलो संठाणभेदतमछाया ।
उज्जोदादवसहिया पुग्गलदव्वस्स पज्जाया ॥१६॥'—द्रव्यसं० ।

शब्द, बंध, सूक्ष्मता, स्थूलता, आकार, खंड, अंधःकार, छाया, चांदणे व ऊन या सर्व पुद्गल द्रव्याच्या पर्यायी आहेत.

इतर धर्मतत्ववेत्त्यांनी शब्दास आकाशाचा गुण मानला आहे. परंतु जैनमताप्रमाणे ते पुद्गलाचेच पर्याय आहे. ते लिहितात—

'सद्दो खंधप्पभवो खंधो परमाणुसंगसंघादो ।
पुट्ठेसु तेसु जायदि सद्दो उप्पादगो णियदो ॥७९॥'—पंचास्ति. ।

शब्द स्कंधापासून उत्पन्न होतो, अनेक परमाणूंच्या बंधविशेषास

स्कंध म्हणतात. ते स्कंध एकमेकांवर आदळल्याने शब्दांची (आवाज) उत्पत्ति होते.

जैनांचे म्हणणे असे आहे की, शब्द हा जर आकाशाचा गुण असतां, तर त्याचे कर्णेंद्रियाद्वारे ग्रहण झाले नसते. कारण अमूर्तिक आकाशाचा गुण हा सुद्धा अमूर्तिकच असावयास पाहिजे. मूर्तिक इंद्रिये अमूर्तिक पदार्थांना जाणूहि शकत नाहीत. उलट शब्द एक-मेकावर आदळतो. विहीरीसारख्या ठिकाणातून त्याचा प्रतिध्वनीहि ऐकावयास मिळतो. शब्द रोकले जाऊ शकतात. ग्रामोफोनचे रेकॉर्ड टेलिफोन वगैरे यासाठी उदाहरणे आहेत. शब्द गतिमानहि आहेत. ही गोष्ट आधुनिक विज्ञानशास्त्रासहि मान्य आहे. शाळेत विद्यार्थ्यांना प्रयोगांच्या द्वारे असे दाखविले जाते की, शब्द अशा आकाशांत जाऊ शकत नाही की, जेथे 'मॅटर'चे अस्तित्व नाही. यावरून विज्ञा-नानेहि शब्द आकाशाचा गुण सिद्ध होत नाही; म्हणून तो मूर्तिक आहे.

बंध म्हणजे केवळ दोन वस्तूचा परस्पर संयोग नव्हे; तर दोन वस्तू आपली मूळची अवस्था सोडून तिसरीच अवस्था या मिलाफाने जेव्हा धारण करतात, तेव्हा अशा संबंध-विशेषास बंध म्हणावे. उदा-ऑक्सिजन व हॅड्रोजन नांवाचे दोन वायु जेव्हा परस्पर मिळतात तेव्हा ते जलस्वरूप होतात. त्याचप्रमाणे कापुर, पेपरमिंट ओव्याचा अर्क हे परस्परांत मिळाल्यावर एक विशिष्ट द्रवमय औषध (अमृतधारा)तयार होते. हाच बंध होय. जर असे मानले नाही तर एखाद्या कापडामध्ये रंगीबेरंगी धाग्यांचा संयोग झाल्यानंतरहि सर्व धागे निरनिराळे राहतात. एकाचा दुसऱ्यावर कांही प्रभाव दिसून येत नाही त्याच-प्रमाणे स्कंधाप्रमाणे सुद्धा परमाणु केवळ संयोगरूपच मानले व त्यांचा बंध विशेष मानला नाही, तर त्याच्या केवळ संयोगाने स्थिर व स्थूल

अशा वस्तूची उत्पत्ति होणार नाही कारण बंधामुळे जे रासायनिक संमिश्रण होते, ते केवळ रासायनिक संयोगाने शक्य होत नाही. अशा रासायनिक संमिश्रणाशिवाय बन्ध उत्पन्न होऊ शकत नाही. जैनशास्त्रांत बंधांच्या स्वरूपाचे विश्लेषण अत्यंत सूक्ष्म रीतीने केलेले आहे. त्यांच्या मतानुसार स्निग्ध व रूक्ष गुणांच्या निमित्तानेच परमाणूंचा परस्परांत बंध होतो. परमाणूत दुसरेहि अनेक गुण आहेत. पण बंधासाठी स्निग्धत्व (चिकटपणा) व रूक्षपणा (कोरडेपणा) हे दोनच गुण कारणीभूत आहेत. स्निग्ध गुणयुक्त परमाणूंचाहि परस्पर बंध होतो व रूक्ष गुणयुक्त परमाणूंचा सुद्धा परस्पर बंध होतो आणि स्निग्ध व रूक्ष गुणधारक परमाणूंचाहि बंध होतो. परंतु जघन्य गुणांशधारकाचा बंध होत नाही. समान गुणांशधारकांचाहि बंध होत नाही. जरी अशा प्रकारच्या परमाणूंचा परस्पर संयोग होऊ शकतो, तथापि त्यांचा स्कंध मात्र होत नाही. म्हणून दोन अधिक गुणांश असतानाच त्या परमाणूंचा परस्परांत बंध होतो. कारण अधिक गुणांशाचा धारक परमाणु कमी गुणांश धारक परमाणूंत मिळाला तरच तिसरी अवस्था धारण करू शकतो व यांचेच नांव बंध आहे. जर दोहींपेक्षा अधिक किंवा कमी गुणांश धारकांचा बंध होतो असे मानले तर अधिक विषमता होऊन अधिक गुणांशांचा धारक परमाणु कमी गुणांशधारक परमाणूस आपल्या सारखाच करून टाकील व कमी गुणांशवाला परमाणु अधिक गुणांशधारक परमाणूवर तितका परिणाम करणार नाही, जितका रासायनिक संमिश्रणासाठी आवश्यक आहे. म्हणून दोन अधिक गुणांशधारक अशा परमाणूंचा बंध होतो. व बंधाने स्कंधाची उत्पत्ति होते. अशा प्रकारचा हा बंध फक्त पुद्गल द्रव्यामध्येच संभवनीय आहे; म्हणून बंध ही पुद्गलाची पर्याय आहे, असे मानले आहे.

याचप्रमाणें स्थौल्य, दुबळेपणा, गोल, त्रिकोण, चौकोन इ० आकार

किंवा मोडतोड ह्रीं मूर्तिक द्रव्यांतच संभवतात. म्हणून तेहि पुद्गलाचे पर्याय आहेत. जैनमताप्रमाणे अंधःकार हीहि वस्तु आहे. कारण तो दिसू शकतो व त्यात तरतमभावहि (कमी जास्तपणा) आढळतो. उदा.- निबिड अंध.कार साधारण अंध.कार इ० इतर दार्शनिक अंधःकारास केवळ प्रकाशाचा अभाव मानतात. परंतु जैन दार्शनिक तो केवळ अभाव मात्र न मानतां. प्रकाशाप्रमाणे ती एक भावात्मक वस्तु मानतात व ज्याप्रमाणे सूर्यचंद्र वगैरेच्या प्रकाशास ऊन किंवा चांदणे या नांवाने म्हटले जाते व ती पुद्गलाची पर्याय आहे, त्याचप्रमाणे अंधःकार हीहि पुद्गलाची पर्याय आहे. छाया ही सुद्धा पुद्गलाचीच पर्याय आहे. कारण कोण्याहि एखाद्या मूर्तिमान् वस्तूने प्रकाश अडविला की छाया पडते याप्रमाणे इंद्रियांच्या सहाय्याने जे आपण पाहतो, ज्यास स्पर्श करतो, ज्याचा वास घेतो, स्वाद घेतो किंवा जे ऐकतो ते सर्व पुद्गलाचेच पर्याय आहेत.

## २ धर्मद्रव्य व ३ अधर्मद्रव्य.

धर्मद्रव्य व अधर्मद्रव्य याचा अर्थ पापपुण्य असा घ्यावयाचा नाही. परंतु ही दोन्ही द्रव्ये जीव, पुद्गलाप्रमाणे दोन स्वतंत्र द्रव्ये आहेत. ते जीव व पुद्गलांना चालण्यास व स्थिर राहण्यास मदत करतात. सहा द्रव्यांपैकी धर्म, अधर्म, आकाश व काल ही चार द्रव्ये निष्क्रिय आहेत; यांच्यात हलनचलन होत नाही. शेष जीव व पुद्गल ही दोन द्रव्ये क्रियावान् आहेत. या दोन्ही द्रव्यांना चालण्यास जे मदत करते ते धर्मद्रव्य व स्थिर राहण्यास जे सहाय्य करते, ते अधर्मद्रव्य होय. जीव आणि पुद्गलांत चालण्याफिरण्याची किंवा स्थिर रहाण्याची शक्ति आहे. तरी बाह्य सहाय्याशिवाय या शक्तीची व्यक्ती होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे परिणमन करण्याची शक्ती जगातील प्रत्येक वस्तूंत असूनहि, त्या परिणमनासाठी

कालद्रव्य सहाय्यक होते, त्याशिवाय ते होऊ शकत नाही; त्याचप्रमाणे धर्म व अधर्मद्रव्य यांच्या सहाय्याशिवाय कोणाचीहि अनुक्रमे गति होऊ शकत नाही किंवा स्थितीहि होऊ शकत नाही. ही दोन द्रव्ये अशी आहेत की, ती जैनाशिवाय कोणीहि मानलेली नाहीत. दोन्ही द्रव्ये आकाशाप्रमाणेच अमूर्तिक व सर्व लोकव्यापी आहेत. पंचास्तिकाय ग्रंथांत म्हटले आहे की--

धम्मत्थिकायमरसअवण्णगंधं असद्दमप्फासं ।
लोगोगाढं पुठ्ठं पिहुलमसखादियपदेसं ॥ ८३ ॥ पचास्ति.

धर्मद्रव्यांत रस नाही, रुप नाही, गंध नाही, स्पर्श नाही किंवा शब्दहि नाहीत. तसेच ते सर्व लोकांत (लोकाकाशांत) व्याप्त असून ते अखंडित (एक पूर्ण) आहे व असंख्यात प्रदेशी आहे–

'उपयं जह मच्छाणं गमणाणुग्गहयरं हवदि लोए ।
तह जीवपुग्गलाणं धम्मं दव्वं वियाणेहि ॥ ८५ ॥' –पंचास्ति.

ज्याप्रमाणे या लोकांत पाणी हे माशांना चालण्यास सहाय्यभूत होते, त्याप्रमाणे धर्मद्रव्य जीव व पुद्गलांना चालण्यास सहाय्यभूत आहे

'जह हवदि धम्मदव्वं तह तं जाणेह दव्वमधम्मक्खं ।
ठिदिकिरियाजुत्ताणं कारणभूदं तु पुढवीव ॥८६॥' –पंचास्ति.

ज्याप्रमाणे धर्मद्रव्य आहे तसेच अधर्मद्रव्यहि आहे. स्थिर रहाण्यास उद्युक्त अशा जीव पुद्गलांना पृथ्वीप्रमाणे स्थिर रहाण्यास सहाय्यभूत होणारे अधर्मद्रव्य आहे.

सहाय्यभूत होऊनहि ही धर्म व अधर्मद्रव्ये प्रेरक कारणे नाहीत. म्हणजे कोणाला ते जबरदस्तीने चालवीतहि नाहीत किंवा एकात्र ठिकाणी डांबूनहि ठेवीत नाहीत. चालण्या–फिरणाऱ्यास तसे करण्यास

व स्थिर राहण्यास उद्युक्त अशा जी पुद्गलांना स्थिर राहण्यास ते मदत करतात.

जर त्यांना गति व स्थितीचे मुख्य कारण मानले तर जे सध्या चालत आहेत. ते सतत चालतच राहतील व जे स्थिर आहेत ते तेथेच कायम स्थिर राहतील, पण असा अनुभव आपणास येत नाही. म्हणून जीव पुद्गल स्वसःच्या शक्तीने चालतात व स्थिरहि होतात. पण धर्म व अधर्म द्रव्य मात्र त्यास केवळ सहाय्यच[१] करते.

## ४ आकाशद्रव्य.

जे सर्व द्रव्यांना स्थान देते, त्यास आकाशद्रव्य म्हणतात. हे द्रव्य

---

१ प्रो० घासीराम जैन यांनी आपल्या 'कॉस्मॉलाजी ओल्ड अँड न्यू नावाच्या पुस्तकात धर्मद्रव्याची तुलना आधुनिक विज्ञानाच्या ईथर नामक तत्वाशी व अधर्म द्रव्याची तुलना सर ऐझॅक न्यूटनच्या आर्कषण सिद्धांताशी करून धर्म अधर्म द्रव्याची कांहीशी कल्पना आणून दिली आहे. कारण वैज्ञानिकांनी 'ईथर हे अमूर्तिक, व्यापक, निष्क्रिय आणि अदृश्य असे मानून त्यास 'गतीचे आवश्यक माध्यम'हि मानले आहे. जैनांनी धर्मद्रव्य हेहि असेच मानले आहे. अधर्मद्रव्य व विज्ञानातील आर्कषण सिद्धांताची तुलना करीत असतांना प्रोफेसर जैन लिहितात.– "हा जैनसिद्धांतामध्ये सांगितलेल्या अधर्मद्रव्य विषयक तत्त्वाचा सर्वात विशेष विजय आहे की, विश्वाच्या स्थिरतेसाठी विज्ञानाने अदृश्य आर्कषण शक्तीच्या सत्तेला स्वयंसिद्ध प्रमाणभूत मंजूर केले आहे. तसेच प्रसिद्ध विज्ञानशास्त्रवेत्ता आॅईस्टीन यांनी त्यामध्ये प्रगति करून त्या शक्तीला क्रियात्मक रूप दिले व नवीन शोधानुसारहि आर्कषणसिद्धांताला सहाय्यक–निमित्त करणाच्या रूपाने मानले जाऊ लागले आहे. मूळ कर्त्याच्या रूपामध्ये नाही. सारांश, ही विज्ञानाची शोधप्रगति, जैनधर्मविषयक अधर्मद्रव्याला मान्यतेला अगदी अनुकूल ठरते." पान–४४.

अमूर्तिक व सर्वव्यापी आहे. ही गोष्ट इतर दार्शनिकहि मानतात. परंतु जैनमान्यतेत व त्यांच्या मान्यतेमध्ये फरक आहे. जैनशास्त्राप्रमाणे आकाशाचे दोन भेद मानलेले आहेत. लोकाकाश व अलोकाकाश. सर्वव्यापी आकाशाच्या मध्यभागी लोकाकाश आहे, व त्याच्या चारहि बाजूनी, अलोकाकाश आहे. लोकाकाशांत सहाहि द्रव्ये आहेत. पण अलोकाकाशांत फक्त आकाशद्रव्यच आहे. पंचास्तिकाय ग्रंथात म्हटले आहे की–

'जीव पुग्गलकाया धम्मा धम्मा य लोगदोणण्णा ।
तत्तो अणण्णमण्णं आयासं अंतवदिरित्तं ॥ ९१ ॥' -पंचास्ति.

जी, पुद्गल, धर्म व अधर्म लोकांच्या बाहेर नाहीत, परंतु आकाश त्या लोकाकाशांतहि आहे व बाहेरहि आहे कारण त्यास अंत नाही. ते अमर्याद आहे.

सारांश, आकाश हे सर्वव्यापी आहे. त्याच्या मध्यभागी लोकाकाश आहे आणि ते अकृत्रिम असे आहे. त्याचा कर्ता विधाता कोणी नाही. त्यास आदि व अन्त नाही. दोन पाय पसरून व कमरेवर दोन हात ठेवून उभ्या राहिलेल्या मनुष्याच्या आकाराप्रमाणे लोकाकाशाचा आकार आहे. अधो–भागाला सात नरक आहेत, नाभीप्रदेशात मनुष्य लोक व वरच्या भागात स्वर्गलोक असून, मस्तक प्रदेशात मोक्षस्थान आहे. सर्व जीव आपआपल्या शरीरपरिमाणाचे असल्यामुळे व निसर्गतःच वर जाण्याचा त्यांचा स्वभाव असल्यामुळे कर्मबंधनातून मुक्त होताच जीव शरीरातून निघून मोक्षस्थानामध्ये स्थिर होतो. त्याच्यापुढे गमनास व स्थितीस सहाय्यक असे धर्मद्रव्य व अधर्मद्रव्य नसल्यामुळे, त्याच्यापुढे तो जाऊच शकत नाही व म्हणून जेव्हा कांही इतर दार्श–निकांनी जैनांना असा प्रश्न विचारला की, धर्म व अधर्म द्रव्याची

आवश्यकताच काय? आकाश तर त्याचे कार्य करतेच, तेव्हा त्याचे उत्तर म्हणन पुढील प्रमाणे खुलासा केला आहे.

'आगासं अवगास गमणट्ठिदिकारणेहिं देदि जदि;
उड्ढं गदिप्पधाणा सिद्धा चिट्ठंति किध तत्थ ॥ ९२ ॥–पंचास्ति.

जर आकाश अवगाहा (स्थान देणे) बरोबरच गमन व स्थितीचेहि कारण होईल तर ऊर्ध्वगमन करणारे मुक्त जीव मोक्षस्थानात कसे राहू शकतील?

मुक्त जीव लोकाच्या अग्रभागी न राहिले तर न राहो केवळ त्यांना थांबविण्यासाठीच्या दोन द्रव्य मानण्याची आवश्यकता नाही. असे कोणी म्हणतील तर आचार्य कुंदकुंद स्वामी सांगतात–

'जम्हा उवरिमट्ठाणं सिद्धाणं जिणवरेहि पण्णत्तं ।
तम्हा गमणट्ठाणं आयासे जाण णत्थित्ति ॥ ९३ ॥ –पंचास्ति. ।

ज्याअर्थी जिनेंद्र भगवंतानी मुक्त जीवांचे स्थान वर लोकाकाशाच्या अग्रभागी सांगितले आहे. त्याअर्थी आकाश हे गति व स्थितीचे निमित्त होऊ शकत नाही. तसेच–––

'जदि हवदि गमणहेदू आगास ठाणकारणं तेसिं ।
पसजदि अलोगहाणी लोगस्स अंतपरिवुड्ढी ॥ ९४ ॥–पंचास्ति

जर आकाश, जीव–पुद्गलांच्या गमन व स्थितीला कारणीभूत झाले असते, तर लोकाकाशाची अन्तिम मर्यादा वाढली असती आणि अलोकाकाश राहिलेच नसते कारण जीव व पुद्गल पुढेगति करीत राहिलेच असते व जसजसे ते पुढे जाऊ लागले असते त्या त्या मानाने अलोकाकाशाचे अस्तित्व कमी कमी होत गेले असते यावरहि कोणी असे

म्हणतील की, लोकाकाशाची वृद्धि व अलोकाकाशाची हानि झाली तर होवो. त्यावर आचार्य पुनः खुलासा करतात–

'तम्हा धम्माधम्मा गमणट्ठिदिकारणाणि णाकासं ।
इदि जिणवरेहि भणिद लोगसहावं सुणंताणं ॥ ९५ ॥ -पंचास्ति.

जिनेंद्र भगवंतानी श्रोतृवर्गाना लोकाकाशाचा स्वभाव असा असल्याचे सांगितले आहे. म्हणून धर्म व अधर्म ही द्रव्ये अनुक्रमे गति व स्थितीची कारणे आहेत. आकाश नाही.

सारांश, एकाच आकाशाचे दोन विभाग ठेवण्यात मुख्य कारण धर्म अधर्म ही दोन द्रव्ये आहेत. या दोन द्रव्यांचा लोकाकाशाबाहेर अभाव असल्यामुळे जीव,पुद्गल लोकाकाशाच्या मर्यादाबाहेर जाऊ शकत नाहीत. जैनेतर तत्त्ववेत्यानी आकाशद्रव्य मानूनहि, लोकाचा खास कोणता आकार मानला नाही. आत्म्यासहि सक्रिय आणि स्वदेहपरिणाम मानलेले नाही. म्हणून त्याचे नियमन करण्यासाठी त्यांना धर्म व अधर्म द्रव्ये मानण्याची आवश्यकता निर्माण झाली नाही. परंतु जैनधर्मात अशी स्वतंत्र व्यवस्था सांगितली असल्याने आकाशपासून भिन्न अशी ही दोन द्रव्ये मानलेली आहेत याप्रमाणे धर्म व अधर्म द्रव्याच्या निमित्ताने एकच आकाश अखंड असूनहि दोन स्वरूपाचे झाले आहे. आकाशाच्या ज्या भागात सर्व द्रव्ये राहू शकतात, ते लोकाकाश आणि त्या व्यतिरिक्त जेथे नुसते केवळ आकाशच आहे, त्यास अलोकाकाश म्हणतात.

या ठिकाणी हे सांगणे अयोग्य होणार नाही की, जैनधर्म लोकाकाश सान्त मानतो व त्यापुढे अनन्त आकाश मानतो. [1]तर वैज्ञानिक आईन्स्टीन

---

१, Cosmology Old and New, P, 57,

सर्व लोकाला सान्त मानतात. परंतु त्यापुढे ते कांहीच मानीत नाहीत. प्रो. एडिंगटन्चे म्हणणें आहे की, पदार्थविज्ञानाचा विद्यार्थी आकाश शून्यस्वरूप कधीच मानू शकणार नाही.

### ५ कालद्रव्य.

जे पदार्थांचे परिवर्तन करण्यास सहाय्यभूत होते ते कालद्रव्य होय जरी परिवर्तन करण्याची शक्ति सर्व पदार्थात आहे, तरी बाह्य निमित्ताशिवाय त्या शक्तीची व्यक्ति होत नाही. ज्याप्रमाणे कुंभाराच्या चाकात फिरण्याची शक्ति आहे, परंतु चाकाखालील अणीच्या सहाय्याशिवाय ते फिरू शकत नाही, त्याचप्रमाणे संसारातील सर्व पदार्थ कालद्रव्याच्या सहाय्याशिवाय परिवर्तन करू शकत नाहीत. म्हणून कालद्रव्य त्यांच्या परिणमनात सहाय्यक आहे. परंतु ते पदार्थांचे परिवर्तन जबरदस्तीने करीत नाही, तसेच एका द्रव्याचे दुसऱ्या द्रव्यातहि ते परिणमन करीत नाही. परंतु स्वतः परिणमन करणाऱ्या द्रव्यांना सहाय्यभूत मात्र होते.

कालाचे दोन प्रकार आहेत. निश्चयकाळ व व्यवहारकाल. लोकाकाशांच्या प्रत्येक प्रदेशावर एक एक कालाणु स्थित आहे, ते कालाणू निश्चय काल होत. म्हणजेच कालद्रव्य नावाची जी वस्तु आहे. ती कालाणूच होय. त्या कालाणूच्या निमित्ताने या जगात प्रतिक्षणी परिवर्तन घडत आहे. त्याच्याच निमित्ताने प्रत्येक वस्तूचे अस्तित्वहि कायम आहे. आकाशाच्या एका प्रदेशात राहिलेला पुद्गलाचा एक परमाणु मंद गतीने जेवढ्या वेळात त्या प्रदेशालगतच्या दुसऱ्या प्रदेशात जातो, त्यास 'समय' ही संज्ञा आहे. हा समय कालद्रव्याची पर्याय आहे. समयांच्या समूहास आवली, उच्छ्वास, प्राण, स्तोक, घटिका दिवस, रात्र इ० म्हणतात. हा सर्व व्यवहारकाल आहे. हा व्यवहारकाल

सूर्यमंडळाची गति, घड्याळ वगैरेच्या सहाय्याने जाणला जाऊ शकतो. आणि त्याद्वारेच निश्चयकाल म्हणजे कालद्रव्याच्या अस्तित्वाचे अनुमान होऊ शकते. ज्याप्रमाणे एखाद्या मुलास 'तो वाघ आहे' असे म्हटल्याने वाघ हा पशूहि आहे हे अनुमान करता येते, त्याप्रमाणेच सूर्यादिकांच्या गतीमध्ये जो कालाचा व्यवहार केला जातो तो औपचारिक आहे व म्हणूनच ज्याचा लौकिक व्यवहारात उपयोग केला जातो, असे काल नावाचे एक स्वतंत्र द्रव्य जरूर असावे असे अनुमान करता येते.

कालद्रव्य इतर मतवादींनीहि मानले आहे परंतु व्यवहार कालासच त्यांनी कालद्रव्यच मानले आहे. कालद्रव्य नावाची अणुरूप वस्तु फक्त जैनांनीच मानलेली आहे व हे कालद्रव्यहि आकाशाप्रमाणे अमूर्तिक आहे. फरक एवढाच की, आकाश हे एक अखंड आहे; तर कालद्रव्य अनेक आहेत. जितके कालाणू त्याप्रमाणात कालद्रव्य आहेत. उदा० म्हटलेच आहे की.–

> लोयायासपदेसे इक्केक्के जे ठिया हु इक्केक्का ।
> रयणायं रासीमिव ते कालाणू असंखदव्वाणि ॥ –सर्वार्थ पृ. १९१

लोकाकाशाच्या एकेका प्रदेशावर रत्नांच्या राशीप्रमाणे जे एक एक स्वतंत्र रूपाने स्थित आहेत, ते कालाणू असून ते असंख्यात द्रव्य आहेत. म्हणजेच प्रत्येक कालाणू हा पुद्गलाच्या प्रत्येक परमाणु प्रमाणेच एक स्वतंत्र द्रव्य आहे. प्रवचनसार वगैरे ग्रंथात या कालाणूच्या संबंधात अनेक युक्ति प्रयुक्तीने चांगली माहिती दिली असून ती मनन करण्या योग्य आहे.

याप्रमाणे जैनमतामध्ये सहा द्रव्ये मानली आहेत व कालद्रव्याला सोडून बाकीच्या द्रव्यांना 'पंचास्तिकाय' म्हटले जाते. 'अस्तिकाय'

या शद्बांत दोन शद्ब आहेत. ' अस्ति ' व दुसरा ' काय ' अस्ति शद्बाचा अर्थ 'आहे' असा आहे; अस्तित्वसूचक शद्ब आहे व ' काय ' शद्बाचा अर्थ ' शरीर ' असा आहे. अर्थात् ज्याप्रमाणे शरीर बहुप्रदेशी असते; त्याप्रमाणेच कालाशिवाय इतर पांच द्रव्येहि बहुप्रदेशी आहेत. म्हणून त्यांना अस्तिकाय म्हणतात; परंतु कालद्रव्य अस्तिकाय नाही. कारण कालाणू असंख्य असले तरी ते परस्पर बद्ध नाहीत, प्रत्येक निरनिराळे आहेत; पुद्गलाच्या परमाणूप्रमाणे ते कधी परस्परात मिळतहि नाहीत व पुन्हा स्वतंत्रहि होत नाहीत. आकाशाच्या एकएका प्रदेशावर नेहमी स्थित आहेत. म्हणून त्यांना ' काय ' ही संज्ञा लावता येत नाहीत.

प्रदेशाच्या संबंधातहि कांही स्थूल गोष्टी जाणण्यायोग्य आहेत. ज्या आकाशाच्या एका भागावर पुद्गल परमाणु राहू शकतो, त्या भागास प्रदेश म्हणतात. असा एकेक परमाणु ओळीने लोकाकाशाच्या प्रत्येक भागावर क्रमाने ठेवला तर त्यात असंख्यात परमाणु माऊ शकतील; म्हणून लोकाकाश व त्यात असलेले धर्म, अधर्म द्रव्य, असंख्यात प्रदेशी समजले जातात. त्याचप्रमाणे शरीरप्रमाण जीवद्रव्यहि शरीरांतून बाहेर निघून सर्व लोकाकाशात व्याप्त होऊ शकते, म्हणून जीवद्रव्यहि असंख्यात प्रदेशी आहे. पुद्गलाचा एक परमाणु एकप्रदेशी आहे, परन्तु त्या परमाणूंच्या समूहानें जे स्कंध बनतात, ते संख्यात असंख्यात व अनन्तप्रदेशी (परमाणूच) असतात म्हणून पुद्गलद्रव्यहि बहुप्रदेशी आहे. याप्रकारे बहुप्रदेशी असल्यामुळे पाच द्रव्यांना पंचास्तिकाय म्हंटले आहे.

### — ६ हे जग व त्याची व्यवस्था —

जे विश्व आपल्या डोळ्यासमोर दिसत आहे व जेथे आपला निवास आहे ते हे जग या सहा द्रव्यांनीच बनलेले आहे. बनलेले

आहे' याचा अर्थ या जगाची कोणी कांही विशिष्ट समयी रचना केली आहे असा नव्हे. हे जग अनादि अनन्त आहे. त्यास प्रारंभहि नाही व शेवटहि नाही तसेच याला कोणी बनविलेहि नाही व याचा अंतहि कोणी करू शकत नाही, अनादी कालापासूनच हे असेच चालत आलेले आहे व अनन्त काळपर्यंत असेच चालू राहिल. मात्र जे परिवर्तन आहे ते प्रत्येक वस्तूचे स्वभावभूत आहे. कोणतीच वस्तु सर्वथा नित्य नाही व नो तशी असूहि शकत नाही. कारण वस्तू ही सर्वथा नित्य मानली तर जगात जे वैचित्र्य दिसून येते ते दिसून यावयास नको होते, सारांश परिवर्तनशील असा संसाराच्या मौलिक स्वभावात कांही परिवर्तन न घडताहि या विश्वाची व्यवस्था सतत कायम आहे.

परन्तु कांही तत्ववेत्त्यांची व सर्व साधारण लोकांची अशी ठाम समजूत आहे की, या जगाचा कोणीना कोणी एक कर्ता असलाच पाहिजे, की, ज्याच्या आज्ञेमुळे जगाची व्यवस्था अगदी नियमित रीतीने कायम चालू आहे. तसे पाहिले तर सृष्टिरचनेच्या बाबतीत अनेक प्रकारची मतमतांतरे प्रचलित आहेत. परन्तु साधारणतः स्थूल रूपाने त्यांची तीन पक्षामध्ये विभागणी केली जाऊ शकते. प्रथम पक्षाचे लोक असे मानतात की, परमेश्वर किंवा ब्रह्मच अनादि अनन्त आहे. ते फक्त ब्रह्मासच अनादि अनन्त मानतात. त्यांच्या मतानुसार एक ब्रह्माशिवाय या जगात दुसरे कांहीच नाही हे जे कांही आपण जग पाहतो, ती सृष्टी म्हणजे स्वप्नाप्रमाणेच एक भ्रम—माया आहे. परंतु जे परमेश्वराला अनादि अनन्त मानतात त्याचे म्हणणे असे की, ही सृष्टी भ्रममात्र (मायास्वरूप) जरी नसली तरी परमेश्वराने नातिरूपातून (शून्यांतून) अस्तिरूप केलेली आहे. प्रारंभी तर परमेश्वराशिवाय कांहीच नव्हते. परंतु त्यांनी शून्यांतून या सर्व वस्तु निर्माण केल्य

आहेत व जेव्हा त्याची इच्छा होईल त्यावेळी पुन: हे शून्यरूप होईल व त्यावेळी परमेश्वराशिवाय दुसरे कांहीच असणार नाही. दुसऱ्या पक्षाच्या लोकांचे म्हणणे असे आहे की, अवस्तूतून दुसरी कांही वस्तू बनू शकत नाही. वस्तूतूनच वस्तू बनते. संसारात जीव व अजीव दोन प्रकारच्या वस्तु दिसतात, त्या कोणी बनविलेल्या नाहीत. ज्याप्रमाणे परमेश्वर अनादि आहे. त्याचप्रमाणे जीव व अजीवस्वरूप वस्तुसुद्धा अनादि आहेत व नेहमीसाठीच राहतील. परंतु या वस्तूच्या अनेक अवस्था बनविणे अगर बिघडविणे हे सर्व त्या परमेश्वराच्याच हातात आहे. तिसऱ्या पक्षाचे जे लोक आहेत त्यांच्या मतानुसार जीव व अजीव या दोन्ही प्रकारच्या वस्तू अनादि कालापासून आहेत व अनंत कालपर्यंत राहणार आहेत. या अवस्था बनविणार अगर बिघडविणारा किंवा या विश्वाचा नियामक (नियंता) तिसरा कोणीच नाही. या वस्तूंच्या परस्पर संबधातून त्या त्या वस्तूच्याच गुण किंवा स्वभावाच्या निमित्ताने हे सर्व परिवर्तन आपोआपच घडत असते.

याप्रमाणे तीनहि मतामध्ये बराच फरक असला तरी एका गोष्टीत हे तिन्ही पक्ष एकमत आहेत. तियानीहि कोणती ना कोणती वस्तु अनादि व अनंत अवश्य मानली आहे. पहिला ब्रह्म किंवा ईश्वराला अनादि मानतो व तोच हे जग निर्माण करतो अगर नष्ट करतो असे मानतो दुसरा पक्ष परमेश्वराप्रमाणेच जीव व अजीव यांनाहि अनादि मानतो. व तिसरा पक्ष जीव व अजीव यांनाच अनादि मानतो. त्यामुळे कोणी बनविल्याशिवाय अनादि अशी कांही वस्तु राहू शकते किंवा नाही. यासंबंधी विकल्पास तिन्ही मतामध्ये जागा नाही व जेव्हा हे मानले गेले की, कोणी बनविल्याशिवाय नेहमी करिताच ( अनादि ) कोणती ना कोणती एखादी वस्तु असू शकते, तर ओघाओघाने असे मानणें प्राप्त आहे की, वस्तूत कोणते ना कोणते गुण वा स्वभाव निश्चित

आहेतच. कारण गुण अगर स्वभावाशिवाय कोणतीहि वस्तु असूच शकत नाही. आणि वस्तु जशी अनादि आहे, त्याप्रमाणेच तिचे गुण किंवा स्वभावहि अनादि आहेत. सारांश, या जगात कोणती ना कोणती वस्तु अनादि अकृत्रिम असू शकते व त्याप्रमाणे त्या वस्तूचे गुण वा स्वभावहि अनादि व अकृत्रिम असू शकतात. या दोन बाबतीत जगातील सर्वांचे एकमत आहे. तेव्हा प्रश्न एवढाच उरतो की, कोणती वस्तु अनादि व अकृत्रिम आहे व कोणती वस्तु सादि व कृत्रिम आहे.

या जगावर जेव्हा आपण दृष्टिक्षेप करतो, तेव्हा तेथे आपणास अशी एकहि वस्तु आढळून येत नाही की जी कोणत्याहि वस्तूच्या आधाराशिवायच बनलेली असेल व अशीहि कोणती एखादी वस्तु आपणास दृष्टोत्पत्तीस येत नाही की जी एखादेवेळी एकदम शून्य रूप होत असेल. एका वस्तूतूनच दुसरी वस्तु बनलेली आपणास दिसून येते. सारांश, संपूर्णपणे नवीन अशी कोणतीच वस्तु बनलेली नाही व कोणतीहि वस्तु सर्वथा एकदम शून्यरूपहि होत नाही. परंतु ज्या वस्तु अनादि-काळापासून आहेत त्यांचेच स्वरूप बदलत बदलत नवनवीन वस्तूरूप झालेल्या पाहण्यात येतात जसे, सोन्यापासून अनेक प्रकारची आभूषणे बनविली जातात. ते दागिनें सोन्याशिवाय बनू शकत नाहीत. असेच पुन: ते दागिने मोडून दुसऱ्या प्रकारचे दागिने बनविले जातात. पण सोने त्यात कायम असतेच. त्याप्रमाणे माती, पाणी, वारा, ऊन इ० च्या संयोगाने बीजच वृक्षामध्ये परिणत होते. तो वृक्ष जळाला तर त्याचे कोळसे बनतात व कोळसे जळाले तर त्याची राख होते. यावरूनहि हे निश्चित होते की, एका वस्तूतूनच दुसऱ्या वस्तू निर्माण होतात. तसेच या जगातील एक परमाणूहि कमी होत नाही व त्यात वाढहि होत नाही जितके आहेत तितकेच नेहेमी राहतात. वस्तूंच्या निरनिराळ्या अवस्था बदलून नवनवीन वस्तु निर्माण मात्र होतात. यावरून कोणतीहि वस्तु

सत्-रूप वस्तूतून शून्यरूप होत नाही किंवा शून्यातून सदाकार धारण करीत नाही. हे सिद्ध होते. परंतु प्रत्येक वस्तु कोणत्या ना कोणत्या रूपात नेहमी चालत आलेली आहे व पुढेहि कोणत्या ना कोणत्या स्वरूपात विद्यमान राहील. म्हणजेच या जगातील जीव व अजीवरूप सर्व वस्तु आदि अनंतरूप आहेत व त्यांची नवनवीन रूपे नेहमीच होत असल्यामुळे हा संसार चालत आलेला आहे,

याप्रमाणे जड चेतन स्वरूप सर्व वस्तूची अशी नित्यता सिद्ध झाल्यावर संसारातील या वस्तु कशा तऱ्हेने नवनवीन रूपे धारण करतात, एवढीच गोष्ट आता फक्त पहावयाची राहिली आहे या जगावर जेव्हा आपण दृष्टिक्षेप टाकतो, तेव्हा आपणास ही गोष्ट दिसून येते की, मनुष्य हा मनुष्यापासूनच निर्माण होतो. त्याचप्रमाणे पशुपक्षीहि आपपल्या मातापित्यापासून जन्मास आलेले आपण पाहतो. आईवडिलाशिवाय तर कोणाची उत्पत्ति होत नाही. गहू, हरभरे वगैरे धान्य त्याचप्रमाणे आंवा वगैरे झाडे किंवा फुलझाडे वगैरे वनस्पति ह्याहि आपापल्या बीजातून, कलमा मुळयांतून वा शाखाफांद्यातून उत्पन्न झाल्याचे आपणास दिसते. आणि आज ज्याप्रमाणे त्याची ही उत्पत्ती होते, त्याचप्रमाणे पूर्वीहि अशाच प्रकारे त्यांची उत्पत्ती होत असावी असे सहज अनुमानतः सिद्ध होते. या सर्व वस्तु जर अनादि मानल्या, तर ही पृथ्वीहि अनादि मानणे क्रमप्राप्तच आहे.

ज्याप्रमाणे वस्तु ह्या अनादिअनंत आहेत, त्याचप्रमाणे त्याचे स्वभावहि अनादिअनंत आहेत. जसे अग्नीचा स्वभाव उष्णता हा त्याचा स्वभाव अनादि काळापासून आहे व अनंत काळपर्यंत कायम राहणार आहे; त्याचप्रमाणे इतर सर्व वस्तूबाबत समजावे. जर वस्तूचे गुण किंवा स्वभाव नेहमी बदलत राहिले असते. तर मनुष्य कोणत्याच गोष्टीला कधी शिवला नसता. त्याला सतत ही भीती राहिली असती

की या वस्तूचा स्वभाव आता बदलणार तर नाही ना? परंतु या गुण व स्वभावाबाबतीत तो नेहमी निःशंक असतो त्या त्या वस्तूंच्या स्वभावासंबंधीच्या पूर्वजांच्या अनुभवावर त्याचा पूर्ण विश्वासवर असतो. यावरून वस्तूबरोबर तिचे गुण स्वभावहि अनादिअनंत असतात' हे ओघाने सिद्ध होते.

त्याचप्रमाणे जगातील वस्तूकडे आपण नीट पाहिले तर आपणास असे दिसून येते की दोन किंवा तीन वस्तूंच्या संयोग व संमिश्रणाने ज्या वस्तु आज निर्माण होऊ शकतात, त्यापूर्वीही निर्माण होऊ शकत होत्या. जसे निळा व पिवळा रंग मिसळला तर आज हिरवा रंग तयार होतो तो प्रथमहि तसाच तयार होत होता व पुढेहि तसाच तयार होत राहील. त्याचप्रमाणे ज्या वस्तूच्या प्रभावाच्यानिमित्तानें दुसऱ्या वस्तूचे परिवर्तन आज होते, ते पूर्वीहि तसे होत असे आणि पुढेहि तसेच होत राहणार आहे. जसे अग्नीच्या उष्णतेने जी वाफ आज तयार तीच पूर्वीहि तयार होत होती आणि पुढेहि तयार होत राहील. लांकूड जाळल्याने ज्याप्रमाणे आज अग्नीचा कोळसा व राख होते त्याचप्रमाणे पूर्वीहि होत होती व पुढेहि होत राहील. सारांश, दुसऱ्या वस्तूंना प्रभावित करण्याचे किंवा दुसऱ्या वस्तूमुळे स्वतः प्रभावित होण्याचे गुण स्वभाव हे वस्तूत अनादिनिधन आहेत.

या प्रकारे विचार केला तर, जेव्हा वृक्षातून बीज बीजातून पुनः वृक्ष यांच्या उत्पत्तीप्रमाणे किंवा कोंबडीपासून अंडें व अंड्यापासून पुनः दुसरी कोंबडी यांच्या उत्पत्तीप्रमाणे जगातील सर्व मनुष्य, पशुपक्षी किंवा वनस्पति पिढी, दरपिढी या रूपाने अनादिकाळापासून चालत आलेल्या आहेत. त्याला कोणत्याहि काळीआदि नाही आणि या सर्व वस्तु अनादि असल्याने ही पृथ्वीहि अनादि आहे. ही गोष्ट आपोआप सिद्ध होते. तसेच वस्तूंचा गुणस्वभाव व एकमेकावर आपला प्रभाव

टाकण्याचा अगर घेण्याचा वस्तूंचा स्वभावहि अनादि काळापासून चालत आलेला आहे. त्यामुळे जगाच्यां रचनेचा सर्व साचाच मनुष्याच्या डोळ्यासमोर स्पष्ट उभा राहतो व त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, या जगात जे कांही घडत आहे. ते सर्व वस्तूंच्या गुण स्वभावानुसारच घडत आहे. याशिवाय निराळी अशी कोणतीहि ईश्वरीय शक्ति नाही की जी या परिवर्तनांत कांही कार्य करीत असेल. अशा निराळ्या शक्तीची जरूरीहि नाही. जसे जेव्हा समुद्राच्या पाण्यावर सूर्याची किरणें पडतात, तेव्हा त्या उन्हाची जितकी उष्णता असेल त्याप्रमाणांतच समुद्राच्या पाण्याची वाफ बनते आणि हवेची जी दिशा असते त्या दिशेनेच ती वाफ वाहत जाते. नंतर ज्या ठिकाणी इतकी थंडी असेल की, त्या वाफेचे पाण्यात रूपांतर व्हावे, याच ठिकाणी ते पाणीहि पडावयास लागते. पुढे वरून खाली पडलेल्या पावसाचे पाणी स्वभावतःच उताराच्या दिशेने वहात जाऊन स्वतः व स्वतःबरोबरच इतर वस्तु घेत घेत नदीच्या रूपाने समुद्राला जाऊन पोहोचते.

ऊन, हवा, पाणी, माती इ. वस्तूंच्या जो आपापला स्वभाव आहे, त्या पासून या जगात लाखो, कोटयावधि परिवर्तने होतात व त्याच्यापासून पुनः तितकीच कार्ये होत जातात. इतरहि जितकी परिवर्तने होतात त्याकडे आपण दृष्टिक्षेप केला तर आपणास असे दिसून येते की, ती परिवर्तनेहि वस्तूच्या स्वभावानुसारच होतात. जेव्हा संसारातील सर्व वस्तू व त्याचे गुण–स्वभाव कायमचे दिसून येतात व या सर्वच वस्तु ज्याअर्थी दुसऱ्या वस्तूनी प्रभावित होतात, अगर दुसऱ्यावर आपला प्रभाव टाकतात, त्याअर्थी ही गोष्ट निश्चित आहे की, त्यांच्यात नेंहमी आदान–प्रदान सुरू असून त्यामुळे अनेक प्रकारची परिवर्तने होत राहतात. हेच संसारचक्र असून वस्तूच्या आपल्या स्वभावानुसार ते एकसारखे चालू आहे. परंतु अज्ञानी मनुष्य मात्र त्यामुळे आश्चर्यचकित होऊन भ्रमांत

पडतात. हा एक विचारणीय मुद्दा आहे की, समुद्राच्या पाण्याची वाफ तयार होऊन, तिचे ढग बनतात, हे तर स्वाभाविक आहे वस्तू स्वभावाशिवाय यांत पावसाचे नियमन करणारा दुसरा कोणी असता तर त्याने ज्या पाण्याच्या वाफेने ढग बनतात, त्या पाण्याची वर्षा त्याने त्याच समुद्रावर केली नसती. परंतु आपल्या दृष्टोत्पत्तीस तर हे येते की जेथे ढगास इतकी थंडी मिळते की, वाफेचे पाणी बनून वर्षा व्हावी, तेथेच ती वर्षा होते. याच कारणामुळे समुद्र किंवा पृथ्वी या दोन्ही ठिकाणीं वर्षा होते. ढगाना तर या गोष्टीचे ज्ञानहि नाही की कोठे आपण वर्षा करावी व कोठे करू नये. त्यामुळेच पाऊस कधी योग्य वेळी पडतो तर कधी अकालीहि पडतो. कधी तर असा अनुभव येतो की, सर्व पीक येईपर्यंत चांगला पाऊस होतो आणि एखाद्याच पावसाची अशी कमतरता असते की, ज्यामुळे केलेली व करविलेली सर्व मेहनत वाया जाते. वस्तु-स्वभावाशिवाय जर यात दुसरे कांही कारण असते, म्हणजे कोणी प्रबंधकर्ता असता तर अशी अंदाधुंदी त्याने होऊ दिली नसती. यावर कोणी असे म्हणतील की, या शेतात पीक होऊ नये. किंवा एखाद्या शेतात कमीपीक व्हावे अशी त्याची इच्छाच होती. परंतु एका ठिकाणी खराब व्हावे व दुसऱ्या ठिकाणी चांगले व्हावे अशीच त्याची इच्छा होती असे म्हणणे हा ईश्वरावर निष्कारण केलेला आरोप आहे. असेच असते तर पिकाची वर्षभर चांगली स्थिती ठेवून अगदी शेंवटीच बिघडविण्याचे त्यास काय प्रयोजन? अगोदर मधाचे बोट लावून मागाहून तोंडघशी पाडण्यापेक्षा त्याने अगोदर शेतकऱ्यास न पेरण्यासंबंधीची प्रेरणा केली असती. त्या शेतकऱ्यावर त्याचे नियंत्रण नाही असे मानले तर निदान त्याने बीज तरी उगवू द्यावयाला नको होते. किंवा बीजावरहि तावा नाही असे मानले तर निदान पावसाचा एक थेंबहि पडू द्यावयाचा नव्हता आणि त्याचेच इच्छेने सर्व चालले आहे असे मानले तर कालव्याच्या पाण्यावर

चाललेली शेतीहि त्याने सुकविलीं असती. परंतु वस्तुत: असे दिसून येते की, ज्या साली पाऊस पडत नाही, त्या साली पावसावर अवलंबून असणारी शेते मुळी उगवत नाहीत पण कालव्यातून पाणी दिलेल्या शेतातील पिके चांगली असतात. यावरून ही गोष्ट स्पष्ट होते की, या या विश्वाचा कोणी प्रबंधकर्ता नसून वस्तुस्वभाव वा वस्तुधर्मामुळेच सर्व योग्य कारणपरंपरा जुळून आली तर पाऊस पडून पिके येतात व पावसाची कारणे मिळाली नाहीत तर पाऊस पडत नाही. खुद्द पावसाला चांगले, वाईट अगर कार्याकार्यासंबंधी ज्ञान नाही. आपल्या पाण्यानें शेत पिकते की सुकते किंवा संसारी जीवांना आपला फायदा होतो की नुकसान होते या गोष्टी त्याच्या ज्ञानाचा विषय नाहीत. त्यामुळेच जेथे आवश्यकता असते तेथें कधी कधी पावसाचा एक थेंबहि पडत नाही व नको तेथे अधिकच पाऊस पडतो. अशी अंदाधुंदी होते. कोणी प्रबंधकर्ता नसल्यामुळेच मनुष्याने कालवे काढून किंवा विहिरी खोदून अशी व्यवस्था केली आहे की, यदाकदाचित् पाऊस आला नाही तरीहि हे पाणी शेतींना देऊन शेती पिकवावी व आपला फायदा साधावा.

याशिवाय सर्व धर्ममताप्रमाणे या जगात दिवसेदिवस पापाची वाढ होत असून सदोदित मोठमोठे अन्यायच होत असलेले स्पष्ट दिसत आहेत. आपली सदिच्छा किंवा आज्ञा न पाळली जाता पाप व अपराध करण्याची प्रवृत्ति अधिक वाढत आहे असे दिसत असतांनाहि जगाचा नियंता आहे व तो नियंता गप्प बसतो हे खरे कसे मानावे? कदाचित् कोणी म्हणतील की, राजाच्याहि आज्ञेचा भंग होतोच. परंतु राजा हा सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् नाही; म्हणून त्याला गुन्हेगाराची संपूर्ण माहिती नसते व तो सर्व गुन्हेगारी दूर करू शकतहि नाही. परंतु जो सर्वज्ञ व सर्व शक्तिमान आहे, एका परमाणू पासून आकाशापर्यंतच्या गति व स्थितीचे जो कारण

आहे ज्याच्या इच्छेशिवाय एक पानहि हालत नाही. त्याच्या बाबतीत ही गोष्ट कशी खरी मानता येईल? एका बाजूने संसारातील प्रत्येक कणाकणाचा नियोजिक–नियंता त्यास मानणे व दुसऱ्या बाजूने गुन्हे–गारांची प्रवृत्ति रोकण्यास त्यास असमर्थ ठरविणे म्हणजे त्या नियंत्याची थट्टा आहे.

तसेच या विश्वाचा कोणी नियंता असता, तर आपणास सध्या जे सुखदु:ख मिळते ते आपल्या कोणत्या कृत्याचे फळ आहे हे आपणास अवश्य सांगून यापुढे वाईट कृत्यापासून दूर राहून चांग या गोष्टी करण्यास त्याने आपणास प्रेरित केले असते. परंतु पापपुण्याची आपणास कल्पनाच नाही, एकाच कृत्यास कोणी पाप तर दुसरा त्यासच पुण्य म्हणतो आणि यामुळेच या जगात शेकडो मतमतांतरे झाली आहेत. आश्चर्य हे की, सर्वजण आपआपले मत हे त्या सर्व शक्तिमान् व सर्वज्ञ परमात्म्याचेच, म्हणून सांगतात. असा 'अंधेरा नगरी' कारभार तर साध्या राजाच्या राज्यातहि पहावयास मिळत नाही. प्रत्येकाच्या राज्यात थोडा फार कायदा असतोच व त्याच्या विरूद्ध कोणी जाईल अगर प्रचार करील तर त्याला शिक्षाहि होते. परंतु सर्व शक्तिमान् प्रभूच्या साम्राज्यात शेकडो मताचे प्रचारक व धर्मोपदेशक धर्माचा उपदेश करीत असून आपआपले सिद्धांत त्या परमेश्वराच्याच आज्ञा आहेत असे सांगून त्याप्रमाणे चालले पाहिजे असे घोषित करतात व हे सर्व होत असतांनाहि संसारातील नियंता असलेल्या सर्व शक्तिमान् परमेश्वराकडून त्या बाबतीत कांहीच नियमन होत नाही अशा परिस्थितीत सर्व शक्तिमान् परमेश्वर हा या विश्वाचा नियंता असून त्याची तो योजना करीत आहे ही गोष्ट मानता येत नाही, वस्तु स्वभावावरच विश्वनिर्मितीचा सर्व सांचा उभारला असून त्याला अनुसरूनच सर्व जग रहाटी चालू आहे, हे मानणे युक्तियुक्त आहे यामुळेच ज्या ज्या वेळी कोणी मनुष्य वस्तुस्वभावाविरूद्ध कांही आचरण

करतो, त्यावेळी कोणत्याच वस्तू त्याला अडवीत नाहीत अगर मनाई करीत नाहीत. मात्र असे करीत असताना त्या त्या वस्तू आपआपल्या स्वभावानुसार त्यास फळ दिल्याशिवाय राहातहि नाहीत. जसे अग्निमध्ये कोणी एखाद्या असंमजस बालकाने नसत्या धिटाईने हात घातला, किंवा एखाद्या समजदार माणसाचा चुकून त्यावर हात पडला, तर अग्नि आपले काम करीलच. मनुष्याच्या शरीरातील शेकडो रोग असे आहेत की, ते त्याच्या अज्ञान दोषाचे फळ आहे परंतु प्रकृति किंवा वस्तुभाव त्यास असे सांगत नाहीत की, तुझ्या या विशिष्ट दोषामुळे हा आजार तुला झालेला आहे. त्याचप्रमाणे आपआपल्या दोषाचे फळहि आपणास वस्तु–स्वभावानुसार आपोआपच मिळते.

याप्रमाणे ही गोष्ट तर आपणास चांगल्या रीतीने पटते. सुखदुःख भोगत असताना ज्या गोष्टीमुळे आपणास हे भोगावे लागते त्याची मुळीच कल्पना येत नाही, या सर्व घटना वस्तुस्वभाव धरूनच होतात हे तर बरोबर आहे. परंतु विश्वाचा कर्ता मानला तर, मात्र ते बरोबर होत नाही. उलट अंधेर–नगरीचा कारभार असल्याचे मात्र दृष्टोत्पत्तीस येते. कोणी एखादा मुलगा चोर, डाकू, वेश्याव्यवसायी इ० पाप्यांच्या घरात जन्माला घातला असेल तर ते त्याच्या भल्याबुऱ्या कृत्याचे फल न मानता, सर्व शक्तिमान् दयाळू प्रभूच्या प्रबंधातील ही एक घटना आहे, असे मानणे हे विवेकाला मान्य होणार नाही. कारण दारू पिऊन व त्याचे वाईट फळ भोगूनहि जर तो दारूच्या दुकानावर जाऊन पहिल्यापेक्षाहि जास्त मादक दारू तो मागेल, तर तो त्याचा स्वभाव आहे असे मानावे. दारू पिऊन त्याची बुद्धीच इतकी खराब झाली आहे की, त्यामुळेच 'विनाशकाले विपरीत बुद्धी' त्यास सुचली असे आपण मानू शकतो. परंतु ईश्वरानेच असे घडविले हे म्हणणें पटत नाही. उलट

त्यास अशी जबरदस्त शिक्षा त्याने करावयास हवी होती की, ज्यामुळे तो त्या दुकानापर्यंत पुनः पोहोचू शकणार नाही व तिचे नांवहि घेणार नाही. तीच गोष्ट व्यभिचारी किंवा चोरांच्याहि बाबतीत व्हावयास पाहिजे होती व नवीन मुलांना अशा दुष्टांच्या घरी त्याने जन्मास घालावयास नको होते. कारण त्यांच्या घरी यांना जन्मास घालणे म्हणजे तीच गोष्ट पुढे चालू ठेवण्याचा परवानाच दिला असे होते. सर्व शक्तिमान् परमेश्वराकडून अशा कृत्यांची अपेक्षा करतां येत नाही.

म्हणून असे मानणे प्राप्त होते की,या विश्वाचा कोणीहि बुद्धिमान नियंता नाही. उलट वस्तुस्वभावानेच व त्यास अनुसरूनच जगांतील सर्व व्यवहार चालू आहेत. हा वस्तुस्वभाव न समजून घेतांच, ईश्वरास या जगाचा प्रबंधकर्ता मानणे ही एक कींव करण्यासारखी गोष्ट आहे. पृथ्वीवर राजा राज्य करतो हे पाहून सृष्टीचा व्यवस्थापक व कर्ता कोणी तरी ईश्वर असला पाहिजे असे मानलेले दिसते. ज्याप्रमाणें राजा खुशामत अगर स्तुति करणाऱ्यावर प्रसन्न होऊन त्याच्या म्हणण्याप्रमाणें अंकित होऊन तो कार्य करतो, त्याचप्रमाणे लोकांनी ईश्वराच्या स्वभावाची कल्पना करून त्याची स्तुतिस्तोत्रें गाऊन त्यास लोक नवस करू लागले अगर त्यासाठी बलिदान करू लागले. पण स्वतःचे आचरण मात्र त्यांनी सुधारले नाही, त्यामुळेच जगात पाप वाढू लागले आहे. ज्यावेळी हा मानव या भ्रमपूर्ण मान्यतेला अंतःकरणापासून काढून वस्तुस्वभावाच्या अटळ सिद्धांताचा स्वीकार करील, त्यावेळीच ह्यांच्या चित्तामध्ये हा विचार दृढमूल होईल की, ज्याप्रमाणे डोळ्यांमध्ये मिरची टाकण्याने व जखमेवर मीठ चोळण्याने दुःखबाढ होणे सुनिश्चित आहे ते दुःख जोपावेतो त्या मिठमिरचीचा परिणाम दूर होणार नाही तोपर्यंत केवळ दुसऱ्याची स्तुती व खुशामत करण्याने दूर होत नाही. याचबरोबर

जसे आपले आचरण असेल तसेच फल मिळेल असे समजले तर अगर 'करावे तसे भरावे' या सिद्धांतावर पूर्ण विश्वास ठेवला तरच मानव आपल्या पापकृत्यापासून दूर राहील व चांगली कृत्ये करील. कुणाच्या खुशामतीने किंवा स्तुतीने हे फळ टाळले जाणार नाही. उलट खुशामत करण्याने किंवा स्तुति केल्याने अगर भेट दिल्याने आपल्या अपराधांची क्षमा होते असा जोपर्यंत मनुष्याचा विश्वास आहे, तोपर्यंत वाईट काम तो सोडणार नाही व चांगली कामे करणारहि नाही. म्हणूनच वस्तू स्वभावाच्या अटल सिद्धांतावर विश्वास ठेवून आपल्या भल्याबुऱ्या कृत्यांचे फळ भोगण्यास सतत तयार राहावे व खुशामतीचा मार्ग सोडून द्यावा हेच विश्वांतील लोकाचे कर्तव्य आहे. या सिद्धांतावर विश्वास ठेवल्यानेच मनुष्याचा आपल्या स्वतःवर विश्वास वाढेल व आपल्या पायावर उभे राहून आपले आचरण सुधारण्याचा तो प्रयत्न करील; जगांतून पाप व अन्याय दूर होऊ शकेल. उलट विश्वनियंता मानला तर मनांत अनेक भ्रम उत्पन्न होऊन पापप्रवृत्ति मात्र वाढतच जाईल.कारण कुणी असा विचार करू शकतो की, सर्व शक्तिमान परमेश्वरास मजकडून असे करवूनच घ्यावयाचे नव्हते, तर माझ्या मनांत असे विचारच त्यानें कां येऊ दिले ? दुसरा असे म्हणू शकतो की, माझ्याकडून असले कृत्य न व्हावे असे तो इच्छीत असता तर त्याने माझ्या हातून असे घडविलेच कसे? तिसरा म्हणू शकेल पाप करविण्याची इच्छाच नसती तर पापे निर्मिलीच कशाला ? चौथा म्हणेल– आता मनांत आलेच आहे तर उरकून टाकावे. सर्व शक्तिमान् परमेश्वराची खुशामत करून व नजराणा चढवून अपराधांची क्षमा मागू– सारांश, विश्वकर्ता मानण्यामुळे पाप करण्यास लोकांस अनेक निमित्ते मिळालेली आहेत. परंतु वस्तुस्वभावा-प्रमाणे जग चाललें आहे; असा ज्यांचा विश्वास असेल त्यांना ' करावे तसे भरावे ' लागेल हे लक्षांत ठेऊन चालण्याशिवाय गत्यंतर नाही;

त्यामुळेच दुराचारापासून विमुख होऊन सदाचरणाकडे प्रवृत्ति वाढेल म्हणून विश्वकर्त्याची खुशामत करून अगर नजराणा अर्पण करून त्याला खुप करण्याच्या भरवशावर राहण्यापेक्षा हे जग स्वयं अनादिनिधन आहे व जगाचा कोणी प्रबंधकर्ता नाही असे आपण स्वतः मानून आपली सुधारणा करण्याकडे प्रवृत्ति ठेवावी व आपली सुधारणा करून घ्यावी.

### ७ जैनमताप्रमाणें ईश्वररूप.

'ईश्वर' शद्ब ऐकता क्षणीच आपणास ऐश्वर्यशाली, वैभवशाली' सर्व शक्तिमान्, स्वामी, अधिकारी, कर्ता, हर्ता इ० गुणांनी युक्त अशा व्यक्तीचा बोध होतो. इहलोकांत एखाद्या स्वतंत्र सम्राटाचा जो दर्जा असावा, तोच दर्जा परलोकात ईश्वराचा किंवा परमेश्वराचा मानला जातो. ज्याप्रमाणे राजकुलात जन्मलेल्याला आपोआप सम्राट पदाची प्राप्ति होते, त्यासाठी त्याला कसलेच प्रयत्न करावे लागत नाहीत, त्याचप्रमाणे ईश्वरहि संसाराला कारणीभूत असे दुःख, कर्म, कर्मफल व वासना यापासून अनादिकालापासून सर्वतः अलिप्त असून त्याचा नाश केल्यामुळे त्यास ईश्वरत्व प्राप्त झाले असे नाही; तर तो त्यापासून अनादितः रहितच आहे व म्हणूनच तो सर्वाहून श्रेष्ठ आहे. सर्वांचा गुरू आहे व सर्वांचा ज्ञाता आहे. जे संसारीलोक क्लेशकर्मादिक नष्ट करून मुक्त होतात, ते ईश्वराच्या बरोबरीने कधीहि होत नाहीत. ईश्वराचे ऐश्वर्य अविनाशी आहे कारण त्यास कधीच नष्ट करीत नाहीं अशा अनादिअनंत पुरुष विशेषास ईश्वर म्हटले जाते. परंतु जैन धर्मात अशा प्रकारच्या ईश्वराला मान्यता नाही. याबाबत जैनमत म्हटते की

नास्पृष्ठः कर्मभि. शश्वद् विश्वदृश्वास्ति कश्चन ।
तस्यानुपायसिद्धस्य सर्वथाऽनुपपत्तितः ॥ ८ ॥ आप्तप०

कोणी सर्वद्रष्टा अनादि कालापासून कर्माने रहित असा असू शकत नाही, कारण योग्य प्रयत्न केल्याशिवाय कोणीहि कोणत्याहि तऱ्हेने सिद्ध होत नाही.

ईश्वरास अनादि मानल्यामुळेच त्यास कर्मापासून नित्य अलिप्त मानले गेले आहे व तो सृष्टिकर्ता समजला गेल्यामुळे त्यास अनादि मानले गेले आहे —परंतु जैनधर्म कोणालाच विश्वकर्ता समजत नाही हे अगोदर सांगितले आहेच. म्हणून तो कोणत्याहि अनादिसिद्ध परमात्म्याची सत्ता (अस्तित्व) नाकारतो जैनमताप्रमाणे ईश्वर असलाच तर तो एक नाही, असंख्य आहेत. म्हणजेच जैनधर्माप्रमाणे इतके ईश्वर आहेत की त्यांची गणना करता येणार नाही. त्यांची संख्या अनंत आहे व पुढेहि ते अनंतकालपर्यंत राहतील, कारण जैनमताप्रमाणे प्रत्येक आत्मा आपल्या स्वतंत्र सत्तेने मुक्त होऊ शकतो आजपर्यंत असे अनन्त आत्मे मुक्त झाले आहेत व पुढेहि होत राहतील. मुक्त जीवच जैनधर्माप्रमाणे ईश्वर होत; व त्या मुक्तात्म्यांतून मुक्त होण्याच्या अगोदर सर्व लोकास ज्यांनी मुक्तीचा मार्ग उपदेशिला, त्यांना जैनधर्म तीर्थकर समजतो.

जैनमताप्रमाणे अनादि कालापासून कर्मबंधनामुळे हा जीव अल्पज्ञ आहे. ज्ञानावरणादि कर्मांच्या निमित्ताने त्याचे स्वाभाविक ज्ञान वगैरे सद्गुण झांकले गेले आहेत. ती आवरणे (कर्मांचे पडदे) दूर झाल्यावर हा जीव अनंत ज्ञानादिकांचा अधिकारी होतो सर्वज्ञ बनतो. जे जे महापुरुष कर्मबंधन तोडून मुक्त झाले, ते सर्व सर्वज्ञ होतात. जीवाच्या स्वाभाविक गुणांचा पूर्ण विकास कर्म होऊ देत नाही. ते दूर झाले म्हणजे प्रत्येक जीव आपापल्या स्वाभाविक शक्तीची पूर्ण अभिव्यक्ति करून घेतो. सारांश,— जीवांचे कर्मबंधन तसेच त्यांचे मर्यादित पण हीनाधिक ज्ञान हे दाखविते की, जीवाची मुक्ति किंवा सर्वज्ञता ही

असंभव गोष्ट नाही. तसेच जो सर्वज्ञ होतो तो कर्मबंधन नष्ट करूनच होतो. त्याशिवाय कोणीहि सर्वज्ञ होऊ शकत नाही म्हणून अनादि सिद्ध कोणीच नाही.

या कर्मबंधनांचे विशेष वर्णन पुढे कर्मसिद्धांत प्रकरणांत केलेले आहे. चार घाति कर्मांचा नाश करून जीव सर्वज्ञ होतो. अशा सर्वज्ञास 'केवली' असेहि म्हणतात. कारण त्याला संपूर्ण ज्ञान, दर्शन होण्यास आत्म्याशिवाय दुसऱ्या कसल्याच सहाय्याची आवश्यकता नसते. म्हणून यांना केवली म्हणतात. त्यांना 'जीवनमुक्त' असेहि म्हटले जाते. कारण जरी ते सशरीर असले तरी, घातिकर्म नष्ट झाल्याने ते मुक्तात्म्या-सारखेच आहेत. त्यांनी चार घातिकर्मांचा नाश केल्यामुळे त्यांना 'अरिहंत' म्हणतात; त्यांनाच 'जिन' असेहि म्हणतात. कारण त्यांनी कर्म-रूपी शत्रूंना जिकलेले आहे. या केवली जिनांचे[1]— एक सामान्य केवली व दुसरे तीर्थंकर केवली असे दोन प्रकार आहेत. सामान्य-केवली आपली मुक्तीची साधना चालूच ठेवतात. परंतु तीर्थंकर केवली संसारी जीवांना मुक्तीचा म्हणजे सर्व दुःखापासून मुक्त होण्याचा मार्ग सांगतात त्यांच्या उपदेशाने संसारांतील अनेक जीव तरून जातात. म्हणून त्यांना तीर्थस्वरूप मानले गेले आहे.

ब्राह्मण धर्मात, ज्याप्रमाणे रामचंद्रादिकांना अवताररूप मानले आहे किंवा बौद्ध धर्मात बुद्धाची मान्यता आहे, त्याचप्रमाणे जैनधर्मातहि

---

१ या अर्हत् नांवावरूनच, हिंदु पौराणिकांनी अशी कल्पना केली की, 'अर्हत्' नांवाच्या राजाने जैनधर्माची स्थापना केली. परंतु 'अर्हत्' हे कोणाचे नांव नसून ते तीर्थंकरांचे पद आहे. हे पद प्राप्त झाल्यानंतरच ते जीवनमुक्त होऊन लोकांस कल्याणाचा मार्ग दाखवितात. तोच मार्ग त्यांच्या 'जिन' या नांवावरून म्हणविला जाणारा जैनधर्म होय.

तीर्थकरासंबंधीची मान्यता आहे. परंतु हे तीर्थंकर परमात्म्याचे अवतार समजले जात नाहीत; तर संसारात असलेल्या जीवापैकीच काहींनी पुरुषार्थ करून लोककल्याणाच्या भावनेनें तीर्थकरपद प्राप्त केलेले असते. जेव्हा तीर्थकरपद प्राप्त करणारा हा जीव मातेच्या गर्भात येतो, तेव्हा तीर्थंकरांच्या मातेस सोळा स्वप्ने पडतात. तीर्थकरांचे गर्भावतरण जन्माभिषेक, जिनदीक्षा, केवलज्ञानप्राप्ति व निर्वाणप्राप्ति असे पाच महाकल्याणिक महोत्सव होतात. या कल्याणिक महोत्सवात इंद्रादिकहि सामील होतात. अशा प्रकारच्या पंचकल्याणिकरूप पूजेमुळे तीर्थकरांना 'अर्हत्' असेहि म्हटले आहे.

तीर्थंकर—हे अनंत दर्शन, अनंत ज्ञान, अनंत सुख व अनंत वीर्य या अनंत चतुष्टयाचे धारक आहेत. ते साक्षात् भगवान् किंवा ईश्वर होत. जैन—साहित्यांत त्यांच्या ऐश्वर्याचे पुष्कळसे वर्णन मिळते. जन्मा—पासूनच ते मति, श्रुत, अवधि ज्ञानाचे धारक असतात व त्याचे शरीर अत्यंत कांतिमान् असते, श्वासोच्छ्वासात अपूर्व सुगंध असतो. त्याच्या शरीरांतील रक्त व मांस श्वेतवर्णाचे असते. केवलज्ञान प्राप्त केल्यानंतर अर्थात् 'अर्हत्' पद प्राप्त केल्यावर त्यांचा उपदेश ऐकण्यास पशुपक्षी सुद्धा त्या सभेंत हजर राहतात. या सभेला 'समवशरण' म्हणतात. 'सर्वांना जे समान शरणभूत' आहे, म्हणजे ज्या ठिकाणी सर्वजण शरण जातात असे आहे. या सभेत बारा प्रकोष्ठ (विभाग) असतात. यातील एका विभागात पशूहि असतात तीर्थकरांची वाणी या पशूनाहि समजते. जेथे जेथे त्यांचा विहार होतो, त्या त्या ठिकाणी रोग, शत्रुत्व माहामारी, अति वृष्टि, दुर्भिक्ष इ० राहत नाही. तीर्थकर भगवान् जन्मास येताच देशात सर्वत्र शांति पसरलेली असते. केवलज्ञानाच्या प्राप्ति—नंतर ते आपले उर्वरित जीवन संसारी प्राण्यांचा उद्धार करण्यातच व्यतीत करतात व त्यामुळेच जैनांच्या परम पवित्र पंच णमोकार मंत्रात

'अरिहंतां' ना प्रथम स्थान दिले आहे–'णमो अरिहंताणं'–अरिहंतांना नमस्कार असो.

जेव्हा या अरिहंतांचे आयुष्य थोडे शिल्लक राहिलेले असते तेव्हा ते योगाचा निरोध करून शिल्लक राहिलेल्या चार अघाति–कर्माचाहि नाश करतात व ही चारहि अघाति–कर्मे नष्ट झाल्यावर त्यांना मुक्ति मिळते, तेव्हा त्यांचे शरीर येथेच विशीर्ण होते व भगवान् आपल्या स्वाभाविक ज्ञानादि गुणांनी युक्त केवळ शुद्ध आत्मस्वरूपच राहतात. मुक्त झाल्यावर स्वाभाविक ऊर्ध्वगमन स्वभावास अनुसरून लोकांच्य वर अग्रभागी ते स्थिर होतात. मुक्त झाल्यानंतर सामान्य केवली व तीर्थंकर केवली यांच्यात कांहीहि फरक असत नाही. मात्र संसारात सामान्य केवलीपेक्षा तीर्थंकर केवली अधिक पूजनीय मानले जातात. कारण संसारी जीवांना त्याच्यापासून पुष्कळसा लाभ होतो. मुक्त झाल्यावर मात्र या दोघात कसलाच फरक राहत नाही. संसारिक अवस्थेत जे कांही अंतर होते ते केवळ तीर्थंकर पदामुळेच होते. मुक्त झाल्यावर ह्या पदापासूनहि मुक्ति मिळते. म्हणून सामान्यकेवली व तीर्थंकरकेवली यांच्यात कांहीहि फरक नाही. दोघांनाहि मुक्त म्हणतात. जैन सिद्धांतात या मुक्तांना 'सिद्ध' हि म्हणतात. अरहंतापेक्षा हेच सिद्धपद वरचे आहे. कारण अरहंत कर्मबंधनापासून सर्वस्वी मुक्त असत नाहीत, तर सिद्ध त्यापासून सर्वथा मुक्त असतात. म्हणून सिद्धांना अरहंतानंतर नमस्कार केला आहे.–"णमो सिद्धाणं"–सिद्धांना नमस्कार असो.

याप्रमाणे जैनमताला अनुसरून अरहंत व सिद्ध पदाची प्राप्ति झालेले जीवच ईश्वर समजले जातात. प्रत्येक जीवात अशी ईश्वर होण्याची शक्ति आहे. परंतु अनादिकालापासून ही शक्ति झाकली गेली आहे. जे जीव कर्मबंधन नष्ट करतात त्यांचीच ही ईश्वर

होण्याची शक्ति प्रगट झालेली असते व ते ईश्वर होतात. तसेच ईश्वर हे कोण्या एका विशिष्ट पुरूषाचे नांवहि नाही; तर अनादिकाल। पासून जे अनंत जीव अरहंत व सिद्धावस्थेस प्राप्त झाले व पुढे होतील त्याचेच नांव ईश्वर आहे.

जैनधर्म–मताप्रमाणे हे ईश्वर संसाराशी कांहीहि संबंध ठेवीत नाहीत. सृष्टि संचालनात त्याचा हात नाही व ते कोणाचे भले बुरेहि करीत नाहीत· कोणाच्या स्तुतिमुळे ते कधी प्रसन्न होत नाहीत किंवा निंदापवादामुळे अप्रसन्नहि असत नाहीत, ज्यास आपण ऐश्वर्य समजतो असे कोणतेहि संसारिक वैभव त्याच्याजवळ असत नाही व कोणाच्या अपराधाबद्दल ते कोणास शिक्षाहि करीत नाहीत, जैनसिद्धांताप्रमाणे ही सृष्टि स्वयंसिद्ध आहे. जीवाना आपल्या कर्मानुसार आपोआपच सुखदु:खाची प्राप्ति होते. अशा परिस्थितीत मुक्तात्मा व अरिहंतांना या नसत्या भानगडीत पडण्याची आवश्यकता नाहीच. कारण ते कृतकृत्य झाले आहेत. त्यांना कांही करण्याचे बाकी राहिलेले नाही.

सारांश ज्यांना इतर लोक संसाराचा कर्ता, हर्ता समजतात अशा प्रकारच्या ईश्वर कल्पना जैनधर्माने मानलेल्या ईश्वररूप अरिहंत व मुक्तात्म्यासंबंधी मुळीच नाहीत. अशा कल्पनाचे समालोचन जैनधर्माच्या अनेक ग्रंथात विशेषत्वाने केलेले आहे पाहिजे तर या दृष्टीनें जैनधर्मास 'अनीश्वरवादी' म्हटले जाऊ शकते. पण अशा प्रकारच्या कर्त्या हर्त्या ईश्वरास जैनधर्मात कांही स्थान नाही, हे मात्र निश्चित्.

## ८– त्याची उपासना

### कां व कशी ?

जैनामध्ये मूर्तिपूजा अति प्राचीन कालापासून प्रचलीत आहे. सम्राट खारवेलाच्या शिलालेखात कलिंगवर चढाई केल्यावर

नंदाने आदिजिन भ० वृषभ देवांची मूर्ति नेल्याचा व मगधावर चढाई करून खारवेलने ती परत आणल्याचा उल्लेख आहे. यावरून २५०० वर्षांपूर्वी राजघराण्यांतहि प्रथम जैन तीर्थकर श्री ऋषभदेवांची मूर्तिपूजा होत होती, हे सिद्ध होते. स्वामी दयानंद तर जैनांनीच मूर्तिपूजेस प्रारंभ केला असे मानतात. तसे पाहिले तर भारताच्या सर्व प्राचीन धर्मात मूर्तिपूजा चालू आहे. परंतु जैनमूर्तीचे स्वरूप तिची पुजाविधि व तिचा उद्देश यात व इतर धर्मीयांच्या या संबंधीच्या कल्पनेत पुष्कळ फरक आहे. ती समजून घेतल्यास ही मूर्तिपूजा व्यर्थ आहे असे म्हणण्याचे कोणीहि धाडस करणार नाही.

जैनधर्मात पाच पदे फार प्रतिष्ठित मानली आहेत. अरंहत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय व साधू. यांना पंचपरमेष्टी म्हणतात. जैनांच्या परम पवित्र पंचनमस्कार मंत्रांत याच पाच पदांना नमस्कार केला आहे. हीच पाच पदे जैनधर्मात वंदनीय व पूजनीय आहेत.

चार घाति कर्माचा नाश करून–अनंत ज्ञान, अनंत दर्शन, अनंत सुख व अनंत वीर्य–हे अनंतचतुष्टय प्राप्त करून घेतात व ज्यांना परम औदारिक शरीर असते, अशा शुद्ध आत्मद्रव्यसंपन्न केवलीना अरंहत म्हणतात. त्यांचे विशेष वर्णन अगोदर आलेच आहे. ते जीवनमुक्त असतात.–२ जे आठही कर्म व शरीरानेहि रहित असतात. लोक व अलोकाला जे जाणतात व पाहतात, तसेच सिद्धशिलेवर जे विराजमान झाले आहेत त्या पुरुषाकार आत्म्यास सिद्ध म्हणतात. हे मुक्त असतात. ३ जे मुनी साधुसंघाचे प्रमुख असतात व पांच प्रकाराच्या आचाराचे जे स्वतः पालन करतात व दुसऱ्या साधूकडून करवितात ते आचार्य होत जे साधू सर्व शास्त्रपारंगत असतात, जे स्वतः अध्ययन करतात व दुसऱ्यास शकवितात, उपदेश देतात ते उपाध्याय होत. ५ विषयोपभोगांची

आशा पार नाहीशी करून जे ज्ञान व ध्यान तपामध्ये लीन असतात, ज्यांच्याजवळ कोणत्याहि प्रकारचा परिग्रह नसतो अगर ठगविद्याहि नसते, जे मोक्षाची साधना करतात, अशा शांत निस्पृही व जितेंद्रिय मुनींना साधू म्हणतात.

जैनमंदिरात प्रायः या पांच परमेष्ठीपैकी अरहंत परमेष्ठीची मूर्ति विराजमान असते. जरी या मूर्ति जैनांच्या चोवीस तीर्थकरापैकी कोणत्या ना कोणत्या तीर्थकरांच्या असतात. तथापि त्या त्यांच्या अरंहत अवस्थेच्या द्योतक असतात. कारण तीर्थकर पदाचे वास्तविक कार्य धर्मप्रवर्तन हे असून ते अरंहत अवस्थेतच होते आणि तीर्थकरहि अरंहतावस्था प्राप्तकेल्याशिवाय पूर्ण वीतरागी व सर्वज्ञ होत नाहीत. वीतरागता आणि सर्वज्ञतेशिवाय धर्मप्रवर्तनहि होत नाही. म्हणून जैनमंदिरात धर्म तीर्थाचे प्रवर्तक अशा जैनतीर्थकरांच्या मूर्ति प्रायः विराजमान असतात. त्या पद्मासनाधिष्ठीत किंवा खड्गासनाधिष्ठीत असतात. परंतु सर्व. ध्यानस्थ मूर्ति असतात. आत्मध्यानांत मग्न असलेल्या शांत अंतर्दृष्टि योग्याच्या आकृतिप्रमाणेच या मूर्तीचीहि आकृति असते. भगवत् गीतेत योग–साधकांचे वर्णन करताना खालील–प्रमाणे लिहिले आहे.

' समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
सम्प्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥
प्रशांतात्मा विगतभी ब्रह्मचारिव्रते स्थित ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्पर ॥ १४ ॥, अ० ६ ]

भावार्थ–शरीर, मस्तक व मान सरळ रेषेंत ठेऊन निश्चल असलेला, इकडे तिकडे न पाहता स्थिर मनाने नासिकाग्र दृष्टि ठेवणारा शांत निर्भय असलेला असा तू ब्रह्मचर्यव्रतामध्ये स्थिर राहून व मन ताब्यात ठेऊन माझ्याठिकाणी स्थिरचित्त हो !

जैनमूर्तीची ध्यान मुद्रा अगदी अशीच असते. दृष्टि नासिकाग्र असते. शरीर, मस्तक व मान सर्व एका रेषेत असतात. पद्मासनावर डाव्या हातावर उजवा हात मोकळा असतो किंवा खड्गासनांत दोन्ही हात गुडघ्यापर्यंत आलेले असतात. चेहऱ्यावर शांति, निर्भयता व निर्विकारता मूर्तिमंत प्रगट झालेली असते. आपले विकार झाकण्यासाठी शरीरावर कोणत्याही प्रकारचे आवरण असत नाही. किंवा सौंदर्य उठून दिसण्यासाठी कसलाहि अलंकार अंगावर घातलेला नसतो. हातात कसलेहि शस्त्र किंवा अस्त्र नसते, भगवद्गीतेत सांगितलेल्या ज्या योग मुद्रेने योगी निर्वाण प्राप्ति करून घेतो, तीच मुद्रा जैनमूर्तीचे ठिकाणी आपणास आढळते. पाहणाऱ्यास असे वाटते की, आपण कोणत्या तरी प्रसन्न प्रशांत आत्मयोगीच्या मूर्तीचे दर्शन करीत आहोत. तेथे राग किंवा वैर विरोध वगैरे कसल्याच भावना असत नाहीत.

सिद्धांच्याहि मूर्ती असतात. परंतु ज्याअर्थी सिद्ध परमेष्ठी देह रहित असतात त्याअर्थी पितळ वगैरे धातूंच्या मध्यभागी मनुष्याकाराप्रमाणे कोरून सिद्धांची मूर्ति केलेली असते. आचार्य, उपाध्याय व साधूंच्याहि मूर्ति कांही ठिकाणी आढळतात. यांच्यामूर्तीमध्ये साधूंची चिन्हे–पिंछी कमंडलु–कोरलेली असतात. सारांश, जैनमूर्ति जैनांचे आराध्य जे पंच परमेष्ठी त्यांच्या प्रतिकृतिस्वरूप त्या मूर्ति असतात.

जैनमंदिरात जाऊन देवदर्शन करणे प्रत्येक जैन श्रावकश्राविकांचे नित्य कर्तव्य आहे. तेथे तो असा विचार करतो की, हे मंदिर जिनेंद्र–भगवंतांचे समोवशरण म्हणजे उपदेश सभा आहे. वेदीवर विराजमान असलेली जिनांची मूर्ति, हे साक्षात जिनदेवच आहेत व मंदिरांत उपस्थित असलेले स्त्रीपुरुष हे भगवंतांचा उपदेश ग्रहण करण्यास आलेले समव–शरणभूमीतील श्रोतृवर्गच आहे. असा विचार करीत भगवंताच्या

गुणांची चांगली स्तोत्रे गात गात, त्यांना नमस्कार करून तीन प्रदक्षिणा घालतो व जर पूजन करावयाचे असेल तर तो पूजाहि करतो, पूजेचे वेळी प्रथम पाण्याने मूर्तीचा अभिषेक केला जातो. काही काही ठिकाणी दूध, दही, तूप, रस, सर्वौषधि इ. नी अभिषेक करण्याची पद्धत आहे. अभिषेकानंतर पूजन केले जाते. हे पूजन जल, चंदन, अक्षत, पुष्प, नैवेद्य, दीप, धूप व फल या अष्टद्रव्याने केले जाते. प्रत्येकाचा एकेक श्लोक म्हणून क्रमाक्रमाने एकेक द्रव्य चढविले जाते द्रव्य चढविते वेळी ते द्रव्य चढविण्याचा उद्देश व मंत्र म्हणून द्रव्य चढविले जाते. जसे मी – १ जन्म जरा मृत्यूंचा नाश होण्यासाठी हे जल चढवितो. अर्थात् ज्याप्रमाणे पाण्याने सर्व घाण नाहिशी होते त्याचप्रमाणे माझ्या पाठीमागे लागलेले हे जन्ममृत्यूचे रोग धुतले जावोत. २ या संसारतापाचा नाश होण्याकरिता व शांतिसाठी मी चंदन चढवितो. ३ अक्षयपद मोक्ष प्राप्तीसाठी अक्षत चढवितो, ४ कामविकार दूर करण्यासाठी मी पुष्प चढवितो, ५ क्षुधा रोग नाहीसा व्हावा म्हणून नैवेद्य चढवितो. ६ अज्ञान अंधःकार दूर करण्यासाठी मी दीप चढवितो. ७ आठहि कर्मे जाळण्यासाठी धूप चढवितो. हे धूप अग्नीत चढविले जाते. ८ मोक्षफल प्राप्ति व्हावी म्हणून फल चढविले जाते. याप्रमाणे क्रमाक्रमाने आठहि द्रव्ये चढविल्यानंतर आठहि द्रव्ये मिळून जे चढविले जाते, त्यास 'अर्घ्य' म्हणतात, हे देखील अनर्घ्य–अमूल्य पदाच्या प्राप्त्यर्थ चढविले जाते.

याप्रमाणे पूजेचा उद्देशहि आपले सर्व विकार व विकारांची कारणे नाहीशी करून अंतिमध्येयाची–मोक्षाची प्राप्ती करणे हा आहे, पूजेचे दोन भेद आहेत. १ द्रव्यपूजा २ भावपूजा– शरीर व वचन यांच्या सहाय्याने वरील द्रव्ये चढविणे ही द्रव्यपूजा व फक्त मनानेच देव–पूजा करणें ही भावपूजा होय. शरीराचा उपयोग करण्यासाठीच ही द्रव्ये

ठेवलेली असतात. किंवा चढविणाऱ्याला हात लावूनहि द्रव्ये चढवितां येतात. वचनाचा उपयोग करण्यासाठी त्या त्या अर्थाचे व भगवंताचे गुणगान करणारे श्लोक म्हणून द्रव्य चढवावयाचे असते. आणि शरीर व वचनाने पूजा चालू असताना, मन जर तिकडे नसेल, तर ती पूजा व्यर्थ आहे. कारण भावाशिवाय कोणतीहि क्रिया फलदायक होत नाही. कल्याणमंदिर स्तोत्रांत सांगितले आहे की—

'आकर्णितोऽपि महितोऽपि निरीक्षतोऽपि
नूनं न चेतसि मया विधृतोऽसि भक्त्या ।
जातोऽस्मि तेन जनबांधव ! दुःखपात्रम्
यस्मात् क्रियाः प्रतिफलन्ति न भावशून्या. ॥३८॥'

अर्थ— हे लोकबंधु—भगवन्—तुमचा उपदेश ऐकूनहि, तुमची पूजा करूनहि व अनेक वेळ तुम्हाला पाहूनहि मी आपणांस भक्तिपूर्वक अद्यापीहि माझ्या हृदयांत स्थापलेले नाही; म्हणूनच मी दुःखपात्र झालों आहे. कारण भावशून्यक्रिया कधीहि चांगले फळ देत नाही.

म्हणून द्रव्यपूजेबरोबरच— शारीरिक व वाचनिक पूजेबरोबरच— भाव—पूजन—मानसिक पूजा करणे आवश्यक आहे. परंतु भावपूजा वर सांगितलेंल्या आठ द्रव्याशिवाय होऊ शकते. कारण द्रव्य हे मन वचन काय पूजेकडे लावण्यासाठी साधनमात्र आहे. याप्रमाणे जैन मूर्तीचे स्वरूप व तिची पूजाविधी सांगितल्यावर तिच्या उद्देशाकडे दृष्टी टाकणें आवश्यक आहे

जैनधर्मात सांगितले आहे की,जगांतील सर्व वस्तूंचा चार प्रकाराने व्यवहार होतो. १ नामरूपाने २ स्थापनारूपाने ३ द्रव्यरूपाने व ४ भावरूपाने उदा:— १ एक राजा घेऊ. या शब्दाचा व्यवहार चार तऱ्हेने व्यवहारात होत असलेला आपण पाहतो. एक तर पुष्कळसे लोक

आपल्या मुलाचे नाव राजा ठेवतात. हा त्या मुलाचा नामरूपाचा व्यवहार होय. कारण तो प्रत्यक्ष राज्य चालवीत नाही. २ राजा नसतानाही राज्य कारभारासाठी कोण्या एकास त्याचा प्रतिनिधी मानून राजाप्रमाणेंच त्याचा मान-सन्मान केला जातो. उदा:-पूर्वी भारताच्या व्हॉईसरॉयला राज्याचे प्रतिनिधी मानून राजाप्रमाणेच ते मानले जात होते. अशा प्रतिनिधीत राजाची स्थापना (मान्यता) केलेली असल्यामुळे, हा स्थापना व्यवहाने राजा म्हणविला जातो. कारण प्रत्यक्ष राजा नसून तो फक्त स्थानापन्न होता. ३ राजपुत्र हा पुढे राजा होणार असल्यामुळे किंवा जो राजा पूर्वी राजा होऊन गेला होता पण सध्या राजा नाही. अशांनाहि 'राजेसाहेव' म्हटले जाते. हा द्रव्य अपेक्षेने झालेला व्यवहार आहे. ४ राज्यासनावर विराजमान असलेला खरोखरीचा राजा हा तर राजा आहेच त्यास राजा म्हणणे हा भाव (अस्तित्व-रूपाने) व्यवहार होय. याप्रमाणेच तीर्थंकर भगवंतांचाहि चारहि प्रकाराने व्यवहार होतो.

जेव्हा कोणी तीर्थंकर मोक्षास जातात. जेव्हा त्याची मूर्ति वनवून तीत त्या तीर्थंकरांची स्थापना करून त्यांच्याप्रमाणेच (तीर्थंकराप्रमाणे) त्याचा आदर सत्कार वगैरे केला जातो. कोणत्याहि पाषण किंवा धातूच्या वनविलेल्या मूर्तित तीर्थंकराचा प्रत्यक्ष आत्मा नाही किंवा हेच तीर्थंकर असे तो समजत नाही. तर आपले तीर्थंकर हे ह्याप्रमाणे प्रशांतात्मा वीतरागी, जितेंद्रिय, योगी होते असे पूजक व दर्शक समजतो मूर्तीच्या सहाय्याने त्या मूर्तिमानाची उपासना आहे. व त्यांना पाहून त्यांच्या पवित्र जीवनांची कल्पना मनात झळकते. जे लोक मूर्तिपूजेचे विरोधी आहेत ते सुद्धा आपापल्या धर्मग्रंथाचा आदर सत्कार करतातच वास्तविक ते ग्रंथ तर कागद व शाईनेच वनविलेले आहेत. पण कागद शाईचा ते आदर करीत नाहीत. तर त्या कागदावर मनुष्याच्या हाताने

लिहिलेला त्या महापुरुषाचे ज्ञान व उपदेश समाविष्ट असतो, त्याचा तो आदर आहे. म्हणून ज्याप्रमाणे ईश्वरीय ज्ञान स्मरणांत रहावे म्हणून; मनुष्य आपल्या हाताने कागदावर त्या अक्षरांची मूर्ति करून त्यांचा विनय करतो, त्याचप्रमाणे ईश्वरीय स्वरूपाला स्मरण करण्यासाठी कलाकार अगर पूजक मूर्तिची प्रतिष्ठा करतो. कागदावर लिहिलेल्या अक्षराने ईश्वरीय ज्ञानाचा जसा बोध होतो. त्याप्रमाणेच मूर्तीच्या द्वारा ईश्वरीय स्वरूपाचा बोध होतो, अक्षर ही मूर्ती व मूर्तीही मूर्तीच आहे व ते वाचून शिकलेल्या व्यक्ती त्यांचे ज्ञान करून घेऊ शकतात. पण मूर्तीला पाहून न शिकलेला मनुष्यहि ईश्वरीय स्वरूपाची कल्पना करू शकतो. एखादा अज्ञानी मूर्तीपासून चुकीचा धडाहि घेऊ शकतो त्यावरून मूर्ती व्यर्थ आहे असे जर कोणी म्हणेल तर असमंजस माणूस धर्मग्रंथांनाहि चुकीचे म्हणू शकेल. पण ते निष्कारण टाकाऊ आहेत असे कोणी म्हणू शकत नाहीत. हीच गोष्ट मूर्तीसहि लागू आहे. कागदावर काढलेल्या देश प्रदेशांच्या नकाशावर बोट ठेऊन शिक्षक विद्यार्थ्यांना हा रशिया, हा हिंदुस्थान, इ. दाखवितो व त्यावरून हा अमुक देश अमेरिका किंवा रशिया नसून ती त्याची प्रतिकृति आहे. हे विद्यार्थी समजून घेतो, त्याचप्रमाणे ही मूर्ती प्रत्यक्ष ईश्वर नसून ईश्वराचे स्वरूप काय आहे, हे त्यावरून समजण्यास मदत होते. म्हणून मूर्तिपूजा ही व्यर्थ नाही.

प्रस्तुत संदर्भात एका जैन स्तुतीचा भावार्थ खाली देत आहोत– त्यावरून मूर्तीपूजेचा उद्देश काय व पूजकाची भावना काय असते यावर चांगला प्रकाश पडतो.

ज्यांनी चारहि घातिया कर्मांचा नाश केला आहे व सर्व पदार्थांचे जे ज्ञाते असूनहि जे आत्मिक आनंदांत मग्न आहेत, असे हे तीर्थंकर.

प्रभू सदा जयवंत होवोत. हे वीतराग, विज्ञानतेचे भांडारस्वरूप भगवान् तुमचा जयजयकार असो! मोहरूपी अंधःकार दूर करणारे हे सूर्य! तुमचा जयजयकार असो. अनंतानंत ज्ञानाचे धारक, तसेच अनंत दर्शन, अनंत सुख, अनंत वीर्य या चतुष्टयांनी युक्त असे हे देवाधिदेव! तुमचा जय-जयकार असो. भव्य जीवांचा स्वानुभव करण्यात कारणीभूत असलेल्या परम शांत मुद्रेचे धारक हे भगवान, तुमचा जयजयकार असो! परम भाग्यानेच भव्य जीवांना आपला उपदेश मिळतो व तो ऐकून त्याचा भ्रम (अज्ञान) मोह दूर होतो. आपल्या गुणांच्या चिंतनाने आप-पर भेद विज्ञान प्राप्त होते. म्हणजे तुमच्या आत्मिकगुणांचा विचार करून मी हे जाणू शकतो की, आत्मा व शरीरात आणि शरारीशी संबंधित असलेल्या कुटुंबीजन, धन, संपत्ति वगैरे मध्ये किती फरक आहे! कारण आपल्यात जे गुण आहेत तेच गुण माझ्या आत्म्यात असूनहि मी ते विसरलेली आहे. म्हणून आपल्या गुणचिंतनाने मला आपल्या गुणांचे स्मरण होते व त्यामुळें मी स्व आणि पर ओळखू लागतो. व त्यामुळे मी अनेक संकटातून आपत्तीतून वा अडचणीतून तरून जाऊ शकतो. हे भगवन्! आपण संसाराचे भूषण आहात कारण आपण सर्व दोप व संकल्प-विकल्प यांपासून मुक्त आहात. हे शुद्ध चैतन्यमय परम पावन परमात्मा! आपण शुभ अशुभरूप विकृत भाव पूर्णतः दूर सारलेले आहेत. हे धैर्यवन्त! आपण अठरा दोषांनी रहित असून अनंत ज्ञान, अनंत दर्शन, अनंत सुख व अनंत वीर्यरूप स्वचतुष्टयांत विराजमान आहांत. मुनी, गणधर वगैरे आपली सेवा करतात. आपण नव केवल लब्धिरूपी अध्यात्मिक लक्ष्मीने अलंकृत झालेले आहांत. आपल्या उप-देशाप्रमाणे वागून असंख्य जीवानी मुक्तिलाभ करून घेतला आहे. व पुढेहि नेहेमी करीत राहतील. हा संसाररूपी सागर दुःखरूपी खाऱ्या पाण्याने तुडुंब भरलेला आहे; तो पार करविण्यास आपल्याशिवाय

दुसरा कोणीच समर्थ नाही. हे पाहून व माझा दुःखरूपी रोग दूर करण्याचा इलाज आपल्या जवळच आहे हे जाणून मी आपणाला शरण आलो आहे व अनादि काळापासून मी जी दुःखे भोगली आहेत, ती आपल्या समोर मांडतो. आपणास विसरून अनादि काळापासून मी या संसाररूपी अरण्यात भटकत आहे. मी नशीबाचे खेळ, अनेक पुण्य व पाप हे आपलेच समजून व स्वतःस दुसऱ्याचा कर्ता समजून. व परपदार्थात इष्टानिष्टतेची कल्पना करून अज्ञानाने व्याकुळ झालो आहे. ज्याप्रमाणे हरीण मृगजळालाच पाणी समजते त्याप्रमाणे मी शरीराला आत्मा समजून खऱ्या आत्मरसाचा अनुभव घेतला नाही.'

'हे भगवन्! आपणास न ओळखल्यामुळे मी किती दुःखे भोगलीत हे आपण जाणताच. पशु, नरक व मनुष्यगतीत जन्म घेऊन अनंत वेळा मला मरणहि आले. आता कुठे काललब्धीमुळे मुक्ती लाभाचा काल जवळ आला व आपले पवित्र दर्शन घडले व मी परम प्रसन्न झालो. आता माझे सर्व गैरसमज मिटले आणि दुःखाचा नाश करणाऱ्या आत्मरसाचा अनुभव मी घेतला. भगवन्! आपल्या चरणाजवळील निवास आता सुटू नये एवढीच प्रार्थना आपल्या चरणाशी आहे व त्यासाठी आत्म्याचे नुकसान करणारे पांचहि इंद्रियांच्या विषयोपभोगात व क्रोधादि विकारांत माझे मन कधीहि रमू नये. माझे मन आपल्या आत्मस्वरूपात नेहमी तल्लीन असावे ज्यामुळे मी स्वतंत्र (मुक्त) होईन असे करावे. मला कोणतीच (सांसारीक) इच्छा नाही फक्त सम्यग्दर्शन, सम्यक् ज्ञान व सम्यक्चारित्ररूप रत्नत्रय स्वरूपाची प्राप्ति व्हावी. या कार्याचे आपणच कारण आहात. माझा मोहरूपी संताप नाहीसा करून हे कार्य करावे. चंद्र ज्याप्रमाणे स्वतः शांतिहि देतो व अंधःकारहि नष्ट करतो, त्याचप्रमाणे कल्याण करणे हा आपला स्वभाव आहे. अमृत पिण्याने रोग जसा नष्ट होतो. त्याप्रमाणे आपल्या स्वरूपाचे अनुभवन करण्याने संसाररोग

नष्ट होतो. तीन लोक व तीन्ही कालांत आपल्याशिवाय दुसरा कोणीही आत्मिक सुखाचा दाता नाही. आज माझ्या मनाची खात्री झाली आहे की, हा दुःखसमुद्र तरून जाण्यास आपणच नौकास्वरूप आहांत !'

वरील स्तुतीवरून हे स्पष्ट आहे की, मनुष्याच्या चंचल चित्तास एकाग्र करण्याचे साधन मूर्ति आहे. तिच्या सहाय्याने मनुष्याचे चंचल चित्त कांही काल तरी त्या महापुरुषांच्या गुणानुरागांत रमून जाते. हे महापुरुष कधीकाळी आपल्या प्रमाणे या संसारसागरांत भ्रमत होते. परंतु त्याने स्वतःच्या पायावर उभे राहून खरे स्वरूप ओळखले व आत्म-लाभ करून जगाच्या कल्याणाच्या भावनेने त्यांनाहि असा मार्ग दाख-विला की, ज्यामुळे दुसरेहि मुक्तिलाभ करू शकतील. या स्तुतीचा उद्देश भगवंतांना प्रसन्न करणे हा नाही. रागद्वेषादि विकारांपासून ते दूर आहेत. ते स्तुतीने हुरळून जात नाहीत व सिदेने रूष्ट होत नाहीत. परंतु त्यांच्या गुण-कीर्तनाने आपल्या गुणांचा आपणास बोध होऊन आपल्या खऱ्या स्वरूपास आपण विसरलो होतो याची जाणीव होते व ती स्तुती त्या गुणांच्या स्मरणाने आपणास वाईट कार्यांपासून दूर सारते.

न पूजयार्थस्त्वयि वीतरागे न निन्दया नाथ विवांतवैरे ।
तथापि तव पुण्यगुणस्मृतिर्नः पुनातु चित्तं दुरिताञ्जनेभ्य.॥५७॥स्वयंभू.

"हे भगवान्! आपण वीतराग आहांत. तेव्हा आपल्या पूजेचे आप-णांस कांहीच प्रयोजन नाही. आणि त्यामुळेच निंदेमुळे रूष्ट होण्या-चेहि आपणास प्रयोजन नाही. परंतु आपल्या पुण्य गुणांच्या स्मरणाने आमच्या चित्तांतील पापरूपी काळिमा धुतला जातो" म्हणून मूर्तिपूजेचा उद्देश मूर्तीत प्रगट झालेले भाव आपल्या मनांत आणून ज्यांची ती मूर्ती आहे, त्यासारखे आपणांस बनविणे हा आहे. अर्थात् जो जसे होऊ इच्छितो तसाच आदर्श तो आपल्या समोर ठेवतो. जैनधर्माचा उद्देश

आत्म्यास सर्व कर्मबंधनापासून सोडवून ज्यास तो विसरला त्याच्या त्या शुद्ध स्वरूपाची प्राप्ति करून घेणे हा आहे. म्हणून ज्याने आपणास तसे बनविले त्यांचा पुण्य आदर्श समोर ठेऊन त्या आदर्शाची त्या मूर्तीत स्थापना करून खरा जैन आपणांस त्याप्रमाणे बनविण्याचा प्रयत्न करतो.

प्रत्येक जैनमंदिरात शास्त्रभांडार असते त्यांत जैनशास्त्रांचा संग्रह असतो. जो दर्शनास किंवा पूजनास तेथे जातो, त्याने तेथे दर्शन, पूजन झाल्यावर शास्त्र–स्वाध्यायहि अवश्य करावयास पाहिजे. कारण ती शास्त्रे जाणल्याशिवाय ज्या मूर्तीची पूजा करावयाची आहे त्या जैन तीर्थकरांचा उपदेश व त्यांचा जीवन–वृत्तांत तो समजू शकत नाही. व ते जाणल्याशिवाय जो आदर्श त्यास मिळावावयाचा आहे तो आदर्श त्यास केवळ मूर्तिपासून प्राप्त होऊ शकत नाही. कारण मूर्ती फक्त मनुष्याच्या उच्च आदर्शाचे संकेत करते. केवळ तीच एकटी उच्च आदर्श प्राप्त करून देऊ शकत नाही. जेव्हा एखादा मुलगा वर्णमाला शिकतो तेव्हा त्यास ती अक्षरे नीट चांगली लिहिता यावीत म्हणून पाटीवर अक्षरे लिहून देतात. मुलगा आपला हात बसेपर्यन्त ती अक्षरे पेन्सिलने गिरवतो. अशा प्रकारे स्वतःस त्या अक्षराचे स्वरूप चांगले समजून नीट लिहिता येईपर्यंत तो ते गिरवितच असतो. त्यानंतर कित्त्याची त्यास जरूरी असत नाही व कसल्याहि सहाय्याशिवाय तो स्वतः लिहू शकतो. त्याचप्रमाणे साधकालाहि मूर्तीची तोपर्यंतच जरूर असते, जोपर्यंत मूर्तीच्या आदर्शाची–खऱ्या स्वरूपाची त्यास कल्पना येत नाही. पण मूर्तीचे पूजन करणारा हा साधक जेव्हा आपल्या ध्येयाची प्राप्ती करून घेऊ लागतो, म्हणजे आपल्या स्वरूपाची ओळख होऊन स्वरूप प्राप्ती होऊ लागते तेव्हा त्यास मूर्तीच्या दर्शनाची किंवा पूजेची आवश्यकता राहत नाही.

म्हणून जैनांची मूर्तिपूजा ही सर्व प्राणिमात्रांचे सर्वोच्च ध्येय असलेल्या त्या आदर्शाची पूजा आहे त्यामुळे पूजकास आपल्या आदर्शाचे स्मरण राहून त्या गुणास तो विसरत नाही. दररोज सकाळी सर्व कामे करण्याच्या अगोदर मंदिरात जाणे हे अनिवार्य कर्तव्यच सांगितले आहे. त्याचे कारण हेच की अर्थ व काम पुरुषार्थाच्या चक्रामध्ये सांपडल्यानंतर आपले सर्वोच्च ध्येय त्याने विसरू नये. त्याचप्रमाणे ज्या महापुरुषांनी ते उच्च ध्येय साध्य केले आहे त्यांचा गुणानुवाद करुन त्यांना आपली श्रद्धांजलि अर्पित करावी व शांति आणि वीतरागतेच्या त्या आदर्शात आपल्या कलुषित आत्म्याचे प्रतिबिंब पाहून ते धुण्याचा त्याने प्रयत्न करावा.

अशा सर्वोच्च ध्येयाचे स्मरण करण्यासाठी ज्या जैन मंदिरांची निर्मिति झाली आहे. त्या बाबतीत जेव्हा " हस्तिना ताडयमानोऽपि न गच्छेत् जिनमंदिरम् " म्हणजे हत्तीच्या पायाखाली तुडविले गेले तरी जैनमंदिरांत जाऊ नये अशी जुनी उक्ति आम्ही ऐकतो, तेव्हा आम्हास अत्यंत आश्चर्य वाटते. तत्कालीन सांप्रदायिक मनोवृत्तीशिवाय यात दुसरे कोणतेच कारण दिसून येत नाही, असो–

सुरूवातीस सांगितलेच आहे की जैनमूर्तिहि निरावरण व निराभरण असते. (वस्त्राभूषणांनी रहित असते.) जे लोक सवस्त्र व सालंकार मूर्तीची उपासना करतात त्यांना नग्न मूर्ति अश्लीलशी वाटते. या बाबतीत आम्ही आमचे स्वतःचे कांही न लिहिता सुप्रसिद्ध साहित्यिक काका कालेलकर यांना श्रवणबोळगोळ (म्हैसूर) येथील बाहुबलीची प्रशांत परंतु नग्न मूर्ति पाहून जे वाटले ते त्यांच्यात शब्दांत आम्ही खाली देत आहेत.–

"सांसारिक शिष्टाचारांत गढून गेलेले आपण ही मूर्ति पाहातांच

मनांत विचार करतो की, ही मूर्ति नग्न आहे! आपण आपल्या मनांत व समाजांतहि अनेक प्रकारच्या घाणेरड्या गलिच्छ वस्तूंचा संग्रह करतो. परंतु त्यांची आपणांला किळस येत नाही व लाजहि वाटत नाही पण नग्नता पाहून मात्र घाबरतो व नग्नता अश्लील असल्याची कल्पना करतो. ही गोष्ट लज्जास्पद असून हा सदाचाराचा द्रोह आहे. आपल्या नग्नतेला लपविण्यासाठी कांही लोकांनी आत्महत्या सुद्धा केलेली आहे. परंतु नग्नता वास्तविक अभद्र आहे काय? नग्नतेमध्ये अशोभनीक असे कांही आहे काय? असे असते तर निसर्गालाहि त्याची लाज वाटली असती ! पशु, पक्षी, फुले सर्व नग्नच असतात. निसर्गाशी ऐक्य साधणारा बालकहि नग्नावस्थेतच फिरतो. त्यांना यांत लज्जा वाटत नाही. व त्यांच्या निष्कपट निष्पाप प्रवृत्तीमुळे आपणांसहि त्यांत लज्जा वाटत नाही. लज्जेची गोष्ट सोडून दिली तर त्यांत कोणत्याहि प्रकारचे कांही अश्लील, बीभत्स अगर किळसवाणे आहे, अशोभनीक आहे, रुचिविहीन आहे, असा कोणालाच अनुभव आलेला नाही. याचे कारण असे की नग्नता ही नैसर्गिक आहे व स्वभावशुद्धहि आहे. मनुष्याने आपले मन विकारांनी इतके विकृत केले आहे व त्याला उलटच्या वाटेने जाण्याची इतकी संवय झाली आहे की स्वभावसुंदर नग्नता त्याला सहन होत नाही. वास्तविक हा दोष नग्नतेचा नसून आपल्या कृत्रिम जीवनाचा आहे. आजारी माणसासमोर पिकलेले फळ, पौष्टिक मेवा व सात्विक आहारसुद्धा उघडपणे ठेऊ शकत नाही. हा दोष त्या खाद्यपदार्थांचा नसुन मनुष्याच्या मानसिक रोगाचा आहे. नग्नता लपविण्यांत नग्नतेची लज्जा नसून त्यात मूलतः विकारी पुरुषासंबंधीची कीव आहे, व विकारांची संरक्षण प्रवृत्ति आहे. परंतु निरागस बालकासमोर नराधम मनुष्य सुद्धा सौम्य व निर्मल बनतो. त्याचप्रमाणे पुण्य पुरुषांच्या समोर व वीतराग विभूतिसमोर ते शांत होतात. जिथे भव्यता आहे,

दिव्यता आहे, तेथे मनुष्य पराजित होऊन विशुद्ध बनतो. मूर्तिकाराने मनांत आणले असते तर तो त्या माधवीलतेची एक फांदी जांघेपासून वर कमरेपर्यंत सहज वर नेऊ शकला असता व याप्रमाणे नग्नता लपविणे अशक्य नव्हते. परंतु ते असे करते तर त्याला सर्व तत्त्वज्ञानाची हत्या करावी लागली असती. बालक आपल्या समोर नग्न उभे राहतात त्यावेळी ते कात्यायनी व्रत करणाऱ्या मूर्ति प्रमाणे आपल्या हाताने आपली नग्नता लपवीत नाहीत. त्यांची निरागस प्रवृत्ति त्यांच्या त्या नग्नतेस पवित्र करते, त्यांना दुसऱ्या आवरणाची काय जरूर ?

आम्ही (श्री.काकासाहेब कालेलकर) जेव्हा कारकल जवळील गोमटेश मूर्ति पाहावयास गेलो, तेव्हा तेथे स्त्री, पुरुष, वृद्ध, बालक अनेक लोक होते. परंतु आमच्या पैकी कोणालच या मूर्तीचे दर्शन करतांना संको-चल्यासारखे मुळीच वाटले नाही. अस्वाभाविक वाटण्याचा तर प्रश्नच नव्हता. मी अनेक नग्न मूर्ति पाहिल्या आहेत व मन विकारी होण्याऐवजी त्यांच्या दर्शनाने निर्विकारी झाल्याचा अनुभव मला आला आहे. मी अशाहि मूर्त्या व चित्रे पाहिली आहेत की जी वस्त्राभूषणांनी अच्छादित असूनहि ती विकारी व उन्मादक असल्याचे दिसून आले. फक्त औपचारिक लंगोट नेसणारे अर्ध नग्न साधू आपल्या समोर वैराग्याचे वातावरण उपस्थित करतात. याच्या उलट आपादमस्तक वस्त्राभरणे चढविणाऱ्या व्यक्ति डोळ्याच्या एखाद्या इंगितमात्र खुणेने किंवा नख-ऱ्याच्या किंचित् इशाऱ्यानेहि मानवी मनाला अस्वस्थ बनवून अधःपतित करतात. म्हणून आपली नग्नता विषयक दृष्टि व आपला विकाराकडे असलेला मनाचा झुकाव हे दोन्हीहि बदलले पाहिजेत. आपण एकीकडे विकारांचे पोषण चालू ठेवतो व दुसरीकडे विवेक ठेवू इच्छितो.”

श्री.काकासाहेबांच्या या उद्गारानंतर नग्नतेबाबत कांही लिहिण्याचे

शिल्लक उरत नाही. कित्येकांनी जैन मूर्तींच्या नग्नतेवरून जैनधर्मसंबंधीचे नाना प्रकारचे नाना प्रवाद पसरविले आहेत. ते केवळ सांप्रदायिक व द्वेषमूलक गैरसमजुतीनेच पसरविले आहेत, जैनधर्म वीतरागतेचा उपासक आहे. तेथे विकार, राग, कामप्रवृत्ति असतात त्याच ठिकाणी नग्नता लपविण्याची प्रवृत्ति दिसून येते. निर्विकारतेसाठी त्याची आवश्यकता नाही व म्हणूनच जैनमूर्ति नग्न असतात, त्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्न सौम्यता व वीरागता झळकत असते. त्यांच्या दर्शनानें विकार नाहीसे होतात. निर्माण होत नाहीत. म्हणूनच जैनमंदिरात न जाण्याचा प्रेरक लोकप्रवादहि पूर्ण भ्रामक आहे.

जैनमंदिर शांति व भावनांच्या भव्यतेचे प्रतीक असते तेथे जाण्याने मनुष्याचे मन पवित्र होते, निर्विकार मूर्ति, तत्त्वज्ञानयुक्त प्राचीन शास्त्रे व तेथील उपयोगी चित्रावली ह्या सर्व तेथील प्रमुख असून त्यांच्या दर्शनाने व अध्ययनाने मनुष्याच्या मनास शांति मिळते.

### ९ सात तत्वे–

द्रव्ये सहा असली तरी धर्मांचा संबंध फक्त एका जीवद्रव्याशीच आहे कारण त्यासच दुःखांतून सोडवून उत्तम सुख मिळविण्यासाठी धर्मांचा उपदेश दिलेला आहे आणि दुःखाचे मूलकारण खुद्द जीवाने स्वतःच बांधलेली कर्मे आहेत. ही कर्मे अजीव असून ती पौग्दलिक आहेत धर्माचे ध्येय सर्व जीवांना दुःखातून सोडवून उत्तम सुख प्राप्त करून देणे हे आहे व ज्याअर्थी दुःखाचे मूलकारण जीवाचे स्वतःच बांधलेली कर्मे आहेत, त्याअर्थी त्या दुःखातून सुटण्याकरिता खालील गोष्टीची माहिती असणे आवश्यक आहे.

१ ज्याची सुटका करावयाची त्या वस्तूचे स्वरूप काय आहे? २ कर्माचे स्वरूप काय आहे? कारण ज्याप्रमाणे सोनाराला सोने व त्यात

मिळालेले इतर द्रव्ये, यांची पारख होणे जरूर आहे, त्याप्रमाणे आत्म-संशोधन करणाऱ्यासहि आत्मा व त्याशी संबद्ध असलेल्या परद्रव्याची (पौद्‌गलिक कर्माची) ओळख होणे जरूरीचे आहे. त्याशिवाय तो आत्म-संशोधन करू शकत नाही. व त्याशिवाय आत्मशुद्धीही करतां येत नाही. ३ ते अजीव कर्म जीवाजवळ कसे येते? (४) तेथे आल्यावर त्याचा जीवाशी कसा बंध होतो ? याप्रमाणे जीव व कर्माचे स्वरूप, कर्मांचे जीवापर्यन्त येणे व त्याचे बंधन, यासर्वांचे ज्ञान झाल्यामुळे संसाराच्या कारणांचे पुरे ज्ञान होते. आता त्यातून सुटका करून घेण्यासाठी आणखी कांही गोष्टी जाणणे आवश्यक आहे. (५) नवीन कर्मबंधास रोकण्याचे उपाय कोणते. (६) पूर्वी बांधलेली कर्मे कशी नष्ट होऊ शकतील. (७) या उपायाने जी मुक्ति प्राप्त होईल तिचे स्वरूप काय.

या सात गोष्टीचे ज्ञान होणे प्रत्येक मुमुक्षूस आवश्यक आहे. यांनाच सात तत्त्वे म्हणतात. पौद्‌गलिक कर्माच्या संयोगानेच हा जीव बंधनांत पडतो व सर्व प्रकारचे कष्ट भोगतो या संबंधचा अंत कसा होईल? हाच एक मूळ प्रश्न मुमुक्षूने सोडवावयास पाहिजे. धर्मच एक असे विज्ञान आहे की, ज्याच्या सहाय्याने हा प्रश्न सोडवितां येईल व तो सोडविण्यासाठीच वरील सात गोष्टी सांगितल्या आहेत या सात गोष्टी-वरील आपली श्रद्धा व त्यांचे ज्ञान यावरच आमचे सुखदु:ख अवलंबून आहे. व यासाठीच त्यांना तत्व ही संज्ञा दिली आहे तत्त्व म्हणजे सारभूत पदार्थ. ही तत्त्वे ज्याला माहीत नाहीत, त्याला इतर बाबीचे पुष्कळ ज्ञान असूनहि वास्तविक ध्येयसिद्धीसाठी त्याचा कांही उपयोग नाही.

या सात तत्वांची नांवे– जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा व मोक्ष अशी आहेत. त्यांत जीव व अजीव ही दोन मूलभूत तत्त्वे आहेत. त्यापासून हे विश्व निर्माण झालेले आहे. या दोन्हीचें वर्णन

पूर्वी आले आहे. (३) तिसरे आस्रव तत्व आहे. याचा अर्थ जीवांत कर्म मल येणे असा आहे. वास्तविक जीव व कर्माचा बंध तेव्हाच होतो. जेव्हा कर्मपुग्दलांचे जीवाजवळ आगमन होते. म्हणून ज्याद्वारे कर्म येते त्या द्वारास आस्रव असे म्हणतात.

ज्याद्वारे जीवात नेहमी कर्म पुद्गलाचे आगमन होते, ती एक जीवाची शक्ति आहे. तिचे नाव योग असे आहे. शरीरधारी जीवांतील ही शक्ति मानसिक, वचनिक व कायिक क्रियांच्या आधाराने जीवाकडे पौग्दलिक कर्माना ओढते. म्हणजेच मनाने आपण जो कांही विचार करतो, वचनाने बोलतो व शरीरानें जे कांही हलनचलन करतो, ते सर्व जीवाकडे कर्म आणण्यास कारण आहे. म्हणूनच तत्त्वार्थसूत्रात मन, वचत कायेच्या क्रियेला योग म्हटले असून तेच आवास्रचे कारण असल्यामुळे त्यास आस्रव म्हटलेले आहे. या आस्रव तत्त्वाने जीवांत पौग्दलिक कर्म कशाप्रकारे येतात याचे ज्ञान होते.

(४) चवथे बंधतत्व. जीव व कर्मा परस्पराशी मिळणे यास बंध म्हणतात. हा बंध संयोग पूर्वक होत असला तरी संयोगापेक्षा एक निराळी वस्तू आहे. संयोग तर टेबल व त्यावर ठेवलेल्या पुस्तकांचाहि आहे पण त्यास बंध म्हणत नाहीत. बंध एक असे मिश्रण आहे की ज्याचे स्वतंत्र रासायनिक परिवर्तन होते. त्याने मिळणाऱ्या दोन वस्तु आपले खरे स्वरूप सोडून एका तिसऱ्याच अवस्थेस प्राप्त होतात. ज्याप्रमाणे दूध व पाणी एकमेकात मिळाल्यानंतर दूध किंवा पाणी हे आपापल्या खऱ्या स्वरूपात राहात नाहीत. तर दूधात कांहीसा पाणचटपणा व पाण्यात कांहीसा दुधाचा स्वाद मिसळलेला असतो. दोघेही एकमेकावर आपला प्रभाव टाकतात. त्याचप्रमाणे जीव कर्माचा परस्परात संबंध झाल्यावर जीव आपल्या खऱ्या स्वरूपात राहात नाही व कर्महि शुद्ध पौग्दलिक राहात नाही. ते दोघेहि एकमेकांच्या गुणाने प्रभावित झालेले असतात. हाच

बंध होय. याचे विवेचन पुढे कर्म सिद्धांतात केलेले आहे. आस्रव व बंध ही दोन्हीही संसाराची कारणे आहेत.

(५) पाचवे तत्व संवर. आस्त्रवास रोकण्याचे नाव संवर आहे. म्हणजेच जीवाकडे नवीन कर्म न येणे यास संवर म्हणतात. जर नवीन कर्माचे आगमन थोपविले नाही तर जीवाची कर्मबंधनातून कधीहि सुटका होणे शक्य नाही. म्हणून संवर हे पांचवे तत्व आहे. (६) सहावे तत्त्व निर्जरा आहे. बांधलेली कर्मे थोडी थोडी जीवापासून निघून जाणे, यास निर्जरा म्हणतात. ज्याप्रमाणे प्रत्येक क्षणी जीवांत नवीन कर्माचा आस्रव व बंध होतो. त्याचप्रमाणे प्रत्येक क्षणी बांधलेल्या कर्माची निर्जराही होत असते कारण त्या कर्माने जे फल द्यावयाचे ते दिल्या-नंतर ते निघून जात असतेच. पण या निर्जरेने कर्मबंधनातून सुटका होत नाही. कारण प्रत्येक क्षणी नवीन कर्मबंध होतच असतो. म्हणून संवरपूर्वक जी निर्जरा होते, म्हणजेच नवीन कर्माचे येणे बंद झाल्या-नंतरच पहिली बांधलेली कर्मे जेव्हा हळूहळू आत्म्यापासून निघून जातात तेव्हा त्या क्रियेस निर्जरा म्हणतात. (७) अशा रीतीने सर्व कर्मे जेव्हा जीवापासून नाहीशी होतात तेव्हा त्या अवस्थेस मोक्ष म्हणतात. हा मोक्ष हे सातवे तत्त्व आहे. यालाच मुक्ति म्हणतात म्हणजे जीवांची कर्मबंधनातून सुटका होते. जेव्हा सर्व प्रकारच्या कर्म-बंधनातून सुटका होते, तेव्हा त्यास मुक्ति म्हणतात.

याप्रमाणे वरील सात तत्वापैकी जीव व अजीव ही दोन मूलतत्त्वे आहेत. त्यांच्या बंधनामुळे ही संसारिक सृष्टी चालू आहे. संसाराचे मूळ कारण आस्रव व बंध असून मुक्तिचे कारण संवर व निर्जरा आहे संवर व निर्जरेने जीवास जीवास जी शुद्धावस्था प्राप्त होते, तोच मोक्ष हाच जीवाचा अंतिम ध्येय-बिंदू होय. त्याच्या प्राप्तीसाठी जीवाचा

जो प्रयत्न चालू असतो त्यालाच धर्म म्हणतात. म्हणून ज्यास आपले अंतिम ध्येय साध्य करावयाचे आहे, त्या वरील सातहि तत्वांचे ज्ञान होणे आवश्यक आहे.

## १० कर्मसिद्धांत – कर्माचे स्वरूप.

जीव जसे कर्म करतो तसेच फळ त्यास भोगावे लागते, हा स्थूल मानाने कर्मसिद्धांताचा गाभा आहे. हा सिद्धांत जैन, सांख्य व नैयायिक, वैशेषिक, मीमांसक वगैरे सर्व आत्मवादी सैद्धांतिक मानतातच. पण त्याबरोबरच अनात्मवादी बौद्धहि मानतात. त्याचबरोबर ईश्वरवादी व अनीश्वरवादी हे सर्वच त्यात एकमताचे आहेत. इतके सर्वांचे एकमत असतानाहि कर्माचे स्वरूप व त्याच्या फळ देण्यासंबंधीच्या प्रक्रियेबाबत दोघातहि मौलिक मतभेद आहेत. साधारणतः जे कांही केले जाते त्यास कर्म म्हणतात. उदाः– खाणे, पिणे, हसणे चावणे, वगैरे परलोक मानणाऱ्या सैद्धान्तिकाचे मत असे आहे की, आपले प्रत्येक चांगले व वाईट कर्म आपला प्रभाव ठेवूनच जाते. कारण आपल्या प्रत्येक प्रवृत्ति किंवा कर्म या मूलत. रागद्वेषाधिष्ठित असतात. जरी प्रवृत्ति किंवा कर्म हे क्षणिक असले तथापि त्याचा संस्कार म्हणजे फलकाल स्थायी (दीर्घकाल) रहातो. त्या संस्काराने प्रवृत्ति व प्रवृत्तीने पुनः संस्कार अशी ही परंपरा अनादि कालापासून चालत आलेली आहे. यालाच संस्कार असे म्हणतात. या संस्कारालाच धर्म, अधर्म, कर्माशय इ. अनेक नांवे आहेत. परंतु जैनदर्शनानुसार कर्माचे स्वरूप यापेक्षा कांही अंशाने भिन्न आहे. जैनधर्मानुसार. कर्म हे केवळ एक संस्कारमात्रच नाही तर एक वस्तूभूत पदार्थ आहे. व रागद्वेषी जीवांच्या क्रियांनी आकृष्ट होऊन जीवाबरोबर ते मिळालेले असते यद्यपि हे पदार्थ भौतिक आहेत, तथापि ते जीवाच्याकर्मांच्या (क्रियांच्या)

मुळे आकृष्ट होऊन जीवाशी त्याचा बंध होतो. म्हणून त्यास कर्म म्हणतात. सारांश,—अन्य धर्म रागद्वेषांनी युक्त अशा जीवाच्या प्रत्येक क्रियेस कर्म म्हणतात. व ते कर्म क्षणिक असूनहि त्याच्या संस्कारास ते स्थायी मानतात, तर जैनधर्माचे मत असे आहे की, रागद्वेषांनी युक्त अशा जीवाच्या मानसिक, वाचनिक, कायिक क्रियेबरोबर एक द्रव्य जीवात समाविष्ट होते; त्याचा रागद्वेषादिक भावांच्या निमित्ताने जीवाशी बंध होतो व कालांतराने ते त्यास त्याचे चांगले अगर वाईट फळ देते. त्याचा खुलासा असा की पुद्‌गलद्रव्य २३ प्रकारच्या वर्गणेत विभागलेले आहे. त्या वर्गणापैकी एक कार्माण वर्गणाहि आहे. व ती सर्व संसारात पसरलेली आहे, जीवाच्या प्रवृत्तीच्या निमित्ताने ही कर्माण वर्गणाच कर्मरूप होते. आचार्य कुंदकुंद यांनी प्रवचनसारांत सांगितल्याप्रमाणे

' परिणमदि जदा अप्पा सुहम्मि असुहम्मि रागदोसजुदो ।
तं पविसदि कम्मरयं णाणावरणादिभावेहिं ॥ ९५ ॥ —प्रवचन०

रागद्वेषाने युक्त असा आत्मा, जेव्हा वाईट किंवा चांगली कर्मे करू लागतो, तेव्हा कर्मरूपी धूळ ज्ञानावरणादि रूपाने जीवात प्रवेश करते. सारांश कर्म एक मूर्त पदार्थ आहे व त्याचा जीवाबरोबर बंध होतो.

जीव अमूर्तिक व कर्म मूर्तिक असते, त्यामुळे त्या दोन्हीचाहि बंध होणे संभवनीय नाही. कारण मूर्तिकाबरोबरच मूर्तिकांचा बंध होतो. परंतु मूर्तिकाबरोबर अमूर्तिकाचा बंध कसा होऊ शकेल? अशी शंका केली जाऊ शकते. त्याचे उत्तर असे की, अन्यदर्शनाप्रमाणे जैन-दर्शनहि जीव व कर्मांचा संबंध अनादि स्वरूप मानते. कधीकाळी जीव संपूर्ण शुद्ध होता व नंतर त्यात कर्म येऊन मिसळले असे मानीत

नाही कारण असे मानले तर अनेक प्रश्न उपस्थित होतात. सर्वांत प्रथम प्रश्न असा की शुद्ध जीवाशी कर्माचा बंध झाला तर तो कसा? व सर्वथा शुद्ध जीवच कर्माच्या बंधनात पडत असेल तर त्यापासून मुटका करण्याचा प्रयत्न करणे व्यर्थ ठरते. म्हणून जीव व कर्माचा संबंध अनादि स्वरूपाचा आहे. उदा:-वरील ग्रंथांत स्वामी कुंदकुंदाचार्यांनी लिहिले आहे–

' जो खलु संसारत्थो जीवो तत्तो दु होदि परिणामो ।
परिणामादो कम्मं कम्मादो होदि गदिसु गदि ॥ १२८ ॥

गदिमधिगदस्य देहो देहादो इंदियाणि जायते ।
तेहि दु विसयग्गहणं ततो रागो व दोसो वा ॥ १२, ॥

जायदि जीवस्सेवं भावो संसारचक्कवालम्मि ।
इदि जिणवरेंहि भणिदो अणादिणिधणो सणिधणो वा ॥ १३० ॥

अर्थ- जे जीव या संसारात असतात. म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यात पडलेले आहेत, त्यांचे रागरूप व द्वेपरूप परिणाम होतात. त्या परिणा–मांनी नवीन कर्मे बांधली जातात. कर्मामुळे अनेक गतीत जन्म घ्यावा लागतो. जन्म घेतल्याने शरीर मिळते, शरीरास इंद्रिये असतात, व इंद्रिये विपयाचे ग्रहण करतात विषयाचे ग्रहण करण्याने जीव इष्ट विषयासंबंधी राग (प्रीति) व अनिष्ट विषयांचा द्वेष करतो. याप्रमाणे संसाररूपी चक्रांत पडलेल्या जीवाच्या परिणामानी कर्मबंध व कर्मबंधा–पासून रागद्वेपरूप भाव होतात. हे चक्र[1] भव्य जीवाच्या अपेक्षेने अनादि–अनंत आहे भव्य व जीवाच्या अपेक्षेने अनादि–सान्त आहे.

---

१ जे जीव या चक्राचा अन्त करू शकत नाहीत त्यांना अभव्य म्हणतात. व जे त्यांचा अन्त करतात त्यांना भव्य म्हणतात.

यावरून हे स्पष्ट आहे की, अनादि कालापासून सांसारिक जीव मूर्तिक कर्माशी बद्ध झाला असल्यामुळे एक प्रकारे तोहि मूर्तिक झाला आहे. उदा०—

'वण्ण रस पंच गंधा दो फासा अट्ठ णिच्चया जीवे ।
णो संति अमुत्ति तदो ववहारा मुत्ति बंधादो ।।७।।' द्रव्यसं०

अर्थः—वास्तविक जीवांत पांच रूप, पांच रस, दोन गंध व आठ स्पर्श राहत नाहींत त्यामूळे तो अमूर्तिक आहे. कारण जैनमंत्राप्रमाणे रूप. रस, गंध, स्पर्श, गुणयुक्त वस्तु मूर्तिक असते. परंतु कर्म बंधनामुळे व्यवहाराने जीव मूर्तिक आहे. म्हणून कथंचित् मूर्तिक आत्म्याबरोबर मूर्तिक कर्मद्रव्याचा संबंध होतो.

सारांश,— कर्माचे दोन भेद आहेत. द्रव्यकर्म व भावकर्म. जीवाशी संबद्ध कर्मपुद्गलांना द्रव्यकर्म म्हणतात व द्रव्यकर्माच्या प्रभावाने होणाऱ्या जीवाच्या रागद्वेषरूप परिणामांना भावकर्म म्हणतात. द्रव्यकर्म भावकर्माचे कारण व भावकर्म द्रव्यकर्माचे कारण असते. द्रव्यकर्माशिवाय भावकर्म होत नाही व भावकर्मावाचून द्रव्यकर्म होत नाही.

## कर्म आपले फळ कसे देते ?

ईश्वरास जगाचा नियंता मानणारे वैदिक-दर्शन जीवास कर्म करण्यामध्ये स्वतंत्र व फळ भोगण्यांमध्यें परतंत्र मानते. त्याच्यामते कर्माचे फळ ईश्वर देतो. तेहि जीवांच्या चांगल्या किंवा वाईट कर्मानुसार त्यांना चांगले किंवा वाईट फळ देतो. परंतु जैन मताप्रमाणे कर्म स्वतःच फळ देते. त्यासाठी दुसऱ्या न्यायाधीशाची आवश्यकता असत नाही उदा०— दारू प्याल्याने नशा चढते व दूध प्याल्याने ताकद येते. दारू किंवा दूध प्याल्यानंतर त्यांचे फल देण्यासाठी दुसऱ्या शक्तिमान नियंत्रकाची जरूरी नाही. त्याचप्रमाणें

जीवाच्या प्रत्येक कायिक, वाचिक व मानसिक प्रवृत्तिमुळे जे कर्म-परमाणू जीवात्म्याकडे आकृष्ट होतात व रागद्वेषाच्या निमित्ताने त्याचेशी बांधले जातात, त्या कर्मपरमाणूमध्ये व दारु किंवा दुधाप्रमाणे चांगला वा वाईट प्रभाव टाकण्याची शक्ति आहे. त्यांचा चैतन्याशी संबंध होऊन ते जीवावर आपला प्रभाव टाकतात व त्या चक्रांत सापडलेला हा जीव अशी कामे करतो की, ती सुखदायक किंवा दुःखदायक होतात. कार्य करण्याचे परिणाम जर चांगले असतील तर कर्मपरमाणूवर त्यांचा चांगला परिणाम होऊन नंतर ते त्यांस चांगले फळ देतात. तसेच त्याचे भाव जर वाईट असतील तर त्यावर वाईट परिणाम होऊन ते जीवाशी बद्ध होतात व कालांतराने त्यांचे फलहि वाईट मिळते. आपल्या मानसिक भावाचा अचेतन वस्तूंवर कसा परिणाम होतो व त्या प्रभावामुळे त्या अचेतनाचा परिपाक चांगला किंवा वाईट कसा होतो इ. प्रश्नांच्या समाधानासाठी भोजनाच्या नियमावर एक दृष्टिक्षेप करावा. वैद्यक शास्त्रानुसार, भोजन करतांना मनात कोणत्याहि प्रकारची प्रक्षुब्धता असू नये. भोजन करण्याच्या अगोदर अर्ध्या तासापासून भोजन झाल्यानंतर अर्धा घंटा होईपर्यंत मनांत अशांति उत्पन्न करणारा कोणताच विचार आणू नये अशा परिस्थितीत जो मनुष्य भोजन करतो त्याला परिपाक चांगला होतो व काम, क्रोध इ० विकारांनी सहित भोजन केले तर त्याचा भोजनावर परिणाम होऊन शरिरातहि विकृति उत्पन्न होते. यावरून हे स्पष्ट आहे की, कर्त्याच्या भावांचा परिणाम जड पदार्थांवरहि पडतो व त्यानुसारच त्याचा विपाकहि होतो. म्हणून जीवास त्याचे फळ भोगण्यात परतंत्र मानण्याची जरूरी नाही.

जर ईश्वरास फलदाता मानले तर जेव्हा एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याचा घात करतो तेव्हा त्या घातकास पापाचा भागीदार होण्याचे कारण उरणार नाही. कारण त्या खुनीच्या द्वारे ईश्वराने मरणाऱ्यास दंड

दिलेला आहे. उदा० राजा ज्या पुरुषांकडून अपराध्यास दंड देववितो ते पुरुष अपराधी म्हणविले जात नाहीत. कारण ते राजाची आज्ञा पाळतात. त्याचप्रमाणे कोणाचा खून करणारा खुनी ज्याची हत्या करतो तो त्यास त्याच्या पूर्वकृत कर्माचे फल भोगवितो. ईश्वराने त्याच्य पूर्वकृत कर्माची अशा प्रकारची ही शिक्षा नियुक्त केल्यामुळेच त्याच असा प्रकारे वध केला गेला असला पाहिजे. आता जर असे मानले की, मनुष्य क्रिया करण्यास स्वतंत्र आहे म्हणून खूनी इसमाचे कार्य ईश्वर-प्रेरित नाही; ते त्याच्या स्वतंत्र इच्छेचा परिणाम आहे. तर त्याचे उत्तर असे की, संसारावस्थेत कोणताच जीव वास्तविक स्वतंत्र नाही; सर्वजण आपआपल्या कर्मांनी बांधलेले आहेत व त्या कर्मानुसारच त्यांची बुद्धि होते. कोणी असेहि म्हणतील की, अशा परिस्थितीत तर कोणी मुक्तिलाभहि करू शकणार नाहीत, कारण जीव कर्माने बांधलेला आहे व कर्मानुसार जीवाची बुद्धि होते. पण हे म्हणणे बरोबर नाही. कारण कर्मे चांगली व वाईटहि असतात. म्हणून चांगल्या कर्मानुसार उत्पन्न झालेली बुद्धि मनुष्यास सन्मार्गाकडेच नेते वाईट कर्मांनी उत्पन्न झालेली बुद्धि मनुष्यास कुमार्गाकडे नेते. सन्मार्गाने चालल्यास मुक्तिलाभ व वाम मार्गाने चालल्यास संसारप्राप्ति होते. म्हणून बुद्धि कर्मानुसार होते असे मानण्यात मुक्तीच्या प्राप्तीत कसलीच बाधा येत नाही.

याप्रमाणे जर जीव कर्म करण्यास स्वतंत्र नसेल, तर खून करणाऱ्याचे खुनी कृत्य त्याच्या दुर्बुद्धीचाच परिणाम मानावा लागेल व बुद्धीची दुष्टता त्याच्या पूर्वकृत कर्माचेच फळ मानावे लागेल. अशा स्थितीत जर आपण ईश्वरास कर्मफलदाता मानले तर त्या खुनीच्या दुष्टबुद्धीचा कर्ता ईश्वरास म्हणावे लागेल. यावर आमचे म्हणणे एवढेच की, कोण्या एका विचारशील फलदात्याने एखाद्या व्यक्तीच्या वाईट कर्माचे

फळ अशा रीतीने द्यावयास हवे होते की, जे त्यासच दंडस्वरूप होईल. त्याच्या कर्माचे फळ दुसऱ्यांना शिक्षा देण्याच्या स्वरूपांत परिणमित होईल अशा रीतीने नको होते. पण ईश्वर खुनी माणसाकडून दुसऱ्याचा खून करवितो कारण त्याला त्या खुनी माणसाकडून दुसऱ्याचा घात करवावयाचा होता, परंतु ज्या बुद्धीमुळे त्यास दुसऱ्याचा घात करण्याची बुद्धि झाली. त्या बुद्धीला बिघडविणाऱ्या कर्माचे फळ काय मिळाले ? या फळामुळे तर दुसऱ्याला शिक्षा भोगावी लागली परंतु जर ईश्वरास फलदाता न मानले व जीवाच्या कर्मातच फलदानशक्ति मानली तर वरील समस्या सहजासहजी सुटू शकते. कारण मनुष्याची वाईट कर्मे त्याच्या बुद्धीवर असा परिणाम करतात की, ज्यामुळे तो रागात येऊन दुसऱ्याचा घात करतो व त्याप्रमाणेच त्याचे वाईट कर्म त्यास वाईट मार्गाकडे तोपर्यंतच घेऊन जातात की,जोपर्यन्त त्यांच्या पासून तो सावध होत नाही. ईश्वरास कर्मफलदाता मानल्याने अनेक प्रकारचे प्रश्न उत्पन्न होतात. उदा०- कांही कर्माचे फळ आपणांस लवकर मिळते तर कांहीचे कांही महिन्यानंतर, तर काहीचे कांही वर्षानी, तर कांहीचे तर जन्मांतराने मिळते. यांचे कारण काय ? कर्मफल भोगण्यांत काळाची विषमता का दिसून येते ? ईश्वरकर्तृवादी लोकाकडून यांचे ईश्वरेच्छे शिवाय दुसरे कोणतेहि समाधनकारक उत्तर मिळत नाही. परंतु कर्मातच फलदानशक्ति मानली तर कर्मवादी जैन सिद्धांत वरील प्रश्नाचे बुद्धिगम्य समाधान करतो. याचे विवेचन पुढे आलेच आहे. म्हणून ईश्वरास फलदाता मानणे योग्य दिसत नाही, प्रथम सांगितलेच आहे की, जैनमताप्रमाणे. कर्म हे जीवाच्या प्रत्येक क्रियेने जीवाकडे ओढले जाणारे कर्म-परमाणू होत. ते कर्म परमाणू योग नांवाच्या प्रत्येक क्रिये-बरोबर जीवाकडे आकृष्ट होतात व आत्म्याच्या कषायाने राग,द्वेष,मोह इ० भावाच्या निमित्ताने जीवाशी बद्ध होतात. याप्रमाणे कर्म-परमाणू जीवा-

पयत आणण्याचे काम योगशक्ति करते व बंध करण्याचे काम रागद्वेषरूप कषाय करतात. सारांश, जीवाची योगशक्ति व कषाय ही कर्मबंधाची कारणे आहेत. कषाय नष्ट झाल्यानंतर जोपर्यंत योगशक्ति कायम आहे. तोपर्यंत जीवाकडे कर्मपरमाणूचा आस्रव (आगमन) होतो. परंतु कषायांच्या अभावी ते जीवाशी बद्ध मात्र होत नाहीत. ते लगेच निघुन जातात. उदा०-आपण योगाला वायूची, कषायांना डिकाची, जीवाला भिंतीची व कर्मपरमाणूना धुळीची उपमा देऊ शकू. जर भिंतीवर डिक लागलेला असेल, अशा वेळी वाऱ्यावरोवर उडून धुळीकण आले तर ते भिंतीला चिकटतात. परंतु भिंत जर साफ, गुळगुळीत व कोरडी असेल व तेथे डिक वगैरे पदार्थ नसतील, तर भिंतीपर्यंत कर्मपरमाणू येऊनहि तेथे ते चिटकून न बसता खाली पडतील. धुळीचे कमीजास्त येणे हे वायूच्या वेगावर अवलंबून आहे. जर वायू जोरात असेल तर खूप धूळ उडून येईल व वाऱ्याचा वेग मंद असेल तर धुळीचे प्रमाणहि कमी राहिल. त्याचप्रमाणे भिंतीवर ती धूळ कमी जास्त प्रमाणात व कमी जास्त दिवसपर्यंत चिकटून राहणे हे त्या डिकाच्या प्रमाणावर अवलंबून आहे. जर भिंतीवर पाणी पडले, तर भिंतीवरील धूळ लवकर निघून जाईल पण त्या भिंतीला एखाद्या झाडाचे दूव लागलें तर तेथील धूळ थोड्या वेळाने निघेल आणि तेथे डिकच असेल तर ती निघून जाण्यास अधिकच वेळ लागेल. साराश, चिकट वस्तूत जितक्या जास्त प्रमाणात चिकटपणा असेल, तितका जास्त परिणाम तो धुळीवर करील व तिची ती शक्ति निघून गेली किंवा तिच्यातील शक्ति कमी झाली तर धूळहि कमी चिकटेल अगर आपोआप गळून पडेल. तीच गोष्ट योग व कषायांची आहे. योगशक्ति जशा दर्जाची असेल त्याप्रमाणे येणाऱ्या कर्मपरमाणूची संख्या कमी किंवा जास्त असेल. जर योग उत्कृष्ट असेल तर कर्मपरमाणूहि अधिक प्रमाणात येतील आणि कमी असेल तर कर्म-

परमाणू येण्याचे प्रमाणहि कमी राहिल. याचप्रमाणे जर कपाय तीव्र असतील तर कर्मपरमाणू जीवावरोवर वरेच दिवसपर्यंत वांधून राहतील व फलहि जास्त देतील. उलट कपाय मंद असतील तर ते कर्मपरमाण कमी काळासाठी वांधले जाऊन त्यांच्या फळांची तीव्रताहि कमी राहील हा एक सर्व साधारण नियम असून त्यात कांही अपवादहि असू शकतात. याप्रमाणे योग व कपायामुळे जीवावरोवर कर्म परमाणूचा बंध होतो.

बंध चार प्रकारचा आहे—प्रकृतिबंध, प्रदेशबंध, स्थितिबंध व अनुभागबंध वांघल्या जाणाऱ्या कर्म परमाणूमध्ये अनेक प्रकारचा स्वभाव असतो त्यास प्रकृति-बंध म्हणतात त्याच्या संख्येची जी मर्यादा त्यास प्रदेश–बंध म्हणतात. जितक्या काळापर्यंत ते आत्म्याशी वद्ध होऊन राहतील त्या कालमर्यादेस स्थितिबंध म्हणतात व त्याची जीवास फल देण्याची जी शक्ति तिची निर्मिति त्यास अनुभाग बंध म्हणतात. कर्माचा अनेक प्रकारचा स्वभाव असणे व कमी जास्त प्रमाणांत त्याची संख्या येणे या गोष्टी योगामुळे होतात व जीवावरोवर कमी जास्त काळपर्यंत राहणे किंवा तीव्र व मंद स्वरूपानें फल देण्याची शक्ति असणे ती कषायावर अवलंबून आहे. सारांश, प्रकृतिबंध व प्रदेशबंध योगामुळे होतात आणि स्थितिबंध व अनुभागबंध कषायामुळे होतात.

यापैकी प्रकृति बंधाचे आठ भेद आहेत—१ ज्ञानावरण २ दर्शनावरण ३ वेदनीय ४ मोहनीय ५ आयु ६ नाम ७ गोत्र व ८ अंतराय. ज्ञानावरण कर्म—जीवाच्या ज्ञान गुणांचा घात करते त्यामुळे कांही लोक अल्पज्ञानी व काही विशेषज्ञानी असतात. दर्शनावरण कर्म—जीवाच्या दर्शन गुणाचा घात करतात. आवरण म्हणजे पडदा टाकणारी वस्तु म्हणजेच ही दोन्ही कर्मे अनुक्रमे जीवाच्या ज्ञान व दर्शन गुणावर पडदा टाकतात. ही कर्मे जीवाचे ते मूळगुण प्रगट होऊ देत नाहीत.

वेदनीय– जे जीवास सुखदुःखांचा अनुभव करविते, त्यास वेदनीय कर्म म्हणतात. जे जीवाला मोहित करते, ते मोहनीय कर्म दोन प्रकारचे आहे. एक दर्शन मोहनीय हे जीवास खऱ्या मार्गाचे भान होऊ देत नाही. तर दुसरे चारित्र मोहनीय जीवास चांगल्या मार्गाची माहिती असूनहि त्या मार्गाने जाऊ देत नाही. आयुकर्म— हे विशिष्ट आयुर्मर्यादेपर्यंत एका शरीरात जीवास अडकवून ठेवते. ही मर्यादा संपल्यावर जीवाचा मृत्यु होतो. नामकर्म–याच्या निमित्ताने जीवास चांगले किंवा वाईट शरीर मिळते व अंगोपांगादीची रचना होते. गोत्रकर्म- याच्या निमित्ताने जीव उच्च किंवा नीच कुळास जन्मास येतो अंतराय कर्म– याच्यामुळे इच्छित वस्तु प्राप्त होण्यात अनेक अडथळे निर्माण होतात. या आठ कर्मांपैकी ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अंतराय हे चार घाति– कर्म म्हणविले जातात कारण यांच्यामुळे जीवाच्या स्वाभाविक गुणांचा घात (लोप) होतो व इतर चार अघाति कर्मे होत. यामुळे जीवाच्या गुणाचा घात होत नाही. या आठ कर्मां– पैकी ज्ञानावरणाचे ५, दर्शनावरणाचे ९, वेदनीयाचे २, मोहनीयाचे २८, आयूचे ४, नामाचे ९३, गोत्राचे २ व अंतरायाचे ५ पोट भेद आहेत. त्यांची नांवे व कामे या संबंधी अधिक माहिती तत्त्वार्थसूत्र, कर्मकांड वगैरे ग्रंथांत पहावयास मिळेल.

घाति कर्मांचेहि दोन भेद आहेत. १ सर्वघाति २ देशघाति. ज्या कर्मामुळे जीवाच्या गुणाचा पूर्णपणे घात होतो ते सर्व–घातिकर्म व ज्या कर्मामुळे अंशतः घात होतो ते देश–घाति कर्म होय. ४ घातिकर्मांच्या ४७ भेदापैकी २६ देशघाति व २१ सर्वघाति प्रकृति (भेद) आहेत. चारहि घातिकर्मे हे पापकर्मच आहेत. परंतु अघातिया कर्मामध्ये कांही पुण्यप्रकृति व कांही पापप्रकृति आहेत. ज्याप्रमाणे खाल्लेले भोजन पचनसंस्थेत जाऊन रस, मज्जा, रुधिर इ० रूप परिणमते, त्याचप्रमाणें

जीवाशी बद्ध झालेले कर्म-पुद्गल ज्ञानावरणादि रूप होतात. त्या कर्म पुद्गलांची विभागणी बांधल्या गेलेल्या कर्मात तावडतोब होते जीव कशा रीतीने कर्म बांधतो व त्याची विभागणी कशी होते ? स्थिती व अनुभाग-बंधाचे नियम काय आहेत इ० बाबीचे वर्णन जैन कर्मसाहित्यात पहा-वयास मिळू शकते.

जैन सिद्धांतात कर्माच्या १० मुख्य अवस्था म्हणजे कर्माच्या होणाऱ्या १० मुख्य क्रिया असून त्यांना करण' म्हणतात. त्यांची नांवे व वर्णन खालील प्रमाणे आहे –

१ बंध– कर्मपुद्गल जीवाशी संबद्ध होणे यास बंध म्हणतात ही सर्वात पहिली अवस्था होय. याशिवाय दुसरी कोणतीहि पुढील अवस्था होऊ शकत नाही. याचे प्रकृति, स्थिति, अनुभाग, प्रदेश असे चार भेद आहेत. जेव्हा जीवाबरोबर कर्म पुद्गलाचा बंध होतो, तेव्हा त्यात जीवाच्या योग व कषायाच्या निमित्ताने चार गोष्टी होतात. प्रथम तावडतोब ज्ञानादिक गुणांचा घात करण्याचा त्याचा स्वभाव होतो. विशिष्ट कर्मपरमाणू विशिष्ट काळपर्यंत जीवाशी बांधून राहतील अशी मर्यादा बांधली जाते. तिसरी, त्यात तीव्र किंवा मंद फल देण्याची शक्ति निर्माण होते. चवथी ते कांही ठराविक प्रमाणातच जीवाशी संबद्ध होतात. याचे वर्णन वर आलेलेच आहे.

२ उत्कर्षण– स्थिति व अनुभाग वाढणे यास उत्कर्षण म्हणतात.

३ अपकर्षण– स्थिति व अनुभाग कमी होणे यास अपकर्षण म्हणतात. कर्मांचा जीवाशी बंध झाल्यावर कर्मामध्ये या दोन क्रिया होतात. वाईट कर्मांचा जीवाशी बंध झाल्यानंतर जर त्या जीवाच्या हातून चांगली कार्ये झाली, तर पहिल्या बांधलेल्या वाईट कर्माची स्थिति व फलदानशक्ति त्या सत् परिणामामुळे कमी होते. हे अपकर्षण व जर

वाईट कर्माचा बंध झाल्यावर जीवाचे परिणाम अधिक कलुषित होतील तर प्रथम बांधलेल्या कर्माची स्थिति व फलदानशक्ति अधिक वाढेल. या उत्कर्षण व अपकर्षणामुळेच कांही कर्म लवकर फल देतात तर कांही उशीरा फल देतात. कांही कर्माचे फळ तीव्र तर इतर कर्माचे मंद असते.

४ सत्ता– कर्माचा बंध झाल्यानंतर कर्म तावडतोब जीवास आपले फल देत नाही. त्याचे कारण असे की, कर्म बांधले गेल्यानंतर त्याचे अस्तित्व कांही कालापर्यंत फल देण्यापूर्वी राहते; यास सत्ता म्हणतात उदा० दारू प्याल्यावर तिचा एकदम परिणाम होत नाही; तर तो कांही काळांनंतर दिसून येतो. त्याचप्रमाणे कर्म बांधल्या गेल्यानंतरहि कांही काळपर्यंत कर्म सत्तेत असते या कालमर्यादेस 'आबाधाकाल' अशी पारिभाषिक संज्ञा आहे. साधारणतः कर्माचा आबाधाकाल त्याच्या स्थितीनुसार असतो. उदा० जो मनुष्य जितकी अधिक तीव्र दारू घेईल तितकी ती जास्त नशा आणणारी व टिकून राहणारी असेल. त्याचप्रमाणे जे कर्म जास्त दिवसपर्यंत राहील त्याचा आबाधाकालहि तितकाच जास्त राहील. म्हणजेच जर एखाद्या कर्माची स्थिती १कोटा-कोटी सागर बांधली असेल तर ते कर्म १०० वर्षानंतर फळ द्यावयास सुरुवात करते व ते त्या कालापर्यन्त फळ देत राहील की, जोपर्यंत त्याची कालमर्यादा संपलेली नसेल. परंतु आयु–कर्माचा आबाधाकाल त्याच्या स्थितीवर अवलंबून नाही. त्याचा खुलासा दुसऱ्या ग्रंथांत पहावा. सारांश, बंध झाल्यानंतर कर्म फल न देतां आत्म्याजवळ राहते, त्यास सत्ता म्हणतात.

५ उदय:– कर्माच्या फल देण्याच्या क्रियेस उदय म्हणतात. हा उदय दोन प्रकारचा असतो. १ फलोदय २ प्रदेशोदय. जेव्हा कर्म आपले फळ देऊन नष्ट होते तेव्हा त्यास फलोदय म्हणतात. व फळ

न देतांच जेव्हा ते नष्ट होते तेव्हा त्यास प्रदेशोदय म्हणावे.

६ उदीरणा:– ज्याप्रमाणे आंब्यांच्या दिवसांत आंबे विकणारे, आंबे लवकर पिकावेत म्हणून, झाडावरून काढून गवत वगैरेमध्ये घालून ठेवतात; त्याचप्रमाणे नियुक्त वेळेच्या अगोदरच कर्माचा विपाक होऊन फल देण्यास सुरुवात होते त्यास उदीरणा म्हणतात. अपकर्षणाच्या योगाने कर्माची स्थिति कमी होते व ती स्थिति कमी झाल्यावर नियुक्त वेळेच्या अगोदर कर्म उदयास येतात. उदा:– कोणी अकाली मरतो या अपमृत्यूचे कारण आयुकर्माची झालेली उदीरणा हे होय. स्थितीचा घात झाल्याशिवाय उदीरणा होत नाही.

७ संक्रमण:– एक कर्म दुसरे सजातीय कर्मरूप होणे यास संक्रमण म्हणतात. हे संक्रमण मूळ भेदांत होत नाही म्हणजे ज्ञानावरण, दर्शनावरणरूप होत नाही किंवा दर्शनावरण ज्ञानावरणरूप होत नाही. याप्रमाणेच इतर कर्माचे जाणावे. परंतु एका कर्माचा एक भेद, त्याच कर्माचा दुसरा भेदस्वरूप होऊ शकतो उदा:– वेदनीय कर्माच्या दोन भेदापैकी साता वेदनीय,असाता स्वरूप होऊ शकते किंवा असाता हे, सातावेदनीयरूप होऊ शकते. एकाच कर्माच्या भेदोपभेदांत संक्रमण होत असेल तरी त्यात अपवाद आहेत. आयुकर्माच्या चार भेदांत परस्परांत संक्रमण होत नाही; म्हणजे नरकगतीचे आयुष्य बांधले गेले असेल तर नरकगतीत जावे लागेल, इतर गतीत नाही.

८ उपशम:– कर्मास उदयात न येण्यायोग्य करणे यास उपशम म्हणतात.

९ निधत्ति:– कर्माचे संक्रमण व उदय न होऊ शकणे यास निधत्ति म्हणतात.

१० निकाचना:– कर्माचे उत्कर्षण, अपकर्षण, संक्रमण आणि उदीरणा न होऊ शकणे यास निकाचना म्हणतात.

जैनशास्त्रांत, कर्माच्या या अनेक अवस्थांचे व आणखी कर्माचा स्वामी, त्यांची स्थिती, कोणत्या वेळी कोणते कर्म बांधले जाते, कोणत्या कर्माचा केव्हा उदय होतो, कोणत्याचा क्षय होतो, इ० गोष्टींचे सविस्तर वर्णन आहे. ते कर्मकांड वगैरे ग्रंथांतून जिज्ञासूनी पहावे.



# प्रकरण ३ रे
# चारित्र ( आचार धर्म )

जैनधर्माच्या सैद्धांतिक मतांचा परिचय करून दिल्यावर ज्याला खरोखर धर्म म्हणता येईल अशा चारित्राची आपण ओळख करून घेऊ.

'रत्नकरण्डश्रावकाचार' नामक प्राचीन जैन ग्रंथांत सिद्धहस्त जैनाचार्य श्री. समंतभद्र स्वामींनी धर्माचे स्वरूप वर्णन करीत असतांना खालील प्रमाणे लिहिले आहे.

" देशयामि समीचीनं धर्मं कर्मनिबर्हणम् ।
संसारदु:खतः सत्वान् यो धरत्युत्तमे सुखे ॥ ॥"

प्राणिमात्रांची संसारिक दु:खापासून सुटका करून उत्तम सुख देणाऱ्या व कर्मबंधनांचा नाश करणाऱ्या सत्य धर्माचे मी कथन करतो. या श्लोकावरून खालील निष्कर्ष निघतात.

१ संसारांत दु:ख आहे.

२ त्या दु:खाचे कारण प्राण्यांची आपआपली कर्मे आहेत.

३ धर्म हा प्राणिमात्रांची दुःखापासून सुटका करून नुसते सुखच नव्हे, तर उत्तम सुख प्राप्त करून देतो.

तेव्हा सर्वप्रथम विचारणीय प्रश्न असा की, संसारात दुःख कां आहे आणि धर्म प्राणिमात्रांची दुःखांतून सुटका करून त्यास उत्तम सुखाची प्राप्ती कशी करून देतो.

## संसारांत दुःख कां आहे ?

संसारांत दुःख आहे, ही गोष्ट कोणापासून लपलेली नाही आणि सर्व लोकांना सुखाची इच्छा असून त्यासाठी ते रात्रंदिवस प्रयत्न करतात; हीहि गोष्ट कोणापासून लपलेली नाही. मग सर्वजण दुःखी कां आहेत? ज्यांना (वीतभर) पोटाची खळगी भरण्यासाठी मूठभर अन्न मिळत नाही व शरीर झांकण्यासाठी वस्त्रेहि मिळत नाहीत, अशांची गोष्ट सोडून द्या. पण जे संपत्तिमान आहेत, तेहि कोणत्यानाकोणत्या कारणाने, कोणत्याना कोणत्या दुःखाने पीडित आहेत, हे आपण पाहतो. गरीब धनाकरिता रात्रंदिवस खपतात. आणि श्रीमंतांना त्यांच्या धनाची तृष्णा उसंत खाऊ देत नाही, स्वस्थ बसू देत नाही, ज्यांना मुलबाळ नाही असे लोक त्यांच्यासाठी रडतात, आणि ज्याना संतति आहे, ते त्यांच्या पालनपोषणाची अहर्निश चिंता वाहतात. कोणाचा मुलगा मरतो तर कोणाची मुलगी विधवा होते; कोणासा पत्नी नाही, म्हणून दुःखी होतो, तर कोणी कजाग पत्नीमुळे सारखा हैराण झालेला आहे. सारांश, प्रत्येक जण कोणत्यानाकोणत्या दुःखाने पछाडलेला आहे. आप-आपल्या समजुतीनुसार ते दुःखं दूर करण्याचा तो प्रयत्न करतो; पण तरीहि दुःख कांही त्याला सोडत नाही. सुखाची इच्छा पूर्ण करण्याच्या प्रयत्नांत सर्व आयुष्य वेचले जाते, पण इच्छापूर्तीचे समाधान कांही त्याला मिळत नाही. याच्या कारणांचा जरा आपण विचार करू या

सुखाची तीन साधने आहेत—धर्म, अर्थ व काम; त्यातूनहि धर्मच सर्वात प्रमुख साधन आहे; बाकीचे दोन दुय्यम आहेत; कारण सदाचाररूप धर्माशिवाय अर्थ आणि काम यांची प्राप्तीच मुळी असंभवनीय आहे. तात्पुरते ते शक्य आहे असे मानले, तरी अधर्मपूर्ण साधनांनी मिळविलेले अर्थ व काम हे कधी सुखास कारणीभूत होऊ शकत नाहीत-दुःखासच कारणीभूत होतात. उदाहरणादाखल चोरीने धन कमावणारा व परस्त्री गमन करणारा याचे उदाहरण आपणाला घेता येईल. मोहामु अशा कार्यात पुष्कळसे लोक आपणाला दिसतात पण आपण ते चांगले करतो असे ते स्वतःच सांगत नाहीत. शिवाय त्या धनापासून आणि कामरोगापासून त्यांना किती सुख मिळते हे त्यांचा आत्माच जाणतो. वास्तविक अर्थ आणि कामापासून तेव्हाच सुख मिळेल, जेव्हा ते संतोषाने (समाधानाने) सीमित असतात, संतोषाशिवाय धन मिळविणाऱ्याची धनाची तृष्णा वाढतच जाते; आणि या तृष्णेच्या ज्वालेने सारखे जळत जाऊन ते सुखाचा लेशहि मिळवीत नाहीत. याप्रमाणेच कामभोगाच्या लालसेला बळी पडून कामभोगाची साधने शरीर, इंद्रिये वगैरे जर्जर होऊन जातात अशा पीडित अवस्थेत त्याना कधी सुख मिळू शकेल काय? त्याशिवाय अर्थ व काम हे कधी शाश्वत टिकणारेहि नाहीत. क्षणभंगुरता हा त्याचा स्वभाव ! परंतु मानवाने त्यालाच आपल्या सुखाचे साधन मानले आहे. जो अर्थ आणि कामात आपली प्रगति करतो, ज्याची संपत्ति अधिक आहे, भोगोपभोगाची साधने ज्याच्याजवळ अधिक आहेत, सुंदर किमती गाड्या ज्याच्या जवळ पुष्कळ आहेत, त्यालाच अधिक सुखी मानले जाते आणि त्याचाच आदरहि अधिक होतो., या सर्व गोष्टी लक्षात घेऊन सर्व आबाल वृद्ध, मूर्ख अगर विद्वान्, सर्व ग्रामीण किंवा नगरवासी आपला सर्व वेळ, आपले शक्तिसर्वस्व, अर्थ व काम साधनेत खर्चतात. एखादा

कोणी धर्माच्या पाठीमागे लागलाच, तर तो अर्थ आणि कामासाठीच लागलेला दिसतो. अशा परिस्थितीत मनुष्य दुःखी का बरे होणार नाही? मनुष्याची ही अर्थलालसा व कामलालसा केवळ त्यांनाच दुःखी करीत नाही, तर सर्व समाज आणि राष्ट्रालाहि दुःखी बनविते. कारण जो मनुष्य स्वार्थवृत्तीने पैसा कमावतो व सारासार विचार ठेवीत नाही, तो दुसऱ्याच्या दुःखाचे कारण निश्चितपणे होतो. आणि त्यावरोवर जर तो दुसऱ्यांना त्रास देऊन चोरी किंवा छलकटपणे स्वतः धनी बनत असेल, तर दुसराहि शहाणा मनुष्य त्याचेच अनुकरण करून त्याप्रमाणेच श्रीमंत बनण्याचा प्रयत्न करतो. याप्रमाणे परस्पर आपसात एक दुसऱ्याकडून सतावला जाऊन संपूर्ण समाजच्या समाज दुःखी होतो, कष्टी बनतो. हीच गोष्ट कामभोगाच्या बाबतीतहि आहे. म्हणून धर्माच्या सहाय्याने अर्थ आणि काम यांना जर मर्यादा घातली; तरच ते सुखाची साधने होऊ शकतात. परंतु धर्म विरहित सुखाची अपेक्षा ही अधिक दुःखासच कारणीभूत होते. म्हणून सुखाबरोबर धर्माचा घनिष्ट संबंध आहे ही गोष्ट सिद्ध होते व सुखाच्या साधनात धर्माची मुख्यता दिसून येते.

त्याचप्रमाणे शास्त्रामध्ये सुखासंबंधी जो विचार केलेला आहे, त्यावर दृष्टिक्षेप केला असता, ही गोष्ट अधिक स्पष्ट होते. सुख हा जीवाचा स्वभाव आहे, हे शास्त्रात सांगितले आहे. कारण सुख हे आत्म्यातूनच प्रगट होते. बाह्य संसारात या सुखास कोठेहि स्थान नाही, जेव्हा आपण आपल्या बाहेरील ( आत्म्याव्यतिरिक्त ) इतर पदार्थातून सुखाचा शोध करतो, तेव्हा आम्हास कधीहि सुख मिळत नाही. ही गोष्ट सत्य आहे की, इंद्रियांचे भोगपभोगाचे पदार्थ या संसारात आहेत; परंतु त्यापैकी कोणतीहि गोष्ट स्वतः सुख स्वरूप नाही उदा० एका व्यापाऱ्याला तारेने सूचना मिळते की त्याला व्यापारात

पुष्कळसा धनलाभ झाला आहे. ती पाहून तो हर्षोत्फुल्ल होतो. आता प्रश्न असा उपस्थित होतो की, तारेने सूचना मिळाल्याबरोबर त्याच्या हृदयास जो आनंद झाला तो कोठून आला? ज्या कागदावर तारेने ती माहिती कळविली होती, त्या कागदात सुख होते काय? अर्थात नाही! कारण त्याच कागदावर त्याला तोटयाची बातमी मिळाली असती तर तोच कागद त्या व्यापाऱ्याच्याच्या दुःखास कारणीभूत झाला असता. कदाचित् कोणी असे म्हणेल की तारेत माहिती सांगणारे जे वाक्य होते त्यात सुख होते. परंतु हेहि खरे नाही. कारण ह्या वाक्यात जर सुख असते तर जो कोणी ते वाक्य वाचील अगर ऐकेल त्या सर्वांना सुख व्हावयास पाहिजे होते. पण असे कधी झालेले दिसत नाही. त्या वाक्याचा त्या व्यापाऱ्याशी संबंध असल्यामुळे त्या पासून त्याला सुख होते, दुसऱ्यास होत नाही, असे कदाचित् काही जण म्हणतील. परंतु जर त्या व्यापाऱ्यास त्या बातमीच्या खरेपणासंबंधी शंका असेल तर ती शंका दूर होईपर्यंत त्यासहि सुख लाभणार नाही. त्याशिवाय आणखी एकच वस्तु कोणाला सुखाचे साधन होते तर तीच दुसऱ्याला दुःरूप वाटते. तसेच एकच वस्तु कधी सुखाला तर कधी दुःखाला कारणीभूत होते. उदा:– स्वतःचा पुत्र जोपर्यंत आई वडीलांच्या आज्ञेमध्ये असतो तोपर्यंत तो त्यांच्या सुखाचे साधन असतो पण तो पुत्र जेव्हा उद्धटपणे बोलतो, तेव्हा तोच पुत्र त्यांना दुःखाचे कारण होतो; म्हणून जर बाह्य वस्तु ही सुखस्वरूप असती तर तीपासून सर्वांना नेहमीच सुख मिळावयास पाहिजे होते. परंतु असे दृष्टोत्पत्तीस येत नाही. म्हणून असे मानणे क्रमप्राप्त आहे की, सुख हा जीवाचाच स्वभाव आहे व ते जीवामध्ये अंतरंगातूनच ( आत्मिक सहाय्याने ) निर्माण होते परंतु बाह्यतः ज्या वस्तूच्या निमित्ताने त्यास सुख होते, तीच वस्तू सुख देते असे मनुष्य अज्ञानाने समजतो. वास्तविक बाह्य वस्तु थी स्वतःसुख

(तृष्णेचा) प्रवाह वाहतच राहातो. कोणाच्याहि सर्व इच्छा कधीही पूर्ण होत नाहीत व कदाचित् झाल्या तरी पुनः इच्छा उत्पन्न होणार नाहीत हे कांही संभवनीय नाही. म्हणून पुनः इच्छा उत्पन्न झाली की पुनः दुःखाची शक्यता उरतेच. तेव्हा इच्छेला अनुसरून प्रत्येक पदार्थ मिळवून इच्छा तृप्त करणे हा सुखाचा खरा उपाय नसून, प्रत्येक प्रकारच्या इच्छेचे नियमन करणे हाच सुखाचा खरा उपाय आहे. कारण इच्छा तृप्त केल्याने ती वाढतच जाते व तृष्णेचे रूप धारण करते.

सारांश,– सर्वांना सुखाची इच्छा आहे. परंतु दुखाचा अभाव झाल्याशिवाय सुखाचा अनुभव येत नाही. अर्थ आणि काम यापासून होणारे सुख हे खरे सुख नाही, तो फक्त शारीरिक किंवा मानसिक रोगांचा केवळ प्रतीकार आहे. भ्रमामुळे मनुष्य त्यास सुख मानतो. व सर्वजण त्या भ्रामक उपायासाठी रात्रंदिवस धडपडतात आणि न्याया-न्यायाचा विचारहि करीत नाहीत. त्यामुळे संसारात दुःख त्याच्या वाट्याला येते. आपली अर्थ व कामाची अनियंत्रित इच्छा हीच खुद्द आपल्या व दुसऱ्याच्या दुःखाचे कारण बनलेली आहे. जर आपण धर्माच्या अंकु–शाने ती नियंत्रित केली धर्माला विरोध येणार नाही अशा रीतीने जर आपण अर्थ व कामाचे सेवन करण्याचे व्रत घेतले, तर आपण स्वतःहि सुखी होऊ शकू व जे अनियंत्रित अर्थ–तृष्णा व काम–तृष्णेचे बळी बनलेले आहेत, अशा दुसऱ्यांनाहि सुखी करू शकू. म्हणून धर्मच उपा–देय आहे. तोच आमच्या इच्छेचे नियमन करून आम्हाला केवळ सुखीच बनवीत नाही, तर पूर्ण सुखीहि बनवितो, कारण जे सुख इंद्रियांच्या सहाय्याने प्राप्त होणारे आहे, ते पराधीन सुख आहे. जो–पर्यंत आपणांला आवडणारे पदार्थ भोगण्यास मिळत नाहीत, तोपर्यंत तेहि सुख मिळत नाहीच; तसेच ते भोगल्यावर तात्पुरते सुख झाल्या–सारखे वाटते, परंतु नंतर भोगून जेव्हा ते पदार्थ सोडून देतो तेव्हा

पुनः त्यांच्या अभावाने अधिकच विकलता येते, हुरहुर वाटते. जसे एकदा यथेच्छ भोजन झाल्यावर दुसऱ्यावेळी पुन्हा भूकेची बाधा सुरू होते व मनुष्य भोजनासाठी पुनः व्याकुळ बनतो. या जातीचे सुख हे खरे सुख नसून दुःखच आहे. खरे सुख तेच समजावे की जे एकदा प्राप्त झाल्यानंतर तेथे दुःखाचे भय मुळीच उरत नाही. म्हटलेच आहे की–

"तत्सुखं यत्र नासुखम् ।

सुख तेच की ज्यांत दुःख मुळीच असत नाही. अशा शाश्वत सुखाची प्राप्ति केवळ धर्मानेच होते.

## २ मुक्तीचा मार्ग.

संसारांत दुःखे कां आहेत हे आपण पाहिलेच आहे. तसेच त्याबरोबर हेहि पाहिले आहे की, सुखाचे साधन धर्म आहे. तो आम्हांस दुःखातून सोडवून नुसत्या सुखाचीच नव्हे तर उत्तम सुखाची प्राप्ति करून देतो. आता दुःखातून सुटून सुख प्राप्त करण्याचा कोणता उपाय आहे ? हा प्रश्न उपस्थित होतो. आचार्य समंतभद्रस्वामी रत्नकरण्ड श्रावकाचार ग्रंथामध्ये लिहितात–

' सद्दृष्टिज्ञानवृत्तानि धर्म धर्मेश्वरा विदुः ।
यदीयप्रत्यनीकानी भवन्ति भवपद्धतिः ॥३॥'' रत्नकरंड० ।

अर्थात् धर्माचे प्रवर्तक, सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान आणि सम्यचारित्र यांना धर्म म्हणतात. यांच्या उलट असलेले मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान आणि मिथ्याचारित्र हे संसाराचे मार्ग आहेत.

ज्यांना वर धर्म म्हणून म्हटलेले आहे त्या सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान सम्मग्चारित्रासच आचार्य सूत्रकार उमास्वामींनी मुक्तीचा मार्ग म्हटलेले आहे. वास्तविक पाहातां दुःख आणि त्याच्या कारणापासून सुटण्याचा

उपाय म्हणजेच मुक्तिचा मार्ग होय. तोच धर्म आहे. तो आपण समजून घेतला पाहिजे.

दुःखापासून कायमची सुटका व्हावी, म्हणून सर्वप्रथम आपली अशी दृढश्रद्धा बनली पाहिजे की–

" एगो में सस्सदो अप्पा णाणदंसणलक्खणो ।
सेसा मे बाहिरा भावा सव्वे संजोगलक्खणा ॥ १०२ ॥ नियमार

ज्ञानदर्शनस्वरूप एक अविनाशी असा आत्माच फक्त झाला आहे. शुभाशुभ कर्मांच्या संयोगाने उत्पन्न झालेले बाकीचे सर्व पदार्थ हे आत्मबाह्य असून माझ्यापासून ते सर्वथा भिन्न आहेत. ते माझे नाहीत.

आपल्या शुभाशुभ कर्मामुळे प्राप्त झालेल्या बाह्य वस्तूवरील ममत्व जोपर्यंत आपण सोडीत नाही, तोपर्यंत आपण आपल्या दुःखमुक्ततेचा प्रयत्न करू शकणार नाही; आणि यदाकदाचित् प्रयत्न केलाच तर तो सफलहि होणार नाही. कारण जोपर्यंत आपण कोण व आपल्या आजु–बाजूस असणाऱ्या वस्तूचा स्वतःशी काय संबंध हे आपण जाणू शकत नाही, तोपर्यंत आपण कशापासून कुणाची मुक्तता करणार? जसे ज्याला सोने व त्यात मिसळलेल्या इतर हीन पदार्थांची खरी ओळख नाही, तो खाणीतून काढलेल्या सुवर्ण पाषाणातून खरे सोने बाजूला करू शकणार नाही. त्यासाठी त्याला त्या पिंडातील अस्सल सोने कोणते व इतर हीन कोणते याचे यथार्थ ज्ञान हवे व 'हेच सोने आहे आणि हे हीन आहे' असा दृढ विश्वास असला पाहिजे. जर दृढ विश्वास नसेल तर कोणाच्या तरी सांगण्यावरून मातीला सोने व सोन्याला माती समजून तो फसविला जाईल. त्याचप्रमाणे ज्याला आत्मशोधन करावयाचे आहे, त्यास आपला आत्मा व त्यात असलेला कर्ममल, त्यांची कारणे

व त्यापासून सुटका करण्याचे उपाय इत्यादींचे यथार्थ ज्ञान तर हवेच; पण त्याबरोबरच त्या ज्ञानाच्या सत्यतेवर त्याचा दृढविश्वासहि असावयास पाहिजे. अशी ही पक्की श्रद्धा म्हणजेच सम्यग्दर्शन होय. दुःखमुक्तीचा प्रयत्न करण्यापूर्वी हे सम्यग्दर्शन असण्याची नितांत आवश्यकता आहे. जर कांही शंका वगैरे असेल तर ती अगोदरच दूर करावयास पाहिजे, शंका दूर झाली, प्रथम सांगितलेल्या सात तत्त्वांवर दृढ श्रद्धा बसली, त्याची यथार्थ प्रतीति आली की, मुक्ति-मार्गात पुढे पाऊल टाकावयास पाहिजे; त्यापासून कधीहि मागे हटावयास नको. जसे-

"विपरीताभिनिवेशं निरस्य सम्यग्व्यवस्य निजतत्त्वम् ।
यत्तस्मादविचलनं स एव पुरुषार्थसिद्ध्युपायोऽयम् ॥१५॥" पुरुषार्थ ।

शरीरालाच आत्मा समजण्याची जी मिथ्या प्रवृत्ति आहे, तिला दूर करून व आत्मतत्त्व चांगल्या प्रकारे जाणून घेऊन त्यापासून विचलित न होणे, हाच परम पुरुषार्थ मुक्तीच्या प्राप्तीचा उपाय आहे.

म्हणून मुक्तीसाठी पूर्वी सांगितलेल्या सात तत्त्वांवर पक्की श्रद्धा असणे, हे सम्यग्दर्शन होय व त्याचे अगदी यथार्थ ज्ञान होणे हे सम्यग्ज्ञान होय. हे दोन्हीहि प्राणिमात्रास उन्नतीस नेणारी साधने आहेत. यांच्याशिवाय मुक्तीचा प्रयत्न व्यर्थ होय. ज्या जीवास या प्रकारचे दृढ श्रद्धान व ज्ञान होते, त्यास सम्यग्दृष्टि म्हणतात. म्हणजेच त्याची दृष्टि यथार्थ मानली जाते. अशी दृष्टि प्राप्त झाल्यावर जर तो पुढे जाईल, तर तो धोक्यात येऊ शकणार नाही. जोपर्यंत माणसाची दृष्टि ठीक असत नाही- जोपर्यंत त्याला आपल्या हिताहिताचे ज्ञान होत नाही, तोपर्यंत तो आपल्या हितकर मार्गाने पुढे जाऊ शकत नाही. म्हणून सुरवातीलाच ही दृष्टि यथार्थ असणे आवश्यक आहे व त्यासाठीच मोक्षमार्गामध्ये, सम्यग्दर्शनास कर्णधारत्वाचा मान मिळाला आहे.

ज्याप्रमाणे नौका योग्य दिशेस नेण्याचे काम, नौका वल्हविणाराच्या हातात नसते, तर ते नौकेच्या मागे असलेल्या सुकाणू चालविणाऱ्या मनुष्याच्या हातात असते, तो सुकाणू जिकडे वळवील तिकडे नौकेला गति मिळते, त्याचप्रमाणे सम्यग्दर्शनाच्या बाबतीतहि जाणावे. म्हणूनच जैन-सिद्धांतात सम्यग्दर्शनास अत्यंत महत्वाचे स्थान दिलें गेले आहे. ते नसेल तर ज्ञान हे 'सम्यग्ज्ञान' होऊ शकत नाही व चरित्र हे 'सम्यक्चारित्र' म्हणविले जात नाही. म्हणून मोक्षाची उपासना करणाऱ्याची दृष्टि सम्यक् असणे, अत्यंत आवश्यक आहे. ती असल्यावर मुमुक्ष ध्येय-भ्रष्ट होत नाही.

या सम्यग्दर्शनाची आठ अंगे आहेत. ज्याप्रमाणे शरीराची आठ अंगे असतात, त्याशिवाय शरीर बनू शकत नाही. त्याप्रमाणे या आठ अंगा-शिवाय सम्यग्दर्शनहि पूर्ण होऊ शकत नाही. सर्वप्रथम ज्या सत्यमार्गाचा त्याने अवलंब केला, त्या कार्याबद्दल त्यास निःशंक व्हावयास पाहिजे. जोपर्यंत त्या मार्गाविषयी यत्किंचित्हि शंका त्याच्या मनात असेल तो पर्यंत त्याची श्रद्धा पक्की कशी असणार? अशा अवस्थेत पुढे जाऊनहि तो आपल्या ध्येयापर्यंत पोहोचू शकणार नाही. म्हणून त्या आपल्या आत्म्यावर आपल्या पत्करलेल्या योग्य मार्गावर आणि योग्य मार्ग दाखविणाऱ्या मार्गदर्शकावर अविचल (अकाटच) श्रद्धा असावयास पाहिजे. दुसरे त्याने कोणत्याहि प्रकारच्या लौकिक सुखाची इच्छा करावयास नको. पूर्ण निष्काम-निरीच्छ बनून काम करावयास पाहिजे. कारण इच्छा आणि विशेषतः स्त्री, पुत्र, धन वगैरेची इच्छा मनुष्यास ध्येय भ्रष्ट करते इच्छेचा जो दास आहे, तो आपली प्रगति कधीच करू शकत नाही. जसे-कोणी एखादा मनुष्य आपला देश स्वतंत्र करण्याच्या मार्गाचे अवलंबन करतो व असा मार्ग स्वीकारल्याने माझी प्रसिद्धि व्हावी, प्रतिष्ठा व्हावी, मला विधान सभेत जागा मिळावी इ० इच्छा त्याची

असेल, तर या इतर गोष्टीवरच त्याचे लक्ष्य स्थिर होऊन देशाच्या स्वातंत्र्याची मूळ इच्छा तो विसरून जातो, या गोष्टी जर त्यास मिळाल्या नाहीत आणि यातनाच सहन करण्याची त्याच्यावर पाळी आली, तर लोकांच्या माथ्यावर दोषाचे खापर फोडून स्वीकारलेला मार्ग तो सोडून देतो. त्याचप्रमाणे सांसारिक सुखाची इच्छा करून मनुष्य मोक्षमार्गावर चालू लागला तर तो ध्येयभ्रष्ट होतो म्हणून निरीच्छ होऊन राहणे हेच योग्य आहे. तिसरे रोगी, दुःखी किंवा दरिद्री माणसास पाहून त्याची किळस करता कामा नये. कारण हे सर्व जीवास मिळालेले आपआपल्या पाप पुण्याचे खेळ आहेत. आजचा लक्ष्मीनारायण उद्या दरिद्रिनारायण होऊ शकतो; जो आज निरोगी आहे तो उद्या रोगाने पछाडला जाऊ शकतो. म्हणून माणसाचे वैभव किंवा त्याची शारीरिक दुर्गंधी इकडे दृष्टि न देतां, त्याच्या गुणावरच दृष्टि ठेवावयास पाहिजे. चौथे, त्याने कुमार्ग व कुमार्गाने जाणारे लोक यांचा कधीच पुरस्कार वा गौरव करता कामा नये: कारण त्यामुळे मिथ्या प्रवृत्तीस प्रोत्साहन मिळते. तसेच जर कोणी सन्मार्गापासून त्यास विचलित करण्याचा प्रयत्न करील तर त्यांच्या गाळचांत फसला जाणार नाही, इतका सारासार विचार व निश्चय त्यानें बाळगावयास हवा. पांचवे, त्याने आप या गुणांचा विकास करण्याचा प्रयत्न करून, दुसऱ्याचे दोष झाकण्याचा प्रयत्न करावा. अज्ञानी किंवा असमर्थ लोकांनी जर सन्मार्गावर कांही शितोडे उडविण्याचा, दोषारोपण करण्याचा प्रयत्न केला तर सन्मार्गाची लोकांत निंदा होऊ नये म्हणून प्रयत्न करावयास हवा. सहावे, स्वतः किंवा दुसरा कोणी मनुष्य जर सन्मार्गापासून विचलित होत असेल, किंवा कांही कारणाने तो मार्ग सोडून देत असेल, तर त्या सन्मार्गामध्ये स्वतःस व त्यास पुनः स्थिर करावयास पाहिजे. सातवे, आपले सहयोगी गण व अहिंसामय असा धर्म यावर आपण मनःपूर्वक प्रेम करावयास

पाहिजे. आठवे, जनतेत पसरलेल्या अज्ञान अंधःकाराला दूर करून अहिंसामय धर्माचा सर्वत्र प्रसार करावयास पाहिजे. सम्यग्दर्शनाची ही आठ अंगे आहेत. त्यांची अनुक्रमे नांवे, निःशंकित, निःकांक्षित, निर्विचिकित्सता, अमूढदृष्टी, उपगूहन स्थितीकरण, वात्सल्य व प्रभावना अशी आहेत. सम्यग्दृष्टीस ही सर्व अंगे असणे आवश्यक आहे.

याशिवाय सम्यग्दृष्टि माणसास आपले ज्ञान, तप, आदरसत्कार बल, ऐश्वर्य, कुल, जाति रूप यांचा गर्व असतां कामा नये. गर्व अत्यंत वाईट आहे. गर्वाला बळी पडून जो आपल्या सहधर्मियांचा अपमान करतो तो आपल्या धर्माचाच अपमान करतो कारण 'न धर्मो धर्मिकैर्विना।' धार्मिक पुरुषाशिवाय धर्माला स्वतंत्र अस्तित्वच नाही.

याप्रमाणे सम्यग्दृष्टि व सम्यग्ज्ञानी होऊन जीवाने आपल्या प्रगतीचा प्रयत्न करावा. इतकी मानसिक तयारी झाल्याशिवाय अहिंसा धर्मरूपी महावृक्षाचे बीजारोपण होऊ शकत नाही. मुक्तीच्या मार्गानें जाणाऱ्यास हा अहिंसाधर्मरूप महावृक्ष, जी मुक्तीमार्गामध्ये शिदोरीचे काम करतात, अशी शांतिरसाने परिपूर्ण स्वादिष्ट मधूर फळे देतो. तसेच या महावृक्षाच्या सुखद शीतल छायेत जागतिक महा-युद्धाच्या भयाने सत्रस्त आणि व्याकुल झालेल्या या चराचर जगतास शांतीचा लाभ होतो. आता सम्यग्चरित्र किंवा आचार याचा विचार करू.

### ३ चारित्र किंवा आचार

जैन धर्माचा प्रारंभ कसा झाला हे सुरवातीला सांगताना ही गोष्ट सांगितली आहे की, जैनशास्त्रानुसार वर्तमान अवसर्पिणी कालाचे प्रारंभी जेव्हा येथे भोगभूमि होती, त्यावेळी येथे कोणताच धर्म नव्हता. सर्व लोक सुखी होते. सर्वांच्या आवश्यकतेनुसार पाहिजे असलेल्या वस्तु त्यांना मिळत होत्या. सर्वजण संतोषी व सरळ स्वभावी होते.

खाजगी संपत्ति–मालकी हक्काचा तेव्हा जन्महि झालेला नव्हता आणि विषमताहि पण त्यावेळेस नव्हती. नैसर्गिक साम्यवाद येथे प्रचलित होता. कोणी लहान किंवा मोठा, किंवा हा अमीर तो गरीब, किंवा मी शासक, तू शास्य असा कसलाच भेदभाव त्यावेळी नव्हता. परंतु नंतर निसर्गात फरक झाला. जरूर असलेल्या वस्तु यथेच्छ प्रमाणात मिळणे बंद झाले. मनुष्यमात्रात असंतोष व भीती पसरली व त्यातून संग्रह–प्रवृत्ति निर्माण झाली. त्यामुळे विषमता वाढू लागली. आणि त्याबरो–बरच गुन्हेगारी वाढत चालली. सुखाच्या ऐवजी दुःख आले. अशा वेळी भ० ऋषभदेवांचा जन्म झाला. त्यांनी लोकांना असि, मसि, कृषि शिल्प, सेवा, वाणिज्य यांच्या सहाय्याने आजीविका करण्याचा उपदेश दिला. तसेच आपल्या प्रत्येक कार्यात अहिंसामूलक व्यवहार करण्याचा उपदेश देऊन अहिंसा हाच धर्म आहे असे सांगितले व त्या अहिंसा धर्माच्या रक्षणाकरिता सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह या चार दुसऱ्या धर्मांचे पालन करणे आवश्यक आहे असा उपदेश दिला. हे पांच यमरूप (व्रतमय) धर्मच जैनाचाराचे मूळ आहे. हा धर्म, गृहस्थ अंशतः पाळतात व मुनी याचे सर्वथा पालन करतात.

चारित्र किंवा आचार याचा अर्थ आचरण असा आहे. मनुष्य जे कांही विचार करतो किंवा बोलतो अगर वागतो, (कृति करतो) त्य सर्वांना आचरण म्हणतात. या आचरणातील सुधारणा ही मनुष्याची प्रगति असून आचारातील बिघाड हा मनुष्याचा बिघाड होय. मनुष्य प्रवृत्तिशील आहे व त्याच्या प्रवृत्तीची मन वचन व काय ही तीन द्वारे आहेत. यांच्या द्वारेच मनुष्य स्वतःचे काम करतो व त्यायोगेच एक मनुष्य दुसऱ्याच्या परिचयात येतो. ही तीन द्वारेच अशी आहेत की, त्यामुळेच एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याचा शत्रूहि बनू शकतो किंवा मित्रहि बनू शकतो. यांच्या सत्प्रयोगाने मनुष्य स्वतः सुखी होऊन

दुसऱ्यालाहि सुखी करू शकतो किंवा त्यांच्या दुष्प्रवृत्तीने मनुष्य स्वतःहि दुःखी होऊन दुसऱ्यालाहि दुःखांत लोटू शकतो. म्हणून याची दुष्प्रवृत्ति टाळून सत्प्रवृत्ति करणे, यास सदाचार किंवा शुभाचरण म्हणतात.

चरित्राचे दोन भाग आहेत.– एक प्रवृत्तिमूलक व दुसरा निवृत्तिमूलक. प्रवृत्तिमूलक भाग हा सर्व बंधाला कारणीभूत असून निवृत्तिमूलक भाग हा अबंधास कारणीभूत आहे. प्रवृत्ति व निवृत्ति या संबंधी येथे थोडेसे विवेचन केले तर ते अस्थानी होणार नाही. प्रवृत्ति म्हणजे इच्छापूर्वक कोण्या एकाद्या कार्यात प्रवृत्त होणे व निवृत्ति म्हणजे प्रवृत्तीस रोकणे, प्रवृत्ति चांगली व वाईट दोन्ही प्रकारची असू शकते. या प्रवृत्तीची तीन द्वारे आहेत. मन, वचन आणि काय, कोणाचे वाईट चिंतणे एखाद्याशी द्वेषभाव वा मत्सर ठेवणे, इ० असत् मानसिक प्रवृत्ति होत. उलट कोणाचे चांगले चिंतणे, त्यांच्या संरक्षणाचे उपाय योजणे इ० सत्मानसिक प्रवृत्ति होय. खोटे बोलणे, शिव्या देणे इ० प्रकार असत् वाचनिक प्रवृत्तीत येतात. हित, मित, प्रिय वचन बोलणे ही सत्–वाचनिक प्रवृत्ति समजली जाते. कोणाची हिंसा करणे, चोरी करणे, व्याभिचार करणे इ० प्रकार हे असत् कायिक प्रवृत्तीमध्ये मोड–तात. तर एखाद्याची रक्षा करणे, त्याची सेवा शुश्रूषा करणे वगैरे सारख्या क्रिया ह्या सत् कायिक प्रवृत्ति होत. याप्रमाणे प्रवृत्ति ही चांगली व वाईट अशी दोन्ही प्रकारची आहे. पण प्रवृत्तीचे हे भले–बुरेपण, हे केवळ त्या कर्त्याची बाह्य प्रवृत्ति किंवा त्यांचे फळ यावरच अवलंबून नसून त्या कर्त्याचा क्रियेच्या पाठीमागील जो उद्देश अगर जी भावना असेल त्यावर अवलंबून आहे. एखादे कार्य जर चांगले करण्याचा उद्देश असेल तर ते सत्कार्य म्हणविले जाते. उलटपक्षी दुष्ट हेतूने केलेले कार्य हे असत् कार्य होय. जसे एखादा डॉक्टर रोग्यास दुरूस्त करण्याच्या भावनेने रोग्याचा फोड फोडतो, त्यावेळी रोगी ओरडतो,

तडफडतो. पण तेवढ्यावरून डॉक्टरचे हे कृत्य वाईट आहे असे कोणी म्हणत नाही; कारण त्या क्रियेपाठीमागील डॉक्टरची भावना वाईट नाही. उलट एखादा मनुष्य श्रीमंत माणसाचे धन लुबाडण्याच्या उद्देशाने त्याच्याशी मैत्री करून त्याची नेहमी खुशामत करीत असेल, त्याला निरनिराळ्या प्रकारची प्रलोभने दाखवून त्याला दारूच्या नशेत अगर वेश्येच्या फंदात पाडीत असेल, तर त्याचे हे कार्य दुष्ट बुद्धीने प्रेरीत झाले असल्यामुळे ही असत् प्रवृत्ति होय. याप्रमाणे अनेक दृष्टांत देता येतील. म्हणून कोणतीहि प्रवृत्ति चांगली की वाईट हे ठरविण्याचा निकष केवळ कार्य नसून त्या पाठीमागील त्याची भावना हीच होय. अशा परिस्थितीत जे लोक लौकिक सुखाच्या आशा–आकांक्षेने प्रेरित होऊन धर्माचरण करतात त्याचे धर्माचरण दुराचाराच्या पाठीमागे लागलेल्या लोकांच्या आचारणापेक्षा सापेक्ष चांगले असले, तरी ज्या भावनेने त्या कार्यात ते प्रेरित झालेले आहेत, ती दृष्टि लक्षात घेता ते आचरण निष्फळच होय. कारण लौकिक किंवा वैषयिक सुखाच्या मोहात फसून त्यामुळें ते शाश्वत अशा आत्मसुखास विसरून जातात. धर्माचरणाच्या अंतिम ध्येयापासून ते दूर असतात. त्यांच्या बाबतीत अशा कार्यामुळे बऱ्याच काळपर्यंत चिरस्थायी सुखाची आशा नष्ट झालेली असते

जरी सुखलाभाची प्रवृत्ति हा प्राणिमात्रांचा स्वभाव सिद्ध धर्म आहे, तरी हीच प्रवृत्ति प्राणिमात्रास चांगल्या किंवा वाईट कार्यात प्रवृत्त करते. कारण जीव खरे सुख कोणते हे खरोखरी ओळखत नाहीत ते असे समजतात की, इंद्रियांच्या विषयातच खरे सुख आहे. त्या–साठीच ते प्रयत्नहि करतात व त्याच्या लोभाने ते धर्माचरणहि करतात पण जसजशी त्यांना विषय सुखाची प्राप्ति होत जाते, तसतशी त्यांची विषय–तृष्णा वाढतच जाते. त्या तृष्णेच्या पूर्तिसाठी ते दररोज नवनवीन

उपाय योजतात, अनर्थ करतात, बळात्कार करतात, दुसऱ्यांना सतवितात, सदसद्विचार न करता ते कांहीहि करतात, पण इतके होऊनहि त्याची तृष्णा मात्र शमत नाही; ही तृष्णा शांत करण्याच्या पाठीमागे लागून ते स्वतःचे जीवन संपुष्टांत आणतात. पण विषयाची तृष्णा मात्र शांत होत नाही. त्यांमुळे आपल्या बरोबर पापाचे गाठोडे घेऊन इहलोकीची यात्रा ते संपवितात: वैषयिक सुखाची तृष्णा ही अशी निंद्य आहे. याशिवाय आणखी या प्रवृत्तीमध्ये हा एक मोठा दोष आहे की, तिची क्रिया सुरू झाली की, तिला कोठेहि लगाम घालता येत नाही. संयम ठेवणे कठीण जाते व योग्य मर्यादेचे उल्लंघन करून ती कार्य करावयास लागते. यासाठीच प्रवृत्तीच्या निरोधावर–संयमावर इतका जोर दिलेला आहे. आणि प्रवृत्तीला विश्वसनीय मार्गदर्शक म्हणून मानलेले नाही यासाठीच दूरदर्शी धर्मोपदेशकांनी प्रवृत्तिमूलक कार्याऐवजी निवृत्तिमूलक कार्याची अधिक प्रशंसा केलेली आहे व निवृत्ति मार्गाचेच ग्रहण करण्याचा उपदेश दिलेला आहे.

बहुभाग लोकांची अशी कल्पना आहे की, प्रवृत्ति ही माणसाला उचित कर्तृत्वसंपन्न बनवून त्याकरवी जगाचे हित करविण्यास प्रवृत्त करते; व निवृत्ति ही माणसाला निष्क्रिय बनवून जगाचे हित करण्यापासून रोकते परंतु ही गोष्ट बरोबर नाही. निवृत्ति–मार्गापेक्षा प्रवृत्तिमार्ग आकर्षक आहे, हे सत्य आहे. पण त्याचे कारण असे आहे की, प्रवृत्ति मार्गाने ज्या सुखाच्या पाठीमागे मनुष्य लागतो, ते सुख क्षणिक असून सहज लभ्य व सहजभोग्य आहे. उलटपक्षी निवृत्ति–मार्गाने जाऊन मनुष्य ज्या सुखाचा शोध घेतो, ते शाश्वत असले तरी कष्टसाध्य असून संयमी झाल्याशिवाय मिळू शकत नाही. म्हणून निवृत्ति–मार्ग तितका आकर्षक जरी नसला तरी एकदा जो त्या मार्गाने, जाऊ लागतो तो बरोबर त्या मार्गाने जातच राहतो; आणि त्या मार्गाने चालत असताना

होणारे सुख हे शाश्वत स्वरूपाचे असून ते भोगण्याच्या शक्तीचा ऱ्हास कधीहि होत नाही. याच्या उलट प्रवृत्ति मार्गाने जे सुख हाती लागते त्या सुखाकरिता ज्या ज्या भोग्य साधनांची आवश्यकता आहे, ती सर्व साधने क्षणिक आहेत व तद्वारा प्राप्त होणारे सुख भोगण्याची आपली शक्तीहि कमीकमीच होत जाणारी आहे. दुसरे असे की. प्रवृत्तीच्या प्रेरणेने जे कार्य केले जाते ते निरंतर चालू राहील किंवा कसे या संबंधी शंका कायम राहते, कारण ते कार्य करणारा कोणत्या तरी लौकिक इच्छेने त्यामध्ये प्रवृत होतो. परंतु निवृत्तीमार्गाने जाणाऱ्याच्या मनोमानसी ही शंका संभवू शकत नाही; कारण तो आपल्या ऐहिक सुखाच्या लाभाकडे लक्ष न देता आपल्या कार्यामध्ये मग्न असतो. कदाचित् कोणी असे म्हणतील की प्रवृत्ति-मार्गी लोकांनीच पुष्कळसे प्रयत्न करून अनेक प्रकारची सुखोपभोगांची साधने निर्माण करून मनुष्य जातीचे पुष्कळसे हित केलेले आहे; परंतु निवृति-मार्गांनी असे कांहीच केलेले नाही. या लोकांनी हे लक्षात घ्यावयास हवे की, भोगोपभोगांची अनेक प्रकारची साधने असतानाहि जेव्हा कोणी मनुष्य शोक-सागरात निमग्न होतो किंवा निराशेच्या खोल गर्तेत पडतो किंवा असाध्य रोगाने पीडित होतो, तेव्हा त्यास निवृत्ति मार्गाने जाणाऱ्यांच्या जीवनांतील उत्कृष्ट आदर्शच धीर देतात; व त्यांच्या अनुभवपूर्ण उपदेशाने त्यास खऱ्या शांतीचा लाभ होतो. म्हणून जे खरे सुख आणि शांति यांच्या शोधात आहेत, त्यांनी कांही प्रमाणांत कां होईना निवृत्ति-मार्गी व्हावयास हवे. एवढेच नव्हे तर प्रवृत्तिमार्गाने जात असतांनाहि आपली दृष्टि निवृत्तिमार्गावर ठेवावयास हवी आहे.

कोणी असे म्हणतील की, याप्रमाणे सर्वच जण जर निवृत्ति मार्गाने जाऊ लागले तर संसाराची परिपाटी कशी चालेल? परंतु ही

विचारपद्धति सदोष आहे, बरोबर नाही; कारण सर्व साधारण जीवाच्या मोहमूलक प्रवृत्ति हरळीच्या मुळीप्रमाणे इतक्या दृढमूळ आहेत की, निवृत्तीच्या अभ्यासाने त्यांची मुळे एकदम नष्ट होणे शक्य नाही. फार तर एवढेच होईल की, कांही प्रमाणांत त्या प्रवृत्ति शांत होतील व असे झाले तर त्यामुळे आपणास व जगास उपकारकच होईल; हानी होणार नाही. म्हणून चारित्राचे एक प्रवृत्तिमूलक व दुसरे निवृत्तिमूलक असे दोन प्रकार आहेत. त्या दोन्हीहि चारित्रांचा प्राण अहिंसा असून सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य, अपरिग्रह हे यांचे संरक्षक आहेत.

## ४ अहिंसा

### जैनाचाराचे प्राणभूत तत्त्व.

अहिंसा हा परमधर्म आहे. हे परमब्रह्म आहे. अहिंसा ही सुख शांति देणारी अमृतवल्ली आहे व सर्व विश्वाचे रक्षण करणारा रक्षामणि आहे. अहिंसा मनुष्याचा खरा धर्म व त्याचे खरे कर्म अहिंसाच आहे. वीरांचाहि हाच बाणा आहे व धैर्यवानांचे ते प्रबळ मानचिन्ह आहे. अहिंसेशिवाय मनुष्याच्या मानव्याला किंमत नाही व शानहि नाही. मानव आणि दानव यांच्यातील अंतर अहिंसा व हिंसाप्रवृति यावरच अवलंबून आहे. अहिंसा मानवी तर हिंसा दानवी आहे. ज्या क्षणा- पासून मनुष्य अहिंसेला विसरला तेव्हापासूनच तो दानवरूप बनू लागला आहे आणि त्या दानवतेचा अभिशाप या जगाला भोगावा लागत आहे. असे असूनहि हे सत्य मानवप्राणी अद्यापि लक्षात घेत नाही. परंतु आता ते सत्य समजण्यास मानव जातीस फारसा काळ लागणार नाही; कारण या सर्व आपत्तीवर अहिंसा हा एकच अमोघ उपाय आहे, दुसरा उपाय नाही.

संसारातील प्राणिमात्रांना शांतीची इच्छा आहे, याचा अर्थ असा की, प्रत्येक जीव सुख–शांतीचा इच्छुक असून मरण्याची कोणालाच इच्छा नाही. अत्यंत दुःखी प्राणी सुद्धा जिवंत राहण्याची इच्छा करतो. सर्वांनाच आपले जीवन केवळ प्रियच आहे असे नाही, तर ते अत्यंत प्रिय आहे. याप्रमाणे अशा प्रियतम वस्तूला जो नष्ट करतो तो हिंसक आहे, दानव आहे, पातकी आहे, आणि जो तिचे रक्षण करतो, प्रसंगी आपल्या प्राणाचे बलिदान करूनहि दीनदुःखितांना वांचवितो, त्यांना जीवनदान देतो तो अहिंसक आहे, तो खरा मानव आहे. या मानवतेचे मूल्य तोच योग्य प्रमाणांत जोखू शकतो की, ज्याच्या प्राणांवर कधी काळी बेतलेले असते. ज्यांना केवळ दुसऱ्याला मारणे, पीडा देणे, एवढेच समजते, अशा हिंसानंदी लोकाकडून या परम उपकारी प्रवृत्तीची अपेक्षा कशी करावी ? एक म्हण आहे "जाके पैर नहिं फटी बिवाई, वह क्या जाने पीर पराई ?" अर्थात् ज्याला आपल्या जीवनात घोर दुःखाचा कधी अनुभव आलेला नाही, एखाद्या आततायी माणसाने जो पर्यंत त्याच्यावर तरवारीचा आघात झालेला नाही, तो दुसऱ्यांना मारण्यात किंवा त्यांना संत्रस्त करण्यात काय दुःख होते, हे काय जाणू शकतो ? जर कधीकाळी आपल्या जीवनावर बेतलेल्या दुःखद घटनापासून मानवानी कांही धडा घेतला असता, तर आज एक मनुष्य दुसऱ्याच्या नरडीचा घोट घ्यावयाला इतका हपापला नसता ? परंतु मनुष्य इतका स्वार्थी आहे किंवा त्याची स्वार्थमूल प्रवृत्ति इतकी प्रबल आहे की, तो स्वतः जिवंत राहण्याची इच्छा तर करतोच, परंतु दुसऱ्याच्या जीवनाची काडी मात्रहि पर्वा करीत नाही. दारूच्या नशेमध्ये भरधांव वेगाने मोटार हांकणारा ज्या सडकेवरून मोटार चालवितो त्याच सडकेवरून जाणारे दुसरेहि प्राणी आहेत, ते ह्या भरधांव वेगाने धावणाऱ्या मोटारीखाली मरतील, याची जशी तो पर्वा

करीत नाही; बेदरकारपणे मोटार चालवितो त्याचप्रमाणे दुसऱ्या प्राण्यांना पीडा देणारा हा मनुष्यहि आपल्या विकाराच्या धुंदीतच मग्न असतो. त्याला आपल्या जीवनाची, चैनीची व सुखाची चिंता आहे; पण दुसऱ्याला कोरडी कोरभर भाकर न मिळाली तरी 'चालेल. पण मला मात्र चांगले स्वादिष्ट रुचकर पदार्थ खाण्यास मिळावेत असे त्यास वाटते. माझा खजिना निष्कारण मनोगणती सोन्यारुप्यांनी खच्चून भरलेला असावा, याचिंतेत चूर असतो; दुसऱ्याच्या शरीरावर लज्जा-रक्षणासाठी वीटभर चिंधीहि नसते याची तो पर्वा करीत नाही. माझी सावकारी शेकडो लोकांना गरीब बनवीत असली अगर माझ्या भोग-विलासासाठी दुसऱ्याच्या प्राणावर बेतत असले तरी 'मला काय त्याचे!' अशा आपल्या नादत असतो. आपले साम्राज्य वाढविण्याच्या धुंदी-मध्ये देशामागून देश पिळले गेले अगर बेचिराख झाले तरी त्याला त्याची यत्किंचितहि पर्वा वाटत नाही. व्यक्ति, समाज आणि राष्ट्र यांच्या या असल्या भावनाच, दुसऱ्या व्यक्ति, समाज व राष्ट्र यांना धुळीला मिळवित आहेत. त्यामुळे कोणालाच सुखाची झोप येत नाही. परस्परातील अविश्वासाची तीव्र भावना रात्रंदिवस मनुष्याच्या व्याकुळ करते, दुसऱ्याचा गळा कसा दाबावा या संधीची वाट पाहात बसणारेच पुष्कळ! हा सर्व हिंसक मनोवृत्तीचा दुष्परिणाम असून सर्व जगाला त्याचा त्रास भोगावा लागत आहे. यापासून वाचण्याचा एकच उपाय आहे आणि तो म्हणजे 'जगा व जगू द्या' हा मंत्र या-शिवाय जगात शांति नांदू शकणार नाही,

कांही लोक अहिंसा ही भित्रेपणाची जननी आहे, अशी कल्पना करतात; तर कांही लोक ही चांगली आहे असे मानूनहि ही अशक्य कोटीतील आहे अशी कल्पना करतात. त्यांचे असे मत आहे की,

अहिंसा ही पुष्कळ चांगली असली तरी प्रत्यक्ष आचारात ती उतरू शकत नाही; ती खरोखर पाळली जाऊ शकत नाही. परंतु या दोन्ही समजुती चुकीच्या आहेत. अहिंसेच्या पोटी भित्रेपणा जन्मासहि येत नाही व तिचे पालन करणेहि वाटते इतके अशक्य नाही· अहिंसेवर हिंसा न करण्यास 'अहिंसा' म्हणतात. परंतु केवळ आपल्या हातून दुसरा प्राणी मेला अगर दुःखी झाला एवढ्यावरूनच त्या कृतीस हिंसा म्हणत नाहीत. जोपर्यंत हिंसारूप परिणाम होत नाहीत, तोपर्यंत त्यास हिंसा म्हणत नाहीत. या जगात सर्वत्र जीव भरलेले आहेत व ते आपआपल्या निमित्तानें मरतातहि. पण जोपर्यंत आपले हिंसारूप भाव झालेले नाहीत, तोपर्यंत जैनधर्मानुसार ती हिंसा म्हणविली जात नाही. म्हणजेच जोपर्यंत आपण प्रमादाने वागत नाही अगर प्रयत्नपूर्वक हिंसा टाळण्याचा प्रयत्न करीत आहोत, तोपर्यंत केवळ दुसऱ्याचा घात झाला, एवढ्यावरून त्याला हिंसक म्हणता येणार नाही.

सारांश हिंसा दोन प्रकारनी संभवतो; पहिली कषायाना बळी पडून झालेली; म्हणजे जाणून बुजून बुद्धिपुरस्सर केलेली व दुसरी अयत्नाचार पूर्वक किंवा गैर सावधपणामुळे झालेली. क्रोध, मान, माया लोभाना बळी पडून एखादा मनुष्य जेव्हा दुसऱ्यावर आघात करतो, तेव्हा ती कषाय पूर्वक झालेली हिंसा असून गैरसावधपणामुळे जर कोणाचा घात झाला, अगर कोणास त्रास, इजा झाली, तर ही अयत्नाचार मूलक हिंसा होय. परंतु जर कोणी एखादा मनुष्य सावधानतेपूर्वक आपले कार्य करीत असेल, आणि कोणालाहि त्रास किंवा पीडा देण्याची त्याची भावना नसेल व अशाच्या हातून जर कोणाचा घात झाला तर त्यास हिंसक म्हणता येत नाही. ही गोष्ट स्पष्ट करताना शास्त्रकारांनी लिहिले आहे की,–

"उच्चालिदम्मि पादे इरियासमिदस्स णिग्गमट्ठाणे ।
आवादेज्ज कुलिंगो मरेज्ज तं जोगमासेज्ज ॥
ण हि तस्स तण्णिमित्तो बंधो सुहुमो वि देसिदो समये" । प्रवचन-२९२।

अर्थात्– जो मनुष्य समोर पाहून वाटेने चालू लागला आहे, त्याचे पाऊल उचलल्यावर जर एखादा जीव त्याच्या पायाखाली योगायोगाने आला व जर मेला, तर त्या मनुष्यास तो जीव मेल्याबद्दल यत्किंचितहि पापबंध नाही.

उलटपक्षी कोणी मनुष्य बेसावधपणाने कार्य करू लागून, तो आपल्या कृतीमुळे कोणाचे कांही नुकसान होईल काय किंवा कोणाच्या प्राणावर बेतेल काय याची काडीमात्रहि पर्वा करित नाही, अशा मनुष्याच्या हातून एखादा जीव जरी मेला नाही, तरी तो पापाचा भागीदार आहे.

"मरदु व जीवदु जीवो अजदाचारस्स णिच्छिदा हिंसा ।
पयदस्स णत्थि बंधो हिंसामेत्तेण समिदस्स ॥१७॥ –प्रवचन०

अर्थात्– जीव जगो वा मरो, गैरसावधपणाने काम करणाऱ्यास हिंसेचे पातक निश्चित लागतेच. परंतु जो सावधगिरीपूर्वक काम करतो, त्याच्या हातून प्राणीवध झाला, तरी त्यास हिंसेचे पातक लागत नाही.

अहिंसेच्या या व्याख्येनुसार आपल्या हातून कोणाचा घात झाला अगर दुःख पोहोचले तरीहि जोपर्यंत आपले भाव त्यास दुःखी करण्याचे नाहीत किंवा आपले कार्य आपण गैरसावधपणाने करीत नाही, तोपर्यंत ती घडलेली हिंसा, 'हिंसा' म्हणविली जात नाही. उलटपक्षी जर एखाद्यास आपले मारण्याचे किंवा दुःख देण्याचे भाव असतील व प्रयत्न करूनहि आपली ती इच्छा फलद्रूप झाली नाही तरी तरी आपण मात्र अशा स्थितीत हिंसकच ठरले जाऊ. कारण जो दुसऱ्याचे वाईट करू इच्छितो, तो आपले अगोदर स्वतःचे वाईट

करतो. कारण म्हटलेच आहे की,–

'स्वयमेवात्मनाऽऽत्मानं हिनस्त्यात्मा प्रमादवान् ।
पूर्वं प्राण्यन्तराणां तु पश्चाद् स्याद्वा न वा वधः ॥ '–सर्वार्थ २०६ ।

अर्थात्– प्रमादी मनुष्य प्रथम आपला स्वतःचा आपण स्वतःच घात करतो, मग त्याचेकडून दुसऱ्या प्राण्यांचा घात होवो वा न होवो.

हिंसा-अहिंसेची स्पष्ट कल्पना यावी, यासाठी जैनधर्मात हिंसेचे दोन विभाग करून वर्णन केले आहे. एक द्रव्यहिंसा व दुसरी भावहिंसा. जेव्हा दुसऱ्याला मारण्याचे वा सतावण्याचे किंवा बेसावधपणाचेहि भाव नसतात पण दुसऱ्या जीवांचा मात्र घात होतो, तेव्हा ती द्रव्यहिंसा होय व जेव्हा कोणास मारण्याचे किंवा सतावण्याचे किंवा गैर–सावधपणाचे भाव असतात तेव्हा प्रत्यक्षात जीव मरो वा न मरो ती भावहिंसा म्हटली आहे. वास्तविक पाहातां भावहिंसा हीच खरी हिंसा आहे, भावहिंसेबरोबर द्रव्यहिंसेचा संबंध असल्यामुळे द्रव्यहिंसेला 'हिंसा' म्हटले आहे इतकेच. परंतु द्रव्यहिंसा झाली; जीवघात झाला, एवढ्यावरून भावहिंसा अवश्यभावी होईलच, असे मात्र नाही. कारण ज्यावेळी मनुष्याच्या हातून कोणाचा घात होतो किंवा कोणास त्रास पोहोचतो तेव्हा त्या मनुष्याचें भाव त्यास तसे पीडण्याचे होते असे एकांताने ठामपणे म्हणता येत नाही. म्हणून जेव्हा कर्त्याच्या मनांत हिंसा करण्याचा उद्देश असेल, तेव्हा ती हिंसा हिंसा आहे. मग त्याच्या हातून कोणी मरो अगर न मरो. उलटपक्षी त्याच्या मनांत जर कोणाची हिंसा करण्याचे भाव नसतील तर त्याच्या हातून एखाद्याचा प्राण गेला तरी ती हिंसा होऊ शकत नाही. द्रव्यहिंसा व भावहिंसा यातील या प्रकारचा हा फरक लक्षांत घेतला नाही तर कोणीच अहिंसक ठरू शकणार नाही व अशी शंका उत्पन्न होईल की,–

' जले जन्तुः स्थले जन्तुराकाशे जन्तुरेव च ।
जन्तुमालाकुले लोके कथं भिक्षुरहिंसकः ॥ '

अर्थः– जळी, स्थळी, इतकेच काय पण सर्व आकाशांत जीवजंतु खचाखच भरलेले आहेत. तेव्हा सर्व जग येथे जंतूंनी भरलेले आहे, तेथे कोण मुनी कसा बरे अहिंसक असू शकणार?

या शंकेचे उत्तर खालील प्रमाणे दिले आहे.

' सूक्ष्मा न प्रतिपीडयन्ते प्राणिनः स्थूलमूर्तयः ।
ये शक्यास्ते विवर्ज्यन्ते का हिंसा संयतात्मनः ॥'

जीव दोन प्रकारचे आहेत; सूक्ष्म व बादर किंवा स्थूल. जे जीव सूक्ष्म म्हणजे अदृश्य आहेत ते कोणाकडून रोकले जाऊ शकत नाहीत व स्वतःहि दुसऱ्याला रोकूं शकत नाहीत. त्यांना कोणीहि पीडा देऊ शकत नाही. पण जे स्थूल जीव आहेत त्यांचे रक्षण केले जाऊ शकते. म्हणून त्यांच्या रक्षणासाठी आपण स्वःतंस संयमी करून सावधानते– पूर्वक त्यांच्या रक्षणासाठी जो जगतो, त्यास हिंसेचे पातक कसे बरे लागेल?

ह्यावरून हे स्पष्ट आहे की, जो मनुष्य जीवाची हिंसा करण्याचा भाव ठेवीत नाही, उलट त्यास वांचविण्याचेच भाव ठेवतो आणि आपले प्रत्येक काम, दुसऱ्या जीवास कसल्याहि प्रकारचे कष्ट पोहचणार नाहीत, अशा सावधानतेने करतो, त्याचेकडून झालेल्या द्रव्यहिंसेचे पाप त्यास लागत नाही. म्हणून (यावरून) जैनधर्माची अहिंसा ही भावनेवर अवलंबून आहे आणि कोणीहि समजुतदार मनुष्य तिला अव्यवहारी (अयोग्य) म्हणू शकणार नाही. मनुष्याकडून अशी अपेक्षा केली जाते की, त्याने आपल्या स्वार्थासाठी दुसऱ्याला त्रास देण्याचे भाव मनामध्ये आणू नयेत आणि आपला उदरनिर्वाह अशारीतीने

करावा की ज्यामुळे कमीत कमी जीवाचे कमीत कमी नुकसान होईल.

अहिंसा हे तत्त्व व्यवहार्य बनविण्यासाठी ज्याप्रमाणे हिंसेचे द्रव्यहिंसा व भावहिंसा हे दोन भेद केले गेले आहेत, त्याचप्रमाणे अहिंसेचेहि अनेक भेद आहेत. प्रथमतः गृहस्थ आणि साधु यांच्या मर्यादा निराळी व साधूच्या अहिंसेची मर्यादा निराळी आहे. जी एका-करीता व्यवहार्य आहे, ती दुसऱ्याला अव्यवहार्य आहे. कारण दोघाचे पद व दोघांची जबाबदारी ही भिन्न भिन्न आहेत. तसेच गृहस्थाच्या दृष्टीनेहि या अहिंसेचे अनेक प्रभेद आहेत. त्या मर्यादा व तिचे भेद प्रभेद लक्षात घेतले, जर जैनी अहिंसा ही अव्यवहार्य आहे असे दोपारोपण कोणीहि करणार नाही, असा आम्हास विश्वास आहे,

## ❊ गृहस्थांची अहिंसा. ❊

हिंसेचे चार प्रकार मानले आहेत,— १ संकल्पी, २ उद्योगी ३ आरंभी, ४ विरोधी. कांही अपराध नसताना जाणून बुजून कोणी एका जीवाचा वध करणे, यास ' संकल्पी, ' हिंसा म्हणतात उदा— कसाई पशूचा वध करतात. जीवन निर्वाहासाठी व्यापार, शेती वगैरे करणे, कारखाने चालविणे, सैन्यात भरती होऊन युद्ध करणे, इत्यादिकात जी हिंसा होते. तिला २ 'उद्योगी' हिंसा म्हणतात. सावधगिरी ठेऊनहि भोजन वगैरे तयार करतांना जी हिंसा होते, तिला ३ 'आरंभी' हिंसा म्हणतात. आणि आपल्यां किंवा दुसऱ्यांच्या रक्षणासाठी जी हिंसा करावी लागते, तिला ४ ' विरोधी ' हिंसा म्हणतात.

जैनधर्ममताप्रमाणे सर्व संसारी जीवाचे त्रस व स्थावर असे दोन भेद मानलेले आहेत. मनुष्य, पशू, पक्षी, किडे इत्यादि व्यतिरिक्त पृथ्वी, जल, अग्नि, वायु, वनस्पती यांच्यातहि जीव आहे, मातीत किडे वगैरे

तर असतातच; पण खुद्द माती स्वत: पृथ्वीकायिक जीवांच्या शरीराचा पिंड आहे. ह्याचप्रमाणे पाण्याच्या बिंदूंत दुर्बिणीच्या सहाय्याने दिसणारे अनेक जंतु आहेतच. पण त्याशिवाय खुद्द पाणी जलकायिक जीवांच्या शरीराचा पिंड आहे. याचप्रमाणे अग्नी वगैरेच्या बाबतीतहि समजावे. या जीवांना स्थावर जीव म्हणतात. आणि जे चालू, फिरू, उडू, बोलू शकतात; किंवा तसे करतांना दिसतात, ते सर्व त्रस जीव होत. या दोन्ही प्रकारच्या जीवांपैकी स्थावरजीवांचे रक्षण करण्याचा प्रयत्न गृहस्थाने करावा. निष्कारण जमीन खोदू नये. व्यर्थ पाण्याची सांडउबड करीत बसू नये किंवा आग लावू नये. व्यर्थ वारा घेत बसू नये. किंवा निष्कारण झाड किंवा आग लावू नये. व्यर्थ वारा घेत बसू नये. किंवा त्याग सांगितलेला आहे. तसेच गृहस्थांना फक्त त्रस जीवाच्या संकल्पी हिंसेचा त्याग सांगितलेला आहे. या हिंसेचा त्याग केल्याने त्यास सांसारीक जीवनात कोणत्यांहि प्रकारचा त्रास होऊ शकत नाही. कारण संकल्पी हिंसा ही एकतर केवळ करमणुकीसाठी किंवा मजेखातर व दुसरे म्हणजे दुसऱ्यास मारून मांस भक्षणासाठी केली जाते. " जिवंत रहा व दुसऱ्यास जिवंत राहु द्या" हा सिद्धांत विसरून जाऊन केवळ आपल्या करमणुकीसाठी जंगलात इतस्तत: फिरणाऱ्या पशुपक्षी शिकारी शिकार करून त्यांच्या मांसाने आपल्या पोटाची खळगी भरतो; ही एक अत्यंत दु:खाची गोष्ट आहे. अशा प्रकारच्या गोष्टी माणसाने सोडल्यास, त्याच्या आयुष्यात त्याला कांही त्रास सहन करावा लागेल ही गोष्ट शक्य कोटीतील नाही. मनुष्याच्या करमणुकीसाठी इतर साधने कांही कमी नाहीत. अन्न किंवा भाजीपाला यांच्या योगे स्वादिष्ट जेवण करूनहि भूक शमविली जाऊ शकते. आजच्या युगात वैज्ञानिक साधने व शोध यांच्या योगाने सर्वत्र धान्य उत्पन्न केले जाऊ शकते. व अनावश्यक जनावरांची उत्पत्तीहि कमी केली जाऊ शकते. जर

मनुष्य आपल्या स्वतःच्या चरितार्थासाठी जीवांची हत्या करणार नाही असा संकल्प करील, तर तो दुसऱ्या दिशेने आपली अधिक उन्नति करू शकेल.

दुसरी गोष्ट अशी की, मांसाहार हे मनुष्याचे कांही नैसर्गिक भोजन नाही. त्याच्या दातांची रचना याची साक्ष आहे. तसेच दूध तूप व फळे इत्यादींनी जी शक्ति येते, ती मांसाहाराने येतेच असे नाही. 'मांसाहार' हा तामसी आहार आहे. त्याने मनुष्यांच्या सात्विक प्रवृत्तीचा घात होतो. या विषयावर पुष्कळ लिहिण्यासारखे आहे. परंतु त्यास इतके स्थान येथे देता येत नाही. त्याचप्रमाणे शिकार खेळणे, हे मनुष्याच्या निर्दयतेचे द्योतक आहे. वाघ वगैरे हिंसक पशू भुकेने व्याकुळ झाले म्हणजेच इतर जनावरांवर आक्रमण करतात. पण मनुष्याची त्याच्याहिं पुढे मजल गेलेली आहे. तो भीतीने गांगरलेल्या पशूंच्यामागे घोड दौड करून बाण किंवा बंदुकीच्या गोळीने त्यांचा प्राण घेऊनहि आपली करमणूक करून घेतो. कांही लोकांचे म्हणणे असे आहे की, शिकार खेळल्याने अंगी पराक्रम येतो. म्हणून शिकार खेळणे हे क्षत्रियांचे कर्तव्य आहे. कदाचित् क्रौर्य आणि निर्दयता यांनाच त्यांनी वीरत्व मानले असावे. परंतु वीरत्व हे एक आंतरिक शौर्य आहे, की जें वेळोवेळी अन्याय व अत्याचारांचा प्रतिकार करण्यासाठी प्रगट होते व तेजस्वी पुरुषात चमकते. भयग्रस्त होऊन इतस्ततः पळ–णाऱ्या मुक्या प्राण्यांच्या जीवनाचा खेळ खेळणे, हे कांही वीरत्व नाहीं. ही भीति आहे व असे करणारे बहुधा भित्रे असतात. याचे एक उदा–हरण आमच्या पाहण्यात आले आहे. बनारसमध्ये ज्या गल्लीत आम्ही राहतो, ती वस्ती (मल्लाहांची) कोळयांची आहे. इतके क्रूर आहेत की, मोठमोठ्या प्राण्यांना (माशांना) पकडून भाजीपाल्याप्रमाणे कापून

खातात. परंतु त्या भागात जेव्हा हिंदू मुसलमानांचे दंगे झाले त्यावेळेसची त्यांची भितिग्रस्त अवस्था कींव येण्यासारखी होती. आपल्या नावेत बसून कांहीजण नदीच्या पैल तीराला गेले व बाकी राहिलेले लोक जैन विद्यार्थ्यांकडे आपले रक्षण करण्यासाठी प्रार्थना करीत होते. एकूण, मांसाहार व शिकार खेळण्याशी शूर वीरतेचा कांही संबंध नाही; म्हणून असल्या गोष्टीपासून आपण दूर रहावे.

याचप्रमाणे धर्माच्या नांवावर देवीसमोर बकरे, म्हैस, डुक्कर इत्यादीचे बलिदान करणे ही एक मूढता व क्रौर्यच आहे. असल्या कृत्याने देवी प्रसन्न होत नाही. धर्मायतनांना कसाईखाना बनविणे हे केव्हाही भूषणास्पद नाही. म्हणून सर्वप्रथम धर्म, पोट किंवा करमणुकीसाठी कोणत्याहि प्राण्यांचा घात करता कामा नये.

कांही लोकांचे म्हणणे असे आहे की, जैनधर्मानुसार ज्याअर्थी वनस्पती वगैरेही जीवांचे शरीरच आहे, त्याअर्थी मांसाहारी भोजन न करणाऱ्यांनी वनस्पती वगैरेचाहि आहार घेऊ नये. परंतु सप्त धातु युक्त जे शरीर त्यालाच 'मांस' ही संज्ञा आहे. वनस्पतीत असे सप्त धातू नाहीत. त्यामुळे वनस्पतीचा आहार हा मांसाहार नव्हे. तसेच काही लोक स्वत: प्राणी न मारतां आपोआप मेलेल्या प्राण्याचे मांस खाण्यात दोष मानीत नाहीत. ज्या प्राण्याचे ते मांस आहे, त्यास ते मारीत नाहीत, हे खरे आहे परंतु एकतर मांसांत तत्काळ अनेक सूक्ष्म जीवांची उत्पत्ती होते व दुसरे म्हणजे मांस भक्षणापासून जे वाईट परिणाम होतात, त्यापासून मनुष्य आपला बचाव कधीही करू शकत नाही, म्हटलेच आहे की–

'मांसास्वादनलुब्धस्य देहिनो देहिनं प्रति।
हतुं प्रवर्तते बुद्धिः शकुन्य इव दुर्धियः ॥२७॥'– योगशा० ।

अर्थः—ज्याला मांस खाण्याची चटक लागलेली आहे, त्याची बुद्धी दुष्ट पक्षांप्रमाणे दुसऱ्यांना मारण्याकडेच लागलेली असते.

अलीकडे मांस भक्षणाचा बराचसा प्रचार झालेला आहे. त्याचा असा परिणाम झाला आहे की, मनुष्य आपल्या स्वार्थासाठी दुसऱ्या मनुष्याचा दुष्मन बनतो. एकाला दुसऱ्याचा खून करण्यांत थोडासाहि संकोच वाटत नाही. म्हणून असल्या गोष्टीपासून सावध असावे.

याप्रमाणे गृहस्थाने संकल्पी हिंसेचा अवश्य त्याग करावयास पाहिजे. आता उद्योगी, आरंभी व विरोधी हिंसा शिल्लक राहिल्या. खालच्या दर्जाच्या गृहस्थास इतका त्याग करणे शक्य होत नाही. कारण त्याला आपआपल्या कुटुंबाच्या भरणपोषणासाठी कांहीना कांही उद्योग व आरंभ करणे भाग पडते; त्याशिवाय त्याचा निर्वाह होऊ शकत नाही. पण असे करताना दुसऱ्या प्राण्यास कमीत कमी त्रास होईल अशी खबरदारी घ्यावी किंवा असलेच उद्योग करावेत. त्याचप्रमाणे 'विरोधी' हिंसेपासूनहि गृहस्थाची सुटका होऊ शकत नाही. तो स्वतः-हून निष्कारण कोणाशी विरोध करणार नाही; परंतु त्याच्यावर कोणी आक्रमण केले तर त्यापासून स्वतःचा बचाव करण्याचा तो जरूर प्रयत्न करील. आक्रमकांशी सामना न देता भिऊन घरांत लपून बसणे हे अहिंसेचे द्योतक नव्हे. या मानसिक हिंसेपेक्षा प्रत्यक्ष हिंसा पुष्कळ चांगली आहे. जैनशास्त्रांत स्पष्ट सांगितले आहे. 'नापी स्पष्ट सुदृष्टिर्यः स सप्तभिर्भयर्मनाक्' (पञ्चाध्यायी) जो जैन धर्मावर खरी श्रद्धा ठेवतो तो सात प्रकारच्या भयापासून संपूर्णपणे रहित असतो.

जैनधर्माचे सर्व तीर्थंकर क्षत्रियवंशी होते. त्यांनी आपल्या आयु-ष्यांत पुष्कळ दिग्विजय मिळविले. मौर्य सम्राट चंद्रगुप्त, महामेघवाहन सम्राट खारवेल, वीर सेनापती चामुंडराय इत्यादि जैन वीर योद्धे

भारतीय इतिहासांतील उज्वल रत्न होत, वास्तविक जैन धर्म हा त्या क्षत्रियांचा धर्म होता, जे रणांगणावर शत्रूचा सामना तरवारीने कसा करावा हे जाणत होते; आणि त्यावर क्षमा कशी व केव्हा करावी हेही जाणत होते. जैन क्षत्रियाकरिता खालील आदेश होता–

" यः शस्त्रवृत्तिः समरे रिपुः स्याद् यः कण्टको वा निजमण्डलस्य ।
अस्त्राणि तत्रैव नृपा क्षिपन्ति न दीनकानीनशुभाशयेषु ॥"–यशस्तिलक. पृ. ९६

अस्त्रशस्त्राने सुसज्जित होऊन. रणांगणावर शत्रू म्हणून जो आलेला आहे, किंवा जो आपल्या देशाचा शत्रू आहे त्यांच्यावर राजे–लोक शस्त्र प्रहार करतात. कमजोर, भयग्रस्य, सदाचारी पुरुषावर ते आपले शस्त्र कधीही उचलीत नाहीत. ही जैनी राजनीती आहे. म्हणून जे लोक अहिंसा धर्मावर भीतीचा आरोप करतात ते भ्रमांत आहेत. अहिंसेत भीतीला स्थान मुळीच नाही; उलट अहिंसेचा पहिला धडा निर्भयता हा आहे. निर्भयता व कायरता हे एकाच ठिकाणी राहू शकत नाहीत. शौर्य हा आत्म्याचाच गुण आहे. आत्म्याच्या द्वारे जेव्हा तें प्रगट होते, तेव्हा ती अहिंसा समजावी व शरीराच्या सहाय्याने ते शौर्य प्रगट होते, तेव्हा तो वीरता असते. जैनधर्मी अहिंसा ही एकतर वीरतेचा किंवा क्षमतेचा पाठ शिकविते. आपत्तीकाळांत गृहस्थाचे कर्तव्य दाखवित असताना एका जैनाचार्यांनी लिहिलेले आहे.

" अर्थादन्यतमस्योच्चैरुद्दिष्टेषु स दृष्टिमान् ।
सत्सु घोरोपसर्गेषु तत्परः स्यात्तदत्ययम् ॥८१२॥
यद्वा न ह्यात्मसामर्थ्यं यावन्मंत्रासिकोशकम् ।
तावद् दृष्टुं च श्रोतुं च तद्बाधा सहते न सः॥८१३॥"-पञ्चाध्या. ।

अर्थः– धर्माचे आयतन, जिनमंदिर, जिनबिंब इत्यादीपैकी कशा–वरहि संकट आले असतांना खऱ्या जैनाने ते दूर करण्यास तयार

राहिले पाहिजे आणि जोपर्यंत त्याच्याजवळ आत्मबल, मंत्रबल, तारवारीचे बल किंवा धनबल आहे, तोपर्यंत आपल्या आपत्ती, तो उघडया डोळयांनी पाहु व ऐकूहि शकत नाही.

जे धर्मावर आलेल्या आपत्तीच्या प्रतिकाराबाबतीत सांगितलेले आहे, तेच देशावर आलेल्या आपत्तीसंबंधीहि समजावे म्हणून जैन-धर्मानुयायांची सेनेत भरती होऊ शकत नाही किंवा युद्ध करु शकत नाही असे जे समजतात ती त्यांची भ्रामक कल्पना आहे. अलिकडे जैनधर्मी लोक बहुतांशी वैश्य आहेत; आणि अनेक शतकापासून चालत आलेले त्यांच्यावरील अत्याचार, त्रास व संकटे यामुळे ते मित्रेहि बनलेले आहेत. पण हा अहिंसा धर्माचा दोष नाही. भारतावर जोपर्यंत अहिंसा धर्मीय जैनांचे राज्य होते, तोपर्यंत भारत गुलाम झालेला नव्हता. ते मरणे जाणत होते व प्रसंगी मारणेहि जाणत होते. परंतु रणातून पराग्डमुख होऊन पळणे त्याना माहित नव्हते. प्राणांच्या मोहाने कर्तव्यच्युत होणे, हीच मोठी हिंसा होय.

एकेवेळी गीतेमध्ये सांगितलेल्या अर्जुनाच्या व्यामोहा बद्दल, एका लेखकाने लिहिले आहे की, "अर्जुनाचा आदर्श अनार्यांचा-बौद्ध व जैनांचा-मार्ग आहे तो आर्यांचा-हिंदु जातीचा कदापीहि होऊ शकत नाही-" लेखकाने या आदर्शास जैनाचा आदर्श कसे मानले हे समजू शकत नाही. गीतेवरून हे स्पष्ट आहे की अर्जुन हिंसेच्या भयाने युद्धापासून पराग्डमुख होत नव्हता; तर आपले भाऊबंध व आपले कुळ यांचा सत्यनाश होईल, या भीतीने तो कर्तव्यच्युत होऊ लागला होता. अर्जुनाच्या हृदयांत अहिंसेची ज्योत पेटलेली नव्हती; की जिच्या प्रकाशात मनुष्य प्राणिमात्रांना आपला बंधु व सर्व विश्व आपले कुटुंब तो समजू शकेल. त्याच्या हृदयांत कौटुंबिक मोहाचें साम्राज्य थैमान

घालीत होते; त्याच्यापुढे अहिंसेचा आदर्श नव्हता. अहिंसा कर्तव्यच्युत करीत नाही. परंतु कर्तव्याकर्तव्याचा बोध करवून माणसास आपल्या कर्तव्यावर दृढ राहण्यास शिकविते व म्हणून अहिंसा ही अव्यवहार्य नाही; व ती भीति अगर निर्बलतेची जननीहि नाही. तिची मर्यादा. व्याख्या व शक्ती यांच्याशी जो परिचित आहे तो असे म्हणण्याचे साहस कदापीहि करणार नाही.

## ५ श्रावकाचे चारित्र.

जैनशास्त्रांत, जैनसंघाचे चार विभाग सांगितलेलें आहेत.–१ मुनी, २ आर्यिका, ३ श्रावक, ४ श्राविका. श्रावक म्हणजे पुरुष–गृहस्थ; व श्राविका म्हणजे स्त्री–गृहस्थ. जैनगृहस्थांना श्रावक म्हणतात. त्याचा अपभ्रंश 'सरावगी' हा शब्द कांही कांही ठिकाणी प्रचलित आहे. जैनसंघांत श्रावक व श्राविकांचे महत्वपूर्ण स्थान आहे. कारण त्यांच्या–शिवाय मुनीचा आश्रम चालूच शकणार नाही. शिवाय त्यांच्या–तूनच तर पुढें मुनि किंवा आर्यिका होतात. म्हणून जैनगृहस्थाचा आचार हा एकप्रकारे मुनीच्या आचाराचा पाया आहे; व त्यावरच कालांतरानें मुनीच्या आचाराचा भव्य प्रासाद उभा राहतो. म्हणून खरा जैनगृहस्थ हा एक आदर्श गृहस्थ असतो.

जो न्यायाने धन मिळवितो, गुणी जनांचा आदर करतो, गोड वाणी बोलतो, एकमेकास विरोध येणार नाही अशा रीतीने जो धर्म अर्थ व काय पुरुषार्थाचे सेवन करतो, जो विनयशील आहे, योग्य असा आहार विहार ज्याचा आहे, जो सज्जन संगतीत असतो, तसेच जो शास्त्रज्ञ, कृतज्ञ, दयाळु, पापभीरु आणि जितेंद्रिय आहे, तो गृहस्थ धर्माचे खरे पालन करतो असे जैनशास्त्रांत सांगितले आहे. ज्या गृहस्थांत इतके गुण असतील तो अगदी आदर्श गृहस्थ असेल यांत

कांहीच शंका नाही. अशा प्रकारचे सद्गृहस्थ जर पृथ्वीतलावर असतील तर ही पृथ्वी स्वर्गापेक्षाहि वरचढ बनेल, परंतु मनुष्याची भोगलालसा स्वार्थप्रवृत्ति ह्या इतक्या प्रबळ आहेत की, तो आपल्या सद्गुणांना विसरला असून काम व अर्थपुरुषार्थाच्या पाठीमागे तो लागलेला आहे. जणू ते त्याचे आराध्य दैवतच बनले आहे. तो धर्माचरणहि करीत असला, तरी आराध्य दैवत असलेल्या अर्थ व काम या आराध्यांच्या पूर्तीसाठीच त्यांच्या नादी लागून तो न्यायान्यायाचा कांहीहि विचार करीत नाही. त्याला दयेची आस्था व पापाची भीतिहि वाटत नाही. इंद्रियांचा तो दास बनलेला आहे आणि त्याच्याच तृप्तीसाठी तो सर्व कांही करतो. असो,

जैनगृहस्थाचे आठ मुलगूण आहेत,– अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह यांचे एकमेव (अंगत:) पालन; त्याचप्रमाणे मद्य, मांस, मधु यांचा संपूर्णपणे त्याग; झाडाची मुळी झाड वाढविण्यास ज्याप्रमाणे कारणीभूत होते, त्याचप्रमाणे गृहस्थाची सर्व प्रगति या गुणावर अवलंबून असल्यामुळे यास मुलगूण असे म्हणतात. याच्याशिवाय कोणताहि जैन, ‘ श्रावक ’ म्हणविला जात नाही.

### १ अहिंसाणुव्रत

जैनमताप्रमाणे त्रस आणि स्थावर असे दोन प्रकारचे जीव आहेत. चालणारे, फिरणारे असे मनुष्य, पशु, पक्षाप्रमाणे असणारे जीवजंतु हे त्रस जीव होत; आणि पृथ्वी जल अग्नी वायु वनस्पतीरूप जीवांना स्थावर म्हणतात. स्थावर जीवांच्या हिंसेचा त्याग गृहस्थ करूच शकत नाही कारण त्यास त्याच्या जीवननिर्वाहासाठीच या सर्व वस्तूची आवश्यकता असते. तरीहिपण त्यांना निष्कारणच त्रास होऊ नये यासाठी पुढे सांगितल्याप्रमाणे सावधगिरी ठेवतोच. आता राहिले त्रस. या जीवांची हिंसाचार

प्रकारची आहे. संकल्पी, आरंभी, उद्योगी व व विरोधी. यांच्यापैकी केवळ संकल्पी हिंसेचा त्याग गृहस्थ करू शकतो. त्याची माहिती पूर्वी आलेली आहेच. शास्त्रकारांनी लिहिले आहे.

" इत्यनारम्भजां जह्याद् हिंसामारम्भजां प्रति ।
व्यर्थस्थावरहिंसावद्यतनामावहेद् गृहीं ॥ १० ॥ " –सागारधर्मा०

अर्थ– आरंभाशिवाय इतर कार्यामध्ये होणारी जी हिंसा ती गृहस्थाने सोडून द्यावी, व शेती, आरंभादिक कार्यामध्ये निष्कारण होणारी जी हिंसा, ती यथाशक्ती सोडण्याचा प्रयत्न करावा.

आरंभक्रियेमध्ये होणाऱ्या हिंसेशिवाय मनोरंजनासाठी, जिव्हा लौलुप्यासाठी, कातड्याचे जोडे बनवावे म्हणून अगर धर्माच्या नांवावर जी पशुहत्या होते ती सर्व श्रावकांनी सोडावी त्याचप्रमाणे जिवंत पशूना मारून त्याच्या ताज्या व मऊ बनलेल्या वस्तूचाहि गृहस्थाने त्याग करावा. कारण त्यामुळे त्यांच्या वधास प्रोत्साहन मिळते त्याअर्थी गृहस्थास आपले जीवन व्यतीत करणे क्रमप्राप्त आहे. व ते जीवन कांही उद्योग धंदा केल्याशिवाय चालू शकत नाही, त्याअर्थी आरंभी हिंसा ही गृहस्थासाठी अपरिहार्य आहे. परंतु गृहस्थाने अशा प्रकारचा उद्योग करावा की, त्यामध्ये कमीतकमी जीवाचा घात होईल; व तितकाच उद्योग करावा की, जितका त्याच्या निर्वाहास आवश्यक आहे. कारण जो गृहस्थ थोडा आरंभ व थोडा परिग्रह यातच संतुष्ट असतो, तोच अहिंसाणुव्रताचे पालन करू शकतो. ज्याला रात्रंदिवस धनाची चिंता लागलेली आहे, रोज नवनवे कारखाने काढून धनसंग्रह करण्याकडे ज्याची प्रवृत्ति आहे व आपल्या अधिकाऱ्यांना व नोकर–चाकरांना कमीतकमी वेतन देऊन त्यांच्याकडून अधिकाधिक काम करून घेतो; न्यायान्यायाचा कांहीहि विचार करीत नाही, तो अहिंसेचे

पालन काय करील? समाधानी माणसासाठीच अहिंसा आहे असंतुष्ट मनुष्य कधीच अहिंसक होऊ शकत नाही. गृहस्थाचे हे कर्तव्य सांगितले आहे की, आपल्यावर अवलंबून असणाराना व नसणाऱ्यांनाहि भोजन देऊन मग स्वतः भोजन करावे. समाधानी मनुष्यच तसे करू शकेल. असमाधानी मनुष्य तर प्रथम आपल्या पोटापेक्षा आपली तिजोरी भरण्याचा प्रयत्न करील, त्याच्या दृष्टीने आश्रितांच्या चिंता व्यर्थ आहेत. आश्रितांना मी पैसे देऊन त्यांना कामाला लावले आहे, प्रत्येक महिन्यात त्यानुसार त्याला पगार दिला जातो, त्यात त्याचे त्यांच्या मुलाबाळाचे पोट भरो वा न भरो; एवढ्या पगारात ते काम करीत नसतील तर आम्ही दुसरे लावू, इतक्यात काम करणारे कांही दुसरे कमी नाहीत. अशा विचारांचा मनुष्य खरा व्यापारी असला, तरी तो अहिंसक व्यापारी नाही. जो आपल्याप्रमाणेच आपल्या अवलंबितांचीहि काळजी घेतो व त्याच्यावर जुलूम जबरदस्ती न करता योग्य समयी भरपूर भोजन देतो व त्यांच्या शक्तीप्रमाणेच त्यांना काम देतो, तोच खरा अहिंसक व्यापारी होय. ही गोष्ट आपले आश्रित मनुष्य आणि पशु या दोघांच्या बाबतीत समानतेने लागू आहे. जैनाचार्यांनी अहिंसेचे पांच दोष सांगितलेले आहेत. व ते दूर करण्याची ताकीद दिलेली आहे; ते दोष याप्रमाणे आहेत.–

१) दुष्ट मनुष्य किंवा पशूना दोर वगैरेनी बांधणे, रागात येऊन कांही मालक आपल्या नोकर चाकरांना बांधवितात; परंतु पाळीव पशु बांधल्याशिवाय राहू शकत नाहीत. म्हणून त्यांना अशा रीतीने बांधावे की, घरास आग वगैरे लागली तर ते बंधन सोडवून घेऊन त्यांना पळता येईल. २) क्रूरतेने काठी किंवा कोरड्याने मारणे ३) दुष्ट बुद्धीने कोणाचे नाक, कान, दात पाय वगैरे अवयव कापणे; परंतु कोण्या पशु किंवा मनुष्यांच्या शरीराचा एखादा अवयव सडला

असेल किंवा शरीरास फोड झाला असेल तर कापण्यांत अगर चिरण्यात दोष नाही. ४) रागांत येऊन किंवा लोभाने मनुष्य किंवा पशूवर त्याच्या शक्तीपेक्षा जास्त ओझे लादणे किंवा शक्तीबाहेरचे काम करविणे, मनुष्य स्वतः उचलून जितके ओझे घेऊन जाऊ शकेल व खाली उतरवून घेऊ शकेल तितकेच ओझे त्यास श्रावकाने उचलण्यास व ठेवण्यास सांगावे. त्याचप्रमाणे काळाचेहि अवधान त्याने अवश्य ठेवावे ठराविक (योग्य) वेळेपर्यन्तच त्यांच्याकडून काम करवून घ्यावे. श्रावक जर शेती करीत असेल, तर त्याने नांगर अगर गाडीस बैलांना योग्य वेळेपर्यन्त जुंपावे व योग्य वेळी सोडावे, शक्तीपेक्षा अधिक काम करवून घेणे ही हिंसा आहे. ५) तहान-भुकेने संत्रस्त झालेला प्राणी मरूनहि जातो म्हणून कोणाचे खाणे-पिणे रोकू नये. कोणी एखादा अपराध केला असेल तर त्याला भिवविण्यासाठी तुला आज भोजन मिळणार नाही असे पाहिजे तर म्हणावे. परंतु भोजनाची वेळ आली की त्यांना खाऊ घालूनच आपण खावयास पाहिजे. किंवा एखादा कोणी आजारी असेल किंवा स्वतःहून उपवास करीत असेल तर ती गोष्ट निराळी. म्हणून श्रावकाने या गोष्टी लक्षात ठेवाव्या की आपल्या अहिंसाव्रतांत कांही दोष येणार नाही, असा व्यवहार ठेवला जाईल.

अहिंसाव्रती श्रावक आपल्या आश्रितांच्या बरोबर जर असा व्यवहार ठेवील, तर त्याला आर्थिक दृष्टीनेहि लाभ होईल; कारण प्रेमळ व्यवहारानें कार्यकारीगण त्याचे काम आपले आहे. असे समजून मन लाऊन त्याचे काम करतील व त्याचे नफा नुकसान हे आपलेच नफा नुकसान आहे असे समजतील याप्रमाणे अहिंसामूळ व्यवहार हा स्वार्थ व परमार्थ या दोन्ही दृष्टीनी फायदेशीर आहे. जमीनदार व मिलमालकांनी (कारखानदारांनी) आपल्या आश्रित शेतकऱ्याशी व मजूराशी असा प्रेमळ व्यवहार ठेवला असता तर दोन्ही

पक्षांत जी ओढाताण व कटुता दिसते, ती दिसली नसती व जमीन-दारी किंवा कारखान्यावर सरकारी नियंत्रणाची गोष्टहि उद्‌भवली नसती.

## -रात्रि-भोजन त्याग व जलगालन.

अहिंसाव्रती श्रावकाने रात्री भोजन करू नये व पाणीहि कपड्याने गाळूनच उपयोगात आणावे. रात्री भोजन करण्याचे दुष्परिणाम वर्तमान पत्रातून अनेकदा प्रकाशित होतात. उदा० चहाच्या किटलीत पाल जळून गेल्यामुळे चहा पिणारांचे मरण ऐकण्यात येते. कधी कधी एखाद्या मोठ्या पंक्तींत भांड्यांत साप पडून गेल्यामुळे मनुष्याचे मरण ऐकण्यांत येते. दरवर्षी अशा दोन चार घटना होतात. परंतु अजूनहि माणसाचे डोळे उघडत नाहीत. नेहमी दिवसाच्या प्रकाशांत काळजीपूर्वक पाहूनच भोजन करावयास पाहिजे. एकतर रात्रीच्या वेळी अगदी तेजस्वी असा प्रकाशहि दिवसाच्या प्रकाशाइतका तेजस्वी असत नाही; आणि सूर्य प्रकाशात इतस्तत, लपून बसलेले जीवजंतु रात्र होताच आपल्या अन्नाच्या शोधार्थ बाहेर पडतात. कृत्रिम प्रकाश त्यांना रोकू शकत नाही उलट जास्त तेजस्वी प्रकाशाने पतंग वगैरे किडेहि अधिक उत्पन्न होतात व भोजन करणाऱ्याच्या ताटांत ते टपटप पडू शकतात. हल-वायाच्या दुकानावर रात्री जाऊन पाहिले तर भट्टीवर दुधाची कढई ठेवलेली असते व वर विजेच्या दिव्याभोवती अनेक किडे फिरत असतात व ते कढईमध्ये पडतात. तिच्या जवळच या किड्यांच्या शिकारीसाठी पाल बसलेली असते. तीहि कधी कधी दुधांत पडतेच. एकदा अशाच प्रकारच्या दुधाच्या दह्याची लस्सी एकजण प्याला तेव्हा त्याची स्थिती अत्यंत वाईट झाली भोजनांत एखादा जीवजंतु गेला तर जर्जर रोग होतो किंवा कुष्टांसारखे रोग होतात. तसेच वैद्यक शास्त्राच्या नियमानुसार भोजन झाल्यानंतर तीन तासांनी जेव्हा

अन्नाची पचन क्रिया सुरू होते, त्यावेळेस निजावयास पाहिजे. परंतु जे लोक रात्री भोजन करतात; ते बहुधा भोजन झाल्यावर थोड्याच वेळांत झोपु लागतात. त्यामुळे स्वास्थ खराब होते. म्हणून आरोग्याच्या दृष्टीनेहि दिवसा भोजन करणे हिताव आहे.

त्याचप्रमाणे नेहमी पाणीहि गाळूनच उपयोगात आणावे. न गाळलेल्या पाण्यात किडे असले तर ते पोटांत जाऊन अनेक प्रकारचे त्रासदायक रोग उत्पन्न होतात. ज्यावेळेला कॉलरा वगैरे सारखे रोग पसरतात तेव्हा पाणी गरम करून पिण्याचा नेहमी आदेश दिला ज तो. वास्तविक गरम पाणी कधीही विकार करीत नाही जैनसाधु नेहमी गरम पाणीच पितात. पण जैनगृहस्थांना मात्र गरम पाणी पिण्याचा नियम सक्तीचा नाही. पाणी गळून वापरण्याचा मात्र सक्तीचा आहे. न गाळलेल्या पाण्यापेक्षा गाळलेले पाणी हे अधिक साफ असते व गाळलेल्या पाण्यापेक्षां गरम पाणी शुद्ध असते. आजकाल तर जागोजागी नळ लावलेले आहेत परंतु नळाचेहि पाणी गाळूनच वापरावयास पाहिजे. त्यापाण्यांतहि माती वगैरे मिसळलेली असते. गाळले असताना ती कपड्यावर जमा होत असलेली दिसतेत. म्हणून पाणी नदीचे असो, नळाचे असो, अगर विहीरीचें असो ते गाळूनच वापरावयास पाहिजे. त्यामुळे पुष्कळशा रोगापासून, कष्टांपासून आपला बचाव होतो. एकदा वर्तमान पत्रात मुरादाबाद जिल्ह्याची घटना प्रकाशित झालेली होती. एक मुलगा रात्री बाजेखाली पाणी ठेवून निजला त्या पाण्यांत विंचू पडला त्या मुलास रात्री तहान लागली व न बघतांच तो पाणी पिऊ लागला, तो विंचू त्याच्या तोंडांत गेला व जबड्याला डंख मारू लागला, मुलगा सारखा तळमळू लागला; पुष्कळसे उपचार केले पण आंत चिकटलेला विंचू कांही बाहेर निघू शकला नाही, सरतेशेवटी त्या मुलाचे तडफडत तडफडतच प्राणोत्क्रमण

झाले. अशा दुर्घटना लक्षात घेऊन रात्री भोजन न करणे व पाणी गाळून पिणे असे नियम आपण अवश्य पाळावयास पाहिजेत. धार्मिक विषयात केवळ धर्माचीच मर्यादा नाहीतर त्यात व्यक्ती व समाजाचे हितहि साठविलेले आहे.

## २ सत्याणुव्रत.

जी गोष्ट जशी पाहिली अगर ऐकली असेल तशीच ती न सांगणें यास सर्वसाधारणतः असत्य मानले जाते. परंतु जैनधर्मात सत्य हे असे कांही स्वतंत्र व्रत नाही तर अहिंसा व्रताचे रक्षण करणे हेच त्याचे लक्ष (ध्येय) आहे. म्हणून जैनधर्मात दुसऱ्याला त्रास पोहोचेल अशा उद्देशाने बोलले जाणारे सत्य वचनहि असत्य समजले जाते. उदा० एखाद्या काण्या माणसास तू काणा आहेस, असे म्हणणे सत्य असले तरी त्यामुळे त्या माणसाच्या मनास इजा पोहोचत असल्यामुळे व त्याला चिडविण्याच्या उद्देशानेच असे म्हटले जात असल्यामुळे हे असत्य भाषणच म्हणविले जाते. या दृष्टीनेच जर एखादे वेळेला सत्य बोलण्यामुळे कोणाच्या प्राणावर संकट येत असेल तर ते सत्य बोलणे सुद्धा चुकीचे आहे, असे जैनमत सांगते. परंतु अशावेळी असत्य बोलून एखाद्याच्या प्राणाचे रक्षण होत असले तरी जर त्याच्या जीवंत रहाण्याने दुसऱ्या प्राण्यांच्यावर संकट येण्याची शक्यता असेल तर या नियमालाहि अपवाद करता येतो. कारण व्यक्तीच्या जीवनाचे रक्षण हे जरी अभिप्रेत असले, तरी त्याच्याकडून होणाऱ्या जुलमाचे अगर अत्याचारांचे रक्षण कोणत्याहि अवस्थेत इष्ट नाही. तसेच अत्याचारापासून सुधारणा व्हावी म्हणून व्यक्तीचा प्राण घेण्यापेक्षा त्यांच्यात सुधारणा करणे हे अति उत्तम. परंतु हे शक्य नसले तर अन्याय किंवा अत्याचारांना सहाय्य देणे हे कधीहि योग्य नाही. व्यक्ती सुधरु

शकतो व म्हणून त्याला तसे करण्याची संधी दिली पाहिजे. प्राण रक्षणासाठी असत्य बोलण्याच्या मुळाशी हाच उद्देश आहे.

असत्य वचनाचे अनेक भेद आहेत– १) व्यक्ती संबंधी खोटी माहिती सांगणे; विशेषतः लग्नादि प्रसंगी विरोधी माणसाकडून विवाह होऊ नये म्हणून मुलीच्या किंवा मुलांच्या बाबतीत खोटयानाटया अनेक कंडया पिकविण्याची प्रथा यातच येते. २) जनावरांसंबंधी खोटे बोलणे उदा० थोडे दूध देणाऱ्या गाईबद्दल खूप दूध देणारी आहे असे सांगणे किंवा प्रकारांतराने उलट बोलणे हेहि यातच समाविष्ट होते. ३) जड पदार्थासंबंधी खोटे बोलणे, उदा० दुसऱ्याची जमीन आपली सांगणे किंवा कर वगैरे चुकविण्यासाठी आपली मालमत्ता दुसऱ्याची सांगणे ४) लाज किंवा लोभाला बळी पडून खऱ्या घटणे विरुद्ध साक्ष देणे. आपल्या जवळ कोणाची ठेव ठेवली असेल तर त्याबाबत खोटे बोलणे; हे किंवा यासारखे दुसरे खोटे भाषण गृहस्थाने बोलु नये त्यामुळे मनुष्याचा विश्वास नष्ट होतो व अनाचारांना प्रोत्साहन मिळते. तसेच ज्यांच्या बाबतीत खोटे बोलले गेले, त्यांनाहि दुःख होऊन ते आपले जन्माचे वैरी बनतात. जे लोक आपल्या रोजच्यां व्यवहारामध्ये खोटे बोलतात किंवा खरा व्यवहार करीत नाहीत त्यांची बाजारात पत राहात नाही.लोक त्यांना अविश्वासू समजून त्यांच्याशी घेण्यादेण्याचे सर्व व्यवहार बंद करतात.

खोटे बोलण्याची संवय नसू हि कधी कधी रागाच्या भरात मनुष्य खोटा बोलतो तर कांही लोक. लोभांत फसून खोटे बोलतात, कांही लोक पोलीस वगैरेच्या भीतीने खोटे बोलतात तर कांही लोक थट्टा मस्करीच्या नादाने खोटे बोलतात. म्हणून सत्यवादी माणसाने क्रोध, लाज, भीति किंवा थट्टा, मस्करी यापासून सावध असावे; कारण अशा खोटया बोलण्यापासून फायदा तर कांहीच होत नाही; पण उलट

तंटा वाढवून माणसाला सवयी मात्र वाईट लागतात,

## ३ अचौर्याणुव्रत.

जो मनुष्य चोरण्याच्य उद्देशाने दुसऱ्याची संधी गवतास रखीही वस्तु घेतो किंवा ती दुसऱ्यास देतो, तो चोर आहे व जो अशा प्रकारच्या चोरीचा त्याग करतो त्यास अचौर्यागुव्रती श्रावक म्हटले जाते. परंतु ज्या वस्तु सर्वसाधारण लोकाकरिता आहेत उदा० पाणी, हवा वगैरे त्या कोणालाहि न विचारता तो घेऊ शकतो. त्याचप्रमाणे एखाद्या कुटुंबातील धनाचा उत्तराधिकारी जो असेल तो पहिली व्यक्ती मेल्यानंतरच ते धन घेऊ शकतो; परंतु त्यांच्या जीवंतपणी जर तो त्याचे धन हिरावून घेईल तर ती चोरी समजली जाईल. जर आपल्याच वस्तूसंबंधी त्यास कधी शंका उत्पन्न झाली की ही माझी आहे किंवा नाही, तर जोपर्यंत शंका मिटत नाही, तोपर्यंत त्याने ती वस्तु घेऊ नये

त्याचप्रमाणे चोरी ही वाईट आहे, असे समजून ती सोडून देणाऱ्याने खालील प्रकारच्याहि गोष्टी करू नयेत.

१) कोण्या एका चोराला स्वतः किंवा दुसऱ्याकडून चोरीची प्रेरणा करणे किंवा करविणे अगर तसल्या गोष्टींची प्रशंसा करणे; तसेच सुरी, चाकू वगैरे चोरीची साधने विकणे किंवा आपल्यातर्फे त्यास देणे उदा० तू निष्कारण असा रिकामा कां बसलास? तुजजवळ कांही खाण्यास नसल्यास मी देतो आणि तुझा चोरलेला माल कोणी घेत नसेल तर मी तो विकून देईन. अशा प्रकारचे हे भाषण चोरांना साथ देणारे असल्यामुळे ती चोरीच आहे. त्याचा त्याग करावयास पाहिजे.

२) चोरीचा माल विकत घेणे. जे लोक असा माल विकत घेतात ते आपल्या मनाची अशी समजूत करून घेतात की आम्ही व्यापार करतो; चोरी करीत नाही. परंतु चोरीचा माल घेणाराहि चोरच समजला.

जातो व म्हणूनच असला सर्व व्यवहार छपवून लपवून केला जातो. ३) माप, तराजू, गज वगैरे कमीजास्त आकाराचे ठेवणे; कमी मापांनी मोजून घेऊन वाढत्या मापाने तोलून देणे हे गैर आहे. ४) एखाद्या वस्तूमध्ये कमी किंमतीची समान वस्तु मिळवून ती विकणे उदा० चांगल्या धान्यात हलके धान्य, लोण्यात चरबी, हिंगांत खैर खऱ्या सोन्या चांदीत बनावटी सोने चांदी इत्यादि मिसळविणे. हे त्याज्य होय व्यापारी असे समजतो की मी चोरी करीत नाही; हे एक व्यापारातील कसब आहे; परंतु त्याचे असे समजणे बरोबर नाही. कारण अशा प्रकारच्या व्यवहाराने तो दुसऱ्यांना फसवितो व असे कारणे निंद्य आहे. ५) राज्यात कांही गडबड झाली असताना वस्तूची किंमत वाढवून देणें; युद्धाच्या वेळी विशेषतः असे जास्त केले गेले किंवा एका राज्यातून लपून छपून दुसऱ्या राज्यात माल नेणे किंवा आणणे. त्याचप्रमाणे यात्रा कर अॅक्ट्राय कर वगैरे चुकविणे हे सर्व प्रकार चोरीचेच प्रकार समजले जातात.

वर ज्या गोष्टी वर सांगितल्या गेल्या आहेत, त्यावरून असे कोणी समजू नये की, ह्या गोष्टी व्यापारी करतात व राजकर्मचारीगण त्यापासून अलिप्त असतात. ते जर राज्यात चोरी करवितील किंवा चोरीचा माल खरीदतील किंवा राज्याकडून पदार्थांची खरेदी झाल्यावर वस्तूच्या किंमती वाढवितील किंवा राज्य अगर देशाच्या विरुद्ध कांही कारवाया करतील तर तेहि चोरीच्या दोषाचे भागीदार समजले जातील.

वास्तविक धन हा मनुष्याच्या प्राण आहे. म्हणून जो कोणाचे धन हिरावून घेईल, तो त्याचे प्राणच हिरावून घेतो असे समजून कोणीहि कोणाची चोरी करू नये व करवू नये.

### ४ ब्रम्हचर्याणुव्रत.

कामवासना हा एक रोग आहे; आणि त्याचा प्रतिकार मात्र भोग नाही. भोगानें हा रोग अधिकाधिकच वाढत जातो. परंतु ज्याच्या लक्षात ही गोष्ट येत नाही व आली तरी आपली काम वासना रोकण्यास जे असमर्थ आहेत अशा लोकांनी आपल्या विवाहित स्त्री बरोबर संतुष्ट असावें. यांचे नाव ब्रह्मचर्याणुव्रत आहे. ब्रम्हचर्याणुव्रती आपल्या पत्नीशिवाय इतर सर्व स्त्रियाशी–मग त्या स्त्रिया विवाहीत अगर अविवाहीत असोत, अगर वेश्या असोत त्याशी रममाण होत नाही, व दुसऱ्यांनाहि तशी प्रेरणा करीत नाही. असे करण्यात केवळ इज्जतीचाच प्रश्न नाही; तर अशा कामसेवनास तो मनापासून पाप समजतो, हे होय. जो केवळ आपला मान किंवा प्रतिष्ठेच्या भयाने या कार्यापासून दूर असतो तो यास वाईट समजत नाही व म्हणून जे अपमान होण्याची भिती नसते; अगर प्रतिष्ठा जाण्याचाहि संभव असत नाही त्या ठिकाणी तो अनाचार करतो; व असे केल्यावर तो कधी कधी आपली मान प्रतिष्ठा गमावून बसतो, परंतु जो या कार्यास पाप मानतो, तो त्यापासून नेहमीच दूर असतो. म्हणून अशा कार्यांना पाप सजून त्यासून दूर राहण्यातच हित आहे. परस्त्री गमन व वेश्यागमनाचे वाईट परिणाम सर्वजण जाणतात. परंतु मनुष्य आपली वासना ताब्यात ठेवू न शकल्यामुळे अनाचार करतो. पुष्कळसे तरुण लहान मुलामुली–बरोबर अशी कुत्सित कामे करून आपले त दुसऱ्याचे जीवन मातीत मिळवितात. कोणी हस्तमैथुन द्वारे आपली कामवासना पुरी करतो. अशी कामे परस्त्रीगमन व वेश्यागमनापेक्षाहि अधिक निंद्य आहेत परंतु आजकालच्या शिक्षणाचे लक्ष्य अशा प्रकारच्या अनाचारांना रोकण्याकडे मुळीच नाही. विद्यार्थी आपले जीवन कसे घालवितो इकडे शिक्षक

किंवा व्यवस्थापक मुळीच लक्ष देत नाहीत, जे अशा प्रकारच्या अनाचारात पडतात ते स्वतःचा आणि दुसऱ्यांचा आत्मा व शरीर या दोन्हीचा घात करतात व म्हणून ते हिंसकापेक्षा कमी दर्जाचे नाहीत; म्हणून आपली आध्यात्मिक व लौकीक उन्नति करू इच्छिणाऱ्यांनी समाजात असे अनाचार पसरणार नाहीत, व आपल्या पत्नी व्यतिरिक्त दुसऱ्यांशी कामसेवन केले जाणार नाही व तिच्याशिवाय संसारातील सर्व स्त्रियांना आपल्या माताबहिणी प्रमाणे समजले जाईल. अशी खबरदारी घ्यावी व लहान मुलांना आपला भाऊ किंवा पुत्र मानून त्याला उन्नत बनवावे.

पत्नीशी कामसेवन करण्याची मान्यता मिळाली म्हणजे एकपत्निव्रत अगर विवाह हे अनियंत्रित कामसेवनेचे प्रमाणपत्र नव्हे. ते फक्त कामरोग शांत करण्याचे औषध आहे असे समजावे. स्तंभक किंवा उत्तेजक औषधाच्या सेवनाने रोग वाढवून अधिक स्त्रीसेवन करणे हा औषधावरहि अत्याचार आहे. अशा अत्याचारामुळेच पुष्कळसे विवाहित तरुण-तरुणी क्षयरोगाने ग्रस्त होऊन अकालीच कालाचे भक्ष्य बनतात. तसेच अनियंत्रित कामसेवन हे आध्यात्मिक व शारीरिक स्वास्थ्याचा बिघाड करते; म्हणून त्यापासून दूर असावे.

त्यासाठी प्रत्येक गृहस्थास खाली दिलेल्या गोष्टीपासून दूर राहण्याचा आदेश शास्त्रकारांनी दिलेला आहे. १) दुराचारिणी स्त्रियांपासून दूर असणे, तोंडाने अश्लिल गोष्ट न बोलणे प्रमाणातीत कामसेवन न करणे अनैसर्गिक मैथुन न करणे व दुसऱ्याच्या वैवाहिक भानगडीत न पडणे. पुरुषासाठी ह्या ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या स्त्रियासाठीहि समजाव्यात स्त्रियांनीहि परपुरुष व अधिक कामसेवनापासून दूर असावे व संयमी राहण्याचा प्रयत्न करावा.

## ५ परिग्रह परिमाणव्रत.

स्त्री, पुत्र, घर, सोने इत्यादि वस्तुसंबंधी ही माझी आहे या प्रकारचा जो ममत्वभाव, त्या मोहास परिग्रह अशी संज्ञा आहे; आणि ममत्व कमी करून वस्तू कमी करण्याच्या नियमाला परिग्रहपरिमाणव्रत म्हटलेले आहे. सर्वसाधारणतः लोक रुपया, पैसा, जमीन, इस्टेट इत्यादिकांसच परिग्रह मानतात. परंतु वास्तविक पाहता; मनुष्याचा मोह (ममत्वभाव) किंवा तीव्र आसक्ति हाच परिग्रह आहे. या बाह्य वस्तु आसक्तीचे कारण असल्यामुळे त्यांना परिग्रह म्हटले आहे. या बाह्य वस्तूंनाच जर परिग्रह मानले तर ज्या असंग लोकाजवळ कांहीच नाही. परंतु ज्यांच्या मनात मोठमोठ्या आशा आकांक्षा सारख्या घोळतात ते सर्व अपरिग्रही समजले जातील. परंतु अशी स्थिती नाही. खरा अपरिग्रही तोच की ज्याच्याजवळ कांही नाही व ज्याच्या मनात कोणत्याहि वस्तूची इच्छा नाही कारण इच्छा झाल्यावर मनुष्य परिग्रहाचा संचय केल्याशिवाय राहत नाही; आणि संग्रहाची प्रवृत्ति वाढू लागली की न्यायान्याय किंवा युक्तायुक्ततेचा विचार मनुष्य करीत नाही. नंतर मनुष्य पैशाचा किडा होतो धनाचा स्वामी न राहता त्याचा दास होतो द्रव्याचे दान करूनहि त्याचे ममत्व सुटत नाही. ते आपल्याजवळच नेहमी असावे असे त्यास वाटते. त्याला नेहमी अशी भिती वाटते की आपण दिलेले द्रव्य कोणी फस्त करूनये. त्याला असे वाटते की आपली खूप कीर्ति व्हावी, लोकांनी आपले गुणगान करावे, दोपावर पडदा टाकावा, वर्तमान पत्रात आपला खूप बोलबाला व्हावा. हे सर्व ममत्वाचेच परिणाम आहेत. त्यातून सुटका झाल्याशिवाय परिग्रहातून सुटका होऊ शकत नाही. जोपर्यंत आपण कोणतीहि वस्तु आपली म्हणून समजत नाही, तोपर्यंत तिच्या चांगल्या वाईटपणाने

आपणास प्रसन्नता किंवा दुःख होत नाही. परंतु कोणत्याही वस्तूविषयी ही माझी आहे असे ममत्व जेव्हा निर्माण होते, तेव्हा मनुष्यास तिची चिंता लागते. म्हणून ममत्वच परिग्रह आहे व ते कमी झाल्याशिवाय परिग्रहरूप पापापासून माणसाची सुटका होऊ शकत नाही.

ज्याप्रमाणे रुपये वगैरे बाह्य परिग्रह आहेत, त्याचप्रमाणे काम क्रोध, मद, मोह इत्यादी भावहि अभ्यंतर परिग्रह आहेत, बाह्य परिग्रहाप्रमाणेच हा अंतर्गत परिग्रहहि कमी केला पाहिजे परिग्रह कमी करण्याचा एकच उपाय आहे तो म्हणजे आपल्या गरजा लक्षात घेऊन मनुष्यानें रुपये, जमीन इस्टेट वगैरे सर्व वस्तूची एक मर्यादा निश्चित करणे. त्यामुळे त्यापेक्षा जास्त आपण आपल्याजवळ कांही ठेवणार नाही आणि अनावश्यक वस्तूचा संग्रह आपोआप कमी होऊ लागेल आणि आवश्यक तेवढे जवळ असल्याने स्वतः त्यासहि कांही कष्ट होणार नाहीत आणि सर्व प्रकारच्या निराशेपासून व दुःखापासून तो दूर असल्यामुळे त्याचे जीवन सुखी व समाधी बनेल. आज सर्वत्र जगात जी आर्थिक विषमता पसरलेली आहे, त्याचे कारण मनुष्याची अनावश्यक संग्रह प्रवृत्ति हे होय. जर सर्वच माणसे आपआपल्या गरजानुसार वस्तूचा संग्रह ठेवतील व अनावश्यक संग्रह समाजातील त्य व्यक्तीना वाटून देतील की ज्यांना त्यांची आवश्यकता आहे, तर आज जगात जितकी अशांति पसरली आहे तितकी राहणार नाही व संपत्तीच्या वाटणीचा जो प्रश्न आज जगासमोर थैमान घालून उभा आहे, तो कोणत्याहि प्रकारच्या कायद्याशिवाय बऱ्याच प्रमाणात आपोआप सुटेल.

जगातील सर्वलोकांची दुर्दम्य इच्छा पाहून, जैनाचार्य गुणभद्र स्वामींनी संसारातील प्राण्यांना उद्देशून खालीलप्रमाणे म्हटले आहे--

"आशागर्त: प्रतिप्राणि यस्मिन् विश्वमणूपमम्।
कस्य किं कियदायाति वृथा वो विषयैषिता ॥३६॥" आत्मानु० ।

"प्रत्येक जीवात आशाचा इतका मोठा साठा आहे की, त्यात हे विश्व अगदी अणुसारखे भासेल. अशा परिस्थितीत सर्व विश्वाची जर वाटणी केली तर प्रत्येकाच्या हिश्याला किती वरे येईल ? म्हणून हे आशाळभूत प्राण्यानो तुमची विषयोपभोगाची इच्छा व्यर्थ आहे." प्रत्येक श्रावकाने विश्वांतील संपत्ति व तिच्यासाठी धडपडणाऱ्या असंख्य प्राण्यांचा विचार करून धनाच्या तृष्णेपासून विरक्त असावे. कारण न्यायाने मिळवून मनुष्य आपले जीवन व्यतीत करू शकतो परंतु धनाचा अतूट भांडार एकत्र करू शकणार नाही. हे अतूट भांडार फक्त पापाच्या कमाईने भरू शकेल. श्री गुणभद्राचार्यांनी सांगितल्याप्रमाणे–

"शुद्धैर्धनैर्विवर्धन्ते सतामपि न सम्पदः ।
न हि स्वच्छाम्बभिः पूर्णाः कदाचिदपि सिंधवः ॥४५॥" आत्मानु० ।

सज्जनांचीहि संपत्ति शुद्ध न्यायोपार्जित धनाने वाढू शकत नाही. कोणी नदी स्वच्छ पाण्यांनी परिपूर्ण अशी कधी पाहिलेली आहे ?

नद्या ज्या तुडुंब भरतात त्या वर्षाऋतूंतील गढूळ पाण्यानेच. त्याचप्रमाणे धनाची वाढहि न्यायाच्या कमाईने होत नाही. म्हणून आवश्यक अशा धनाचे परिमाण करून, मानवी प्राण्यांनी अन्यायाच्या मिळकतीपासून दूर राहिले पाहिजे. त्यामुळे तो स्वतः सुखी होईल; व दुसरे लोकहि त्याच्यापासून होणाऱ्या दुःखापासून मुक्त होतील

या व्रताचेहि ५ दोष आहेत. त्यापासून श्रावकांनी दूर असावे. १) लोभात येऊन मनुष्य किंवा पशूकडून अधिक काम करून घेणे. २) खूप फायदा होईल या इच्छेने युद्ध काळांत जसा केला गेल्या त्याप्रमाणे धान्यादिकांचा संग्रह करणे. ३) तसेच आपल्या जवळील वस्तू

थोड्याशाच फायद्याने विकल्यामुळे किंवा नंतरची झालेली भाववाढ पाहून आपण न केलेल्या धन संग्रहाबद्दल हळहळ करणे. ४) योग्य फायदा झाला असतानाहि अधिक लाभाची इच्छा करणे. ५) अधिक फायदा होत आहे असे पाहून, आपल्या परिग्रहाची केलेली मर्यादा वाढविणे. (या गोष्टीपासून श्रावकाने दूर असावे)

## श्रावकाचे भेद

श्रावकाचे ३ भेद आहेत.– १) पाक्षिक २) नैष्ठिक ३) साधक १) जो अंशत: हिंसेचा त्याग करून श्रावक धर्म स्वीकारतो त्या श्रावकास 'पाक्षिक' श्रावक म्हणावे. २) जो श्रावक निरतिचारपणे श्रावक धर्माचे पालन करतो, तो 'नैष्ठिक' श्रावक होय. ३) व देशचारित्र पूर्ण करून जो आपल्या साधनेत लीन रहतो त्यास 'साधक' श्रावक म्हणावे. अर्थात् श्रावकाच्या प्रारंभिक अवस्थेचे नांव पाक्षिक, मध्यम अवस्थेचे नांव नैष्ठिक व पूर्ण अवस्थेचे नांव साधक आहे. याप्रमाणे अवस्थाभेदाने श्रावकाचे ३ प्रकार केलेले आहेत. त्याची माहिती खालील प्रमाणे –

## पाक्षिक श्रावक

पाक्षिक श्रावकाने मागे सांगितलेले आठ मुलगुण पाळावयास पाहिजेत. पुढेपुढे आठ मूलगुणांत ५ अणुव्रताऐवजी ५ क्षिरीफलांचा त्याग सांगितलेला आहे. ज्या वृक्षापासून दूध निघते, त्यास क्षीरवृक्ष व उदूंबर म्हणतात. या फलांमध्ये अनेक जंतु असतात त्यासाठीच अमरकोषात उदुंबराचे नांव एक जंतु–फल असेहि आहे; व दुसरे नांव 'हेमदुग्धक' असेहि आहे, कारण त्यातून निघणाऱ्या दूधाचा रंग पिव–ळसर असतो पिंपळ, वड, पाकर, उंबर व कटुंबर ह्या पांच प्रकारच्या वृक्षांची फळे खाऊ नयेत. कारण त्यांत जंतु असतात. वृक्षांतून खाली पडल्यावर उंबर फुटते, तेव्हा त्यातून अनेक

जंतु उडताना दिसून येतात. म्हणून असली फळे व मद्य, मांस, मधु यांचा त्याग करावा. प्रत्येक पाक्षिक श्रावकाने इतके तरी कमीतकमी केलेच पाहिजे. उदा०—

'पिप्पलोदुम्बरप्लक्षवटफल्गुफलान्यदन् ।
हन्त्यार्द्राणि त्रसान् शुष्काण्यपि स्वं रागयोगतः ॥ ३॥'—सागारधर्मा० ।

पिंपळ, वड, उंबर, पाकर व कटुंबर यांची कच्ची फळे जो खातो तो त्रस अर्थात् चालणाऱ्या फिरणाऱ्या जंतूंचा घात करतो; कारण त्या फळात असे जंतु दिसून येतात व जो त्यांना सुकवून खातो त्यात अति आसक्ति असल्यामुळे तो आपला स्वतःचाच घात करतो. म्हणून या प्राथमिक (पाक्षिक) श्रावकाने अशा तऱ्हेच्या फळाचा त्याग करावा. त्याचप्रमाणे हिंसा, खोटे बोलणे, चोरी, अब्रम्ह व परिग्रह सोडण्याचा यथाशक्ति अभ्यास करावा. तसेच जुवा खेळणे, वेश्यागमन, शिकार, परस्त्रीसेवन, वगैरे सात व्यसनेहि सोडावीत. दररोज जिनमंदिरांत जाऊन अरहंत देवाची पूजा करावी. गुरुची सेवा करावी व सुपुत्रांना दान द्यावे. तसेच इतर जी धार्मिक कृत्ये व कीर्ति वाढविणारी कार्ये करीत असावे. उदा० दीनअनाथाकरिता अन्नवस्त्रे, औषधालये वगैरेची व्यवस्था करणे व आपल्या मुलामुलींना योग्य बनवून सुपात्र व्यक्तींबरोबर त्यांचा संबंध जोडून द्यावा.

## नैष्ठिक श्रावक

नैष्ठिक श्रावकाचे ११ दर्जे आहेत. हे दर्जे या क्रमाने ठेवलेले आहेत की हळूहळू चढत चढत श्रावक आपला आध्यात्मिक विकास करीत राहून जीवनाच्या अंतिम ध्येयापर्यन्त तो जाऊन पोहोचू शकतो. जैनशास्त्रांत या अकरा दर्जांना अकरा प्रतिमा म्हणतात. त्यांचे संक्षिप्त

विवेचन पुढील प्रमाणे–

(१) दर्शन प्रतिमा:– पाक्षिक श्रावकाचा जो आचार अगोदर सांगितला आहे, त्याचे पालन करून ज्याची श्रद्धा पक्की व विशुद्ध झाली आहे; सांसारिक भोगोपभोगांपासून जो विरक्त होत चालला आहे म्हणजेच विषयोपभोग भोगत असतांनाहि त्यासंबंधीची आसक्ती ज्याची राहिली नाही; ज्याचे चित्त पंचपरमेष्टीच्या चरणी नेहमी लीन झाले आहे; अष्ट मूलगुणांत जो कोणतेहि दोष लागू देत नाही, व पुढचे गुण मिळविण्याची उत्कंठा ज्यास लागली आहे; व आपल्या भरणपोषणाकरिता न्यायमार्गानेच जो आजीविका मिळवितो, तो दार्शनिक श्रावक होय. दार्शनिक श्रावक मद्य, मांस, मधु वगैरेचे सेवन तर करीत नाहीच, पण त्यांचा व्यापार स्वतः करीत नाही किंवा दुसऱ्याकडून करावीत नाही; व अशा कार्यास कोणास संमती देत नाही; मद्यपान करणाऱ्यावरोबर खाण्यापिण्याचा व्यवहार करीत नाही. कातड्याच्या भांड्यांत ठेवलेले तूप किंवा तेल तो वापरीत नाही. ज्या खाद्यपदार्थावर बुरा आला असेल, अगर ज्याचा स्वादहि बिघडला असेल असे पदार्थ हा श्रावक खात नाहीं. माहित नसलेला भाजीपाला अगर फळे तो सोडून देतो. सूर्योदयानंतर एक मुहुर्ताने व सूर्यास्त होण्याच्या एक मुहूर्त अगोदरच त्याचे सर्व खाणे पिणे होते; तो पाणी गाळूनच उपयोगांत आणतो; जुगार खेळत नाही, सट्टेबाजी करीत नाही, वेश्यासेवनापासून तो दूर असतोच; पण तिच्याशी तो कशाही प्रकारचा संबंध ठेवत नाही; व त्या बाजूने फिरकतहि नाही. दुसऱ्याचे द्रव्य न्यायालयांत जाऊन अगर अन्य मार्गांनी हडपण्याचा प्रयत्न करीत नाही, शिकार खेळत नाही, व चित्रे वगैरेतील जिवजंतूचीहि जो हत्या करीत नाही; तो परस्त्रीशी संबंध ठेवणे तर बाजूलाच राहिले; पण मुलीच्या आईवडीलांच्या सांगण्याशिवाय तो

दुसऱ्याच्या मुलामुलींचा विवाह जुळवून देत नाही व जे काम वाईट समजून स्वतः सोडून दिले आहे, ते तो दुसऱ्याकडूनहि करून घेत नाही व संकल्पी हिंसेचा संपूर्ण त्याग करतो, आरंभादिक कार्य त्यांनी स्वतःपुरतेच मर्यादित असतात, कारण असली कामे दुसऱ्याकडून करून घेतली तर अहिंसाणुव्रत जितके शुद्ध रहावयास पाहिजे तितके ते शुद्ध रहात नाही. तो नैष्ठिक श्रावक होय. आपल्या पत्नीशीहि तितक्याच प्रमाणात भोगभोगतो की, तितके मानसिक व शारीरिक संताप शमण्यास आवश्यक आहेत, कामोपभोगापेक्षा संतान उत्पत्ति हाच त्याचा उद्देश असतो! आपल्या मुलाबाळांना तो सदाचारी बनविण्याचा प्रयत्न करतो, आपल्या वृद्धावस्थेत त्याच्यावर आपल्या घरादारांचा भार सोपवून आत्मोन्नतीच्या मार्गास स्वतः लागतो. ही सर्व दार्शनिक श्रावकाची कर्तव्ये आहेत.

२) व्रतिक–ज्याचे सम्यग्दर्शन व आठ मूलगुण परिपूर्ण झाले आहेत व जो मायाचाराने किंवा भविष्यकाळी विषयसुख भोगण्यास मिळावेत, या आशेने व्रताचे पालन करीत नाही तर रागद्वेषादि विकारावर विजय मिळवून समताभाव मिळविण्याच्या दृष्टीने व्रतपालन करतो. तो व्रतिक श्रावक होय. हा व्रतिक श्रावक ५ अणुव्रताचे पालन निर्दोष करतो, व त्याच्या विकासाठी पुढील शीलांचेहि पालन करतो ते सात शील याप्रमाणे– १ दिग्व्रत, २ देशव्रत, ३ अनर्थदंडव्रत, ४ सामायिक, ५ प्रोषधोपवास, ६ भोगोपभोग परिणाम, ७अतिथिसंविभाग.

१ दिग्व्रतः– या श्रावकाने आपल्या सर्व उर्वरित आयुष्यांत जाण्यायेण्याचा व देण्याघेण्याच्या क्षेत्राची मर्यादा करावयास पाहिजे, उदा० या स्थानापर्यंत माझा संबंध राहील. त्याच्या बाहेर खूप लाभ होणार असूनहि मी व्यापार करणार नाही. अशा नियमाने मनुष्याचे तृष्णेचे क्षेत्र मर्यादित होते; व विदेशी व्यापाराचे नियमन

मर्यादित होऊन देशाची संपत्ति परदेशी जाणेहि थांबते. हे नैष्ठिक श्रावकाचे दिग्व्रत होय,

२ देशव्रत:– वरील प्रमाणे आमरण केलेल्या मर्यादेमध्येहि आपल्या गरजा व यातायात लक्षात घेऊन, कांही काळासाठी वरील मर्यादांच्या-आत, एखाद्या विशिष्ट स्थानापर्यंतच मी जाण्यायेण्याचा किंवा देण्या-घेण्याचा व्यवहार करीन. अशी प्रतिज्ञा करणे देशव्रत होय.

३ अनर्थदंडव्रत:– निष्कारण दुसऱ्या प्राण्यांना त्रास होईल असे कोणतेहि कार्य न करणे, हे अनर्थदंडव्रत होय. संक्षेपतः अशी कामे ५ प्रकारात विभागली आहेत.

१ पापोपदेश, २ हिंसादान, ३ दुःश्रुति, ४ अपध्यान, व ५ प्रमाद चर्या. १ पापोपदेश:– जे लोक हिंसादिकांनी आपली उपजीविका करतात, त्यांना हिंसादिकांचा उपदेश देऊ नये. उदा० पारध्याला को गत्या एका विशिष्ट स्थानी हरीण वगैरे प्राणी बसतात ते सांगू नये किंवा ठगाना व चोरांना अमुक एका विशिष्ट स्थळी दरोड्याची किंवा चोरीची संधी आहे असे सांगू नये; तसेच चार चौघे बसतात अशा ठिकाणी अशा प्रकारच्या गप्पासप्पाहि करू नयेत.

२ हिंसादान:– ज्या साधनाने दुसऱ्याचे प्राण जाऊ शकतील असे विष, शस्त्रे वगैरे हिंसेचे साहित्य दुसऱ्यास देऊ नये.

३ दुःश्रुति:– जी पुस्तके किंवा शास्त्रे वाचल्याने अगर ऐकल्याने मन कलुषित होते; किंवा कामवासना जागृत होते; अगर दुसऱ्यांना मारण्याचे भाव होतात अथवा हृदयामध्ये गर्व व दुरभिमान उत्पन्न होतो अशी शास्त्रे व पुस्तके स्वतः ऐकू नयेत दुसऱ्यासहि ऐकवू नयेत.

४ अपध्यात:– याचे मरण होवो, हा तुरुंगात जावो, अमक्याच्या घरी चोरी होवो. किंवा त्याच्या स्त्रीचे हरण केल्या जावो, एखाद्याची

इस्टेट विकली जावो, किंवा बरबाद होवो अशा प्रकारचे दुष्ट विचार मनात येऊ देऊ नयेत.

५) प्रमादचर्या:– जरूरी शिवाय जमिन खोदणे, पाणी सांडणे आग जाळणे, वारा घेणे, किंवा झाडे (वनस्पती) तोडणे, असली कामे करू नयेत. अशा प्रकारची कामे करण्याने आपणांस कांहीहि फायदा होत नाही. उलट नुकसान होऊन दुसऱ्यांना मात्र त्रास पोहोचतो. अश्लील चर्चा करणें. शरीराने कुत्सित गोष्टी करणे निष्कारण वडवड करणें, व आपल्याला काही फायदा होवो अगर न होवो दुसऱ्याला कांही त्रास होईल किंवा काय याचा विचार न करता कामे करणें त्याचप्रमाणे भोगोपभोगांची साधने जरूरीपेक्षा जास्त वाळगणे या गोष्टी या श्रावकाने करू नयेत.

४) सामायिक:– सकाळी व संध्याकाळी एकांत स्थळी कांही काळासाठी हिंसा वगैरे सर्व पापापासून विरक्त होऊन आत्मध्यान करण्याचा अभ्यास करावा. मन, वचन, काय स्थिर करीत असताना आत्मा व त्याचे अंतिम साध्य मोक्ष यांचे चिंतन करावे. मन, वचन, काय एकाग्र करणे अत्यंत कठीण असले तरी ते कष्टसाध्य आहे. सुरवातीस कांही दिवस त्रास होईल, शरीर निश्चल राहणार नाही, मनांत अनेक विचाराचे काहूर माजेल, पाठ लवकर लवकर म्हणून संपविण्याची वृत्ति सुरवातीस आढळून येईल; पण ती रोकावयास पाहिजे. पण हे जेव्हा साध्य होतात तेव्हा मनुष्यास बरीच आध्यात्मिक शांति मिळते,

५) प्रोषधोपवास:– प्रत्येक अष्टमी व चतुर्दशीस मन, वचन, कायेची स्थिरता व एकाग्रता चांगली व्हावी या उद्देशाने उपवास करावयास पाहिजे. त्या दिवशी कांहीहि खाऊ पिऊ नये. परंतु असा

उपवास ज्यांच्याकडून होत नसेल त्यांनी फक्त पाणी प्यावे व तेवढ्या-वरहि ज्यांचे भागत नसेल त्यांनी एकवेळेस हलके सात्विक भोजन करावे. जो उपवास करू इच्छितो त्याने अष्टमी व चतुर्दशीच्या पहिल्या दिवशी दुपारी भोजन करून उपवासाची प्रतिज्ञा घ्यावी आणि घरगुती व इतर व्यवहार बंद करून एकांत स्थानी जावे व आपला काळ आत्म-चिंतन व स्वाध्याय करण्यात घालवावा. संध्याकाळी दैनिक कृत्ये आटोपून पुनः त्याच कार्यात प्रवृत्त व्हावे व रात्री विश्रांति घ्यावी. या प्रमाणे सर्व दिवस घालविल्यावर अष्टमी व चतुर्दशीचा दिवसहि त्याचप्रमाणे घालवून दुसऱ्यादिवशी दुपारी पाहुणे व ( अतीथी मुनी वगैरे साधूंना) आहार देऊन मग आपण निरासक्तीने भोजन करावे. उपवास म्हणजे केवळ पोटाला उपवास देणे एवढाच अर्थ नसून पांचहि इंद्रियांना उपवास घडवावा असा त्याचा अर्थ आहे. आहाराचा त्याग करून जर मनुष्याचे चित्त पांचीहि इंद्रियांच्या विषयात लागलेले असेल, चांगले चांगले स्वादिष्ट भोजन, सुंदर सुंदर स्त्रिया, सुगंधी द्रव्ये किंवा मधुर संगीत ऐकण्याकडे मन जात असेल, तर हा उपवास निरर्थक आहे.

६) भोगोपभोगपरिमाणः—भोगोपभोगांच्या साधनाचे कांही काला-करिता परिमाण करावे. उदा० या वस्तूचा या काळापर्यंतच मी उपभोग घेईन अशी मर्यादा केल्यानंतर त्यापेक्षा अधिक वस्तूची इच्छा करू नये. जी वस्तु एकाच वेळ भोगली जाते तिला 'भोग' म्हणतात जशी फुलांची माळ किंवा भोजन, जी वस्तु पुनः पुनः भोगण्यात येऊ शकते तिला उपभोग म्हणतात. जसेः— वस्त्र. या दोन्ही प्रकारच्या वस्तूंचा नियम करावयास पाहिजे. अशा नियमाने गृहस्थाच्या चित्तवृत्तीचे नियमन होते. व अनावश्यक भोगोपभोग आणि संग्रह बंद होतो, आणि त्यामुळे दुसऱ्यांनाहि त्या वस्तु सहजासहजी मिळू शकतील.

जो मनुष्य भोगोपभोगांची साधने कमी करून आपल्या गरजा कमी करतो, त्याचा त्यामुळें खर्चहि कमी होतो. खर्च कमी झाल्यामुळे त्याची धनाचीं आवश्यकताहि कमी होते. आणि त्यामुळे न्यायान्यायाचा विचार न करताहि पैसे मिळविण्याची तृष्णा माणसास सतावित नाही. त्यासाठीच लिहिले आहे.–

'भोगोपभोगकृशनात् कृशीकृतधनस्पृहः ।
धनाय कोट्टपालादि क्रियाः क्रूराः करोति कः ॥' सागारधर्मा०।

अर्थः– भोग व उपभोग कमी केल्याने ज्याची धन तृष्णा कमी झाली आहे, असा कोणता मनुष्य धनासाठी पोलीस वगैरेसारखी निर्दयपणाची नोकर पत्करील ?

म्हणून भोगोपभोगांचे परिमाण करणारा आपल्या उपजीविकेसाठी दुसऱ्यांना त्रास होईल असे कोणतेच काम करणार नाही. त्याचे खाणे पिणे अत्यंत साधे, सात्विक व शुद्ध असते. मद्य, मांस, मधु तर तो सेवन करीत नाहीच, परंतु जे मादक व पचण्यास कठीण असे गरिष्ठ पदार्थ असतील, त्याचेहि तो सेवन करीत नाही. त्याच्या भोजनात शरीरपोषक आहार असतो परंतु स्वास्थ्य बिघडविणारे अगर इंद्रियाना उत्तेजित करणारे पदार्थ असत नाहीत. प्रकृति विरुद्ध व संयोगाविरूद्ध आहार तो कधीच करीत नाही. भाजीपाला चांगला पाहून शुद्ध करूनच तो खातो. आलु, गाजर, मुळा वगैरे सारखे जमीनीत उगवणारे पदार्थ तो खात नाही कारण अशा पदार्थात जैनमताप्रमाणे पुष्कळसे जीव राहतात. लौकीक दृष्टीनेहि जो भाजीपाला सूर्याच्या प्रकाशात वाढत नाही, तो तामसी आहार म्हणविला जातो. पुष्कळशा रोगात [1]डॉक्टरहि असे पदार्थ खाण्याचा निषेध करतात. पावसाळयात पालेभाजी व न

१ या गोष्टीचा मूळ लेखकांस स्वतः अनुभव आलेला आहे. खोकल्याने प्रकृति बिघडली असतांना मुरादाबादचे स्व. बॅनर्जी यांनी चिकित्सा करण्यापूर्वी

दळलेले मुग. उडीद वगैरे धान्यहि खात नाहीत; कारण त्यावेळी अशा पदार्थात पुष्कळसे जीवजंतु असतात.

७) अतिथिसंविभाग– दररोज भोजन करण्यापूर्वी आपल्या दारी उभे राहून संसार विरक्त अशा खऱ्या साधूंची प्रतिक्षा करावी व कोणी मुनि, साधू त्यावाजूने जाऊ लागले तर त्यांना आदराने थाबवून आपल्यासाठी बनविलेल्या भोजनातून भक्तीपूर्वक आहार द्यावा व नंतर स्वत: भोजन करावे.

याप्रमाणे श्रावकाचे हे सात शीलव्रत सांगितलेले आहेत. यापैकी पहिली तीन 'गुणव्रते' समजली जातात. कारण ही पाळल्याने पहिली पांच अणुव्रते अधिक दृढ होतात व त्यांत विशेषता येते. पुढची चार 'शिक्षाव्रते' आहेत. कारण त्यांच्यामुळे मुनिधर्म ग्रहण करण्याचे शिक्षण मिळते. शिक्षा म्हणजे अभ्यास. पुढील गुणांच्या प्राप्तीसाठी अभ्यास म्हणून जी व्रते केली जातात, ती शिक्षाव्रते होत.

३) सामायिक:– व्रत प्रतिमाधारी श्रावक जेव्हा ३ वेळ सामायिक करतो त्यावेळी कितीहि कष्ट झाले किंवा अत्यंत कठीण अशा आपत्ती आल्या तरी आपल्या ध्यानापासून जो विचलीत होत नाही, व मन, वचन, काय, एकाग्र व स्थिर ठेवतो, त्यास सामायिक प्रतिमाधारी श्रावक म्हणतात. अशी एकाग्रता अत्यंत कठीण असली तरी अभ्यासाने ती साध्य होते. त्याचा उद्देश आत्म्याची शक्ती केंद्रीभूत करणे हा आहे. वर व्रतांत सामायिक सांगितले असले तरी ते अभ्यासरूप असून हे व्रतस्वरूप आहे.

४) प्रोषधोपवासी:–वर अष्टमी चतुर्दशीला प्रोषधोपवास करण्याची

---

जमीन कंद खाणें सोडण्यास सांगितले. असे पदार्थ तर आमच्या धर्मानेच त्याज्य सांगितले आहेत असे जेव्हा त्यांना सांगितले तेव्हा ते अत्यत प्रभावी झाले.

विधी सांगितली आहे तीच येथेहि जाणावी. फरक इतकाच की तेथे अभ्यासरूपाने उपवासाचे विधान आहे येथे व्रतरूपाने ते करावयास पाहिजे.

५) सचित्तविरत:– पहिल्या चार प्रतिमांचे पालन करणारा दयाळू श्रावक जेव्हा हिरवा भाजीपाला, फळफुले वगैरेहि खाण्याचा त्याग करतो, तेव्हा त्यास 'सचित्त–विरत' श्रावक म्हणतात. मुख्यत: त्यागाचा उद्देश संयम पाळणे हा आहे. संयमाचे दोन प्रकार आहेत, १ प्राणी संयम व २ इंद्रियसंयम. प्राण्याचे रक्षण करणे यास प्राणीसंयम म्हणतात व इंद्रिये वश करणे हा इंद्रिय संयम होय. प्रत्येक प्रकारच्या त्यागात दोन्ही प्रकारचे संयम पाळणे हा उत्तम पक्ष होय. परंतु दोन्ही संयम पाळणे शक्य झाले नाही तर निदान एक प्रकारचा संयम तरी अवश्य आहे. जैनसिद्धांताप्रमाणे हिरव्या वनस्पतीच्या दोन अवस्था आहेत १ सप्रतिष्ठीत २ अप्रतिष्ठीत. सप्रतिष्ठीत अवस्थेमध्ये प्रत्येक वनस्पतीत अनेक जीव राहतात, व त्यासाठीच अशा वनस्पतीना अनंतकाय म्हणतात व अप्रतिष्ठीव अवस्थेतील एकच जीव असतो. म्हणून सप्रतिष्ठीत किंवा अनंतकाय अवस्थेत जोपर्यंत ती वनस्पती आहे तोपर्यंत ती खाऊ नये कारण त्यामुळे अनंत जीवाचा घात होतो. परंतु जेव्हा ती वनस्पती अप्रतिष्ठीत होते, म्हणजे जेव्हा तिच्यात अनंत जीवाचा वास असत नाही, तेव्हा तिला अचित्त करून खावे. सचित्ताचे अचित्त करण्याचे अनेक प्रकार आहेत. जसे.– सुकविणे, गरम करणे, शिजविणे किंवा चाकू वगैरेने कापणे इत्यादि. अशा करण्याने सचित्त वनस्पति अचित्त होते. तेव्हा असा प्रश्न कोणी विचारील की सचित्ताला अचित्त करून खाण्यात काय फायदा आणि जीवरक्षा तर त्यातहि होत नाही. त्याचे उत्तर असे सचित्तपदार्थ अचित्त करण्याने जीवरक्षण व प्राणी संयम पाळला गेला नाही, तरी इंद्रिय संयम पाळला जातो

कारण सचित्त वनस्पती पौष्टिक व उन्मादक असते. वर सांगितलेल्या प्रकाराने तो अचित्त केल्यास त्यातील पौष्टिक तत्व नष्ट होऊन त्यातील उन्मादकता निघून जाते व ती इंद्रिय विकारास कारणीभूत होत नाही; परंतु शारीरिक स्थिती मात्र कायम ठेवतात. धार्मिक दृष्टिने इंद्रियात विकार न होऊ देता शरीराची स्थिती जे चांगले ठेवू शकेल तेच भोजन श्रेष्ठ समजले जाते. या दृष्टिनेच पांचवी प्रतिमाधारी हा श्रावक इंद्रियोन्मादक सचित्त वनस्पतीच्या भक्षणाचा त्याग करतो.

जैनशास्त्रात सप्रतिष्ठीत व अप्रतिष्टित वनस्पती ओळखण्याची अनेक चिन्हे आहेत. उदा० जी वनस्पती मग तिचे मूळ असो, साल असो पान, फुल किंवा फळ असो—ती तोडल्यावर लवकर तिचे दोन समान तुकडे होतात ती सप्रतिष्टीत व जी एकीकडून तोडण्याचा प्रयत्न केला असता, दुसऱ्या कोठून तरी तुटते ती अप्रतिष्टीत वनस्पती होय जी वनस्पती सोलली असताना तिची मोठी साल निघते, ती अप्रतिष्टीत व जिची साल पातळ निघते ती अप्रतिष्टीत होय. ज्या वनस्पतींच्या शिरा किंवा धारा स्पष्टपणे निघत नाहीत किंवा आतील फांका निरनिराळ्या झाल्या नाहीत ती सप्रतिष्टीत व जिच्या फाका अलग अलग होतात किंवा जिच्या शिरा व धारा स्पष्ट उमटून दिसतात ती अप्रतिष्टीत वनस्पती होय.

६) दिवा मैथुन विरत:- वरील पाच प्रतिमाधारी श्रावक जेव्हा दिवसा मन वचन कायेने सर्व स्त्री मात्रांच्या सेवनाचा त्याग करतो तेव्हा त्यास दिवामैथुनविरत प्रतिमाधारी म्हणतात. पाचव्या प्रतिमेत इंद्रियोन्मादक वस्तूचा खाण्यापिण्याचा त्याग करून इंद्रियसंयम करण्याचा प्रयत्न करण्यास सांगितले आहे. तर सहाव्या प्रतिमेत दिवसा कामभोगाचात्याग करून त्याची काम लालसा फक्त रात्री पुरतीच मर्यादित

केलेली आहे. कांही असे म्हणतात की दिवसा मैथुन तर थोडे लोक करतात तेव्हा त्याचा त्याग करविण्यात काय विशेषता आहे? परंतु मैथुनाचा संबंध केवळ शारिरीक भोगापुरताच मर्यादित नाही. तर वचनानेहि तशा गोष्टीची चर्चा न करणे व मनात ते विचार न येऊ देणे या गोष्टी या प्रतिमेत समाविष्ट आहेत. तसेच दिवसा मनुष्याच्या दृष्टीसमोर असे अनेक स्त्री, पुरुष येतात की ज्यामुळे त्यांची कामवासना जागृत होऊ शकेल म्हणून अशा प्रकारच्या प्रवृत्तीपासून दूर राहून पुढील ब्रह्मचर्य प्रतिमेकडे त्यास नेणे हाच यातील ध्येय बिंदु किंवा उद्देश आहे.

७ ब्रह्मचर्य:– वर सांगितलेल्या संयमाच्या अभ्यासाने आपल्या मनाला वश करून जो मन वचन कायेने कधीहि कोणत्याहि स्त्रीचे सेवन करीत नाही त्यास ब्रह्मचारी म्हणतात. वर सहाव्या प्रतिमेत दिवसामैथुनाचा त्याग सांगितला. सातव्या प्रतिमेत नेहमी करिताच रात्रीसुद्धा मैथुनत्याग करून ब्रह्मचारी होतो. ब्रह्मचर्याचे फायदे सांगणे म्हणजे सूर्याला दिवा दाखविणे आहे. आत्मिक शक्ती एकत्रित करण्यासाठी ब्रह्मचर्य हे अपूर्व साधन आहे. मात्र ते स्वेच्छेने पाळले पाहीजे. अनिच्छेने किंवा जबरदस्तीने पाळावयाच्या ब्रह्मचर्याने शारीरिक किंवा मानसिक कोणताच फायदा होत नाही कारण ब्रह्मचर्याचा उद्देश शारीरिक कामभोगापासून निवृत्ती एवढाच नाही तर पांचहि इंद्रियांना आपआपल्या विषयभोगापासून निवृत्त करणे याचेंच नाव ब्रह्मचर्य आहे. जर केवळ कामेंद्रियाचेच नियंत्रण केले व दुसऱ्या इंद्रियावर ताबा ठेवला नाहीं, तर कामेंद्रियावरहि माणसाचे नियंत्रण राहणार नाही.

८ आरंभविरत:– पहिल्या सात प्रतिमाधारी श्रावक जेव्हा

आपल्या उपजीविकेच्या साधनांचा- शेती, नोकरी, व्यापार वगैरे करण्याचा व करविण्याचा - त्याग करतो तेव्हा तो आरंभविरत म्हणविला जातो. ब्रह्मचर्य धारण करून आपल्या कौटुंबिक जीवनाची त्याने अगोदरच मर्यादा केलेली असते व आपली मुलेबाळे कमविण्या-लायक झाली आहेत, असे जेव्हा त्याला आढळू : येते तेव्हा तो विरक्त होतो, मात्र तो त्यांना फक्त कामधंद्यासंबंधी सांगतो किंवा अनुमति देतो

९ परिग्रहविरतः-पहिल्या आठ प्रतिमा धारण करणारा श्रावक, जेव्हा आपली जमीन, इस्टेट वगैरेवरील ममत्व सोडतो, तेव्हा त्यास परिग्रहविरत श्रावक म्हणतात या प्रतिमेत असताना श्रावक आपला सर्व उद्योग-धंदा पुत्रांच्या स्वाधीन करतो, पण संपत्तीवरील आपला हक्क कायम ठेवतो. आपला मुलगा चांगल्या रीतीने उद्योगधंदा करू शकेल, व सर्व संपत्तीहि त्याच्या ताब्यात दिली तरी तो तिचे चांगल्या रीतीने रक्षण करू शकेल असे जेव्हा त्यास आढळून येते, तेव्हा तो पंचासमोर आपल्या मुलाला किंवा दत्तक मुलाला बोलावून सांगतो 'बाळ आजपर्यंत आम्ही हा गृहस्थधर्म पाळला आता विरक्त होऊन आम्ही तो सोडून देतो आमचे स्थान आता तू स्वीकार. आत्मशुद्धी-साठी आत्मशुद्धी करू इच्छिणाऱ्या आपल्या पित्याचा भार सांभाळून जो त्या सहाय्य करतो तोच खरा पुत्र होय, आणि जो असे करीत नाही तो पुत्र नसून शत्रु आहे. तेव्हा माझे हे धन धार्मिककार्य आणि कुटुंबीजनाचा भार साभाळून माझा भार हलका कर. कारण यातून मुक्त झाल्याशिवाय कोणीहि कल्याणार्थी आपले कल्याण करू शकणार नाही. मुमुक्ष लोकास सर्व त्यागच पथ्यकर आहे." याप्रमाणे सर्व कांही पुत्रावर सोपवून गर्ह्यस्थी जबाबदारीतून तो मुक्त होतो, परंतु इतके करूनहि तो घर सोडत नाही. फक्त उदासीन होऊन कांही काळपर्यंत तो घरात राहतो व मुलगा गृहकार्यात किंवा उद्योगधंद्यात जी कांही

सल्ला विचारील ती तो त्यास देत असतो.

१० अनुमतिविरतः– पहिल्या नऊ प्रतिमांचा अभ्यास केलेला श्रावक जेव्हा आपला मुलगा आपल्या संमतिशिवायहि सर्व प्रकारचा कार्यभार सांभाळतो तेव्हा देणेघेणे, शेती, वाणिज्य, विवाह आदि लौकिक कार्यामध्ये सर्वप्रकारची अनुमति देणे बंद करतो. तेव्हा त्यास अनुमतिविरत श्रावक म्हणतात. अर्थात् तो घरात न राहता मंदीर वगैरेमध्ये राहूनच आपला वेळ स्वाध्याय, तप वगैरेतच घालवितो. मध्यान्हकालीन सामायिक केल्यानंतर आपल्या किंवा दुसऱ्यांच्या घरी भोजन करतो. भोजनात त्याला कोणत्याच प्रकारची आसक्ती नसते आपल्या व्रतनियमादिकानुसार जे मिळेल ते तो खातो व मनाशी असा विचार करतो की शरीर राहिल्याशिवाय धर्मादिकाचे कार्य चांगले होणार नाही म्हणून शरीराची स्थिती टिकून राहण्यासाठी भोजन करतो. कांही दिवस गेल्यानंतर जेव्हा तो पाहतो की आता मी घर सोडू शकतो तेव्हा आपले गुरुजन, बांधव, पुत्र वगैरेची सम्मति घेऊन घर सोडतो.

११ उद्दिष्टविरतः– ही अंतिम प्रतिमाधारी श्रावक आपल्यासाठी जो आहार बनविला असेल त्या आहाराचे ग्रहण करीत नाही म्हणून त्यास उद्दिष्टविरत म्हणतात. याचे दोन भेद आहेत. यातील पहिल्या प्रकारचा श्रावक पांढरी लगोटी नेसतो व फक्त पांढरी चादर आपल्या जवळ ठेवतो. त्याचप्रमाणे कातरी किंवा वस्तऱ्याने केस काढतो. ज्या कोणत्या स्थानावर बसावयाचे किंवा निजावयाचे असेल ते स्थान अगदी कोमल वस्त्र वगैरेनी साफ करून कोणत्याहि जीवजंतूना बाधा पोहचणार नाही याची खात्री करुन घेऊन मगच बसतो किंवा झोपतो.

याच पहिल्या प्रकारच्या श्रावकाचेहि आणखी दोन विभाग

आहेत. एक अनेक घरातून भिक्षा मागून आणतो व दुसरा एका घरीच भिक्षा घेतो जो अनेक घरातून भिक्षा मागून आणतो, तो भोजनाच्या वेळी श्रावकाच्या घरी जाऊन त्याच्या अंगणात उभा राहून " धर्मलाभ होवो" असे म्हणून भिक्षा मागतो किंवा मौनपूर्वक आपणास पात्र दाखवून निघून जातो. जर कोणी श्रावकांनी कांही दिले तर ते तो आपल्या पात्रात घेतो. परंतु तेथे जास्त वेळ थांबत नाही व व तेथून दुसऱ्या श्रावकाच्या घरी जाऊन त्याप्रमाणेच करतो. जर कोण्या एका श्रावकाने आपल्या घरीच भोजन करण्यास सांगितले तर दुसऱ्या घरून जे आणले असेल ते प्रथम खाऊन मागाहून आवश्यकतेनुसार त्या श्रावकाच्या घरी भोजन करतो. असे कोणी म्हटले नाही तर जरूर तितक्या घरी जाऊन आपल्या गरजेपुरते मिळाले म्हणजे ज्या ठिकाणी शुद्ध प्राशुक पाणी असेल तेथे नीट पाहून भोजन करतो. खातेवेळी रुचीकडे लक्ष्य देत नाही किंवा अरुचकर असल्या गोष्टीकडे त्याचे लक्ष नसते. भोजनानंतर आपले उष्टे भांडे स्वतःच घासून ठेवतो. अहंकाराला बळी पडून जर तो दुसऱ्याकडून भांडी धुवून घेईल तर तो असंयम समजला जातो, आणि भोजनानंतर गुरूजवळ जाऊन दुसऱ्या दिवसपर्यंत आहार न करण्याचा नियम घेतो आणि गुरूजवळ येईपर्यंत मध्ये जे जे कांही त्याने केले असेल ते सर्व त्यांना सरळ सरळ सांगतो. जो उत्कृष्ट श्रावक एका घरीच भिक्षा ग्रहण करतो, तो कोणी एखाद्या मुनीच्या मागाहून श्रावकाच्या घरी जाऊन भोजन करतो व असे भोजन मिळाले नाही तर उपवास करतो.

या अकराव्या प्रतिमेतील श्रावक हा नेहमी मुनीजवळच राहतो त्याची सेवाशुश्रूषा करतो व अंतरंग आणि बहिरंग तप करतो विशेषतः वैयावृत्यतप अधिक निष्ठेने करतो. मुनिजनांना कांही कष्ट झाले असता

ते निवारण करण्याचा प्रयत्न यास वैयावृत्य म्हणतात. रोग्याची शुश्रूषा करणे, अशक्त मुनींना साहाय्य करणे, वृद्धांचे पायदावणे वगैरे तो आनंदाने करतो. वैयावृत्याचे फार महत्व आहे. कारण त्य.मूळे त्याची (घृणाभाव) किळस नाहीशी होऊन सेवा भावनेस प्रोत्साहन मिळते व वात्सल्याची वृद्धि होते, त्याचप्रमाणे अशा दु:खीकष्टी मुनीना आपली काळजी घेणारा कोणी आहे हे पाहून त्यांना ओकेओके किंवा एकाकी न वाटता हायसे वाटते

या प्रतिमेतील दुसऱ्याप्रकारचा उत्कृष्ट श्रावकहि पहिल्याप्रमाणेच सर्व क्रिया करतो. फरक एवढाच की डोके व दाढीचे केस तो हातानेच ओढून काढतो या क्रियेस 'केशलोच' म्हणतात. त्यास फक्त एक लंगोटीच असते व मुनीप्रमाणे हातात एक मोराच्या पंखांची पिंच्छिहि असते. तिने तो आपल्या वसण्याउठण्याचे स्थान साफ व जंतू रहित करतो. तसेच श्रावकाच्या घरी जाऊन त्याने प्रार्थना केल्यावर त्याच्या घरी हातातच भोजन करतो कोणतेच भांडे जवळ ठेवीत नाही. डाव्या हाताच्या करंगळीत उजव्या हाताची करगळी फसवून दोन्ही हातानीच तो आपले पात्र बनवितो. गृहस्थ डाव्या हाताच्या तळहातावर आहार ठेवत जातो व तो उजव्या हाताच्या चार बोटांनी तो घास घेऊन पाहून मग तोंडांत घालतो. हे श्रावक उत्तमोत्तम ग्रंथांचा स्वाध्याय करतात; व रिकाम्या वेळी संसार, शरीर वगैरेच्या स्वभावाबद्दल मनात चिंतन करतात.

याप्रमाणे नैष्ठिक श्रावकाचे हे अकरा दर्जे आहेत. हे क्रमाक्रमानेच पाळावयाचे असतात. सुरवातीच्या प्रतिमा व तत्संबंधीच्या क्रिया न करता एकदम वरच्या दर्जात तो प्रविष्ट होऊ शकत नाहीत व यदाकदा- चित् कोणी आगेकूच केली तर त्याला त्या दर्जांचा श्रावक म्हणता येणार नाही. जैनधर्मात शक्त्यनुसार केल्या गेलेल्या कार्यालाच अधिक

महत्व आहे, मागची प्रतिमा सोडून देऊन पुढे उड्डाण करणाऱ्याकडून पुढील प्रतिमांचा निर्वाह नीट होऊ शकत नाही. तसेच आपली जबाबदारी सोडून देण्याच्या उद्देशाने जे त्यागी बनू इच्छितात, त्यांनाहि येथे स्थान नाही. उलट जे आपल्या गार्हस्थिक जबाबदाऱ्यांचा यथोचित प्रबंध करून केवळ आत्मकल्याणाच्या भावनेनेच या मार्गाचे अवलंबन करतात तेच या मार्गास योग्य समजले जातात.

## साधक श्रावक

श्रावकाचा तिसरा भेद साधक आहे. मरणकाल जवळ आला असतांना शरीरावरील ममत्व सोडून भोजनादिकांचा त्याग करीत हळूहळू प्रेम पूर्वक, ध्यानाने जो आत्मशुद्धी करण्याचा प्रयत्न करतो, त्यास 'साधक' श्रावक म्हणतात.साधकाच्या या क्रियेला'समाधिमरणव्रत'किंवा'सल्लेखना व्रत' असेहि म्हणतात. जेव्हा कोणता एखादा भयंकर उपसर्ग, दुर्भिक्ष, वृद्धापकाळ किंवा इतका असाध्य रोग झाला असेल, की त्यातून सुटका होणे शक्य नाही तर अशावेळी धर्मसाधनेसाठी शरीरावरील ममत्व कमी करून ते कृश करणे किंवा ते सोडणे यास 'सल्लेखना' किंवा 'समाधिमरण' असे म्हणतात. समाधिमरण करण्याची विधि सांगत असतांना लिहिलेले आहे की, शरीर धर्माचे साधन आहे, त्यामुळे ते धर्मसाधनेत सहाय्य होत असेल तर ते नाश करू नये. परंतु ते नष्टच होणार असेल तर त्याचा शोक करू नये. ते धर्माचे साधन समजून आत्मध्यानांत प्रवृत्त होणे हाच सल्लेखनेचा उद्देश आहे. रोग झाला तर तो सुधारण्याचा उपाय करावा. परंतु शरीर जर धर्माच्या आड येत असेल तर अशा वेळी शरीराची पर्वा न करता धर्माचेच रक्षण करावे. कारण शरीर नष्ट झाले तर ते पुनः मिळेल परंतु धर्माची प्राप्ती अत्यंत दुर्लभ आहे.

कोणी कोणी समाधिमरणव्रताचें स्वरूप न समजून घेतां या क्रियेस ' आत्मघात ' म्हणतात. परंतु धर्मावर संकट आले असतांना धर्माची रक्षा करण्याकरिता शरीराची उपेक्षा करणे हा आत्मघात न ही उलट क्रोधास बळी पडून विष वगैरेच्या सहाय्याने प्राणांचा घात करणे हाच आत्मघात आहे. धर्माच्या रक्षणासाठी आपले बलिदान करणाऱ्या वीरांचे अनेक पोवाडे भारताच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. जे लोक भौतिक जीवनालाच सर्वस्व समजून त्याच्या पाठीमागे लागलेले असतात, ते खरोखर जीवन म्हणजे काय हे समजत नाहीत. म्हणूनच म्हटले आहे " ज्याला मरता येत नाही त्याला जगताहि येत नाही."

आपला धर्म, कर्म, मान, मर्यादा इत्यादि गमावून जे जगणे त्याला जीवन कसे म्हणावे ? आयुष्य क्षणभंगुर आहे; लाखो प्रयत्न करूनहि एके दिवशी ते नष्ट होणारच आहे. तेव्हा त्याच्या रक्षणासाठी कर्तव्य पराङ्गमुख होणे हे योग्य नाही. हा मुद्दा जैनशास्त्रांत एका दृष्टांताने समजावून दिला आहे.

'देण्याघेण्याच्या अनेक वस्तूंचा संग्रह करणारा व्यापारी आपल्या घराचा नाश व्हावा असे इच्छित नाही. परंतु जेव्हा त्याच्या घरास आग लागते तेव्हा ती विझविण्याचा तो आटोकाट प्रयत्न करतो. पण हे घर विझविणे शक्य नाही, असे जेव्हा त्यास दिसून येते तेव्हा त्याची पर्वा न करतां बाकी शिल्लक राहिलेल्या धनाचे तो रक्षण करतो. त्याच प्रमाणे व्रतशीलरूप धनाचा संचय करणारा हा व्रतीश्रावक, आपल्या शरीराचा नाश करू इच्छित नाही. परंतु शरीर नाशाचा निश्चित प्रसंग उपस्थित झाल्यावर आपल्या धर्मास बाधा येणार नाही अशारीतीने ते सोडण्याचा तो प्रयत्न करतो. म्हणजेच कांही केले तरी शरीराचा नाश होणारच अशी खात्री जेव्हा होते, तेव्हा

शरीराची पर्वा न करता धर्म रक्षणाचा प्रयत्न तो करतो. अशा परि-स्थितीत समाधीमरणास ' आत्मघात कसे म्हणता येईल ?'

समाधीमरणाचा उद्देश शेवट सुधारणे हा आहे. जेव्हा मृत्यु अटळ आहे अशावेळी रागद्वेषादि विकार व परिग्रह सोडून शुद्ध मनाने सर्वांची क्षमा मागून, ज्यांनी आपला अपराध केला असेल, त्यांनाहि क्षमा करावी. त्याचप्रमाणे आपल्या हातून झालेल्या पापाबद्दल आलोचना करावी व मरणापर्यन्त संपूर्ण महाव्रते धारण करावीत. अशावेळी समाधि-मरणव्रत देणारे आचार्य व त्यांचा सर्व संघ त्या साधकाची साधना सफल बनविण्यास तत्पर असतात. आचार्य साधकास विचारून त्याची कांही खाण्याची इच्छा असेल तर ते त्यास खाण्यास देऊन मगच आहाराचा त्याग करवितात व केवळ दुधासारखे पदार्थ त्यास दिले जातात. कालांतराने दुधाचाहि त्याग करून गरम पाणी दिले जाते व नंतर त्याचाहि त्याग करविला जातो. परंतु जर त्यास असा कांही रोग असेल की ज्यामुळे पुनः पुनः तहान लागत असेल तर गरम पाणी देणे चालूच असते व जेव्हा मृत्यूची घटका अगदी जवळ येते, तेव्हा गरम पाण्याचाहि त्याग करवितात.

त्यानंतर आचार्य साधकाच्या कानात सदुपदेश देतात व साधक पंचणमोकारमंत्राचा जप करीत शांततेने प्राण विसर्जन करतो. या समा-धिमरण व्रताचे ५ दोष आहेत. अशा साधकाने १ जिवंत राहण्याची किंवा २ कष्टाला भिऊन लवकर मरण्याची इच्छा करू नये. कारण आपल्या इच्छेने आयुष्य कमी किंवा जास्त होणारे नाही. म्हणून असले विचार मनांत आणणे व्यर्थ आहे. ३ त्याचप्रमाणे मित्रांवरील प्रेम किंवा ४ आयुष्यात भोगलेल्या सुखाचेहि स्मरण करू नये. असल्या गोष्टी मनुष्याचे मन कमजोर बनवितात व साधकाची साधना यथोचित होत नाही. ५ त्याचप्रमाणे मनांत असाहि विचार आणू नये की

मी आयुष्यभर जी धर्म आराधना केली त्याचे फळ म्हणून दुसऱ्या जन्मात मी चक्रवर्ती किंवा इंद्र वगैरे व्हावे. कारण अशा करण्याने धर्माराधनेचा मूळ उद्देश नष्ट होतो धर्मासाठी त्याने जे आतापर्यंत सोडले, ते धर्म करून पुनः तेच मागणे हा मूर्खपणा आहे. धर्माचे स्वरूप व त्याच्या उद्देशासंबंधी अज्ञान असल्याचेच हे द्योतक आहे म्हणून असल्या आकांक्षापासून दूर असावे.

याप्रमाणे जैनश्रावक आपल्या विधिनियमानुसार आपले जीवन निर्वाह करून, तो सरतेशेवटी शांततेने व निर्भयतेने मृत्यूस आलिंगन देतो व अशारितीने हा साधक आपले मानवी जीवन सफल बनवितो

### ६ श्रावकधर्म व जागतिक प्रश्न.

चालू जागतिक प्रश्न सोडविण्यासाठी धर्म किती प्रमाणात पुढे येऊ शकतो? हा सर्व धर्मासमोर महत्वाचा प्रश्न आहे. हा प्रश्न एकवेळ सोडून दिला तरी केवळ व्यक्तीची प्रगति व मोक्षप्राप्ती एवढ्याकरिताच धर्म निर्माण झाला आहे की, समाज आणि राष्ट्राचा विकासहि त्यामुळे होऊ शकतो हाही प्रश्न धर्मासमोर आहेच. वर सांगितलेल्या श्रावक धर्माच्या अनुरोधाने हा प्रश्न सोडविण्याचा येथे आपण प्रयत्न करू.

धर्माची उत्पत्ति व्यक्ती-विकासासाठी झालेली आहे हे सत्य आहे. परंतु व्यक्ती ही समाज, राष्ट्र आणि विश्व यापासून कांही निराळी नाही. व्यक्तीचा समूहच समाज राष्ट्र आणि जग या नावानी समजला जातो. आज जे जागतिक प्रश्न म्हणून समजले गेले आहेत. ते वास्तविक जगात असलेल्या व्यक्तींचेच प्रश्न आहेत. व्यक्ती हा एकटा आहे, हे मान्य करूनहि अनेक व्यक्ती मिळून संघ, समाज वगैरे बनतात. म्हणून व्यक्तीच्या विकासासाठी जन्मलेला धर्म, हा फक्त एखाद्या व्यक्तीच्याच उन्नतीचे कारण नसून समाजाच्याहि विकासाचे तो कारण

आहे आणि व्यक्तीमात्रात जगातील सर्वच व्यक्ती येत असल्यामुळे पर्यायाने तो जगाच्याहि विकासास कारणीभूत होतो. परंतु जगाने तो धर्म पाळला पाहिजे. तेव्हा सुरवातीस आपण आजचे सोडविण्यासारखे कोणते प्रश्न आहेत? व त्याचे मूळ कारण काय आहे? हे आपण पाहू

गेल्या २०० वर्षात विज्ञानाने बरीच प्रगति केली आहे. त्याने अशा प्रकारची यंत्रसामुग्री शोधून काढली आहे की ज्यामुळे जगाचे सरक्षण व विनाशहि अधिक होऊ शकेल. कारण त्याचा चांगला व वाईट असा दोन्ही प्रकारचा उपयोग होऊ शकतो, चांगला अगर वाईट उपयोग करणे ही मनुष्याच्या हातातील गोष्ट आहे. त्यात वस्तूचा काय अपराध? विद्या चांगली असूनहि दुर्जनांच्या हातात पडल्यावर ती वितंडवादास कारणीभूत होते. सज्जन धनाने परोपकार करीत असेल तरी तेच धन दुर्जनांना उन्माद निर्माण करिते. शक्तीने एखादा दुसऱ्याला त्रास देतो तर त्या शक्तीने दुसरा एखादा दुःखिताचे दुःख निवारण करतो. विज्ञानामुळे जगातील अंतर नष्ट होऊन जगातील निरनिराळ्या जाती व राष्ट्रे इतकी जवळ आली आहेत की, जर परस्परांशी मैत्रीने त्यांनी राहण्याचे ठरविले तर सहज एकसूत्रतेने राहू शकतील; कारण विज्ञानामुळे संघटनेची अनेक साधने निर्माण झालेली आहेत. त्याचप्रमाणे उत्पादनाचीहि अशी साधने आहेत की, ज्यामुळे जगातील सर्व स्त्री-पुरुष सुखाने आपला निर्वाह करू शकतील. परंतु त्या साधनावर आज कांही विशिष्ट वर्गाचा व राष्ट्राचा अधिकार आहे व ते त्यांचा उपयोग दुसऱ्यावर आपले वर्चस्व गाजविण्यासाठी व टिकविण्यासाठी करतात. शिकारीसाठी जंगलात भटकणारा वाघ आपल्या तीक्ष्ण नखाचा व दातांचा शिकारीसाठी जसा उपयोग करतो, त्याचप्रमाणे वैज्ञानिक साधनानी भरभराटीस आलेली राष्ट्रेहि दुसऱ्या

राष्ट्रांच्या छातीवर त्या वाघाप्रमाणेच आपल्या साधनांचा उपयोग करीत असल्याचे दिसून येते. त्यामुळे युद्धाची निर्मिती होते आणि त्यांत संपत्तीची व लोकांची आहुति दिली जाते. जणु काय या साधनांचा दुसरा कोही चांगला उपयोग होतच नाही. एका बाजूने नवीन साध-नांच्या सहाय्याने शेतीतून खूप धान्य उत्पन्न केले जाते, रात्रंदिवस गिरण्या चालवून कपडे बनविले जातात; तर दुसरीकडे अनेक मनुष्य अन्न व वस्त्रांशिवाय जीवन व्यतीत करतात, एकाबाजूला अन्नवस्त्रासाठी किंबहुना दाण्यादाण्यासाठी लोक तडफडतात, आणि दुसरीकडे ज्यांना आवश्यकता नाही, अशांच्याजवळ जरूरीपेक्षा जास्त साठे भरून ठेवलेले आढळून येतात. शांति व सुरक्षिततेसाठी कायदे तयार केले जातात, तर ते जबरदस्तीने पाळून घेण्यासाठी पोलीस, सेना व जेल-खानेहि आहेत. पण त्याचबरोबर अन्यायासाठी न्यायाचे ढोंग व सत्य लपविण्यासाठी असत्याचा प्रचारहि केला जात आहे. हे प्रश्न सर्व जगासमोर सारखेच आहेत. युद्धात होणाऱ्या महान् विनाशाने युद्ध खेळणाऱ्यांनाहि भयभीत केले आहे. सर्वांना वाटते युद्ध होऊ नये. परंतु युद्धाची जी कारणे आहेत ती त्यांना सोडवत नाहीत. सर्वत्र राजनैतिक व आर्थिक संघटनांत परस्पर अविश्वास खून, मारामारी आणि प्राणहानि यांची भावना सुप्तपणे पसरलेली आहे. दुसऱ्याला बेवकूफ बनवून आपले कार्य साधणे हाच सर्वांचा मूलमंत्र आहे. मग शांति कशी रहावी व युद्ध संस्था कशी समूळ नष्ट व्हावी ?

अर्लीकडील या प्रश्नांच्या विहंगमावलोकनावरून असा निष्कर्ष निघतो की, निरनिराळी राष्ट्रे व जाती यांच्यांत हिंसामूळ व्यवहारासच जास्त प्राधान्य दिले गेले आहे. स्वार्थाधिष्ठित बेईमानी धोकेबाजी ही सर्व हिंसेचीच प्रतिरूपे आहेत. अशा परिस्थितीत दोन व्यक्तीत ज्या-प्रमाणे मैत्री असू शकत नाही, त्याचप्रमाणे राष्ट्रांत व जातीजातीतहि

मैत्री राहू शकत नाही. "स्वतः जिवंत रहा व दुसऱ्यासहि राहू द्या." हा सिद्धांत जसा व्यक्तीस लागू आहे तसाच तो राष्ट्रासहि व जातीसहि लागू आहे. निरनिराळी समाज व राष्ट्रे जोपर्यन्त हा सिद्धांत पाळू शकत नाहीत तोपर्यंत विश्वांतील प्रश्न सुटू शकणार नाहीतच; उलट अधिकाधिक गुंतागुंत मात्र वाढेल. म्हणून जागतिक प्रश्न सोडविण्यासाठी राष्ट्रांच्या शासन व्यवस्थेत आमूलाग्र परिवर्तन व्हावयास पाहिजे. त्याचप्रमाणे सामाजिक व आर्थिक व्यवस्थेतहि योग्य सुधारणा व्हावयास पाहिजे आणि हे परिवर्तन अहिंसेवरच आधारलेले असावयास पाहिजे.

बलप्रयोगाच्या आधारावर मानवी संबंधांची भिंत उभी केली जाऊ शकत नाही, हे विसरून चालणार नाही. कौटुंबिक व सामाजिक जीवनाच्या प्रगतीत पुष्कळशा प्रमाणात सहानुभूति, दया, प्रेम, त्याग सहृदयता यांना स्थान आहे. त्याचप्रमाणे व्यक्तिगत आचरण व सामाजिक वातावरण यांचा निकट संबंध आहे ही गोष्टहि विसरून चालणार नाही. व्यक्तीगत आचरणाने सामाजिक वातावरण व सामाजिक वातावरणाने व्यक्तित्त्वाचा उदय होतो. कोणत्याहि समाजातील व्यक्तीचे आचारण जर दूषित असेल, तर सामाजिक वातावरण कधीहि शुद्ध होऊ शकणार नाही. सामाजिक वातावरण शुद्ध असल्याशिवाय व्यक्तींच्या आचरणातहि सुधारणा घडणे शक्य नाही. म्हणून व्यक्तीगत सदाचारावरोबर सामाजिक वातावरणहि शुद्ध करण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे; व त्यासाठीच जैनधर्म प्रत्येक व्यक्तीच्या शुद्ध चारित्रावर ज़ोर देऊन व आपल्या जीवनातून हिंसामूलक व्यवहार संपूर्णतः घालवून, मैत्री, प्रमोद, कारुण्य वगैरे भावनांनी आपसांतील व्यवहार करण्याचा आदेश देतो. इतकेच नव्हे तर, त्याची हीहि इच्छा आहे की राजाहि असाच धार्मिक असावा. कारण राजनीतीत

अधार्मिकता शिरल्यास सर्व राष्ट्राचे नैतिक जीवन अधोगतिस जाते व मग अशा अनीतीतून व्यक्ती सुटू म्हटला तरी सुटू शकणार नाही. अनेक बाह्य प्रलोभनें व नित्य वाढणाऱ्या गरजांच्या दडपणाने तोही अनर्थ करावयास तत्पर होतो. उदा० चोरबाजार, काळाबाजार इ. म्हणून राज्यनीती, समाजनीती व वैयक्तिक जीवन यांचा आधार ' अहिंसा हाच ठेवला, तरच राजा व प्रजा दोन्हीहि सुखाने नांदू शकतील.

ज्या देशात आज लोकशाही आहे, त्या देशांत जरी आपआपल्या जनतेच्या सुखदु:खाकडे लक्ष्य दिले जाते; तरी त्यांचा दुसऱ्या देशांतील जनतेबरोबर असा व्यवहार आढळत नाही. तोंडाने गोडगोड गोष्टी तर केल्या जातात; परंतु व्यवहार मात्र त्यांचा अगदी उलट असतो. दुसऱ्या देशांवर आपला अधिकार जमविण्यासाठी राजकीय गट बनविले जातात. त्यांच्या विरुद्ध खोटा प्रचार करण्यासाठी लाखो रुपये खर्च केले जातात व वर पुन: अशी बढाई मारली जाते की त्यांच्या चांगल्यासाठीच आम्ही त्यांच्यावर राज्य करीत आहोत. तेथील सरकार-वर आपला अधिकार जमवून त्या देशातील धनाचा व लोकाच मन मानेल तसा उपयोग केला जातो. हे सर्व हिंसा, असत्य, चोरी नसेल तर दुसऱ्या कोणत्या गोष्टीस ही नावे लागू शकतील ? जर राष्ट्रांची उभारणी अहिंसेच्यां आधारावर केली गेली व असत्य व्यवहारास स्थान दिले गेले नाही, तर राष्ट्रांत परस्पर अविश्वास व सूडबुद्धी किंवा युद्धाची खुमखुमी राहणार नाही. सर्व राष्ट्रांचा एक विश्वसंघ झाला, त्यांतील सर्व राष्ट्रांना भ्रातृभावनेने एक कुटुंब समजून सर्वांना समान अधिकार असला, कोणी शासक व शास्य असा भेदभाव नसला, सर्वांची दु:खे अडचणी आणि संकटे काळजीपूर्वक लक्षात घेतली म्हणजेच सर्वांची सर्वांशी मैत्री असली व सर्व एकसूत्रतेने राहू लागले तर युद्ध होणार नाही व तज्जनित नाना प्रकारच्या यातनाही

लोकांना भोगाव्या लागणार नाहीत.

आज उत्पादनावर एक राष्ट्र किंवा विशिष्ट वर्गाचा अधिकार असल्याने आपल्यासाठी दुरदूरून कच्चा माल मागवावा लागतो व तयार झालेला माल खपविण्यासाठी बाजारपेठा पाहून त्यावर आपला ताबा ठेवावा लागतो. मग ह्या बाजारपेठा आपल्या राष्ट्रापासून कितीहि दूर असल्या तरी त्यांची त्यांना क्षिती नसते. यामुळेच जगांत अनेक आपत्तीं येऊ लागल्या आहेत. या प्रश्नातून आपली सुटका करावयाची असेल तर आपणास एक अहिंसेचाच मार्ग स्वीकारावा लागेल. राष्ट्र व विशिष्ट समाजाच्या चांगुलपणाकडे लक्ष देण्याऐवजी जगाच्या भलेपणाकडे आपणांस पहावे लागेल. आपले जीवन भौतिक दुनियेच्या आवश्यकतेनुसार चालवून चालावयाचे नाही. कृत्रिमपणाने आपल्या गरजा वाढवून मग त्या पूर्ण करीत बसण्याचा खटाटोप सोडून द्यावा लागेल. आपल्याजवळ किती जास्त वस्तू आहेत. एवढ्यावरच जीवनातील आनंद अवलंबून नाही. जी व्यक्ती किंवा समाज व राष्ट्र कृत्रिमपणे गरजा वाढवून त्या भागविण्याच्या पाठीमागे लागते किंवा निष्कारण वस्तूंचा संग्रह करीत राहते, ते दुःख व पापाचाच संग्रह करीत असते; व त्यासाठीच जैनधर्माने परिग्रहास पाप सांगितले आहे व प्रत्येक गृहस्थासाठी असा नियम केला आहे की त्याने आपल्या इच्छांना बांध घालून आपल्या गरजेप्रमाणे आवश्यक वस्तूंची एक मर्यादा निश्चित करावी व त्यापेक्षा जे अधिक असेल त्याचा त्याग करावा. आज उत्पादन व वाटणीच्या प्रश्नाने या जगात विराट स्वरूप धारण केले आहे. कल्पनातीत आर्थिक विषमता वाढली असून तीत समतोलता साधणे दिवसेदिवस कठीण होऊ लागले आहे. जैनधर्मप्रवर्तक श्री. वृषभनाथ भगवंतांनी युगाच्या सुरवातीस मनुष्याची ही संग्रह प्रवृत्ती लक्षांत घेऊन प्रत्येक गृहस्थास परिग्रहपरिमाणव्रताचा आदेश दिला.

या व्यवस्थेत भोगविलास हे जीवनाचे ध्येय नव्हते. भोगावर जोर दिल्यानेच जागतिक व्यवस्थेचा आधार मौज, भोग व अधिकार हे झाले, आणि त्याचा अखेर परिणाम म्हणजे संघर्ष व जगाच्या गळ्या-भोवती युद्धाची तांत; याउलट जर अनावश्यक इच्छांच्या नियमावर आपण जोर दिला व स्वैरजीवनावर नियंत्रण केले; तर आपल्या गरजा कमी होतील. मनःपूर्वक गरजा कमी केल्याशिवाय, केवळ कायद्यांच्या जोरावर उत्पादन व वाटणीचा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला, तर त्यात यश येणार नाही. कारण कायद्याचे पालन आपण अगदी काटेकोर करीत आहोत असे दाखवूनहि मनुष्य आपल्या बुद्धीच्यायोगाने त्या कायद्यांचा भंग करू शकतो, व त्या लवचिक भाषेच्या आधारानेच त्यातून तो सहिसलामत सुटतोहि.

वास्तविक नैतिक आचाराचे पालन जबरदस्तीने होऊ शकणार नाही. तो अंतरंग प्रेरणेनेच होऊ शकेल. म्हणून कायद्यापेक्षाहि अधिक प्रभावी व गुणकारी मार्ग ' आत्मसंयमन ' हाच आहे जर मनुष्य आपले व समाजाचे यांत कल्याण आहे, असे समजून त्याचे पालन करील, तर तो स्वतः संयमी बनण्याचा प्रयत्न करू लागले. याप्रमाणे जेव्हा संयमी पुरुष वरच्या दर्जावर जाऊन पोहोचतो, तेव्हा तो स्वतः आदर्श बनून दुसऱ्यांनाहि त्याच्यापासून संयमी बनण्याची प्रेरणा मिळेल व याप्रमाणे तो समाजाचा नैतिक स्थर वाढविण्यात निरंतर योग दान देत राहिल. संयमाच्या या शिकवणुकीचा परिणाम म्हणजेच ब्रह्मचर्य व अपरिग्रह-व्रत आहे. जर मानवी समाजाच्या वासना व लालसा नियंत्रित केल्या गेल्या नाहीत, तर त्याचे शारीरिक व आध्यात्मिक स्वास्थ्य नष्ट होऊन त्याचा विकास थांबेल.

वरील विवेचनावरून आपणास असे समजून येईल की, जैन-

धर्मात प्रत्येक गृहस्थासाठी जी अणुव्रते सांगितली आहेत, ती सामाजिक व राजकीय जीवनाचेहि आधार स्तंभ झाले तर अनेक महत्वाचे जागतिक प्रश्न सहज सुटू शकतील.

आता मद्य, मांस, मधुत्याग व गृहस्थांची अन्यव्रते आणि नियम यांचे सर्वजण पालन करतील अशी आशा केली जाऊ शकत नाही तथापि जो त्याचे पालन करील त्याचा शारीरिक व आध्यात्मिक दृष्टीने लाभच होईल. मद्य व मांस अशा गोष्टी आहेत की सार्वजनिक भोजनांत त्याना स्थान देण्याची गरज नाही. दोन्हींहि तामसी आहारात मोडले जातात व त्यांनी सात्विक भावांचा विकास होत नाही, तसे झाले नाहीतर अहिंसक वातावरणहि तयार होऊ शकत नाही आणि त्याशिवाय जगात सुखशांतीची प्रस्थापना होणे शक्य नाही. म्हणून त्यावरून जर मनुष्याचे मन उडून गेले तर त्या मनुष्याचा व त्या बरोबर सर्व जगाचा फायदा होऊ शकेल. मनुष्यस्वभाव हा संपूर्णतः चांगला अगर वाईट नसतो. ओल्या मातीप्रमाणे तो आहे. ज्याप्रमाणे त्याला घडवावे तसे तो धारण करतो. ज्या घराण्यात असल्या वस्तूचा त्याग चालत आलेला आहे त्या घराण्यातील मुले अशा वस्तूचा आजन्म त्याग करतात. उलट ज्या घरात अशी प्रथा चालू असत त्या घरातील मुले त्यास लालचावतात. यावरून असे सिद्ध होते की, जो त्याचा प्राकृतिक आहार नाही, अशा वस्तूपासून मनुष्य सहज दूर राहू शकतो. परंतु ज्या देशात अन्नधान्याची कमतरता आहे. किंवा वातावरणाच्या प्रभावामुळे असले पदार्थ ते सोडू शकत नाहीत, त्या देशामध्ये सुद्धा असल्या पदार्थावर प्रतिबंध घालून कमीतकमी अशी भावना तरी निर्माण करता येऊ शकेल की, या वस्तु मनुष्यास ग्राह्य नाहीत. परंतु परिस्थितिवश त्या खाव्या लागतात. आपली शक्ती, परिस्थिति व व्यवसाय याना अनुसरून हिंसेचा त्याग करूनहि मनुष्य अहिंस–

कांच्या पक्तीत सामील होऊ शकतो. उा० एखादा कोणी कसाई आपल्या आजीविकेचे ते साधन असल्यामुळे जरी तो पशुहत्या सोडू शकत नसला तरी त्याने आठवड्यातून एक दिवस त्याचा त्याग करणे किंवा विशिष्ट प्रकारच्या प्राण्याशिवाय अगर त्यांच्या कांही मर्यादेबाहेर मी हत्या करणार नाही असा नियम घेणेसुद्धा अहिंसाणुव्रताच्या जघन्यश्रेणीत समाविष्ट होऊ शकते. जैन पुराणात या बाबतीत अनेक कथा आहेत. एका मुनीने एका मांसाहारी भिल्लास कावळयाचे मांस सोडण्याचा नियम दिला, तसेच एका कोळयास असा नियम दिला की, त्याच्या जाळयात जो पहिला मासा येईल त्यास सोडून द्यावे. एका फाशी देण्याचेच काम करणाऱ्या चांडाळास असा नियम दिला की चतुर्दशीच्या दिवशी कोणासहि फाशी द्यावयाची नाही. या छोटया छोटया प्रतिज्ञांनीहि त्याचे जीवन सुधारलेले होते. म्हणून थोडासाहि प्रतिबंध (नियम) घेऊन मांस, मद्य सेवनावर जर कांही अंकुश घातला गेला, तर त्याची संवय झालेली माणसे त्याच्या वाईट परिणामांपासून वाचू शकतील. त्यामुळे समाजात पसरलेल्या अनेक वाईट पद्धतीतून समाजाची सुटका होऊ शकेल. याप्रमाणे जेनधर्माचे नियम जरी अधिक कडक दिसतात, तरी मनुष्याची शक्ती व परिस्थिति लक्षांत घेऊनच ते पाळण्याचे आदेश दिलेले असतात. म्हणून त्यात कोठे तीव्रता अगर मनुष्याने स्वतः होऊन आपल्या अनियंत्रित इच्छेस "ब्रेक" लावावयास शिकावे व वाईट कामे करतांनाहि निदान आपण हे वाईट करतो आहोत हे विसरून नये. ह्या इतक्या साध्या गोष्टी आहेत की त्या कोणीहि करू शकेल. त्याप्रमाणे वृद्धावस्थेत आपल्या सांसारिक जबाबदाऱ्यातून पार पडून व त्यांचा भार आपल्या उत्तराधिकाऱ्यावर सोपवून जर मनुष्य आत्मसाधनेचा मार्ग स्वीकारू लागला, तर त्यामुळे

अशा कार्यक्षेत्रात पडणाऱ्या अनेक नव्या उत्सुक व्यक्तींना सहजा-सहजी स्थान मिळू शकेल, कौटुंबिक कटुताहि कमी होईल व त्या बरोबरच आध्यात्मिक विकासाचा मार्गहि चालू राहून त्यामुळे जगास पुष्कळसा फायदा होईल

### ७ मुनींचे चारित्र.

मुनि किंवा साधुंचे २८ मूलगुण असतात. १-५ पाच महाव्रते अहिंसामव्रत, सत्यमहाव्रत, अचौर्यमहाव्रत, ब्रह्मचर्यमहाव्रत, अपरि-ग्रहमहाव्रत. ज्या पांच व्रतांचे श्रावक एकदेश (अंशतः) पालन करतो, तीच व्रते साधु पूर्णपणे पाळतो. म्हणजेच ते षट्कायिक जीवाची हिंसा करीत नाहीत; व राग, द्वेष, काम, क्रोध वगैरे विकार उत्पन्न होऊ देत नाहीत. प्राणावर संकट आले असतांनाहि कधी खोटे बोलत नाहीत. दिल्याशिवाय कोणतीच वस्तु घेत नाहीत. पूर्णशीलाचे पालन करतात व अंतरंग आणि बहिरंग सर्वप्रकारच्या परिग्रहाचा ते त्याग करतात फक्त शौच वगैरेसाठी पाणी अवश्य असल्यामुळे एक कमंडलु व जीव रक्षणा-साठी मोरांच्या गळून पडलेल्या पंखांची पिंछी एवढेच फक्त त्यांच्या जवळ असते. ६-१० पांच समिति-दिवसा सूर्याच्या प्रकाशात जमीन पाहून काळजीपूर्वक चालतात. बोलतांना भाषा अत्यंत हितकर व प्रमाणशीर असते. दिवसा एकवेळ श्रावकाच्या घरी जाऊन जर तो श्रद्धा व भक्तीने आहारास आमंत्रित करील तर ४६ दोष टाळून भोजन करतात. आपले कमंडलु व पिंछी, जीवजंतू पाहून हातात घेतात व खाली ठेवतात. मल-मूत्र-विसर्जन अशा स्थानी करतात की, जेथे कोणालाहि त्यापासून त्रास होण्याची शक्यता नाही. ११-१५ पंचेद्रिय संयम-आपल्या पांचही इंद्रियांना जे आवडते, त्यावर त्यांची प्रीति नसते अगर जे पदार्थ इंद्रियांना अनुकूल नाहीत, त्यावद्दल अप्रीति किंवा

दोषहि नसतो. १६-२१ सहा आवश्यके:- दररोज सामायिक करणे, तीर्थंकरांची स्तुती करणे, त्यांना नमस्कार करणे, प्रमादामुळे झालेला दोष सुधारणे, पुढे होणाऱ्या दोषापासून मुक्त होण्यासाठी अयोग्य वस्तूंचा मन, वचन, कायेने त्याग करणे, झालेल्या दोषांच्या शुद्धीसाठी प्रायश्चित घेणे अथवा तपाच्या वृद्धीसाठी किंवा कर्माच्या निर्जरेसाठी कायोत्सर्ग करणे उभे राहून दोन्ही हात खाली गुडघ्याकडे ताठ ठेऊन व पायांत चार बोटांचे अंतर ठेवून निश्चलरूपाने आत्मध्यानांत लीन होणे, यास कायोत्सर्ग म्हणतात.

२२. स्नान न करणे, गृहस्थाच्या घरी जेव्हा आहारास जातात तेव्हा गृहस्थाच त्यांचे शरीर पुसून देतात. २३. तोंड न धुणे; भोजन करण्याच्या वेळी गृहस्थाच्याच घरी मुखशुद्धी करून घेतात, २४. जमिनीवर झोपणे. २५ उभे राहून आहार घेणे. २६. दिवसातून एकादाच भोजन करणे. २७. नग्न असणे. २८ केशलोच करणे.

हे २८ मूलगुण प्रत्येक जैनसाधू पाळतो. त्यावर जरी कांही संकट आले तरी त्यापासून ते विचलीत होत नाहीत. भूकतहानेने व्याकुळ झाले तरी कोणाला मागत नाहीत, व चेहऱ्यावर दीन भावहि आणीत नाहीत ज्याप्रमाणे विदेशी सरकार असताना सरकारशी असहयोग करणारे सत्याग्रही देशाच्या स्वातंत्र्यासाठी तुरुंगांत टाकल्यानंतरहि कोणाकडे फिर्याद करीत नव्हते; किंवा आत्यंतिक कष्ट झाले तरी माफी मागत नव्हते उलट आपल्या ध्येयपूर्तीसाठी तत्पर राहात असत. त्याचप्रमाणे जैनसाधु सांसारिक बंधनाच्या कारणाशी असहयोग करून आलेल्या कष्टांना न घाबरता आत्ममुक्तीसाठी सतत प्रयत्नशील राहतात. जे लोक त्यांना त्रास देतात, दुःख देतात, अपशब्द बोलतात, त्यांच्यावर ते क्रोध करीत नाहीत; त्यांना कोणाशी लढाई किंवा झगडा करण्याचे कांही कारण नाही. ते नेहमी आपल्या कर्तव्यांत मग्न असतात. शत्रू, मित्र, महाल किंवा स्मशान, निंदा, स्तुति इत्यादि

सर्व त्यांना सारखेंच असतात त्याची जे करितात त्यांना ज्याप्रमाणे ते आर्शीवाद देतात, त्याचप्रमाणे तलवारीने त्यांच्यावर कोणी वार करू लागला तर त्यांचेही हितच इच्छितात. त्यांचा कोणावरच राग किंवा द्वेष नसतो किंबहुना ते दूर करण्यासाठीच साधूंचा आचार ते पाळतात उदा०

" मोहनिरापहरणे दर्शनलाभादवाप्तसंज्ञान: ।
रागद्वेषनिवृत्यै चरणं प्रतिपद्यते साधु: । ॥ ४७ ॥
रागद्वेषनिवृते हिंसादिनिवतना कृता भवति ॥
अनपेक्षितार्थवृत्ति: क: पुरुष सेवते नृपतीन् ॥ ४८ ॥ रत्नकरंड श्रा

अर्थ:– मोहरुपी अंधःकार दूर झाल्यानंतर, सम्यग्दर्शनाच्या प्राप्तीबरोबरच ज्यास सम्यग्ज्ञानाचीहि प्राप्ति झाली आहे ते साधु राग व द्वेप दूर करण्यासाठीच चारित्र पालन करतात. (यावर कोणी असे म्हणेल की हिंसादिक पापापासून निवृत्त होण्यसाठी चारित्र पाळले जाते: रागद्वेषाच्या निवृत्तिसाठी नाही. कारण जैनधर्मानें अहिंसा ही आराध्य आहे तर त्याचे समाधान असे की ) राग, द्वेप इत्यादि दूर झाल्यानंतर हिंसादि पापे आपोआपच दूर होतात. कारण ज्या मनुष्यास आपल्या उपजीविकेची चिंता नाही, ते लोक राजाची सेवा करण्यास कशास जातील? म्हणून ज्यास रागद्वेपच नाहीत तो हिंसेसारखी कार्ये कशास करील?

म्हणून बाह्य सर्व गोष्टीपासून साधू उदासीन असतो ते कोणाकडे अपेक्षावृत्तीने पाहात नाहीत. जैनधर्मात साधूंनाच निरपेक्ष वृत्तीने व संयतशीलतेने राहण्याचा आदेश दिलेला आहे. त्यासाठी त्यांच्या आवश्यकताहि अत्यंत मर्यादित असतात. साधु होण्यासाठी सर्व वस्त्रांच त्यास त्याग करावा लागतो. कारण एकतर त्याची निर्विकारता त्यावरूना स्पष्ट होते. व दुसरी गोष्ट म्हणजे त्यासाठी त्यास कोणास याचना

करावी लागत नाही. जो निर्विकार नाही तो स्वतःहून स्वइच्छेने नग्न होऊ शकत नाही. विकार लपविण्यासाठीच मनुष्य लंगोटी नेसतो. त्याची लंगोटी गमावली अगर फाटली तर त्यास चालणे, फिरणे कठीण होऊन जाईल. लहानपणी मुलगा नग्न असतो त्यास पाहून कोणास लाज वाटत नाही कारण तो स्वतः निर्विकार असतो. जेव्हा त्याच्यात विकृत भावना येऊ लागतात,तेव्हाच नग्न राहण्याचा संकोच वाटतो. सर्वजण निसर्गतः दिगंवरच असतात. नंतर मनुष्य कृत्रिमतेच्या अवडंवरांत फसतो. म्हणून जो साधु असतो तो अशी कृत्रिमता टाकून देऊन नैसर्गिक अवस्थेत परत येतो. त्याला पुनः कृत्रिम आवरणाची आवश्यकता राहात नाही. त्यासाठीच डोके, दाढी व मिशाचे केस दुसऱ्या, चौथ्या किंवा सहाव्या महिन्यात ते आपल्या हाताने काढतात. साधुत्वाची दीक्षा घेताना त्यांना अशा केशलोच करावा लागतो. त्याची कांही कारणे आहेत. प्रथम जे सुखासीन व्यक्ती आहेत किंवा जे कोणी अडचणी किंवा कांही विशिष्ट कारणांनी साधु वनू इच्छित असतील ते या मार्गास कधी लवकर झुकणार नाहीत व त्यावरोवरच पाखंडी साधूपासून साधुसंघाचा आपोआपच वचाव होतो. पाखण्डी साधूंच्या सहवासात त्यांना राहण्याची इच्छा होत नाही. साधु झाल्या–वर जर ते केस ठेवतील तर त्यांत ऊवा वगैरे होऊन ते हिंसेचे कारण होतील किंवा जर दुसऱ्याकडून क्षौरकर्म करून घ्यावयाचे असेल तर त्यासाठी दुसऱ्यांना पैसा वगैरे मागण्याची पाळी येईल म्हणून वैराग्य वृद्धीसाठी मुनिजनांस केशलोच आवश्यक सांगितला आहे. लिंग म्हणजे चिन्ह. ज्या चिन्हावरून मुनी ओळखले जाऊ शकतात ते मुनीचे लिंग समजले जाते. ते दोन प्रकारचे आहे १) द्रव्यलिंग म्हणजे वाह्य चिन्ह व २) भावलिंग म्हणजे अभ्यंतर चिन्ह. जैन–मुनींची दोन्ही चिन्हे खालीलप्रमाणे सांगितली आहेत–

" जधजादरुवजादं उप्पाडिदकेसमंसुगंसुद्धं ।
रहिदं हिंसादीदो अप्पडिकम्मं हवदि लिंगं ॥ ५ ॥
मुच्छारम्भविमुक्कं जुत्तं उवजोगजोगसुद्धीहिं ।
लिंगं ण परोवेक्खं अपुणब्भवकारगं जेण्हं ॥ ६ ॥ –प्रवचनसार ३ ।

मनुष्य जसा उत्पन्न होतो, तेच ज्याचें रूप असते, म्हणजे जो नग्न असतो. डोके, दाढी किंवा मिशांचे केस जो हाताने काढतो; सर्व दुराचारापासून जो रहित असतो, हिंसादिक पापे जो करीत नाही, शरीरादिकावर जो संस्कार करीत नाही, ती सर्व जैनसाधूंची बाह्य चिन्हे होत. त्याचप्रमाणे ममत्व व आरंभाने मुक्त असणे, मन, वचन, कायेचा शुद्धीपूर्वक उपयोग असणे, दुसऱ्यांची थोडीहि अपेक्षा नसणे ही सर्व. अभ्यंतर चिन्हे आहेत व ती मोक्षाची कारणे आहेत.

काही असा प्रश्न विचारतात की या युगात या बाह्य चिन्हांची काय आवश्यकता? पण बाह्य चिन्हांनीच अंतरंगाची ओळख पटते डोळयाने फक्त बाह्य चिन्हेच दिसू शकतात; व ती पाहूनच लोक त्याचे अंतरंग ओळखण्याचे प्रयत्न करतात. तसेच लोक–व्यवहारातही मुद्रेची मान्यता आहेच. राजमुद्रेच्या शिक्याने छोटासा कागद हजारो रुपयांच्या किंमतीचा होतो. म्हणून द्रव्यलिंगाचीहि आवश्यकता आहे.

त्याचप्रमाणे जैनधर्मात साधूने अगदी निरपेक्ष असावे, यावर कटाक्ष आहे. त्यांच्या शरीर–रक्षणासाठी त्यांना भोजनाची आवश्यकता असली व त्यासाठी त्यांना गृहस्थांच्या घरी जाणे भाग पडले तरीहि ते आहारास निघाल्यावर कोणाच्या घरी जात नाहीत. व कोणास मागतहि नाहीत. फक्त भोजनाच्या वेळी ते गृहस्थाच्या दारावरून जाऊ लागतात. त्यांच्या निघण्याच्या वेळी गृहस्थांनी आपआपल्या घरासमोर उभे रहावे व साधूंची प्रतीक्षा करावी हे गृहस्थाचे आव–श्यक कर्तव्य आहे व तसे उभे राहिले असतांना त्यांना जेव्हा साधु

येत असलेले दिसतात, तेव्हा त्यांना पाहून गृहस्थ म्हणतात 'भो स्वामी! थांबावे इत्यादि" असे त्रिवार म्हणून जर साधु थांबले, तर त्यांना तो आपल्या घरांत घेऊन जाऊन उच्चासनावर बसवितो नंतर त्याचे पाय धुवून पूजा करतो व नंतर त्यांना नमस्कार करतो व म्हणतो "मनशुद्ध वचनशुद्ध, कायशुद्ध व आहार पाणी शुद्ध" असे थांबावे! असे म्हणतात. अशी भक्ती झाल्यावर साधु भोजनालयात प्रवेश करतात. या नवधा-भक्तीवरून साधु गृहस्थाची ओळख करू शकतो की ते प्रमादी आहेत, की अप्रमादी? यांच्या घरी भोजन सावधगिरीने झाले की गैरसावध-गिरीने झाले ? दुसरे यामुळे गृहस्थाच्या मनात अवज्ञा करण्याचा भाव नसतो व साधूस जो कांही आहार तो देतो तो ते भार समजून देत नाही, तर कर्तव्य समजून अत्यंत प्रसन्नतेने देतो. जेथे साधु भिक्षा मागत फिरतात व गृहस्थ त्यांना दूर लोटतात अशा ठिकाणी साधु आपले आत्मकल्याण करू शकत नाहीत व परकल्याणहि करू शकत नाहीत म्हणून विधीपूर्वक दिला गेला तरच जैनसाधू आहार ग्रहण करतात; अन्यथा परत फिरतात.

भोजनालयात प्रवेश केल्यानंतर तेथे ते उभे राहतात व दोन्ही हात धुवून हाताची ओंजळ बांधतात. गृहस्थ त्यांच्या डाव्या हाताच्या तळहातावर घास तयार करून टाकतो व साधू तो चांगल्या रीतीने पाहून उजव्या हाताच्या अगुलीने घेवून तोंडांत टाकतात जर घासात कांही जीवजंतू किंवा केस आढळून आला तर ते भोजन सोडून देतात भोजनाचे असे अनेक अंतराय जैनशास्त्रांत सांगितले आहेत.

पूर्वी लिहिलेच आहे की, भोजन हे केवळ जीवनासाठीच केले जाते व जीवन रक्षणाचा उद्देश धर्मसाधन हाच आहे. म्हणून धर्मात थोडेसेहि विघ्न येत असेल तर भोजन लगेच सोडून देतात. तसेच

हातात भोजन करावयाचे ते एवढयासाठीच की भोजनांत अंतराय आला तरी पुष्कळसे उष्टे अन्न वाया जाणार नाही. दुसरे पात्र हातात घेऊन भोजनासाठी निघण्यात एक प्रकारचीं दीनताहि असते व गृहस्थाच्या येथील पात्रांत जेवल्याने ते त्यास घासून धुवावे लागेल व बसून खावे लागेल. पण या दोन्ही गोष्टी साधूना वर्ज्य आहेत; कारण बसून खाण्याने आरामशीर अमर्यादित आहार होण्याची शक्यता असते व सुखासीन बनण्याची शक्यता असते; म्हणून त्यांना उभे राहूनच आहार घेण्यास सांगितले आहे.

साधूना आपला बहुतेक वेळ स्वाध्यायांतच व्यतीत करावयाचा असतो. या स्वाध्यायाच्या चार वेळा आहेत. सकाळी दिवसानंतर दोन घटकांनी स्वाध्याय सुरू करावा व मध्यान्हीच्या दोन घटका अगोदर संपवावा. नंतर माध्यान्हानंतर दोन घटका स्वाध्याय करावा तो दिवस जाण्याचे दोन घटका अगोदर संपवावा. नंतर रात्री दोन घटका झाल्यानंतर पुन: स्वाध्याय करावा तो अर्धी रात्र होण्याच्या दोन घटका अगोदर संपवावा तसेच अर्धी रात्र दोन घटका झाल्यानंतर स्वाध्याय करावा तो रात्र संपण्याच्या दोन घटका अगोदर संपवावा.

## साधूंची दिनचर्या

मध्य रात्री चार घटका निद्रा घेऊन व थकवा दूर करून उठल्यावर साधूने स्वाध्याय सुरू करावा व जेव्हा रात्र संपायला दोन घटका बाकी असते तेव्हा स्वाध्याय संपवून प्रतिक्रमण करावे. मोठमोठे अभ्यासू योगीहि क्षणभराच्या प्रमादाने समाधीपासून च्युत होतात म्हणून साधूने नेहमी अप्रमादी रहावे. दररोज त्रिकाल जिनेंद्रभगवंताची वंदना करावी व चित्त स्थिर व्हावे, म्हणून त्यांच्या गुणांचे चिंतवन करावे. कायोत्सर्ग करतांना हृदयकमलातील प्राणवायूबरोबरच मनाचेहि

नियमन करून "णमो अरिहंताणं, णमो सिद्धाणं चे" ध्यान करावे नंतर पुनः प्राणवायू सोडून व पुनः घेऊन " णमो आयरियाणं, णमो उवज्झायाणं" चे ध्यान करावे व नंतर पुनः सोडून व पुनः प्राणवायू घेऊन "णमो लोए सव्वसाहूणं चे" ध्यान करावे; नऊ वेळा असे केल्याने चिरसंचित पाप नाहीसे होते. जे साधु प्राणवायूचे नियमन करू शकत नसतील, त्यांनी फक्त वचनानेच पंचणमोकाराचा जप करावा. हा मंत्र सर्व विघ्न नाहीसे करणारा व याची सर्व मंगल कार्यामध्ये प्रमुख म्हणून गणना केली आहे. कायोत्सर्गानंतर स्तुती वंदना वगैरे करून आत्मध्यान करावे. कारण आत्मध्यानाशिवाय मुमुक्षु साधकांची कोणतीच क्रिया मोक्ष साधक होत नाही.

याप्रमाणे प्रातःकाली देव वंदना करून सिद्धांची, शास्त्रांची व आपले गुरु, आचार्य वगैरेंची भक्ती करावी. याप्रमाणे सकाळी दोन घडीपर्यन्त प्रातःकालीन कृत्ये करून पुनः साधूने स्वाध्याय करावा. स्वाध्यायानंतर भोजनाची इच्छा असल्यास शास्त्रोक्त विधीला अनु-सरून आहार करावा व त्यानंतर दुसऱ्यादिवसपर्यन्तच्या आहाराचा त्याग करावा. नंतर आपल्या हातून झालेल्या दोषांची शुद्धीकरून मध्यान्हानंतर दोन घटकांनी स्वाध्याय करावा. जेव्हा दोन घटका दिवस शिल्लक राहतो तेव्हा स्वाध्याय समाप्त करून व दिवसभरांत लागलेल्या दोषाचे परिमार्जन करून आचार्याची वंदना करावी. देव वंदना वगैरे झाल्यावर दोन घटका रात्रीनंतर स्वाध्याय सुरू करावा व अर्धी रात्र होण्यास दोन घटका असेपर्यंत तो चालू ठेवावा. नंतर चार घटका एका अंगावर भूमीवर शयन करावे. हे साधूंचे नित्य कृत्य आहे. नैमित्तिक कृत्यें मूलाचार अनगार धर्मामृत इत्यादि ग्रंथावरून सम-जावून घ्यावीत. तसेच साधूंच्या बाबतीत आणखीहि कांही गोष्टी शास्त्रात लिहिलेल्या आहेत. त्या अशा:-

मुनि जेव्हा उन्हांतून सावलीत जातात, व सावलीतून उन्हात जातात, तेव्हा पिंछीने आपले शरीर साफ करतात. त्याचप्रमाणे उठताना किंवा बसताना जीवजंतू मरणार नाहीत असे पाहून व ते स्थान कोमल हाताने आपल्या पिंछीने साफ करून ते बसतात. ज्या घरात पशु बांध-लेले असतील किंवा कोणी वाईट कार्य करीत असेल, त्या घरात मुनि आहारास जात नाहीत. ज्या घरात गेले त्या घरातील दात्याकडे ते पुनः पाहात नाहीत. व संघात कोणी साधु आजारी असतील, तर त्यांची कधीहि ते उपेक्षा करीत नाहीत. एकटया साधूने कोठेच जाऊ नये. दुसऱ्या साधूबरोबरच जावे. गुरूना पाहाताच उठून उभे राहावे व त्यांना नमस्कार करावा. गुरू ज्या वस्तु देतील त्या अत्यंत आदराने दोन्ही हातानी घ्यावात व त्या घेऊन त्यांना नमस्कार करावा. ज्याने दीक्षा दिली असेल, जे शिकवींत असतील, अगर जे प्रायश्चित देतात किंवा समाधिमरण साधवितात ते सर्व गुरू होत.

प्राण जाण्याचा प्रसंग आला तरी मुनीनें दीनता दाखवू नये. भुकेने शरीर कृष व मलीन होणे हे वास्तविक साधूचे भूषण आहे. पवित्र मनाच्या साधूस त्याची लज्जा ( क्षिती ) वाटत नाही. ज्याचे मन शुद्ध असेल तोच खरा समजला जातो. मनःशुद्धीशिवाय स्नान करूनहि शुद्ध होत नाही, चित्रातील स्त्रीलासुद्धा साधूने स्पर्श करू नये. जेथे आसपास कोणी स्त्रिया नसतील अशाच ठिकाणी साधूंनी रात्री झोपावे. तसेच एकांतांत एकटयाच साधूने स्त्रीबरोबर वार्तालाप करू नये; बसू उठू नये अगर भोजन करूनये. जेथे राहून मुनीचे मन चंचल होत असेल तो देश साधूने सोडून द्यावा. पांच प्रकारच्या वस्त्राने जे रहित असतात त्यानाच निर्ग्रंथ म्हणतात, मग सोने चांदी वगैरेची गोष्ट तर दूरच राहिली. परिग्रहाचे वाईट परिणाम जैनाचार्यांनी खालील प्रमाणे सांगितले आहेत.

" परिग्रहवतां सतां भयमवश्यमापद्यते
प्रकोपपरिहिंसने च परुषानृतव्याहृती ।
ममत्वमथ चोरतो स्वमनसश्च विभ्रान्तता
कुतोहि कलुषात्मनां परमशुक्लसद्ध्यानता ॥४२॥" पात्रके. स्तो.

परिग्रहवाल्यांना चोरदिकांचे भय नेहमीच सतावित असते. चोरी झाल्यावर राग येतो व मारण्याचे भाव उत्पन्न होतात. कठोर किंवा असत्य वचन बोलले जाते. ममत्वामुळे मनात भ्रांती उत्पन्न होते. अशा परिस्थितीत कलुपित मनाचे साधू उत्कृष्ट शुक्लध्यान कसे करू शकतील म्हणून साधूने अपरिग्रही असावे.

ही जी वर साधूची चर्या सांगितली आहे, त्यावरून एक गोष्ट स्पष्ट आहे की जैनधर्मात साधू जीवन अत्यंत कठोर आहे. जे संसार, शरीर व भोगांची असारता चांगल्या रीतीने समजतात. तेच असे कठोर तपश्चरण करू शकतात. सुखासीन मनुष्यांना तेथे थारा नाही. जैन-मुनीचे जीवन खरोखर तरवारीच्या धारेवर धावण्यासारखे कठीण आहे आजकालच्या सुखासीन लोकांना साधूच्या जीवनातील हे कठोर आचरण कदाचित् सहन होणार नाही, व ते त्यास व्यर्थ समजतील. परंतु त्यानी 'स्वातंत्र्य' प्राप्त करून घेणे ही सुळावरची पोळी आहे हे विसरू नये. ज्या देशावर परदेशी सरकार आपले प्रभुत्व जमविते, त्याना तेथून काढणे किती कठिण आहे हे स्वातंत्र्यप्राप्तीसाठी यमयातना सोसलेल्या आपल्या भारतीयापासून लपणारी गोष्ट नाही. मग असंख्य भवांत जे कर्म आत्म्याशी बद्ध झालेले आहे, त्याची सुटका इतक्या-सहजी कशी होऊ शकेल? शरीर व इंद्रिये आत्म्याचे साथी नाहीत तर ते त्यास परतंत्र बनविणाऱ्या कर्माचे साथीदार आहेत. आपले समजून, जो त्याचे लाड पुरवितो, तो कर्माच्या जाळ्यात पक्का फसतो. याची उपमा इंग्रजांच्या शासन कालीन व्यवस्थापकाशी केली जाऊ

शकते. जनतेच्या जीविताचे व वित्ताचे ते रक्षक मानले जात असत; परंतु संधी मिळताच डोळे झाकून ते त्याचे भक्षक बनत, म्हणून आपले आत्मशुद्धीचे कार्य साधण्यापुरतीच ह्या शरीराची अपेक्षा करावी काम संपल्यावर पुनः त्याचे नांव काढू नये. हा दृष्टिकोण साधूंच्या दिनचर्येत ठेवला आहे मात्र फक्त कष्ट सहन केले की मुक्ती मिळते. असे जैनधर्म सांगतो असे समजू नये. रागास बळी पडून स्वतः कष्ट सोसणे किंवा दुसऱ्यांना कष्ट देणे हे वाईट आहे. परंतु जगाची वाईट स्थिती जाणून व त्यातुन आपली सुटका करून घेण्यासाठी मात्र, मुक्तीच्या मार्गावर पाऊल टाकल्यावर, येणाऱ्या दुःखाची तमा बाळगू नये. एवढाच त्याचा अर्थ आहे. आचार्यांनी लिहिल्याप्रमाणे--

'न दुःखं न सुखं यद्वद् हेतुर्दृष्टश्चिकित्सिते ।
चिकित्सायां तु युक्तस्य स्याद् दुःखमथवा सुखम ॥
न दुःखं न सुखं तद्वद हेतुर्मोक्षस्य साधने ।
मोक्षोपाये तु युक्तस्य स्याद दुःखमथवा सुखम । मत्रार्य० ॥

" ज्याप्रमाणे रोगमुक्त होण्यासाठी दुःख किंवा सुख कारण नाही. परंतु एकदा चिकित्सा सुरू झाल्यानंतर दुःख होवो वा सुख होवो ते शेवटास न्यावेच लागते; त्याचप्रमाणे दुःख किंवा सुख हे मोक्ष साध्य करण्यास कारणीभूत नाहीत; परंतु मुक्तीचा मार्ग स्वीकारल्यानंतर दुःख होवो किंवा सुख होवो त्याची पर्वा बाळगू नये.

म्हणून साधूंची तपश्चर्या जाणून बुजून त्यास दुःखी करण्याच्या उद्देशाने सांगितलेली नाही, तर त्याने सावधान होऊन कष्टसहिष्णु बनावे व सदा जागृत रहावे यासाठी ही कठोर तपश्चर्या आचरण्यास सांगितली आहे.

कांही लोक स्नान करणे व तोंड न धूणे ही गोष्ट अत्यंत वाईट समजून त्यावर टिका करतात. परंतु ते न करूनही साधूंची शारीरिक

स्वच्छता चांगली असू शकते. कांही लोक म्हणतात जैनसाधूंच्या दातावर मळ साचलेला असतो व त्यावर जर फँसा चिकटला तर तो उत्कृष्ट साधु समजला जातो. परंतु ही कुत्सित टीका आहे. दांतांवर तेंव्हाच मळ जमतो, जेव्हा आतडे मळाने भरलेले असते. जैनसाधु एकच वेळ मर्यादित हलका आहार घेतात. त्यामुळे त्यांच्या आंतड्यांतहि मळ जमत नाही व दांतावरहि मळ जमत नाही. कोणी एका लेखकाने लिहलेलें आहे की जैनसाधु आपल्याजवळ झाडू ठेवतात व चालतांना झाडुन सग पुढे जातात, पण हीही कपोल कल्पित कंडी आहे. मोराची पिंछी हा झाडू नाही व ती फक्त शरीरशुद्धीसाठी व उठण्या बसण्याच्यास्थानी जीवजंतु असू नयेत म्हणून स्थान साफ करण्यासाठीच फक्त आहे. केवळ द्वेषाने किंवा अज्ञानाने लोकांनी पिकविलेल्या ह्या कंड्या आहेत. जैनसाधूचें शरीर अस्वच्छ भासले तरी त्यांचा आत्मा अत्यंत शुद्ध असतो.

## ८ गुणस्थान.

जैनसिद्धांतानुसार संसारातील सर्व जीव १४ स्थानात विभागलेले आहेत. त्या स्थानांना गुणस्थान म्हणतात. जीवाचे गुण किंवा स्वभाव ५ प्रकारचे असतात. ते असे, औदयिक, औपशामिक, क्षायिक, क्षायो-पशामिक व पारिणामिक. जे भाव कर्माच्या उदयाने उत्पन्न होतात, त्यास औदयिक म्हणतात. जे भाव कर्माच्या उपशमाने होतात त्यांना औपशमिक म्हणतात. जे भाव कर्मांच्या क्षयाने प्रगट होतात, त्यास क्षायिक भाव म्हणतात. आणि जें भाव कर्माचा क्षय व उपशमाने होतात, त्यास क्षायोपशामिक भाव म्हणतात. जे गुण कर्माचा उदय, उपशम, क्षय व क्षयोपशम यांच्याशिवाय केवळ स्वभावानेच प्राप्त होतात त्यास पारिणामिक भाव म्हणतात. जीवामध्ये हे गुण असतात. म्हणूनच आत्म्यालाहि गुणवान् म्हणतात व त्यांच्या स्थानास गुणस्थान म्हणतात

हे पुढे सांगितल्याप्रमाणे चौदा आहेत. आत्म्यांच्या गुणांच्या विकास-क्रमास अनुसरून ही गुणस्थाने सांगितली असल्यामुळे एका दृष्टीनें हे गुणस्थान म्हणजे आध्यात्मिक उत्थान पतनाचे नकाशेच आहेत. यांना आत्म्याची भूमिका असेही म्हणता येईल.

पूर्वी सांगितलेल्या आठ कर्मांमध्ये सर्वात प्रबल मोहनीय कर्म आहे. हे कर्मच आत्म्याच्या सर्व शक्तीना विकृत करण्यास कारणीभूत असून ते जीवास खऱ्या मार्गाचे-आत्म स्वरूपाचे-भान होऊ देत नाही व त्या मार्गावरून जाऊहि देत नाही. पण एकदा का जीवा-पासून मोहाचा हा पडदा फाटू लागला की आत्मिक गुण विकसित होऊ लागतात. त्यामुळे साहाजीकच या गुण-स्थानाच्या रचनेत मोहाच्या चढउतारास ज्यास्त स्थान आहे. त्यांची संक्षिप्त माहिती पुढील प्रमाणे समजावी.

१ मिथ्यादृष्टी:-मोहनीय कर्माचा एकभेद मिथ्यात्व आहे.त्याच्या उदयाने जीव आपल्या हिताहिताचा विचार करू शकत नाही किंवा विचार करण्याचे सामर्थ्य असूनहि जो यथार्थ विचार करीत नाही.त्यास मिथ्यादृष्टी जीव म्हणतात. उदा० आजारी माणसास गोड पदार्थ चांगले लागत नाहीत. त्याचप्रमाणे त्यांनाहि धर्म रुचकर वाटत नाही.. जगांतील पुष्कळसे लोक याच श्रेणीतील आहेत.

२ सासादन सम्यग्दृष्टी:- मिथ्यात्व कर्माचा उदय नाहीसा करून सम्यग्दृष्टी झालेला जीव जेव्हा सम्यक्त्वापासून च्युत होतो, पण मिथ्यात्वाच्या अवस्थेस पोहोचलेला नसतो. अशा मधल्या अवस्थेतील जीव सासादन सम्यग्दृष्टी असतो. उदा० पर्वतावरून कुणी एखादा मनुष्य खाली येऊ लागला आहे पण अजून जमीनीवर येऊन पोहोचला नाही, अशा मनुष्यास तो डोंगरावरील मनुष्य समजतात त्याचप्रमाणे सम्यक्त्वाच्या शिखरावरून तो खाली ढकललेला आहे. परंतु

अजून मिथ्यात्वाच्या जमीनीवर येऊन पोहोचला नाही अशा मध्यंतरीच्या मार्गावरील जीवास हे गुणस्थान असते. ४ थ्या गुण-स्थानातून खाली येतानाच हे गुणस्थान व त्यातून नियमाने जीव पहिल्याच गुणस्थानात जातो.

३ सम्यग्मिथ्यादृष्टी:- दही व गूळ एकमेकामध्ये मिसळल्यानंतर त्यांचा जसा मिश्र स्वाद निर्माण होतो, त्याचप्रमाणे एकाचवेळी सम्यक्त्व व मिथ्यात्व यांनी मिश्र असे परिणाम जेव्हा जीवाचे असतात, तेव्हा त्यास सम्यग्मिथ्यादृष्टी म्हणतात.

४ असंयतसम्यग्दृष्टी:- ज्या जीवाची दृष्टी म्हणजे श्रद्धा ही समीचीन असते त्यास सम्यग्दृष्टी म्हणतात हे जीव सम्यग्दृष्टी असतात, परंतु ते संयम पाळीत नाहीत म्हणून त्यांना असंयतसम्यग्दृष्टी म्हणतात उदा०

'जो इंदियेसु विरदो णो जीवे थावरे तसे वा वि ।
जो सद्दहदि जिणुत्तं सम्माइट्ठी अविरदो सो ॥२-॥'- गो० जीव०

जे इंद्रियांच्या विषयापासून विरक्त नाहीत व जे त्रस व स्थावर जीवांच्या हिंसेचा त्याग करीत नाहीत; परंतु जिनेंद्र देवानी सांगितलेल्या मार्गावर आस्थापूर्वक श्रद्धान करतात, ते जीव असंयत सम्यग्दृष्टी होत. यापुढील सर्व गुणस्थाने सम्यग्दृष्टी जीवानाच होतात.

५ संयतासंयत:- जे जीव कांही प्रमाणात संयमी व कांही प्रमाणात असंयमी असतात त्याचे हे गुणस्थान असते. म्हणजे जे त्रस जीवाच्या हिंसेचा त्याग करतात व यथाशक्ती आपल्या इंद्रियावर नियंत्रण ठेवतात, ते संयतासंयत होत. पूर्वी गृहस्थाचे चारित्र सांगितले आहे, ते यांचेच चारित्र होय. व्रती गृहस्थांना संयतासंयत म्हणतात. या गुणस्थानापुढील सर्व गुणस्थाने संयमास प्राधान्य देऊन सांगितलेली आहेत.

६ प्रमत्त संयत:- पूर्ण संयम पाळत असूनहि ज्या मुनीमध्ये

प्रमादामुळे कधी कधी जेव्हा असावधानता असते त्या मुनीस प्रमत्तसंयत म्हणतात.

७ अप्रमत्तसंयतः– प्रमाद न ठेवता संयमाचे जे शुद्ध रीतीने पालन करतात व जे ध्यानात मग्न असतात, त्या मुनीना अप्रमत्तसंयत म्हणतात

सातव्या गुणस्थानापासून पुढे दोन श्रेणीना प्रारंभ होतो १ उपशम श्रेणी व २ क्षपकश्रेणी. श्रेणी म्हणजे पक्ती किंवा ओळ. जेव्हा मोहनीय कर्माचा उपशम (दावून) करून जीव वर चढतो, त्यास उपशमश्रेणी म्हणतात व त्या कर्माचा क्षय करीत वर चढतो तेव्हा त्यास क्षपकश्रेणी म्हणतात. प्रत्येक श्रेणीची चार चार गुणस्थाने आहेत. ८–९ व १० वे गुणस्थानात दोन्ही श्रेणीचे जीव असतात पण ११ वे गुणस्थानात हे फक्त उपशम श्रेणीवाल्यांचे व १२ वे गुणस्थान फक्त क्षपक श्रेणीवाल्याचे असते. ही सर्व गुणस्थाने क्रमाक्रमाने ध्यानमग्न मुनीनाच होतात.

८ अपूर्वकरणः– करण म्हणजे परिणाम व जेव्हा आत्म्याचे परिणाम पूर्वी कधीहि झाले नाहीत शुद्ध असतात तेव्हा त्यास अपूर्वकरण गुणस्थान म्हणतात या गुणस्थानातील ध्यानमग्न मुनीचे परिणाम प्रत्येक क्षणाक्षणात अपूर्व अपूर्व असेच असतात. यात कर्माचा उपशम किंवा क्षय कांहीच होत नाही. परंतु त्यासाठी तयारी होऊ लागलेली असते. प्रत्येक क्षणात जीवाचे भाव उत्तरोत्तर उन्नत स्वरूपाचे होत असतात.

९ अनिवृत्तिकरणः– (बादरसांपराय)–समान समयवर्ती जीवाच्या परिणामांत कांहीही भेद नसणें यास अनिवृत्तिकरण म्हणतात. अपूर्वकरणाप्रमाणेच तेथेही प्रत्येक क्षणात अपूर्व तसेच परिणाम असतात परंतु अपूर्वकरणांत एक समयांत अनेक परिणाम होतात आणि समान समयवर्ती जीवांचे परिणाम असमानहि असू शकतात. परंतु या गुणस्थानामध्ये एकाच समयात एकच परिणाम होत असल्यामुळे समान

समयांत असलेल्या सर्व जीवांचे परिणाम एकसारखेच असतात. त्या परिणामांना अनिवृत्तिकरण म्हणतात व बादर सांपरायाचा अर्थ "स्थूल-कषाय" असा होतो. हे गुणस्थानातील ध्यानस्थ मुनी कर्मांचा उपशम करतात किंवा क्षय तरी करतात. या गुणस्थानापर्यंतच्या सर्व जीवांमध्ये स्थूलकषाय असतो, हे दाखविण्यासाठी या गुणस्थानाबरोबर बादर-सांपराय हे पद जोडलें गेलें आहे: म्हटलेच आहे की–

'होंति अणियटिणो ते पडिसमयं जेसिमेक्कपरिणामा।
विमलयरझाणहुयवहसिहाहि णिद्दड्ढकम्मवणा ॥५७॥'

ज्याचे प्रत्येक समयात एकच परिणाम असतात, त्या जीवांना अनिवृत्तिकरण परिणामाचे जीव म्हणतात. हे अत्यंत निर्मल ध्यानाग्नीने आपल्या कर्मरूपी वनास जाळून टाकतात.

१० सूक्ष्मसांपराय:–आपल्या उज्वल परिणामांने ध्यानस्थ मुनी आपले कषाय सूक्ष्म करतात म्हणून यांना सूक्ष्मसांपराय गुणस्थानवाले म्हणतात.

११ उपशांत कषाय–वीतराग छद्मस्त:– उपशम श्रेणीने चढणारे ध्यानस्थ मुनि जेव्हा सूक्ष्म कषायांचाहि उपशम करतात, तेव्हा त्यांना उपशांत कषाय गुणस्थान असते. अगोदर सांगितल्याप्रमाणे पुढे पुढे जाणारे ध्यानस्थ मुनि ८ व्या गुणस्थानापासून दोन श्रेणीत विभागले जातात. त्यांच्यापैकी उपशम श्रेणीवाले जीव मोहनीय कर्म प्रकृतीना हळुहळू संपूर्णत: दाबून ठेवतात (उपशमित करतात); पण त्यांचा संपूर्ण नाश करीत नाहीत. ज्याप्रमाणे एखाद्या भांड्यातील वाफ आपल्या जोराने भांड्यांवरील झाकण पाडू शकते त्याप्रमाणेच उपशमश्रेणीवाल्या जीवांना त्याचे परिणाम त्यांना खालीहि ओढू शकतात. या गुणस्थानांत कषाय फक्त दबलेले असून त्याचा उदय नसल्यामुळे यांना उपशांत

कषाय-वीतराग म्हणतात, परंतु संपूर्ण ज्ञान व दर्शनांना रोकणारी कर्मे अजून येथे शिल्लक असतात म्हणून ह्यांना छद्मस्थ असेहि म्हणतात.

१२ क्षीणकषाय-वीतराग छद्मस्थः- क्षपक श्रेणीवर चढणारे मुनि मोहाचा हळु हळु नाश करीत करीत जेव्हा त्यांचा संपूर्ण नाश करतात तेव्हा त्यांना क्षीणकषाय वीतराग-छद्मस्थ म्हणतात.

याप्रमाणे सातव्या गुणस्थानापासून पुढे जाणारे जीव दोन्ही पैकी कोणत्याहि श्रेणीने चढले तरी ते सर्व ८-९ व १० वे गुणस्थान प्राप्त करतातच. पण दोन्ही श्रेणी चढणाऱ्यामध्ये इतकेच अतर असते की पहिल्यापेक्षा दुसऱ्या श्रेणीवाल्यांची आत्मविशुद्धि व आत्मबल विशिष्ट प्रकारचे असते. त्यामुळे पहिल्या श्रेणीने चढणारे मुनि १० व्यातून ११ व्या गुणस्थानात जातात, पण दबलेला मोह पुनः उत्पन्न होऊन ते जीव नियमाने खालीं पडतात (खालील गुणस्थानात जातात) दुसऱ्या श्रेणीने चढणारे जीव मोहाचा सर्वथा नाश करीत गेल्यामुळे १० व्यातून १२ व्यात जातात व कषायाचा संपूर्ण नाश झाला असल्यामुळे तेथून त्यांचे अधःपतन कधीच होत नाही, ते वरील गुणस्थानांतच जातात. हा सर्व जीव परिणामांचा खेळ आहे.

१३ सयोगकेवली:- सर्व मोहनीय कर्माचा नाश झाल्यावर इतर कर्मांची शक्ती क्षीण झालेली असते. म्हणून १२ व्या गुणस्थानाच्या शेवटच्या अवस्थेत क्षीणकषाय मुनी ज्ञानावरण, दर्शनावरण व अंत-राय या तीन घातिया कर्मांचा नाश करून सयोगकेवली हे १३ वे गुणस्थान प्राप्त करून घेतात. यांच्या ज्ञानावरण कर्माचा नाश झाल्या-मुळे त्यांना केवलज्ञानाची प्राप्ति होते. आता याना वस्तु मात्र जाणण्या साठी इंद्रिय, प्रकाश व मन वगैरेचेहि साहाय्य लागत नाही. ते आत्मिक शक्तीनेच सर्व कांही जाणतात म्हणून त्यांच्या ज्ञानास केवलज्ञान म्हणतात व हे असणाऱ्यांना 'केवली' म्हणतात. आत्म्याचे शत्रु जे घातिकर्म

त्यांच्यावर या केवलींनी विजय प्राप्त केला असल्यामुळे त्यांना 'जिन', 'परमात्मा', 'जीवन्मुक्त', 'अरिहंत' इत्यादि म्हटले जाते जैन तीर्थंकर या अवस्थेतूनच धर्म-प्रवर्तन करतात. जागोजागी विहार करून प्राणिमात्रांना त्यांच्या हिताचा उपदेश देतात व अशा रीतीने आपले उर्वरित आयुष्य वेचतात. जेव्हा आयु अंतर्मुहूर्त म्हणजे एका मुहूर्तापेक्षाहि कमी उरते. तेव्हा सर्व व्यवहार बंद होऊन ते ध्यानस्थ असतात. तथापि यांच्या मन, वचन, कायेचा सूक्ष्म व्यापार (योग) चालू असतो म्हणून यांना सयोगकेवली म्हणतात.

१४ अयोग-केवली:– वर सांगितल्या प्रमाणे केवली ध्यानस्थ होऊन जेव्हा त्यांच्या मन, वचन, कायेचा ( योगाचा ) सर्व व्यापार बंद होतो, तेव्हा त्यांना अयोगकेवली म्हणतात. हे अयोग केवली बाकी शिल्लक राहिलेली ४ अघातिया कर्मेहि ध्यानाग्नीत भस्म करून सर्व कर्म व शरीराच्या बंधनातून सुटून मोक्ष – लाभ करून घेतात.

याप्रमाणे संसारातील सर्व जीव आपआपल्या आध्यात्मिक विकासाच्या तारतम्याने १४ गुणस्थानात वाटले गेले आहेत. त्यापैकी १ ली चार गुणस्थाने नरक, तिर्यंच, मनुष्य व देव गतीतील जीवांना होऊ शकतात. ५ वे गुणस्थान फक्त संज्ञी पशु पक्ष्यांना व मनुष्यांनाच होते व या पुढील सर्व गुणस्थाने मुनींसच होतात व त्यातूनहि ७ व्या पासून १२ व्या पर्यंतची गुणस्थानें आत्मध्यानात मग्न अशा साधूंनाच होतात व त्या प्रत्येक गुणस्थानाचा काल अंतर्मुहूर्त म्हणजे १ मुहूर्तापेक्षाहि कमी असतो.

## ९ मोक्ष किंवा सिद्धि

मुक्ति किंवा मोक्ष म्हणजे सुटका. आत्मा सर्व कर्मबंधनापासून सुटला असल्यामुळे त्या अवस्थेस मोक्ष म्हणतात. याचेच दुसरे नाव

सिद्धि असेहि आहे. सिद्धि म्हणजे प्राप्ति. ज्याप्रमाणे गाळणे, तापविणे वगैरे मार्गांनी धातूतील घाण नाहीशी झाल्यावर सोने शुद्ध बनते त्याचप्रमाणे आत्मिक गुणांना कलुषित करणारे दोष नाहीसे करून, उत्पन्न होणाऱ्या शुद्ध आत्म्याच्या प्राप्तीस 'सिद्धि' किंवा 'मोक्ष' म्हणतात. कर्ममलातून सुटल्याशिवाय आत्मा शुद्ध होत नाही म्हणून मुक्ति किंवा सिद्धि ही दोन्ही एकाच अवस्थेतील दोन नावे आहेत. पण त्यातून दोन गोष्टी सूचित होतात. १ मुक्ति कर्मबंधनापासून सुटलेल्या आत्मिक अवस्थेचे नांव आहे २ व सिद्धि त्यानंतर प्राप्त होणाऱ्या शुद्ध आत्मिक गुणाच्या प्राप्तीचे नाव आहे; म्हणून जैनधर्मात, बौद्ध लोक मानतात त्याप्रमाणे, आत्म्याच्या अभावास किंवा वैशेषिक मानतात त्याप्रमाणे आत्म्याच्या गुणांच्या विनाशास मुक्ति मानलेली नाही. जैन-धर्ममताप्रमाणे आत्मा एक स्वतंत्र द्रव्य आहे व ते ज्ञाता व द्रष्टा आहे. परंतु अनादिकालापासून हा जीव कर्मबंधनाने बांधला गेलेला असल्यामुळे तो आपल्या कर्माचे फळ भोगतो. पण जेव्हा तो त्या कर्म-बंधनाचा क्षय करतो तेव्हा त्यास मुक्त म्हणतात.

मुक्तावस्थेत त्याचे अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतसुख, अनंतवीर्य इत्यादि स्वाभाविक गुण पूर्ण विकसित झालेले असतात. ज्याप्रमाणे धातूतून मळ निघून गेल्यावर सोन्याचे स्वाभाविक गुण जास्त विकसित होतात व त्यामुळेच ते शुद्ध सोने जास्त चमकदार व अधिक पिवळे दिसते, त्याप्रमाणेच आत्म्यातून कर्ममल निघून गेल्यामुळे आत्म्याचे स्वाभाविक गुण जास्त खुलून दिसतात. मुक्त झाल्यावर जीव वर जातो, आगीचे लोट जसे स्वभावतःच वर जातात, त्याप्रमाणेंच आपल्या स्वभावानुसार मुक्त जीव वर जातात लोकाच्या अग्रभागी मोक्षस्थान आहे. त्यास सिद्धशिला म्हणतात. सर्व जीव मुक्त झाल्यावर ऊर्ध्व-गमन करून त्र मोक्षस्थानी विराजमान होतात. मोक्षस्थाची कल्पना

इतर धर्मापेक्षा जैनधर्मात वेगळी आहे. याचें कारण असे की, वैदिक धर्मात आत्म्यास व्यापक मानलेले आहे म्हणून त्याने मोक्ष स्थाना-व.बतीत विचार केलेला नाही. बौद्धमताप्रमाणे आत्मा हे स्वतंत्र तत्त्व नाही म्हणून मोक्षस्थानाची त्यांना कांही चिंता नव्हती, परंतु जैन-दर्शनांत आत्मा हे एक स्वतंत्र तत्त्व मानले असूनहि ते संपूर्ण व्यापक न मानता, शरीराकाराचे मानलेले आहे,म्हणून त्यांना मोक्ष स्थानाबाबतीत विचार करावा लागला. या मताप्रमाणे कर्म बंधनातून सुटलेले मुक्त जीव ऊर्ध्वगमन करतात व लोकाच्या अग्रभागी जाऊन स्थित होतात, तेथून ते खाली कधीहि येत नाहीत.

एका मंडलिक मताचा उल्लेख जैन शास्त्रांत आलेला आहे. तें मुक्त जीवांचे ऊर्ध्वगमन मानतात. त्यांच्या मताप्रमाणे मुक्त जीव अनंत कालपर्यन्त सारखे वर वरच जात राहतात, त्यांचे अवस्थान कोठेच नाही. ऊर्ध्वगमन मानूनहि यांना मोक्ष स्थानाचा कांहीच विचार सुचला नसवा काय ? त्यांना असे वाटले असावे की, वर जाऊनहि एकाच स्थानी त्यांनी कां थांबावे? पुढे कां जावू नये? या प्रश्नाचे उत्तर यांना सुचले नसावे व म्हणून त्यांनी त्यांना कायमचेच ऊर्ध्वगमनशील मानले. परंतु जैनधर्मात गति व स्थितीना सहाय्यक अशी धर्म व अधर्म नांवाची द्रव्ये मानून ही शंका समूळ नष्ट केलेली आहे. ही दोन्ही द्रव्ये समस्त लोकांत व्याप्त आहेत त्याच्यापुढे नाहीत म्हणून लोकाच्या वर टोकापर्यंतच मुक्त जीव जातात त्यापुढे जात नाहीत म्हणून ते त्याचे मोक्षस्थान आहे.

मुक्तावस्थेत शरीर विरहित केवळ आत्माच असतो व ज्या शरीरांतून त्यांनी मुक्तीचा लाभ करून घेतला,त्या शरीराच्या आकारा-सारखाच त्याचा आकार असतो. उन्हात उभे राहिल्यानंतर शरीराची सावली जशी पडते, त्याप्रमाणेच शरीरकार आत्मा मुक्तावस्थेत असतो.

व अमूर्त असल्यामुळे तो दिसू शकत नाही. मुक्त झाल्यानंतर हा आत्मा जन्म, मरण, वृद्धत्व, रोग, शोक, दु:ख, भय इत्यादींनी रहित असतो; कारण ह्या सर्व अवस्था शरीराच्या असतात व शरीर तेथे नसते. तसेच मुक्तावस्था ही आत्म्याच्या शुद्धावस्थेचेच नामांतर आहे व जोपर्यंत आत्मा शुद्ध आहे तोपर्यंत तेथून तो खाली येत नाही व पुन: अशुद्ध होण्याचे कांहीच कारण नसल्यामुळे ते नेहमी तेथेच निराकुलतेने आत्मसुखांत मग्न असतात.

## १० जैनधर्म नास्तिक आहे काय ?

जे धर्म ईश्वरास सृष्टिकर्ता व वेदांनाच प्रमाण मानतात ते जैनधर्माची गणना नास्तिक धर्मात करतात; कारण जैनधर्म ईश्वरास सृष्टिकर्ता मानत नाही; व वेदांची प्रमाणताहि स्वीकारीत नाही. परंतु ईश्वरास सृष्टिकर्ता न मानणे व वेदांना प्रमाण न समजणे म्हणजे नास्तिक असा अर्थ कोणत्याहि विचारशील शास्त्रज्ञाने केलेला नाही. उलट जे परलोक मानत नाहीत पापपुण्य, स्वर्गनरक, परमात्मा इत्यादि मानीत नाहीत, ते ' नास्तिक ' असाच ' नास्तिक ' या शब्दाचा अर्थ आढळून येतो. या दृष्टीने विचार केल्यास जैनधर्म परलोक मानतो, आत्म्यास स्वतंत्र द्रव्य मानतो. पाप-पुण्य, स्वर्ग-नरक इ० मानतोच व त्याबरोबरच प्रत्येक आत्म्यांत परमात्मा होण्याची शक्ति आहे असेहि तो मानतो. म्हणून अशा परिस्थितीत जैनधर्मास 'नास्तिक' म्हणता येत नाही. जे वैदिक धर्मावलंबी जैनधर्मास नास्तिक म्हणतात ते जैनांनी वैदिकधर्म न मानल्यामुळेच त्याना नास्तिक म्हणू लागले; परंतु अशा परिस्थितीत सर्व धर्म परस्पराच्या दृष्टीने नास्तिक ठरतील. ही कांही शास्त्रीय कल्पना नाही. म्हणून शास्त्रीय दृष्टीने पाहिल्यास जैनधर्म परम आस्तिक धर्म म्हणविला जातो.

# प्रकरण ४ थे.

# जैन साहित्य.

जैनसाहित्य अति विशाल आहे व भारतीय साहित्यांत त्याचे विशिष्ट स्थान आहे. लोकोपकारी अनेक जैनाचार्यांनी आपल्या जीवनाचा बहुभाग साहित्याच्या रचनेत व्यतीत केला आहे. जैनधर्मात मोठमोठे प्रकांड विद्वान् आचार्य झालेले आहेत व ते तार्किक, वैयाकरणी कवि व तत्त्ववेत्ते होते. त्यांनी जैनधर्माबरोबरच भारतीय साहित्याच्या इतर क्षेत्रातहि आपल्या लेखणीचे तेज दाखविले आहे. दर्शन न्याय, व्याकरण, काव्य, नाटक, कथा, शिल्प, मंत्रतंत्र. वास्तु, वैद्यक इ. अनेक विषयावर विपुल जैनसाहित्य उपलब्ध आहे. व पुष्कळसे, धार्मिक द्वेष, बेपर्वाई व अज्ञानामुळे नष्ट झालेले आहे.

भारतातील अनेक भाषेत हे साहित्य लिहिले गेले आहे. विशेषत: प्राकृत, संस्कृत व द्राविडीयन भाषेत ते जास्त प्रमाणात आहे. जैनधर्माने प्रथमापासूनच धर्मप्रचारार्थ लोकभाषा स्वीकारून तीत म्हणजेच त्या त्या काळी जी लोकभाषा जास्त प्रचलित होती, त्या भाषेत आपले साहित्य लिहिले आहे. जर्मन विद्वान डॉ. विंटरनीट्ज आपल्या " A history of Indian Literature " Vol.-II मध्ये पृष्ठ २७-२८ वर लिहतात.- " भारतीय भाषाच्या इतिहासाच्या दृष्टीनेहि जैनसाहित्य अति महत्वपूर्ण आहे. कारण आपले साहित्य अधिकांत अधिक प्रसृत व्हावे, या गोष्टीची जैन नेहमीच काळजी घेत होते. या उद्देशानेच आगमिक साहित्य व प्राचीनतम टीका प्राकृतांत लिहिल्या गेल्या. श्वेतांबरानी आठव्या शतकापासून तर दिगंबरानी त्याच्या कांही अगोदर संस्कृत भाषेत रचना करण्यास सुरवात केली. नंतर १० ते १२ शतकांपर्यन्त

जी तत्कालीन लोकभाषा होती; त्या अपभ्रंश भाषेत आपले साहित्य लिहिले व अलीकडील जैन बहुतेक आधुनिक सर्व भाषेत आपले साहित्य लिहितात. तसेच त्यांनी हिंदी व गुजराथी आणि दक्षिणेत तामीळ व कानडी भाषेत विशेश समृद्ध साहित्य लिहिले आहे."

आज जे जैन साहित्य उपलब्ध आहे, ते सर्व भ० महावीरांच्या उपदेश परंपरेशी संबद्ध आहे, भ० महावीरांचे प्रधान गणधर गौतम इंद्रभूति होते. त्यांनी त्यांचा उपदेश लक्षात ठेवून, तो बारा अंग व चौदा पूर्वांच्या रूपाने विभागला. या अंग व पूर्वांच्या ज्ञानात जे पार-गत होते, त्यांना श्रुतकेवली म्हणविले जात होते. जैन परंपरेत ज्ञान-धाऱ्यांच्या मालिकेत दोन पदे सर्वात मोठी समजली गेली आहेत. प्रत्यक्ष ज्ञान असणाऱ्यात 'केवलज्ञानी' व परोक्षज्ञान धारण करणाऱ्यात 'श्रुतकेवली'. ज्याप्रमाणे केवलज्ञानी समस्त चराचर जगतास प्रत्यक्ष जाणतात व पाहतात त्याचप्रमाणे श्रुतकेवलीहि शास्त्रामध्यें सांगितलेला प्रत्येक विषय श्रुतज्ञानाने स्पष्टपणे जाणतात.

भ० महावीरांच्या निर्वाणानंतर तीन केवलज्ञानी त्यानंतर-पांच श्रुतकेवली झाले. यापैकी शेवटचे श्रुतकेवली भद्रबाहु होते. याच्यावेळी मगधात १२ वर्षाचा भयंकर दुष्काळ पडला. तेव्हा त्यांनी आपल्या संघाबरोबर दक्षिणेकडे विहार केला. तेथून ते पुनः वर परतलेच नाहीत. म्हणून दुष्काळानंतर पाटलीपुत्र येथे भद्रबाहूच्या गैरहजेरीत जे साहित्य एकत्रित केले गेले ते बहुतेक एकपक्षी होते. दुसऱ्या पक्षांनी त्यास मान्यता दिली नाही. याचे कारण असे होते की दुष्का-ळाच्यावेळी जे साधू मगध देशात राहिले, ते तत्कालीन आपत्तीमुळे बरेचसे शिथिलाचारी झालेले होते, म्हणून त्यावेळापासूनच जैनसंघाचे दिगंबर व श्वेतांबर असे दोन विभाग होऊन दोघांचेहि साहित्य अलग

अलग झाले.

## दिगंबर साहित्य

श्रुतकेवली भद्रबाहु-स्वामीनंतर कोणीच श्रुतकेवली झाले नाहीत. व चौदा पूर्वांपैकी ४ पूर्वांचे ज्ञान त्यांच्याबरोबरच लुप्त झाले. त्यांच्यानंतर ११ आचार्य ११ अंगाचे व १० पूर्वांचे ज्ञाते झाले. पुढे ५ आचार्य फक्त ११ अंगाचेच ज्ञाते झाले पूर्वांचे ज्ञान एक प्रकारने नष्टच झाले फक्त तुटपुंजे ज्ञान बाकी राहिले. नंतर ४ आचार्य फक्त प्रथम आचार अंगाचेच ज्ञाते झाले. याप्रमाणे अंगज्ञानहि नष्ट झाले. याप्रमाणे कालक्रमाने ज्ञान हळूहळू कमी होत होत वीर निर्वाणानंतर ६८३ वर्षे निघून गेली. सर्व अंग व पूर्वांचे शिल्लक राहिलेले थोडेबहुत ज्ञानहि लुप्त होण्याचा प्रसंग आला असे आचार्य धरसेनांना वाटल्यावरून त्यांनी गिरनार पर्वतावर भूतवली व पुष्पदंत नामक दोन सर्वोत्तम साधूंना आपले शिष्य बनविले व त्यांच्याकडून श्रुताभ्यास करविला. या दोघांनी श्रुताभ्यास करून 'षट्खंडागम' नामक सूत्रग्रंथाची रचना प्राकृत भाषेत केली जवळपास याचवेळी गुणधर नांवाचे आचार्य होऊन गेले. त्यांनी २३३ गाथात 'कषाय पाहुड' वा 'कषाय प्राभृत' नावाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ आचार्य परंपरेने आर्यमंक्षु व नागहस्ति नावाच्या आचार्यांना उपलब्ध झाला. त्यांच्यापासून शिकून यतिवृषभ नावाच्या आचार्यांनी त्यावर 'वृत्तिसूत्र' लिहिले ते प्राकृतमध्ये असून ६००० श्लोक-प्रमाण आहे. या दोन महान् ग्रंथावर अनेक आचार्यांनी अनेक टीका लिहिल्या, पण त्या आज उपलब्ध नाहीत. त्यांचे अंतिम टीकाकार वीरसेनाचार्य झाले. ते प्रकांड विद्वान् होते. त्यांनी 'षट्खंडागमावर' सुप्रसिद्ध 'धवला' नावाची टीका शके ७३८ मध्ये पुरी केली. ही टीका ७२,००० श्लोक प्रमाण आहे. दुसरा महान् ग्रंथ कषायपाहुड यावरहि त्यांनी टीका लिहिली. पण २०,००० श्लोक लिहून ते स्वर्गवासी झाले.

तेव्हा त्यांचे सुयोग्य शिष्य जिनसेनाचार्य यांनी ४०,००० आणखी श्लोक लिहून शके ७५९ मध्ये ही टीका पूर्ण केली. या ६०,००० श्लोक प्रमाण टीकेचे नांव 'जयधवल' आहे. या दोन्ही टीकांची रचना संस्कृत–प्राकृत मिश्रित आहे. पुष्कळसा भाग प्राकृतमध्ये असून, मधून मधून संस्कृतहि आहे. स्वयं टीकाकारानी त्या ग्रंथाच्या प्रशस्तीत खालीलप्रमाणे लिहिले आहे.

"प्राय:प्राकृतभारत्या क्वचित् संस्कृतमिश्रया ।
मणिप्रवालन्यायेन प्रोक्तोऽयं ग्रंथविस्तर: ॥"

षट्खंडागमाचा शेवटचा खंड महाबंध आहे. याची रचना भूतबली आचार्यांनी केली असून हा प्राकृतांत आहे व याचे ४१,००० श्लोक आहेत. या सर्व ग्रंथात कर्म–सिद्धाताचे अत्यंत सूक्ष्म, गहन व सविस्तर वर्णन आहे.

दीर्घकालपर्यन्त हे तीनहि ग्रंथ मूडबिद्री (दक्षिण कर्नाटक) येथील जैनभांडारात सुरक्षित ठेवलेले होते. तेथील भट्टारक महाशय व पंचाच्या उदार भावनेने आता या तीनहि ग्रंथांचे प्रकाशन हिंदीत टीकेसहित होऊ लागले आहे.

दहाव्या शतकांत दक्षिणेत नेमिचंद्र सिद्धांतचक्रवर्ती नामक एक जैनाचार्य होऊन गेले. ते त्या तीनहि ग्रंथांचे महाविद्वान ज्ञाते होते. त्यांनी त्यांचे संकलन करून गोम्मटसार व लब्धिसार–क्षपणसार नांवाचे दोन ग्रंथ लिहिले. हे दोन्ही ग्रंथ प्राकृत भाषेत लिहिले आहेत. त्यांत जीव, कर्म व कर्मांचें क्षपण (विनाश) यांचे सुंदर व गहन वर्णन आहे. या दोन्ही ग्रंथांवर संस्कृत टीका उपलब्ध असून जयपूरचे स्व. पं. टोडरमलजी यांनी जयपुरी भाषेत लिहिलेली टीकाहि भाषाटीकेसह उपलब्ध आहे. या ग्रंथाचे बरेचसे खंड छापून प्रसिद्ध झाले आहेत.

इ. स. च्या प्रथम शतकांत कुंदकुंद नांवाचे महान् आचार्य झाले त्यांनी समयसार, प्रवचनसार व पंचास्तिकाय हे तीन प्राकृत भाषेत लिहिले. ते 'कुंदकुंदत्रयी' या नांवाने प्रसिद्ध आहेत. समयसारांत निरनिराळ्या दृष्टीने आत्मतत्त्वाचे विवेचन असून हा अध्यात्मावर अपूर्व ग्रंथ आहे. ९ व्या शतकांत आचार्य अमृतचंद्रसूरि यांनी या ग्रंथावर संस्कृत भाषेत टीका व पद्ये (कलश) लिहिली आहेत. ती अति हृदयंगम आहेत. १७ व्या शतकांत कविवर बनारसीदास यांनी या कलशांचा हिंदीत अत्यंत मनोहर पद्यानुवाद केलेला आहे.

प्रवचनसार व पंचास्तिकायांत जैन तत्वज्ञानाचे युक्तिपूर्ण विवेचन आहे. असे म्हणतात की, कुंदकुंद आचार्यांनी पुष्कळशा प्राभृतांची रचना केलेली होती, पण त्यापैकी आज फक्त ८ प्राभृत उपलब्ध आहेत.

तामील भाषेतील 'तिरुकुरल' काव्याचे लेखक हेच म्हणून मानले जातात. याचे शिष्य 'उमास्वामी' हेहि सुप्रसिद्ध जैनाचार्य होऊन गेले. त्यांनी सर्वप्रथम जैनवाङ्मय संस्कृत सूत्रांत रचून 'तत्वार्थसूत्र' नामक ग्रंथाची रचना केली. या ग्रंथाचे १० अध्याय असून त्यांत जीवादि सात तत्वाचे सुंदर विवेचन आहे निरनिराळ्या धर्मात बायबल, गीता, कुराण इ. ना जे स्थान आहे, तेच स्थान जैनधर्मात या ग्रंथास आहे दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही संप्रदायांनी यास मान्यता दिली आहे व दोन्ही परंपरेतील आचार्यांनी त्यावर अनेक टीका लिहिल्या आहेत. त्यात श्रीमत् अकलंक देवांचे 'तत्वार्थराजवार्तिक' व विद्यानंदि आचार्यांचे 'तत्वार्थश्लोकवार्तिक' उल्लेखनीय आहेत. संस्कृत भाषेत हे दोन्ही ग्रंथ अत्यंत प्रौढ भाषेत लिहिले असून जैनसिद्धांतावर ते अपूर्व ग्रंथ आहेत.

दर्शन व न्याय शास्त्रांत स्वामी समंतभद्राचार्य व सिद्धसेनाचार्य सुप्रसिद्ध आहेत. स्वामी समंतभद्र आचार्यांनी 'आप्तमीमांसा' नांवाचा

सुंदर ग्रंथ लिहिला त्यांत स्याद्वादाचे उत्तम विवेचन केले असून इतर धर्मीय मतांचीहि विचारपूर्ण आलोचना केली आहे. या ग्रंथावर श्री अकलंक देवांनी ' अष्टशती ' व त्यावर विद्यानंदि आचार्यांनी 'अष्टसहस्त्री' नांवाची टीका लिहिली आहे. ही अष्टसहस्त्री इतकी गहन आहे की ती समजण्यास कष्टसहस्त्रीचे अनुभव येतात याच विद्यानंदी आचार्यांनी आत्मपरीक्षा व प्रमाण परीक्षा लिहिले असून भाषा विषय व विवेचन या सर्व दृष्टीने ते पाहण्यालायक आहेत.

श्री अकलंक देवांना जैन न्यायाचे 'जनक' मानले तर त्यात अतिशयोक्ति नाही. वरील टीकेशिवाय यांनी सिद्धिविनिश्चय, न्याय विनिश्चय, लघीयस्त्रयी. प्रमाणसंग्रह इ० अनेक ग्रथ लिहिले आहेत. ते सर्व गंभीर व प्रौढ भाषेत लिहिले आहेत. यावर आचार्य अनंतवीर्य वादिराज व प्रभाचंद नामक विद्वान् जैन नैयायिकांनी विस्तृत टीका ग्रंथ लिहिले आहेत. माणिक्यनंदी आचार्याचा परीक्षामुख नांवाचा सूत्र ग्रंथ जैनन्यायाच्या अभ्यासासाठी अत्युपयोगी आहे. त्यावर आचार्य प्रभाचंद्रानी प्रमेयकमलमार्तंड नावाचा मोठा गहन ग्रंथ लिहिला आहे. तो संक्षिप्त करून त्यावर अनंत-वीर्याचार्यांनी प्रमेयरत्नमाला नावाची टीका लिहिली आहे पात्रकेसरीचे त्रिलक्षणकदर्थन, श्रीदत्तांचे जल्पनिर्णय, हेहि महत्वपूर्ण ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. दुसऱ्या ग्रंथात त्यांचा फक्त उल्लेख सांपडतो.

पुराणसाहित्यात हरिवंश पुराण, महापुराण, पद्मचरित इ० ग्रंथ उल्लेखनीय आहेत. या पुराणांचा प्रतिपाद्य विषय ' त्रेसष्ट शलाका ' पुरुषाचे चरित्र असा आहे यात २४ तीर्थंकर, १२ चक्रवर्ती, ९ वासुदेव व ९ प्रतिवासुदेव आहेत. ज्यांत पुराणपुरुषाचे पुण्य चरित्र वर्णन केले आहे, त्यास पुराण म्हणतात. हरिवंश पुराणात कौरव पांडवाचे वर्णन आहे. पद्मचरितात श्री रामचंद्राचे वर्णन आहे. या दोन्ही ग्रंथांना

अनुक्रमे जैनमहाभारत व जैनरामायण म्हणता येते. यांच्याशिवाय चरित्र-ग्रंथाचे तर जैनसाहित्यात विपुल भांडार आहे. सकलकीर्ति आदि आचार्यांनी अनेक चरित्र ग्रंथ लिहिले आहेत. आचार्य जटासिंहनंदीचे 'वरांगचरित्र' हे एक पौराणिक काव्य आहे. काव्य साहित्यात वीरनंदीचे चंद्रप्रभचरित्र, हरिचंद्राचे धर्मशर्माभ्युदय, धनंजयाचे द्विसंधान व वाग्भटाचे नेमिनिर्वाण ही उच्चकोटीतील संस्कृत महाकाव्ये आहेत.

अपभ्रंश भाषेत चरित्र व पुराणग्रंथ, संस्कृपेक्षा जास्त प्रमाणात आहेत. या भाषेत जैनसाहित्याचे भांडार भरलेले आहे. ही भाषा बराच काळपर्यंत लोकभाषा होती व हिच्यातील साहित्यहि अत्यंत लोकप्रिय आहे. गेल्या कांही दशकात विद्वानाचे लक्ष या भाषाकड आकृष्ट झाले आहे व ही वर्तमान प्रांतीय भाषांची जननी असल्यामुळे भाषाशास्त्री व विभिन्न भाषांचे इतिहास लेखक यांना या साहित्याचे अध्ययन करणे आवश्यक झाले आहे. पुष्पदंताचार्य ह्या भाषेचे महाकवि होते. त्यांचा त्रिसृष्टी महापुरुष गुणालंकार हा महान् ग्रंथ आहे. पुष्पदंतानी महाकवि स्वयंभू यांचे स्मरण केले आहे. स्वयंभू, पुष्पदंत कनकामर, रैधू इ० अनेक कवींनी अपभ्रंश भाषेचे साहित्य समृद्ध करण्यात कोणतेच कष्ट घेण्याचे बाकी ठेवलेले नाही.

कथासाहित्यही अत्यंत विशाल आहे. आचार्य हरिषेणांचा कथाकोष हा प्राचीन ( इ. स. ९३२ ) ग्रंथ आहे. आराधना कथाकोष-पुण्यास्त्रव कथाकोष इ. अनेक कथाग्रंथ गोष्टीच्या सहाय्याने धर्माचरणाचे शुभफल व अधर्माचरणाचे अशुभफल वाचकांवर ठसवितात. जैनसहित्यांत चंपूकाव्यहि विपुल आहे. सोमदेवसूरीचे यशस्तिलक चंपू, हरिश्चंद्राचार्यांचे जीवंधरचंपू व अर्हद्दासाचे पुरुदेवचंपू उत्कृष्ट काव्ये आहेत. गद्यग्रंथात वादीभसिंहाचे गद्यचिंतामणि उल्लेखनीय आहे.



नाटकांत हस्तिमल्लाचे विक्रांतकौरव, मैथिलीकल्याण, अंजना पवनंजय इ. नाटके प्रेक्षणीय आहेत.स्तोत्र साहित्याचीहि कमतरता जैनवाङ्मयात नाही. महाकवि धनंजयाचे विषापहार स्तोत्र, कुमुदचंद्रांचे कल्याण मंदिर इ. स्तोत्रे उत्कृष्ट आहेत स्वामी समंतभद्राचार्यांच्या स्वयंभूस्तोत्रात जैनदर्शनाचे उच्च कोटीचे सिद्धांत चांगल्यारितीने मांडले आहेत. ते एक दार्शनिक स्तवन आहे. नीति-ग्रंथाचीहि वानवा येथे नाही. वादीभसिंहाचे 'क्षत्रचूडामणि काव्य' हा उत्कृष्ट नीतिपूर्ण काव्यग्रंथ आहे. आचार्य अमितगतीचे 'सुभाषित-रत्न-संदोह,' पद्मनंदी आचार्यांची पद्मनंदी पंचविंशतिका व महाराज अमोघवर्षांचें प्रश्नोत्तर रत्न-माला हेहि सुंदर नीतिग्रंथ आहेत.

याशिवाय ज्योतिष, आयुर्वेद, व्याकरण, कोष, छंद, अलंकार, गणित, राजनीति इ. विषयांवरहि जैनाचार्यांचे अनेक ग्रंथ आज उप-लब्ध आहेत. ज्योतिष व आयुर्वेद विषयक साहित्य कमी प्रमाणात प्रसिद्ध झाले आहे. व्याकरणात पूज्यपाद देवनंदीचे जैनेंद्र व्याकरण व शाकटयनाचे शाकटयन व्याकरण उल्लेखनीय आहे. कोषवाङ्मयांत धनंजय नाममाला व विश्वलोचनकोष, अलंकारात अलंकार चिंतामणि गणितात महावीर गणितसार संग्रह व राजनीतीत सोमदेवाचे नीति-वाक्यामृत इ. संस्मरणीय ग्रंथ आहेत. हे झाले संस्कृत व प्राकृत भाषेतील जैनग्रंथाचे विहंगमावलोकन. संस्कृत व प्राकृत साहित्याव्यतिरिक्त इतर भाषेतहि जैन साहित्य खूप विशाल आहे.

द्राविडीयन भाषांतहि बरेच जैनसाहित्य असून त्यामुळेच त्या भाषाना महत्व प्राप्त झाले आहे. कानडी भाषेत लिहिणारे अतिप्राचीन कवि जैनच होते. किंबहुना कानडी साहित्य उन्नत, प्रौढ व परिपूर्ण करण्याचे श्रेय जैनचार्य व जैनाकवीनाच मिळालेले आहे १३ व्या

शतकापर्यंतचे कानडी भाषेतील सर्व प्रौढ ग्रंथकार जैन व होते. पंप–भारतासारखा महाप्रबंध व शब्दमणि दर्पणासारखा शास्त्रीय ग्रंथ पाहून जैनकवींबद्दल कोणास आदर वाटणार नाही? कानडी गद्यग्रंथात प्राचीन 'चामुंडराय पुराणा' चे लेखक वीरमार्तंड चामुंडराय हे जैनच होते. आदिपंप, कवि चक्रवर्ती रत्न, अभिनव पंप इ. कवि जैनच होते. 'कर्नाटक कविचरित्राचे' चे लेखक आर. नरसिंहाचार्यांनी जैनकवि–बाबतीत पुढील उद्‌गार काढले आहेत. ' कन्नड भाषेचे मूळ कवि जैन होते आजपर्यंत उपलब्ध असलेल्या सर्व प्राचीन व उत्तम कृती जैन कवींच्याच होत्या. विशेषत: प्राचीन जैन कवीमुळेच कन्नड भाषेला सौंदर्य व कांति आली आहे पंप, रन्न व पोन्न यांना तर कवीमधील रत्नत्र मानणे योग्य होईल. इतर कवींनी १४ व्या शतकाच्या अंता–पर्यंत सर्वश्रेष्ठ चंपूकाव्याची रचना केली. कन्नड भाषेस सहाय्यक असे छंद, अलंकार, व्याकरण, कोष इ. ग्रंथ अधिक प्रमाणात जैनांनीच लिहिलेले आहेत.'

येथे हे सांगणे अयोग्य होणार नाही की, दक्षिणेकडे कानडी भाषेतील सर्व जैन साहित्य दिगंबर जैन विद्वानांनीच लिहिलेले आहे. दिगंबर संप्रदायातील बहुतेक सर्व प्रमुख प्रमुख आचार्य सर्व कर्नाटक विभागातच राहणारे होते व त्यांनी केवळ प्राकृत किंवा संस्कृतमध्येच ग्रंथरचना केली इतकेच नव्हे तर कानडी भाषेचेहि ते ग्रंथकार होते.

तामील भाषेचे साहित्यहि सुरवातीपासूनच जैनधर्म व जैन संस्कृतीने प्रभावित झालेले आहे. 'कुरल' व ' नालदीयार ' नांवाचे दोन ग्रंथ तद्देशीय जैनाचार्यांनी लिहिलेले आहेत. या ग्रंथातील अव–तरणे पुढील बहुतेक साहित्यात घेतलेले आढळतात. काव्य –साहित्या–पेक्षाहि तामील भाषेतील नीतिविषयक साहित्य प्राचीन असून त्यावर

जैनाचार्यांचा विशेष प्रभाव आहे. 'पलमोली' चे लेखक जैनच होते. यांच्या प्राचीन सूक्ति अतिमोलिक आहेत. कुरल व नालदीयानंतर यांचा तिसरा क्रमांक लागतो. "तिनै मालै नू रेम्वतु"चे लेखकहि जैन असून हा ग्रंथ शृंगार व वीररसाने पूर्ण आहे. यांत युद्ध विषयक सिद्धांतहि सांगितलेले आहेत. यांच्यानंतर झालेल्या टीकाकारांनी आपल्या ग्रंथांत वरील ग्रंथाचे पुष्कळसे उतारे घेतलेले आहेत. अशाच प्रकारचा आणखी एक ग्रंथ 'नान् मणिक्कडिगे' हा वेणवा छदांत लिहिलेला आहे.

तामील भाषेच्या पांच महाकाव्यापैकी चिंतामणि, सिलप्पडिकारम् व वलैतापति ह्या जैन लेखकाच्या कृती आहेत. सिलप्पडिकारम् हा अतिमहत्वपूर्ण तामीळ ग्रंथ साहित्यिक रीतिबाबत प्रमाणभूत मानला जातो. याचे तीन महाखंड असून एकूण तीस अध्याय आहेत. या भाषेतील ५ लघुकाव्ये– यशोधर कांव्य, चूडामणि, उदयन्कथै, नाग-कुमार काव्य व नीलकेशी ही आहेत. या पाचहि काव्याचे लेखक जैन आचार्य होते. जैन लेखकानी तामील भाषेचे व्याकरणहि लिहिले आहे. नन्नोल' हे तामील भाषेचे अतिप्रचलित व्याकरण आहे. हे शाळेत व कॉलेजमध्येहि शिकविले जाते. 'निघंटु' ग्रंथांत दिवाकर निघंटु, पिंगल निघंटु व गुणमणि निघंटु उल्लेखनीय ग्रंथ आहेत. जैनानी गणित व ज्योतिषा–संबंधी अनेक ग्रंथ लिहिले आहेत. याप्रमाणे तामील भाषा जैनसाहित्याने समृद्ध झालेली आहे.

गुजराथी भाषेतहि दिगंबर जैन कवीनी अनेक काव्ये लिहिली असून त्याची माहिती 'जैन गुर्जर कवि' या ग्रंथांत मिळू शकते

दिगंबर जैनसाहित्यात हिंदी ग्रंथांची संख्या बरीच आहे. गेल्या ३०० वर्षात बहुतेक जैनग्रंथ हिंदी भाषेतच लिहिले गेले आहे. जैन श्राव-कांचें दररोज स्वाध्याय करणें हे एक आवश्यक कर्तव्य आहे. म्हणून

सर्वसाधारण लोकांच्या भाषेत जिनवाणीची. रचना करण्याचा प्रयत्न अतिप्राचीन काळापासून होत आहे. त्यामुळेच हिंदी जैनसाहित्यात गद्य-ग्रंथांचे प्रमाण अधिक आहे. साधारणतः १६ व्या शतकापासून हिंदी गद्यग्रंथ जैन साहित्यात लिहिले गेले आहेत. त्यामुळे हिंदी भाषेचा विकास समजण्यास त्याचे अध्ययन अत्युपयोगी होईल. सैद्धांतिक ग्रंथांत तत्वार्थसूत्र, सर्वार्थसिद्धि, राजवार्तिक, गोम्मटसार, प्रवचनसार, पंचास्तिकाय, समयसार, षट्खंडागम, कषायप्रभृत, रत्नकरंड इ० महत्वपूर्ण ग्रंथांची टीका हिंदी भाषेत आहे. न्यायग्रंथावरील परीक्षामुख, आप्तमीमांसा, प्रमेयरत्नमाला, न्यायदीपिका व तत्वार्थश्लोकवर्तिका सारख्या महान् ग्रंथांची हिंदी टीकाहि उपलब्ध आहे. या टीका-ग्रंथांचे अध्ययन केवळ हिंदी भाषाभाषी लोकच करीत नाहीत तर गुजराथ, महाराष्ट्र व अतिदूर दक्षिण जैन प्रांतांतील लोकहि यांचा लाभ घेतात. याप्रमाणेच जैनधर्मसाहित्य हिंदी भाषेच्या प्रचारासहि सहाय्यक होत आहे. बहुतेक सर्व पौराणिक ग्रंथांचा व अनेक कथासाहित्यांचा अनुवाद हिंदी भाषेत झालेला आहे. अनुवादाचे कार्य प्रथमतः जयपूरच्या विद्वानांनी ढुंढारी भाषेत सुरू केले व ते अनुवाद आजहि त्या रूपात पहावयास मिळतात. ही झाली अनुवादित साहित्याची चर्चा.

हिंदी गद्य व पद्य स्वतंत्रपणेहि लिहिलेले असून त्यांतून जैन-सिद्धांताचे वर्णन पहावयास मिळते. गद्यसाहित्यात पं. टोडरमल्लजीचे 'मोक्षमार्गप्रकाशक' व पद्यसाहित्यांत पं. दौलतरामजीची 'छहढाला' ही जैनसिद्धांताची अमूल्य रत्ने आहेत. पं. टोडरमलजी, पं.दौलतरामजी पं. सदासुखजी, पं. बुधजनजी, पं ज्ञानतरायजी, पं. जयचंदजी इ० अनेक जैन विद्वानांनी आपापल्या काळच्या प्रचलित हिंदी भाषेत गद्यपद्य किंवा दोन्ही प्रकारची रचना केलेली आहे. विनंती, पूजापाठ,

स्तोत्र, धार्मिक भजने वगैरेहि पुष्कळ असून पद्यसाहित्यात अनेक पुराणे व चरित्रेहि लिहिली आहेत.

हिंदी जैन साहित्याची एक अशी विशेषता आहे की, त्यांत शांत-रसाचा प्रवाह सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतो. संस्कृत व प्राकृत जैन ग्रंथकारा-प्रमाणच हिंदी जैन ग्रंथकारांचेहि असेच ध्येय राहिले आहे की मनुष्याने सांसारिक विषयापासून विन्मुख होऊन आत्मतत्त्वास त्याने ओळखावे व आपला विकास करावा. हा ध्येयबिंदू समोर ठेवूनच सर्वांनी आपापली ग्रंथ रचना केलेली आहे. हिंदी जैनसाहित्यांतच नव्हे तर हिंदी साहित्यातहि कविवर्य बनारसीदासजीची 'आत्मकथा' ही एक अपूर्व कलाकृति मानली गेली आहे. त्यांचे 'नाटक समयसार' हाहि अध्यात्मा-वरील अद्भुतपूर्व असा ग्रंथ आहे.

## श्वेतांबर साहित्य.

पाटलीपुत्र येथील परिषदेत जे अंगविज्ञान संकलित केले ते सुद्धा कालांतराने अस्ताव्यस्त झाले. तेव्हा वीरनिर्वाणाच्या सहाव्या शतकांत आर्य स्कंदील यांच्या अध्यक्षतेखाली मथुरेला एक सभा झाली व त्यांत पुनः एकदा शिल्लक राहिलेल्या अंगसाहित्यास सुव्यवस्थित रूप दिले गेले. यास 'माथुरी वाचना' असे म्हणतात. यानंतर पुनः वीरनिर्वाणाच्या दहाव्या शतकांत वल्लभी नगरी (काठेवाड) येथे देवर्द्धिगणी क्षमा-श्रमण यांचे अध्यक्षतेखाली आणखी एक सभा झाली यांत पुनः अकरा अंगाचे संकलन झाले बाराव्या अंगाचा तर अगोदरच लोप झालेला होता. आतापर्यन्त स्मरणशक्तीच्या आधारेच अंगसाहित्याचे पठनपाठन चालत असे. परंतु आता वीरनिर्वाण संवत ९८० (ई. स. ४५३) च्या सुमारास ते ज्ञान ग्रंथरूपांत ग्रथित करण्यात आले. सध्याच्या जैन आगमाच्या व्यवस्थेचे श्रेय मुख्यतः संपादक देवर्द्धिगणी यांच्याकडेच जाते. त्यांनी यांचे निरनिराळे अध्याय केले व जे भाग त्रुटित होते, ते

आपल्या बुद्धीनुसार [1]संकलित केले. डॉ. जेकोबीच्या म्हणण्याप्रमाणें देवर्द्धि गणीनंतरहि या जैन आगमात बरेचसे फेरफार झाले आहेत.

श्वेतांबर संप्रदायाचे संपूर्ण जैनागम सहा विभागात विभागले आहे. १ अकरा अंगे–आचारांग, सूत्रकृतांग, स्थानांग, समवायांग, भगवती,ज्ञाता धर्मकथा, उपासक दशा, अंतकृद्दशांग, अनुत्तरौपपातिक, प्रश्नव्याकरण व विपाकसूत्र २ बारा उपांग–औपपातिक, राजप्रश्न, जीवाभिगम, प्रज्ञापना,जंबूद्वीपप्रज्ञप्ति.चंद्रप्रज्ञप्ति,सूर्यप्रज्ञप्ति,निरयावली, कल्पावतंस, पुष्पिक, पुष्पचूलिक व वहिनदशा. ३ दहा प्रकीर्णके–चतुःशरण, आतुरप्रत्याख्यान, भक्त, संस्तार, तंदुलवचारिक, चंद्रवेधक,

---

१ समयसुंदरगणींनी आपल्या सामाचारी शतकांत पुढील प्रमाणे लिहिले आहे–

"श्रीदेवर्द्धिगणिक्षमाश्रमणेन श्रीवीराद् अशीत्यधिक– नवशत– (९८०) वर्षे जातेन द्वादशवर्षीयदुर्भिक्षवशात् वहुतरसाधु व्यापत्तौ वहुश्रुतविच्छित्तौ च जातायां .... भव्यलोकोपकाराय श्रुतभक्तये च श्रीसंघाग्रहात् मृतावशिष्टतदा–कालीनसर्वसाधून् वल्लभ्यामाकार्य तन्मुखाद् विच्छिन्नावशिष्टान् न्यूनाधिकान् त्रुटिताऽत्रुटितान् आगमालापकान् अनुक्रमेण स्वमत्या संकलय्य पुस्तकारूढाः कृताः। ततो मूलतो गणधरभाषितानामपि तत्संकलनानन्तरं सर्वेषामपि आगमानां कर्ता श्रीदेवर्द्धिगणक्षमाश्रमण एव जातः।"

अर्थ– श्री. देवर्द्धिगणी क्षमाश्रमणानी वी. नि. सं. ९८० मध्ये १२ वर्षाच्या दुष्काळामुळे पुष्कळसे साधू मेल्यानंतर व वहुभाग श्रुताचा लोप झाल्यावर भव्य जीवाच्या उद्धारासाठी शास्त्रभक्तीने प्रेरित होऊन संघाच्या आग्रहाने बाकी शिल्लक राहिलेल्या सर्व साधूना वल्लभी नगरामध्ये बोलावून त्याच्या तोंडून शिल्लक राहिलेल्या कमी जास्त अगर त्रुटित अत्रुटित आगमाच्या वाक्याचे आपल्या बुद्धीप्रमाणे संकलन करून ते पुस्तकरूपाने लिहिले. म्हणून मूलतः गणधर प्रतिपादित सर्व शास्त्रे असूनहि यानी सकलन केल्यामुळे श्री देवर्द्धिगणी–क्षमाश्रमण यांना सर्व आगामाचे कर्ता मानले जाते. (समयसुंदरगणीचे सामाचारी शतक.)

देवेंद्रस्तव, गणिविद्या, महाप्रत्याख्यान व वीरस्तव. ४ सहा छेदसूत्रे– निशीथ, महानिशीथ, व्यवहार, दशाश्रुतस्कंध, बृहत्कल्प व पंचकल्प ५ दोनसूत्रे– नंदीसूत्र व अनुयोगद्वार. ६ चार मूलसूत्रे– उत्तराध्ययन, आवश्यक, दशवैकालिक व पिंडनियुक्ति हे ४५ ग्रंथ आगम म्हणविले जातात. यांची भाषा आर्ष प्राकृत आहे. यात आचार, व्रत, जैनतत्व ज्योतिष, भूगोल इ० विविध विषयाचे वर्णन आहे दिगंबर संप्रदायाच्या साहित्यात अंग व अंगबाह्य ग्रंथाची नावे व त्यात वर्णिलेल्या विषयाचा उल्लेख मिळतो परंतु त्यात उपांगादि भेद नाहीत. श्वेतांबर संप्रदायात चंद्रप्रज्ञप्ति; सूर्यप्रज्ञप्ति, जंबूद्वीपप्रज्ञप्ति यांना उपांग मानले आहे. परंतु दिगंबर साहित्यात यांची गणना दृष्टिवादाचा एक भेद जो परिकर्म त्यात केलेली आहे. त्याचप्रमाणे दश–वैकालिक उत्तराध्ययन कल्प– व्यवहार व निशीथ नामक ग्रंथाना अंगबाह्य म्हटले आहे. दिगंबर संप्रदायात अंगाशिवाय इतर सर्व साहित्यास अंगबाह्य म्हटलेले आहे.

श्वेतांबर परंपरेप्रमाणे देवर्द्धिगणीनंतर जिनभद्र गणी क्षमाश्रमण नावाचे एक विशिष्ट आचार्य झाले. त्याचे 'विशेषावश्यक भाष्य' हा एक उच्च कोटीचा ग्रंथ आहे. त्यात तर्कपूर्ण रीतीने ज्ञानाची सुंदर चर्चा केली आहे. तत्वार्थसूत्रावर एक भाष्यहि आहे. त्यास कांही विद्वान् स्वोपज्ञ मानतात. यावर आचार्य सिद्धसेन गणी यांची तत्वार्थ भाष्य ही एक विस्तृत टीका आहे. आगमिक साहित्यावरहि अनेक टीका उपलब्ध आहेत. नवांगवृत्तिकार श्री. अभयदेवसूरी यांनी ९ आगमावर संस्कृत भाषेत सुंदर टीका केली आहे. यादृष्टीने मल्लधारि हेमचंद्राचे नांवहि उल्लेखनीय आहे. त्यांनीहि आगमिक साहित्यावर विद्वत्तापूर्ण टीका लिहिल्या आहेत. विशेषावश्यक भाष्यावर रचलेली यांची टीका फारच सुंदर आहे.

श्वेतांबर संप्रदायात कर्म विषयक साहित्यहि बरेचसे आहे. यांत

कर्मप्रकृति', 'पंचसंग्रह', 'प्राचीन व नवीन कर्मग्रंथ' उल्लेखनीय आहेत. १३ व्या शतकांत श्री. देवेंद्रसूरींनी नवीन कर्मग्रंथाची रचना स्वोपज्ञ टीकेच्या आधारे केली. यांत कर्मसाहित्याची विपुल सामुग्री सकलित आहे. न्याय विषयक साहित्यात सिद्धसेन दिवाकरांचा न्यायावतार न्यायाचा आद्यग्रथ मानला जातो. यांचे 'सन्मति तर्क प्रकरण' हा एक महत्त्व पूर्ण ग्रंथ आहे. यांत आगमिक मान्यता तर्काच्या कसोटीवर घासण्याचा प्रयत्न केला आहे. या ग्रंथावर अभयदेवसूरीची महत्वपूर्ण टीका आहे. या संप्रदायात हरिभद्रसूरी नावाचे एक प्रख्यात विद्वान् झाले. असे म्हणतात की यांनी १४०० प्रकरण ग्रंथ रचले होते. यांच्या उपलब्ध ग्रंथात 'अनेकान्तवाद प्रवेश', अनेकात जयपताका' व शास्त्रवार्ता–समृच्चय ही नांवे उल्लेखनीय आहेत. तत्वार्थसूत्रावरहि यांनी टीका लिहिली आहे. वादिदेवसूरीचे 'प्रमाणनयतत्त्वालोकालंकार व त्याची 'स्वोपज्ञ वृत्ति, 'स्याद्वाद रत्नाकर' आणि आचार्य हेमचंद्राची 'प्रमाण–मीमांसा' व मल्लिषेणसूरीची 'स्याद्वाद मंजरी' ही न्यायशास्त्रातील सुंदर ग्रंथरत्ने आहेत १७ व्या शतकात आचार्य यशोविजय एक कुशल नैयायिक झाले. त्यांनी विद्यानंदीच्या अष्टसहस्त्रीवर एक टिप्पणी लिहिली आहे व नयोपदेश, नयामृत–तरंगिणी, तर्कपरिभाषा इ अनेक ग्रंथ लिहिले आहेत. जैनधर्माच्या सिद्धांतावर यानी नव्या दृष्टिकोनाचे विचा केला आहे. व नव्यन्यायाच्या शैलीनेहि ग्रंथ लिहिले आहेत.

पुराणसाहित्यात विमलसूरीचे 'पउमचरियं' (पद्मचरित्र) हे एक प्राकृत काव्य आहे. हे अति प्राचीन आहे यांत रामचंद्राची कथा आहे. 'वसुदेव हिण्डी हेहि एक प्राकृत भाषेतील पुराण आहे. या प्राचीन पुराणात महाभारताची कथा आहे. आचार्य हेमचंद्राचे ' त्रिसष्टीशलका पुरुषचरित् हेहि उल्लेखनीय आहे. इतरहि अनेक ग्रंथ आहेत.

काव्यात हेमचंद्रांचे 'द्वयाश्रयमहाकाव्य' अभयदेवाचे 'जयंतविजय' मुनिचंद्रांचे 'शांतिनाथ चरित' ही चांगली काव्ये आहेत. गद्यकाव्यात धनपाल कवीचा 'तिलमंजरी,' हा एक सुंदर आख्यायिकाग्रंथ आहे. नाटकात रामचंद्रसूरीचे 'नलविलास', 'सत्य हरिश्चंद्र' 'राघवाभ्युदय', 'निर्भयव्यायोग' इ. उल्लेखनीय आहेत. जयसिंहाचे 'हम्मीरमदमर्दन' एक ऐतिहासिक नाटक आहे. यात चौलुक्य राजा वीरधवलाने हम्मीर नावाच्या यवनास पिटाळल्याचे वर्णन आहे.

लाक्षणिक ग्रंथांत आचार्य हेमचंद्राचे 'काव्यानुशासन' प्रेक्षणीय उतरले आहे.जैनवाङ्मय कथासाहित्याचे भांडार आहे. यांत उद्योतनसूरीचे 'कुवलयमाला' हरिभद्रांचें 'समराइच्चकहा' व पादलिप्ताचे 'तरंगवक्कहा' अतिप्रसिद्ध आहेत. कुवलयमाला हे प्राकृत साहित्यातील एक अमूल्य रत्न आहे. प्राकृत भाषेच्या अभ्यासकाम हे फार उपयोगी आहे.याप्रमाणे आचार्य सिद्धर्षि याते 'उसमितिभवप्रपंचकथा' हा भारतीय साहित्यातील प्रथमश्रेणीचा रूपक–ग्रंथ मानला जातो.

व्याकरणात आचार्य हेमचंद्राचे 'सिद्धहेमव्याकरण' हे फारच प्रसिद्ध आहे. याच्या आठव्या अध्यायात प्राकृत व्याकरण असून यापेक्षा दुसरा चांगला व्याकरण ग्रंथ प्राकृतात आज उपलब्ध नाही. कोषांतहि हेमचंद्राचे 'अभिधानचिंतामणि', 'अनेकार्थसंग्रह', 'देशी–नाममाला', 'निर्घंटशेष', 'अभिधान राजेंद्र' व 'पाइअ सद्दमहण्णव' हे अपूर्व कोष-ग्रंथ आहेत.

प्रबंधांत चंद्रप्रभसूरीचे 'प्रभावकचरित', मेरुतुंगाचे 'प्रबंधचिंता–मणि', राजशेखराचे 'प्रबंधकोष' व जिनप्रभसूरीचे 'विविध तीर्थकल्प' महत्वपूर्ण ग्रंथ आहेत. इतरहि अनेक विषयावर अनेक प्रकारचे साहित्य उपलब्ध आहे. अपभ्रंश भाषेचेहि साहित्य पुष्कळ आहे ज्यामध्ये धनपाल रचित भविष्यदत्तकहा प्रसिद्ध आहे व स्तोत्र साहित्यहि भरपूर आहे.

श्वेतांबर संप्रदायाचे अनुयायी अधिक प्रमाणात गुजराथेत आहेत त्यामुळे गुजराथी भाषेत पुष्कळ साहित्य लिहिले आहे. त्याचा परिचय ‘ जैन गुर्जर कविओ ’ या ग्रंथात सविस्तर दिला आहे.

विदेशी भाषातहि जैनसाहित्य उपलब्ध आहे. जर्मन विद्वान् स्व. हर्मन याकोबी यानी कित्येक ग्रंथाचे संपादन केले आहे. त्याची कल्पसूत्राची प्रस्तावना व Sacred Books of East नावाच्या ग्रंथमालेतून प्रकाशित झालेल्या जैनसूत्राची प्रस्तावना वाचनीय आहे. जर्मन विद्वान् प्रा० ग्लेजनप यांचे ‘ जैनिझम् ’ हेहि चांगले आहे. स्व. वीरचंद्र राघवचंद्र गांधी यांनी अमेरिकेत शिकागो शहरात झालेल्या सर्वधर्म-संमेलनात जे भाषण केले, ते ‘ कर्मफिलॉसाफी ’ या नावाने छापलेले आहे. ‘ न्यायावतार ’ ‘ सन्मतितर्क ’ वगैरेचाहि इंग्रजी अनुवाद झालेला आहे . इतरहि अनेक ग्रंथ आहेत. दिगंबर साहित्यहि इंग्रजीत बरेच आहे. बॅ. जे. एल्. जैनी व बॅ. चंपतराय यांनी या बाबतीत उल्लेखनीय सेवा केली आहे, भाषा व भाष.वरील प्रभुत्व कौतुकास्पद आहे.

उपसंहार:- पुष्कळसे जैनसाहित्य प्रकाशित होऊ लागले आहे. व नवीन धर्तीचे त्याचे संपादनहि होत आहे. प्राचीन जैन साहित्याचे तुलनात्मक व ऐतिहासिक विवेचन करण्याची प्रथाहि रूढ झाली आहे. याचें श्रेय सर्वश्री पं नाथूराम प्रेमी, पं. जुगलकि मुख्तार, पं. सुखलाल, मुनि जिनविजय इ० जैन विद्वानाना आहे. या दृष्टीने प्रेमाजीचें ‘जैन-साहित्य व इतिहास’ मुख्तारजीची ‘पुरातन वाक्यसूत्रची’ ची प्रस्तावना व ‘समंतभद्र’ हे ग्रंथ उल्लेखनीय आहेत. ‘षट्खंडागम’ ‘कषायपाहुड’ व ‘न्याय कुमुदचंद्रांची’ हिंदी प्रस्तावना तुलनात्मक व ऐतिहासिक दृष्टी साठी अध्ययन करण्यायोग्य आहे. जिज्ञासूनी त्याचें अध्ययन करावे. तसेच संशोधकासाठीहि जैनसाहित्यात विपुल अध्ययन सामुग्री आहे.

## कांही प्रसिद्ध जैनाचार्य.

भगवान् महावीरानंतर असे अनेक प्रसिद्ध आचार्य व ग्रंथकार झाले की ज्यांनी आपल्या सदाचार व सद्विचारांनी केवळ जैनधर्मीयांनाच उपकृत केले असे नव्हे,तर आपल्या अमर लेखणीने भारतीय वाङ्मयहि त्यांनी समृद्ध बनविले आहे. अशांपैकी कांही प्रसिद्ध आचार्यांचा व ग्रंथकाराचा परिचय पुढे संक्षेपाने दिलेला आहे.

गौतम गणधरः– (इ. स. पूर्वी ५५७) हे भगवन् महावीराचे प्रधान गणधर (शिष्य) होते. यांचे मूळ नांव 'इंद्रभूति' असून जातीने हे वेदपारंगत ब्राह्मण होते भ.महावीरांना केवलज्ञान झाल्यानंतर त्यांची दिव्यध्वनी बाहेर निघेना. तेव्हा इंद्रास चिंता झाली. त्याचे कारण ओळखून ते इंद्रभूतिजवळ गेले व युक्तिप्रयुक्तीने त्यांना त्यांनी समोवशरणांत आणले. तेथे येताच त्यांच्या मनातील सर्व विकार व संशय दूर होऊन इंद्रभूतीने दीक्षा घेतली. ते भगवंताचे प्रधान गणधर बनले. भगवंतांचा उपदेश ऐकून व समजून घेऊन त्यांनी द्वादशांग श्रुताची रचना केली. आश्विन व॥ ३० ला प्रातःकाळी भ० महावीराचे जेव्हा निर्वाण झाले त्याचवेळी गौतम स्वामींना केवलज्ञानाची प्राप्ति झाली व त्यानंतर १२ वर्षांनी यानाहि निर्वाणपद प्राप्त झाले.

भद्रबाहूः– (इ.स.पू.३२५) हे अंतिम श्रुतकेवली होत. यांच्यावेळी मगधात १२ वर्षे भयंकर दुष्काळ पडला, तेव्हा साधूंच्या मोठ्या संघाबरोबर त्यानी दक्षिणेकडे विहार केला. प्रसिद्ध मौर्यसम्राट चंद्रगुप्त हेहि आपल्या पुत्रावर राज्यभार सोपवून याच्याबरोबर दक्षिणेकडे गेले. तिकडे म्हैसूर प्रांतातील श्रवणबेळगोळा या ठिकाणी आपला अंतसमय जवळ आलेला ओळखून भद्रबाहू तेथेच थांबले; व बाकी संघाला विहार करण्यास अनुज्ञा दिली. सेवेसाठी चंद्रगुप्तहि त्याच्या बरोबर

तेथेच राहिले. तेथील चंद्रगिरी पर्वतावर एका गुहेत भद्रबाहू स्वामीच्या देहोत्सर्ग झाला. ही गुंफा 'भद्रबाहू गुंफा' नावाने प्रसिद्ध आहे व तेथे त्याच्या चरणपादुकाहि आहेत त्याची तेथे पूजा होते. याचवेळी संघभेदाचे बीजारोपण होऊन त्यानंतर श्वेतांबर व दिगंबराची निर-निराळी आचार्यपरंपरा सुरु झाली. पुढे कांही प्रमुख दिगंबर आचार्यांचा परिचय देण्यात येत आहे.

धरसेनाचार्यः-(वि. सं. दुसरे शतक)-अंग व पूर्वांचे हे एकपदेश ज्ञाते होते हे सौराष्ट्र देशातील गिरनार पर्वताच्या गुंफेत ध्यान करीत असत. आपल्या पश्चात् श्रुतज्ञानाचा लोप होईल या चिंतेने त्यांनी महिमा नगरीच्या मुनीसंमेलनास पत्र दिले व तेथून दोन मुनी त्यांच्या जवळ आले. त्यांच्या बुद्धीची परीक्षा करुन त्यांनी त्यांना सिद्धांताचे शिक्षण दिले.

पुष्पदंत व भूतबलिः- हे दोन मुनी आचार्य धरसेनाजवळ आलेले होते. आषाढ शु॥ ११ स अध्ययन पुरे होताच धरसेनाचार्यांनी त्यांना निरोप दिला. नंतर हे दोन्ही शिष्य तेथून अंकलेश्वर येथे आले व तेथेच त्यांनीचातुर्मास केला. पुष्पदंत मुनी पुढे अंकलेश्वराहून वनवास येथे गेले तेथे त्यांनी जिनपालितांना दीक्षा दिली. तसेच वीसदी सूत्राची रचना करुन त्यांना शिकविले व भूतबलि जवळ पाठविले. भूतबलीनी पुष्पदंताचे आयूष्य थोडेसे शिल्लक राहिलेले ओळखून पुढील ग्रंथरचना केली. याप्रमाणे पुष्पदंत व भूतबलीनी 'षट्खंडागम' नामक सिद्धांत ग्रंथ लिहिले आणि हे षट्खंडागम लिपिबद्ध करून ज्येष्ठ शु॥ ५ स त्याची शास्त्रपूजा केली. ही तिथि जैनात श्रुतपंचमी या नांवाने प्रसिद्ध झाली.

गुणधर ( वि. सं. दुसरे शतक )- हेहि आचार्य साधारणता याच काळी झाले ते 'ज्ञानप्रवाद' नामक ५ व्या पूर्वातील दहाव्या

वस्तु अधिकारांतर्गत 'कषायपाहुड' रूपी श्रुतसागरात पारंगत होते. श्रुताचा विनाश होऊ नये म्हणून कषायपाहुड नांवाचा महत्वपूर्ण सिद्धांत–ग्रंथ प्राकृत गाथेत त्यांनी रचला.

कुंदकुंदाचार्य :– (वि सं. दुसरे शतक)– कुंदकुंदाचार्य हे जैन–धर्मातील अत्यंत प्रभावी आचार्य झाले. याच्या संबंधी अशी कथा प्रसिद्ध आहे की, विदेह क्षेत्रात सीमंधर स्वामीच्या चरणाजवळ जाऊन त्यांची दिव्यध्वनी ऐकण्याचे सौभाग्य यांना प्राप्त झाले. याचे पहिले नांव पद्मनंदी असे होते. कौडकुंदपूर येथील रहिवासी असल्यामुळे ते कोंडकुंडाचार्य या नांवानेहि ओळखले जात व त्याचेच कर्णमधुर रूपांतर कुंदकुंदाचार्य असे झाले. यांचे ' प्रवचनसार ', ' पंचास्तिकाय ' व 'समयसार' नांवाचे ग्रंथ अतिप्रसिद्ध असून ती ' नाटकत्रयीं ' या नांवाने ओळखली जाते. याशिवायहि त्यांनी अनेक 'प्राभृतां'ची रचना केली आहे. पैकी आठ प्राभृत उपलब्ध आहेत. बोधप्राभृताच्या शेवट–च्या एका गाथेत त्यांनी आपण श्रुतकेवली भद्रबाहूंचे शिष्य असल्याचे सांगितली आहे. श्रवणबेळगोळा येथील शिलालेखातहि याची बरीच कीर्ति गाईलेली आहे.

उमास्वामी:– (वि. सं. तिसरे शतक) हे आचार्य कुंदकुंदाचे शिष्य होत. यांनी जैनसिद्धांत संस्कृत सूत्रात निबद्ध करून तत्त्वार्थसूत्र नामक ग्रंथाची रचना केली. यांना 'गृद्धपिच्छाचार्य' असेहि म्हणतात. श्रवणबेळगोळ येथील शिलालेख नं. १०८ मध्ये असा उल्लेख आहे की कुंदकुंदाचार्यांच्या पवित्र वंशात सर्व पदार्थांचे ज्ञाते श्री. उमास्वामी मुनी झाले. ते मुनीश्रेष्ठ होते. त्यांनी जिनदेवप्रणीत सर्व शास्त्राचा अर्थ सूत्ररूपाने निबद्ध केला. ते प्राणीमात्रांच्या रक्षणात अति सावधान होते. एकेवेळी जवळ पिंछी नसल्यामुळे गृद्धांच्या पंखाची पिसे पिंछी रूपाने

त्यांनी उपयोगात आणली. तेव्हापासून त्यांना गृद्धपिच्छाचार्य म्हणतात. येऊ लागले. साधारणतः दिगंबर जैनमुनी जीवरक्षेसाठी मोरांच्या पंखाची पिछी जवळ बाळगतात.

समंतभद्राचार्यः- (वि. सं. तिसरे चवथे शतक (जैन समाजातील प्रभावी आचार्यात स्वामी समंतभद्राचार्यांचें स्थान अत्यंत श्रेष्ठ आहे. त्यांना जैनशासनाचे प्रणेते व भावी तीर्थंकर मानलेले आहे, अकलंक देवांनी अष्टशहीत, विद्यानंदानी अष्टसहस्त्रीत, जिनसेनाचार्यांनी आदि-पुराणात, जिनसेनसूरींनी हरिवंशपुराणात, वादीराजसूरींनी न्याय-विनिश्चय विवरण व पार्श्वनाथ चरित्रात, वीरनंदीनी चंद्रप्रभ चरित्रात, हस्तिमल्लांनी विक्रांतकौरव नाटकात व दुसऱ्या अनेक ग्रंथकारानीहि आपापल्या ग्रंथप्रारंभी यांचे अति आदरपूर्वक स्मरण करून त्यांना नमस्कार केला आहे मुनि जीवनात यांना भस्मक रोग झाला होता. तो दूर करण्यासाठी त्यांनी कांची किंवा काशी येथील राजकीय शिवालयात पुजाऱ्याचे काम पत्करले व तेथील देवार्पित नैवेद्य भक्षण करून आपला रोग दूर केला जेव्हा ही गोष्ट इतरांना समजली, तेव्हा स्वयंभू स्तोत्राची रचना करून जैनशासनाचे महत्व जगास प्रत्यक्ष पटवून दिले यांचे 'आप्तमीमांसा', 'बृहत्स्वयंभू स्तोत्र', 'युक्त्यनुशासन', 'जिनस्तुति शतक' व 'रत्नकरंड' हे ग्रंथ उपलब्ध असून जीवसिद्धि इ. कांही ग्रंथ अनुपलब्ध आहेत हे प्रखर तार्किक व कुशल वादी होते. यांनी अनेक देशात फिरून विपक्षीयांना शास्त्रार्थात जिंकले.

सिद्धसेनः- ( वि. सं पाचवे शतक ) आचार्य उमास्वामी प्रमाणेंच सिद्धसेनांनाहि दोन्ही संप्रदायात मान्यता मिळालेली आहे. दिगंबर संप्रदायातील दोन्ही जिनसेनाचार्यांनी फारच आदराने यांचें स्मरण केले आहे. यांच्या सूक्ति भ० ऋषभदेवाच्या सूक्तिसारख्याच असल्याचे सांगितले आहे. प्रतिवादीरूपी हत्तीच्या समूहासमोर हे

विकल्परूप नखयुक्त सिंहासारखे समजले गेले आहेत. श्वेतांबर संप्रदायात त्यांना 'दिवाकर' हे विशेषण लावले जाते. यांचा 'सन्मति-तर्क' ग्रंथ अतिप्रसिद्ध व लोकमान्य आहे प्राकृत गाथेत लिहिलेला आहे. इतर न्यायावतार व द्वाविंशतिका हे ग्रंथ संस्कृतमध्ये लिहिले आहेत. हे ग्रंथ गंभीर असून खोल तत्वचर्चेनी परिपूर्ण आहेत. प्रसिद्ध इतिहासज्ञ पं. जुगलकिशोर मुख्तार यांनी आपल्या अनेकांताच्या सन्मति सिद्धसेनाकांत ( ९-११ ) खोल अध्ययन व संशोधन करून असे सिद्ध केले आहे की, या सर्व कृति एकाच सिद्धसेनाच्या नसून सिद्धसेन नावाचे अनेक विद्वान् झालेले आहेत.

देवनंदी:– (इ स. पाचवे शतक) श्रवणबेळगोळा येथील शिलाले नं. ४० (६४) मध्ये असे लिहिले आहे की, याचे पहिले नाव ,देवनंदी' होते. पण बुद्धीच्या तीव्रतेमुळे त्यांना 'जिनेंद्रबुद्धी' हि म्हणत व देवानी यांच्या चरणाची पूजा केली, यावरून याचे नाव 'पूज्यपाद' असेहि आहे. संक्षेपतः 'देव असेहि नाव होते. आचार्य जिनसेनानी आदिपुराणात व वादीराजसूरीनी पार्श्वनाथचरित्रात या संक्षिप्त नावाचेंच याचें स्मरण केले आहे. महाकवि धनंजयांनी आपल्या नाममालेत पूज्यपादाचे व्याकरण 'अपश्चिम रत्नत्रय' यापैकी संबोधिले आहे. याचे 'जैनेंद्र व्याकरण' जैनाचे पहिले संस्कृत व्याकरण आहे. याची सूत्रे व व संज्ञा संक्षिप्त आहेत. 'मुग्धबोध' चे कर्ता पं गोपदेवानी आठ वैय्याकरणात जैनेंद्रकर्त्याचाहि उल्लेख केला आहे याशिवाय यांचे 'सर्वार्थसिद्धि', 'समाधितंत्र,' 'इष्टोपदेश' व दशभक्ति' (संस्कृत) हे चार उपलब्ध ग्रंथ आहेत. त्यांनी आपल्या व्याकरणावर टीकाहि लिहिली आहे व वैद्यक ग्रंथहि लिहिले आहेत पण ते अप्राप्य आहेत. गंगवंशीय राजा दुर्विनीत हे यांचे शिष्य होते. याचा काल इ. स. ४८२ ते ५१२ पर्यंत मानला जातो.

पात्रकेसरिः– (इ. स. सहावे शतक) यांना पात्रस्वामी असेहि म्हणतात. यांनी बौद्धांच्या त्रैरुप्य हेतुवादाचे खंडन करण्यासाठी 'त्रिलक्षणकपर्थन' नांवाचे शास्त्रच लिहिले पण ते अनुपलब्ध आहे. शांतिरक्षितानी आपल्या तत्त्वसंग्रहात पात्रस्वामीच्या मताची आलोचना करतांना कांही कारिका पूर्वपक्षाच्या रूपाने लिहिल्या आहेत. त्यांचा खालील श्लोक अतिप्रसिद्ध आहे.

अन्यथानुपपन्नत्वं यत्र तत्र त्रयेण किम् ।
नान्यथानुपपन्नत्वं यत्र तत्र यत्रेण किम ॥

वादिराजसूरि व अनंतवीर्यानी लिहिले आहे की, बौद्धांच्या त्रिक्षणाचे खंडन करण्यासाठी पद्मावती देवींनी भ० सीमंधर स्वामीच्या समोवशरणांत जाऊन त्याच्या गणधरांच्या प्रसादाने हा श्लोक तयार करून पात्रकेसरींना दिला होता. श्रवणबेळगोळा येथील शिलालेख ५४ मध्येहि असा उल्लेख आहे.

अकलंकः–( इ. स. ६२० ते ६८० ) यांनी जैन न्यायास चांगले स्वरूप दिले. हे प्रकांड पंडित धुरंधर शास्त्रार्थी व उत्कृष्ट विचारक होते. जैन न्यायास यांनी जे रूप दिले, त्यावरच पुढच्या जैन ग्रंथकारानी आपली मतदार ठेवली. बौद्धांबरोबर यांचा खूप संघर्ष झाला. स्वामी समंतभद्राचे हे योग्य उत्तराधिकारी समजले जातात. यांनी त्यांच्या आप्तमीमांसेवर 'अष्टशती' नावाचे भाष्य लिहिले यांचे जीवन व परिचय यांची माहिती 'न्यायकुमुदचंद्रा' च्या प्रस्तावनेत आहे. यांची भाषा गंभीर आहे. यांचे 'अष्टशती' प्रमाणसंग्रह' 'न्यायविनिश्चय 'लघीयशास्त्र' व ' तत्वार्थराजवार्तिक हे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. व सिद्धिविनिश्चय हा प्रकाशित झालेला नाही.

विद्यानंदिः–(इ. स.९वे शतक) विद्यानंदि हे तत्कालीन अतिसमर्थ विद्वान् होत. यांनी अकलंकदेवांच्या अष्टशतीवर अष्टशहस्त्री नांवाच्या

महान् ग्रंथ लिहिला. तो समजून घेण्यासच चांगल्या चांगल्या विद्वानांना कष्टसहस्त्रीचा अनुभव येतो. हे सर्व दर्शन शास्त्रात चांगले पारंगत होते. यांनी 'अष्टसहस्त्री' आप्तपरीक्षा,'प्रमाणपरिक्षा',पत्रपरीक्षा तत्वार्थ श्लोकवार्तिक'व'युक्त्यनुशासनटीका' हे ग्रंथ पौढ भाषेत लिहिले आहेत.

माणिक्यनंदि:– ( इ. स. ९ वे शतक ) यांनी अकलंकदेवांच्या ग्रंथाचे खोल अध्ययन करून 'परीक्षामुख' नांवाचा सूत्रवद्ध ग्रंथ लिहिला. त्यात प्रमाण व प्रमाणभासाचे संक्षिप्त स्पष्ट पण सरस वर्णन आहे.

अनन्तवीर्य:– ( इ. स. ९ वे शतक ) हेहि अकलंक–न्यायाचे प्रकांड पंडिप होते. यांनी सिद्धिविनिश्चय या ग्रंथावर विद्वत्तापूर्ण टीका लिहिली. वादिराजांनी न्यायविनिश्चय विवरणात यांची चांगली स्तुति केली असून असे लिहिले आहे की, 'यांच्या वचनामृताच्या वृष्टीने जगाला खाऊन टाकणारा शून्यरूपी अग्नि शांत झाला.

वीरसेन:- (इ. स. ७९० ते ८२५) हे सिद्धांत ग्रंथ 'षट्खंडागम' व कषायपाहुड' यांचे मर्मज्ञ होते. पहिल्या ग्रंथावर यांनी ६२००० श्लोक प्रमाण प्राकृत संस्कृत मिश्रित 'धवल' नावाची टीका लिहिली व कषायपाहुडावर २०,००० श्लोक प्रमाण टीका लिहून हे स्वर्गवासी झाले. टीका जैनसिद्धांतावरील गहनचर्चेने परिपूर्ण आहेत, धवलाच्या प्रस्तावनेत ते वैयाकरणाचे अधिपति, तार्किक चक्रवर्ती व प्रवादीरूपी हत्तीना सिंहासारखे असल्याचे सांगितले आहे.

जिनसेन:... ( इ. स. ८०० ते ८८० ) हे वीरसेनाचे शिष्य होते. आपले गुरू स्वर्गवासी झाल्यानंतर यांनी आपल्या गूरूची 'जयधवल ही टीका पुरी केली. यांनी स्वतःस 'अविद्धकर्ण' असे लिहिलें आहे. त्यावरून असे दिसून येते की यांनी बालवयांतच दीक्षा घेतली. हे मोठे कवि होते. यांनी आपल्या तारूण्यावस्थेतच कालिदासाच्या

मेघदूताला अंतर्भूत करून पार्श्वाभ्युदय नांवाचे सुंदर काव्य रचलेले आहे. मेघदूतांत जितके श्लोक आहेत त्यातील प्रत्येकाच्या शेवटचे चरण व इतर चरणांपैकी एक एक किंवा दोन दोन घेऊन आपल्या श्लोकात समाविष्ट करून यांनी आपली काव्यरचना केली आहे. महापुराण हाहि यांचा एक ग्रंथ आहे. यात त्रेसष्ट शलाका पुरुषाचे चरित्र लिहिण्यास त्यांनी प्रारंभ केला. परंतु मध्येच स्वर्गवास झाल्यावर त्याचे शिष्य गुणभद्राचार्य यांनी हा ग्रंथ पूर्ण केला. राजा अमोघवर्ष हा यांचा शिष्य असून राजा यांना पुष्कळसा मान देत असे.

प्रभाचंद्र (इ. स. ११ वे शतक)- हे एक बहुश्रुत दार्शनिक विद्वान् होते. सर्व दर्शनातील बहुतेक सर्व चांगल्या मौलिक ग्रंथांचा यांनी अभ्यास केला होता. ही गोष्ट त्यांनी लिहिलेल्या 'न्यायकुमुदचंद्र' व 'प्रमेयकमलमार्तंड' नांवाच्या दार्शनिक ग्रंथांच्या अवलोकनावरून स्पष्ट होते. यातील पहिल्या ग्रंथात अकलंक देवाच्या लघीयस्त्रयीवर भाष्य असून दुसऱ्या ग्रंथात आचार्य माणिक्यनंदीच्या परीक्षामुख ग्रंथावर भाष्य आहे. श्रवणबेळगोळ येथील शिलालेख नं. ४० (६४) मध्ये यांना 'शब्दाभोरुहभास्कर' व प्रसिद्ध 'तर्क ग्रंथकार' म्हणून लिहिले आहे. यानी शाकटायन व्याकरणावर एक विस्तृत न्यास ग्रंथहि लिहिला आहे. त्याचा कांही भाग उपलब्ध आहे. याच्या गुरुचे नाव पद्मनंदी सैद्धान्तिक होते.

वादिराजः-(इ स.११वे शतक) वादिराज हे तार्किक असूनहि उच्च कोटीचे कवि होते. याना षट्तर्कषण्मुख, स्याद्वाद-विद्यापति व जगदेक-मल्लवादी अशा उपाधी होत्या नागर तालुक्यातील शिलालेख नं ३९ मध्ये लिहिले आहे की, ते सभेत अकलंक, प्रतिपादनात धर्मकीर्ति, बोलण्यात बृहस्पति व न्यायशास्त्रात अक्षपाद होते. यानी अकलंक देवाच्या न्यायविनिश्चयावर २०,०० श्लोकप्रमाण केलेले भाष्य

विद्वत्तापूर्ण आहे. शके ९४७ (इ. स. १०२५) मध्ये यांनी पार्श्वनाथ-चरित्र लिहिले आहे. ते अत्यंत सरस व प्रौढ आहे. इतरहि बरेचसे ग्रंथ व स्तोत्र यांनी लिहिले आहेत. यांच्या गुरूचे नांव 'मतिसागर' होते.

ह्या कांही प्रसिद्ध जैनाचार्यांचा परिचय झाला. आता कांही श्वेतांबर जैनाचार्यांचा परिचय दिला जात आहे. त्यापैकी दोन्ही संप्रदायात मान्यता असलेल्या उमास्वामी व सिद्धसेन ह्यांचा परिचय वर आला आहेच.

निर्युक्तिसार भद्रबाहु:—भद्रबाहु नांवाचे दोन आचार्य झाले आहेत. हे दुसरे भद्रबाहू विक्रमाच्या ६ व्या शतकांत झाले. हे जातीने ब्राह्मण व प्रसिद्ध ज्योतिषी वराहमिहिर यांचे बंधु होते. यांनी आगमावर निर्युक्तीची रचना केली व इतरहि अनेक ग्रंथ लिहिले.

मल्लवादी:— हे अति तार्किक होते. आचार्य हेमचंद्रानी आपल्या व्याकरणात लिहिले आहे की सर्व तार्किक मल्लवादीनंतरच उदयास आले; यानीं लिहिलेले नयचक्र अति महत्वपूर्ण असून त्यांचे पूर्ण नांव 'द्वादशार नयचक्र' हे आहे. मूळग्रंथ उपलब्ध नाही. परंतु सिंह क्षमाश्रमणानी त्यावर केलेली टीका मिळते. आचार्य हरिभद्रांनी आपल्या 'अनेकान्तजयपताका' ग्रंथांत वादिमुख्य असा यांचा गौरव केला आहे त्यावरून विक्रमाच्या ८ व्या शतकाच्या अगोदर ते झाले असावेत.

जिनभद्रगणि:— (इ. स. ६ वे व ७ वे शतक) जिनभद्रगणि क्षमाश्रमण एक अत्यंत समर्थ व आगमकुशल विद्वान होतें. 'विशेषावश्यक' नांवाचा यांचा एक महत्वपूर्ण भाष्य ग्रंथ आहे. त्यावरूनच 'भाष्यकर' नांवाने यांची प्रसिद्धि झाली.

या ग्रंथात यांनी सिद्धसेनाच्या विचाराचे खंडनहि केलेले आहे.

'विशेषणवती' इ० दुसरेहि अनेक ग्रंथ यांनी लिहिले आहेत. हे उत्कृष्ट व्याख्याते असल्याचे आचार्य हेमचंद्रांनी लिहिले आहे.

हरिभद्रः- (इ. स. ७००–७५०) हे श्वेतांबर संप्रदायातील अत्यंत मान्य विद्वान् होऊन गेले. यांनी संस्कृत व प्राकृतांत अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यापैकी अनेकान्तवाद प्रवेश, अनेकान्तजयपताका, ललितविस्तरा, षड्दर्शनसमुच्चय व समराइच्चकहा अति प्रसिद्ध आहेत. आपल्या प्रकरण ग्रंथात यानी तत्कालीन साधूंची खरी आलोचनाहि केली आहे.

अभयदेवः– (इ. स. ११ वे शतक) हे प्रद्युम्नसूरीचे शिष्य. यांनी सिद्धसेनाच्या सन्मतितर्कावर अत्यंत विद्वत्तापूर्ण टीका लिहिली असून या टीकेत शेकडो दार्शनिक ग्रंथांचा सारांश खच्चून भरलेला आहे. दिगंबर परंपरेत अकलंक देव, विद्यानंदि व प्रभाचंद्र यांना जे स्थान आहे, तेच श्वेतांबर परंपरेत मल्लवादी, हरिभद्र व अभयदेव सूरि यांचे स्थान आहे हे सहाहि विद्वान्, दार्शनिक क्षेत्रातील दैदीप्यमान तारे होत.

हेमचंद्रः– (१२ वे शतक) विद्वान् मंडळीत आचार्य हेमचंद्राचे स्थान अति उच्च आहे. गुर्जर नरेश सिद्धराज जयसिंह हे याचें चांगले भक्त होते. त्यांच्या नांवावरच यांनी आपले 'सिद्धहैमव्याकरण' लिहिले त्याचा एक अध्याय 'प्राकृत व्याकरण' हा आहे. हे अतिप्रसिद्ध आहेत. आचार्यांचा जन्म संवत ११४५ मध्ये झाला. ९ वर्षाचे असतानाच यांनी दीक्षा घेतली व संवत् ११६२ मध्ये याना आचार्यपद मिळाले. संवत् १२२९ मध्ये यांचा स्वर्गवास झाला. न्याय, व्याकरण, काव्य, कोश इ० सर्व विषयावर यानी अद्भुत ग्रंथ लिहिले आहेत. जयसिंहाचे उत्तराधिकारी राजा कुमारपाल हे याचे शिष्य होते.

यशोविजयः– (इ. स. १८ वे शतक) – आचार्य हेमचंद्रानंतर श्वेतांवर परंपरेत यशोविजयासारखा दुसरा सर्वशास्त्रपारंगत विद्वान झाला नाही. यांनी काशीत अध्ययन केलें होतें हे नव्यन्यायाचे नुसते विद्वानच नव्हते, तर त्या शैलीत कित्येक ग्रंथाची यांनी रचनाहि केली. यांचे जैनतर्कभाषा, ज्ञानविंदू, नयरहस्य, नयप्रदीप इ० ग्रंथ अध्ययन करण्यासारखे आहेत. यांची विचारसरणी अति विद्वत्तापूर्ण व समतोल होती.



## प्रकरण ५ वे

# प्राचीन जैनकला व पुरातत्त्व.

## [ प्राचीन ऐतिहासिक सामुग्री ]

जैन–मान्यतेप्रमाणे या अवसर्पिणी कालाचा ऱ्हास होत होत जेव्हा भोगभूमीचे स्थान कर्मभूमीने घेतले त्यावेळी भ० ऋषभदेवानी जनतेच्या योगक्षेमासाठी पुरुषाच्या वहात्तर कला व स्त्रियांचे चौसष्ट गुण सांगितले जैन अंगसाहित्याच्या १३ व्या पर्वात त्याचे सविस्तर वर्णन होते. परंतु ते आता नष्ट झाले आहे. यावरून असे दिसून येते की, सुरवातीस कलेचा फार विस्तृत अर्थ होता. त्यांत जीवननिर्वाहापासून ते जीवनोद्धारापर्यंतचे सर्व प्रयत्न समाविष्ट होते. म्हटलेच आहे की,

कला वहत्तर पुरुषकी, तामे दो सरदार ।
एक जीवकी जीविका, एक जीव–उद्धार ॥

जैनधर्माचे मुख्य लक्ष्य जीवनविकासाकडे आहे जीवन–

विकासासाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नाच्या विकासाचें नावच जैनधर्म असे जर मानले, तर ते अनुचित होणार नाही. 'सत्यं शिवं सुंदरं' म्हणजे जें सत्य आहे, कल्याणकारी आहे, सुंदर आहे ती कला. ही कलेची अलीकडील परिभाषा जैन कलेस बरोबर लागू पडते. कारण जैन-धर्माशी संबद्ध अशा चित्रकला, मूर्तिकला व स्थापत्यकला या सर्व कला सौंदर्याबरोबरच कल्याणकारी असून सत्याचेंहि त्या दर्शन घडवितात. त्यांचा परिचय संक्षेपाने पुढे देत आहोत.

## चित्रकला

सरगुजा राज्यातील लक्ष्मणपुरीपासून १२ मैलावर 'रामगिरी पहाड आहे. तेथे 'जोगीमारा' गुंफा आहे. या गुंफेच्या चौकटीवर अत्यंत सुंदर अशी चित्रे कोरलेली आहेत. ती ऐतिहासिक दृष्टीनें प्राचीन असून जैनधर्माशी संबंधित आहेत. परंतु संरक्षणाच्या अभावी त्यांची स्थिति फारच खराब झालेली आहे. पुदुकोटै राज्यांत राजधानी–पासून ९ मैलावर एक जैन गुंफा–मंदिर आहे ते सितन्नवासल नावाने प्रसिद्ध आहे. त्याचे प्राकृत रूप 'सिद्धण्णवास' हे आहे. याचा अर्थ सिद्धांचा निवास असा होतो. याच्या भिंतीवर 'पूर्वपल्लव राज्याच्या शैलीची चित्रे आहेत. ही तामीळ संस्कृति व साहित्याचे महान् रक्षक प्रसिद्ध कलाकार राजा पहिला महेंद्र वर्मा (सन ६००–६२५) यांनी बनविली आहेत. ही अतिसुंदर असून सर्वात प्राचीन जैनचित्रे आहेत, यामध्ये काहीच शंका नाही की, अजिंठा येथील सर्वोत्कृष्ट चित्राबरोबर सितन्नवासल येथील चित्राची तुलना करणे अन्यायाचे होईल परंतु या चित्राचे भारतीय चित्र–कलेच्या इतिहासात महत्वाचे स्थान आहे. यांची रचनाशैली अजिंठ्याच्या भिंतीवरील चित्राशी बरचशी मिळतीजुळती आहे. येथे सध्या भिंती व छतावरील कांही दोनचार चित्रेच फक्त चांगल्या स्थितीत शिल्लक

राहिली आहेत. या चित्राची विशेषता अशी आहे, की अगदी थोड्या परंतु स्थिर व खोच रेषांनी अत्यंत सुंदर आकृती अशा कलात्मकतेने काढल्या आहेत की, त्या जणू जिवंत वाटतात. गुंफेंत समोवशरणाची सुंदर रचना चितारली आहे व ती सर्व गुंफा कमालानी सुशोभित झालेली आहे. खांबावर नर्तकीची चित्रे आहेत. ओवरीमध्ये छतावर मध्यभाग्री पुष्करणी काढली आहे व पाण्यात पशुपक्षी जलक्रीडा करीत असलेले दाखविले आहेत. उजव्या बाजूस तीन मनुष्याकृतीची चित्रे आकर्षक व सुंदर आहेत. गुंफेत पद्मासनावर ध्यानमुद्रेत असलेल्या पुरुषा इतक्या उंचीच्या पांच तीर्थकरांच्या मूर्ती आहेत.वास्तविक पल्लवकालीन ही चित्रे भारतीय विद्वानाच्या अभ्यासाचा विषय आहेत.

यानंतरची जैनधर्माशी संबंधित चित्रकलेची उदाहरणे १०-११ व्या शतकापासून तो १५ व्या शतकापर्यंत मिळतात. विद्वानाचे असे मत आहे की, मध्यकालीन (युगीन) चित्रकलेचे जे अवशेष सापडतात. तें या जैनभांडारामुळेच. कारण या काळात साधारणतः १००० वर्षेपर्यंत जैनधर्माचा प्रभाव भारतवर्षात एक मोठ्या भागात बराच पसरलेला होता. आणि दुसरी गोष्ट अशी की, मोठ्या प्रमाणात जैनानी धार्मिक ग्रंथ ताडपत्रीवर लिहिले व चित्रित केले होते. वी. सं. ११५७ मध्ये चित्रित केलेली निशीथचूर्णीची प्रत आज उपलब्ध आहे. ही जै ाश्रित कलेची अतिप्राचीन प्रत होय. १५ व्या शतकाच्या अगोदर ज्या कांही कलात्मक चित्रकृती पाहावयास मिळतात त्या केवळ जैनग्रंथातच सापडतात.

आतापर्यन्त जे प्राचीन जैनसाहित्य उपलब्ध आहे त्याचा बहुभाग ताडपत्रावर लिहिलेला आढळतो. म्हणून भारतीय चित्रकलेचा विकास ताडपत्रावरहि बराच झाला आहे. मुनी जिनविजयजी लिहितात की

'चित्रकलेचा इतिहास व अध्ययनाच्या दृष्टीने ताडपत्राची ही सचित्र पुस्तके अत्यंत मौल्यवान व आकर्षक वस्तु आहेत.'

मद्रास गव्हर्नमेटच्या म्युझियमतर्फे Tirupatti Kunram.' नावाचा श्री. टी एन्. रामचंद्रन् यांनी लिहिलेला एक मौल्यवान् ग्रंथ प्रकाशित झाला आहे. यातील चित्रावरून दक्षिण भारतातील जैन-चित्रकलेच्या पद्धतीचे स्वरुप चांगले लक्षात येते. त्यापैकी अधिक चित्रे भ० ऋषभदेव व महावीरांच्या जीवन घटनावर प्रकाश टाकतात. त्यावरून त्यावेळचे पोषाख, नृत्यकला, इ. ची चांगली माहिती मिळते.

ताडपत्री सुरक्षित राहाव्यात म्हणून लाकडी फळ्यांचा उपयोग केला जात असे. म्हणुन त्यावरही जैन चित्रकलेचे सुंदर नमुने पाहावयास मिळतात. जैन चित्रकलेच्या बाबतीत चित्रकलेचे मान्यवर विद्वान् श्री. एम्. सी. मेहता असे लिहितात की, ' जैनचित्रात एक प्रकारची निर्मलता, स्फूर्ति व गतिवेग आहे. त्यामुळे डॉ. आनंदकुमार स्वामीसारखे विद्वान्हि आश्चर्यमुग्ध झाले. या चित्राची परंपरा अजिंठा, वेरूळ, बाघ व सितन्नवासलाच्या भिंती-चित्राची आहे. समकालीन संस्कृतीच्या अध्ययनाने या चित्रापासून पुष्कळशी ज्ञान-वृद्धि होते. विशेषतः पोशाख व सामान्यपणे उपयोगात येणाऱ्या निरनिराळ्या वस्तू इ. बाबी चांगल्या रीतीने लक्षांत येतात.' (भारतीय चित्रकला पृ. ३३. )

## ❊ मूर्तिकला ❊

जैनधर्म हा निवृत्तिप्रधान धर्म आहे. म्हणून सुरवातीपासून आजपर्यंत त्यांच्या मूर्ति-रचनेत साधारणतः एक प्रकारचेच दर्शन होते. इ. स. च्या सुरवातीस कुशान राज्यकालाच्या ज्या जैनप्रतिमा उपलब्ध आहेत, त्यात व त्यानंतर शेकडो वर्षांनी बनविलेल्या जैन मूर्तीत बाह्य

दृष्टीने फार थोडेसेच अंतर आहे. प्रतिमेचे लाक्षणिक अंग जवळ जवळ २००० वर्षपर्यंत एकाच स्वरूपांत कायम राहिलेले आहे. पद्मासन किंवा खड्गासनस्थ मूर्तीत बराचसा काळ निघून गेल्यानंतरहि त्यांत विशेष फरक आढळून येत नाही. जैनतीर्थकराच्या मूर्ती विरक्त, शांत व प्रसन्न असतात, त्यामध्ये मनुष्याच्या मनातील विकाराना अजिबात थारा असत नाही. मूर्तीच्या मुखचर्येवरूनच ही जिनप्रतिमा आहे हे तावडतोब ओळखले जाऊ शकते. खड्गासनावरील मूर्तीच्या तोंडावरहि प्रसन्नता झळकत असून दोन्ही हात गुडघ्यापर्यन्त आलेले असतात. ती ध्यानमग्न उभी पुरुषाकार दिसते. बसलेल्या प्रतिमा ध्यानमुद्रेत पद्मासनावर विराजमान असतात. दोन्ही हात मांडीवर सरळ ठेवलेले असतात. चोवीसहि तीर्थकराच्या प्रतिमाच्या स्वरूपात कसलाच व्यक्तिभेद नसल्यामुळे त्याच्या आसनावर निरनिराळी चित्रे काढलेलीं असतात. त्यावरून कोणत्या तीर्थकरांची प्रतिमा आहे हे ओळखले जाऊ शकते. दिगंबर श्वेतांबर मूर्तीमधील भेद व त्यांच्या कारणाची चर्चा या पुस्तकांतील संघभेद या प्रकरणात केलेली आहे.

मध्यकालीन जैनमुर्तिवर बौद्धप्रथेप्रमाणे कपाळावर ऊर्णा (केसाचा विशिष्ट गोल आकार) डोक्यावर उष्णीष व छातीवर श्रीवत्स अशी चिन्हेहि काढली जाऊ लागली. परंतु त्यांच्या मूळ रचना व स्वरूपात कांही फरक पडला नाही.

अलिकडे सर्वात प्राचीन जैनमूर्ति पाटण्याच्यां लोहिनीपुर या ठिकाणी मिळाली आहे ही निश्चितपणे मौर्यकालीन असून, ती पाटना म्युझियममध्ये ठेवली आहे. याचे पॉलिश चमकदार व अजूनहि जसेच्या तसेच कायम आहे. लाहोर, मथुरा लखनौ, प्रयाग इ. ठिकाणच्या म्युझियममध्ये अनेक जैनमूर्ती पाहावयास मिळतात. त्यापैकी कांही

गुप्तकालीन आहेत. श्री. वासुदेव उपाध्याय लिहितात. मथुरेतीन २४ वे तीर्थंकर वर्धमान महावीर यांची मूर्ति मिळाली असून, ती कुमारगुप्ताच्या काळी तयार झाली होती. वास्तविक मथुरेत जैन मूर्ति कलेच्या दृष्टीने पुष्कळसे काम झाले आहे. श्री. रायकृष्णदास आपल्या 'भारतीय मूर्तिकला ग्रंथात लिहितात की मथुरेच्या शुंगकालीन कला मुख्यतः या जैन संप्रदायाच्या आहेत.

खंडगिरी व उदयगिरी येथे इ. स. पूर्वी १८८ ते ३० पर्यंतच्या शुंगकालीन मूर्ति शिल्पकलेतील अद्भूत चातुर्य प्रकट करतात. तेथे या वेळच्या कोरलेल्या जवळ जवळ १०० जैन गुंफा असून त्यात मूर्ति–शिल्पहि आहे. दक्षिण भारताच्या अलगामलै नामक स्थानी खोदलेल्या जैनमूर्ति उपलब्ध झालेल्या आहेत. त्यांचा काळ इ. स पू. ३००० ते २०० च्या आसपास सांगितला जातो या मूर्ति सौम्यस्वरूप असून द्रवीडियन कालामध्ये अति सुंदर म्हणून मानल्या जातात. श्रवणबेळ–गोळा येथील प्रसिद्ध जैनमूर्ति संगारातील अद्भूत वस्तूपैकी एक गणली जाते. ती आपल्या अनुपम सौदर्याने व अद्भूत शांतीने प्रत्येक व्यक्तीचे मन आपल्याकडे आकृष्ट करून घेते. जैनमूर्तिकलेची ही एक जगास अनुपम देणगी आहे.

### स्थापत्यकला

तीर्थंकरांच्या साध्या प्रतिमाचे निवासस्थान सुशोभित ठेवण्यात जैनाश्रित कलांनी कांही बाकी ठेवलेले नाही. भारतवर्षाच्या चारहि कानाकोपऱ्यात जैनमंदिराच्या अद्वितीय इमारती आजहि उभ्या आहेत. म्हैसूर राज्याच्या हसन जिल्ह्यात बेलूर येथील जैनमंदिरे मध्यकालीन जैनवैभवाची साक्ष देतात. गुजराथच्या अबू मंदिरातील स्थापत्यकला ही इतकी सुंदर आहे की, ती सारखी पाहातच रहावेसे वाटते.

विंध्य प्रांतातील छतरपूर राज्यात 'खजुराहा' या स्थळी ९ ते ११ व्या शतकापर्यंत अतिसुंदर देवालये बनलेले आहेत आणि काळ्या पाषाणाच्या खंडित अखंडित जैनप्रतिमा जागोजागी पाहावयास मिळतात. बहुधा बुंदेलखंडातून आणलेल्या जैनमूर्तींचा चांगला संग्रह अलाहाबाद येतील म्युनिसिपल् संग्रहलयांत पाहावयास मिळतो. एकेवेळी बुंदेलखंड जैन-पुरातत्त्वाचे व कलेचे माहेरघर होते. त्यानें शिल्पकारांना यथेच्छ द्रव्य देऊन जैन कलाकृती निर्माण केल्या. त्याची पूर्ण कल्पना खजुराहा व देवगड येथील यात्रा करूनच येऊ शकतें. चितोडचा जैनस्तंभ स्थापत्यकलेच्या दृष्टीनें उल्लेखनीय आहे या शैलीचा तो एकमेव स्तंभ होय. त्याची उंची ८० फूट असून खाल-पासून ते शिखरापर्यंत त्यावर सुंदर नक्षी काढलेली आहे व सजावट केलेली आहे. यावर लिहिलेल्या लेखावरून ह्याचा काळ ८९६ इ. स. हा आहे. हा स्तंभ प्रथम तीर्थंकर आदिनाथाशी संबंधीत आहे. यावर त्यांच्या शेकडो मूर्ति कोरलेल्या आहेत. ग्वाल्हेरच्या पहाडावर जैन प्राचीन कलेची उल्लेखनीय सामूग्री आहे. पहाडाच्या चारहि बाजूने पुष्कळशा जैनमूर्ति खोदलेल्या आहेत व त्यापैकी कांही कांही ५७ फूट उंचीच्या आहेत फ्रेंच कलातज्ञ ज्यूरीनो यांनी आपल्या 'लॉ रिलीजन दि जैन' पुस्तकात यथार्थपणे लिहिले आहे की,'विशेषतः स्थापत्यकलेच्या क्षेत्रात जैनांनी इतकी पूर्णता प्राप्त केली आहे की, क्वचितच कोणी त्यांची बरोबरी करू शकेल!'

जैन स्थापत्यकलेचे सर्वांत प्राचीन अवशेष ओरिसाच्या दक्षिण भागाकडील उदयगिरी व खंडगिरी पर्वतातील तसेच जुनागडच्या गिरनार पर्वतातील गुंफेत मिळतात. उदयगिरी व खंडगिरीच्या गुंफाबाबत मि. फर्ग्युसनाचे असे म्हणणे आहे की, त्यांची विचित्रता व प्राचीनता तसेच त्या ठिकाणी आढळणाऱ्या मूर्तींचें आकार प्रकार यामुळे त्याचे

विशेष महत्व आहे. उदयगिरीची हाथीगुंफा ही खारवेलांच्या शिला- लेखामुळे अतिप्रसिद्ध झाली आहे. व स्थापत्यकलेच्या दृष्टीने राणीगुंफा व गणेश गुंफा उल्लेखनीय आहेत. त्यामध्ये जैनस्थापत्यकलेमध्ये भ० पार्श्वनाथांचा जीवन वृत्तांत अतिकौशल्याने कोरलेला आहे. कलेच्या दृष्टीने मथुरेचे आयागपट, वोडनस्तूप व तोरण हे उल्लेखनीय आहेत. जैनस्थापत्यकलेचे कांहीसे अलीकडील उदाहरण अबू द. स्थानी व राणा कुंभाच्या वेळच्या अवशेषात पहावयास मिळते. अलवर राज्याचा भानुगड स्थानीहि अतिसुंदर जैनमंदिर आहेत. त्यातील एक १० व्या ११ व्या शतकातील असून खजुराहा येथील मंदिराप्रमाणेच ते अतिसुंदर आहे. मि. फग्युसनाचे म्हणणे असे आहे की, ' राज- पुतन्यात जैन कमी राहिल्यामुळे त्यांच्या मंदिराची दुरवस्था झाली. आहे. परंतु भारतीय कलेच्या उपासकांना (प्रेमी जनाना) ते फारच उपयुक्त ठरतील.

जैनांच्या स्थापत्यकलेने गुजराथचीहि शोभा वाढविली आहे हें सर्वांना मान्य आहें की, सर्व जैनकला व स्थापत्य जिवंत राहिले नसते तर मुस्लीम कलेने हिंदूकला दूपित झाली असती. मि. फर्ग्युसन यांनी स्थापत्यावर एक ग्रंथ लिहिला असून त्यात ते लिहितात, बाराव्या शत- काचे ब्राह्मण धर्मीय मंदिर आहे, ते गुजराथेतील जैनाकडून घेतलेल्या शैलीचे उदाहरण आहे. राणकपूर येथील जैनमंदिरातील अनेक खांबा वरील कला पाहून कला-मर्मज्ञ आश्चर्यमुग्ध होतात. दक्षिणेंत जेथें बौद्ध धर्माच्या स्थापत्याचे थोडे वहुत अवशेप मिळतात, तेथे जैनधर्माच्या प्राचीन स्थापत्याची पुष्कळशी उदाहरणे आजहि उपलब्ध आहेत. त्यापैकी वेरूळ येथील इंद्रसभा व जगन्नाथसभा ह्या प्रमुख आहेत. साधारणत:यांचे खोदकाम चालुक्यांची वदामी शाखा किंवा राष्ट्रकूटांच्या आश्रयाखाली झाले असावे. कारण वदामी येथेहि याच प्रकारची एक जैनगुंफा आहे.

ती सातव्या शतकातील समजल्या जाते.

दक्षिणेत जैनमंदिरे व मूर्ति पुष्कळशा प्रमाणात आहेत. श्रवणबेळगोळा (म्हैसूर) येथे गोमट्टस्वामीची प्रसिद्ध जैनमूर्ति आहे. ती स्थापत्य कलेच्या दृष्टीने अपूर्व आहे. तेथे अनेक जैनमंदिरें आहेत. ती द्रवीडियन शैलीची आहेत. कॅनरा जिल्ह्यात किंवा तुळू प्रदेशात जैनमंदिरे पुष्कळ प्रमाणात आहेत. परंतु त्यांची शैली दक्षिण भारतीय द्रवीडियन शैलीशीहि मिळत नाही किंवा उत्तर भारतीय पद्धतीशी जुळती नाही. मुडविद्री येथील मंदिरात लाकडी कामाचा अधिक उपयोग केला असून त्यावरील नक्षीकाम प्रेक्षणीय आहे. सारांश, भारतवर्षाचा क्वचितच असा एखादा भाग असेल की, प्राचीन जैनकलेचे अवशेष तेथे सांपडणार नाहीत. आज जेथे जैनांची वस्ती नाही अशा ठिकाणीहि जैनकलेचे सुंदर नमुने आढळतात. त्यामुळे प्रसिद्ध चित्रकार रविशंकर रावळ हे आपल्या 'अंधकार युगीन भारता'त (पृ० ९५–९६) वर म्हणतात की, 'भारतीय कलेचा अभ्यासी जैनधर्माची जराहि उपेक्षा करणार नाही. कारण जैनधर्म हा कलेचा महान् आश्रयदाता, उद्धारक व संरक्षक असल्याचे दिसून येते.'

स्व. के. पी. जायस्वाल यांनीं जैनधर्मसंबंधित वास्तुकलेबाबत एक चुकीची गोष्ट सांगितली आहे जैन व बौद्धमंदिरावर अप्सरांच्या मूर्तीबाबत ते म्हणतात, "आता प्रश्न असा उपस्थित होतो की, बौद्ध जैनांना या अप्सरा कोठून मिळाल्या? xxx यावर त्या त्यांनी सनातन हिंदू (वैदिक) इमारतीवरून उचलल्या असाव्यात, असे माझे उत्तर आहे!"

भारतीय कलाचे अशा तऱ्हेने सांप्रदायिक विभाजन करण्याबाबत मि. व्युहलर यांचें मत उल्लेखनीय आहे. त्यांनी मथुरा येथील प्राचीन कलेचा अभ्यास करून पुढील प्रमाणे आपले मत निश्चीत केले आहे. 'मथुरा येथील संशोधनावरून मला असा धडा मिळाला आहे की,

भारतीय कला सांप्रदायिक नाही बौद्ध, जैन व ब्राह्मण धर्मांनी आपल्या वेळच्या व देशाच्या कलांचा उपयोग केलेला आहे. कलेच्या क्षेत्रात त्यांनी प्रतीके व रूढी आणि रीति हे एकाच प्रवाहातून घेतलेले आहेत. हे सर्व धार्मिक व कलात्मक तत्त्वांच्या रूपाने जैन, बौद्ध व सनातनी हिंदू या सर्वांनाच सारख्या रीतीने लागू आहे! या मताचीच पुष्टि मि. विन्सेट स्मिथ यांनी आपल्या 'दि जैन स्तूप अँड अदर अँटीक्विटीज् ऑफ मथुरा' यांत केली आहे

याप्रमाणे प्राचीन मंदिरे मूर्ति, शिलालेख, गुंफा व ताम्रपत्र इ० रूपाने आजहि जैन-प्राचीन कला इतस्ततः दिसून येतात. त्यापैकी बरेचसे पुरावे काळाच्या प्रवाहात नष्ट झाले आहेत व कांहीसे नष्टहि गेलेत. मि. फर्ग्युसन याचे म्हणणें आहे की 'बारा खांबाच्या घुमटाची जैनात बरीच चाल रूढ झालेली दिसते. असा प्रकारच्या एक घुमट भेलसा येथील समाधीत आढळतो व तो प्रायः चवथ्या शतकातील आहे. दुसरा बाघ येथील महान् गुंफेत आढळतो. तो ६ व७ व्या शतकातील आहे. अशा प्रकारचे घुमट संशोधन केल्यास आणखीहि पुष्कळ सांपडतील. परंतु अशा प्रकारच्या घुमटाचें पातळ व सुंदर खांब मुसलमानांनी आपल्या कामात उपयोगात आणले. कारण ते अगदी सरळ पुनः बसविले जाऊ शकत होतें. म्हणून ते छिन्नविछिन्न न करताच मुसलमानांनी उपयोगात आणले. मि. फर्ग्युसन आपल्या Histroy of Indian and Eastern Architedture. P. 209. वर लिहितात की, अजमेर, दिल्ली, कनोज धार व अहमदाबाद येथील विशाल मशिदी जैन मंदिराच्याच पुनः तयार केल्या आहेत. गुजराथ येथील प्रसिद्ध सोमनाथ मंदिर कोणास माहित नाही.? इ. स. १०२५ मध्ये महमद गझनीने हें फोडले या मंदिराची शैली गिरनार पर्वतावर असलेल्या श्री नेमीनाथांच्या जैनमंदिराशी मिळती जुळती आहे·

मि. फर्ग्युसनचे म्हणणे असे आहे की, 'जेव्हा मुसलमानानी या मंदिरावर आक्रमण केले तेव्हा हे 'सोमेश्वर मंदिर' नावाने ओळखलें जात होते. सोमेश्वर म्हणजे शिव. जर हे मंदिरे शिवाचे होते तर तेथे शिवलिंग अवश्य प्रतिष्ठित असावयास पाहिजें होते. परंतु मुस्लिम इति-हास लेखकाचे म्हणणे असे की, मूर्तीस डोके, हात, पाय व पोट होतें. अशा स्थितीत ही मूर्ति शिवलिंग नसून विष्णूची किंवा कोण्या तरी जैन तीर्थकरांची असावी, पण त्यावेळी गुजराथेत वैष्णव धर्माची नांव-निशाणीहि नव्हती. तसेच मुसलमानानंतर त्या मंदिराचा जीर्णोद्धार राजा भीमदेव, सिद्धराज व कुमारपालानी करविला हे सर्व जैन होते. यावरून फर्ग्युसन यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, सोमनाथाचे मंदिर हे जैनमंदिर होते.

कलेप्रमाणेच 'पुरातत्व' या शब्दाचाहि अर्थ अति व्यापक आहे. इतिहास वगैरे तयार करण्यात ज्या साधनाची आवश्यकता असते, ते सर्व 'पुरातत्व' यामध्ये गर्भित आहेत. म्हणून प्राचीन मंदिरे, मूर्ति गुंफा व स्तंभ याप्रमाणेच प्राचीन शिलालेख व शास्त्रे याचाहि समावेश पुरातत्वांत होऊ शकेल.

श्रवणबेळगोळा (म्हैसूर) येथे पुष्कळसे शिलालेख कोरलेले आहेत. म्हैसूर पुरातत्व विभागाचें तत्कालीन अधिकारी लूईस राईस यांनी श्रवणबेळगोळाच्या १४४ शिलालेखाचा संग्रह प्रकाशित केला होता. यांच्या प्रस्तावनेत त्यानी या लेखाच्या ऐतिहासिक महत्वाकडे विद्वानाचे लक्ष वेधले आहे. चंद्रगुप्त मौर्य आणि भद्रबाहू यांच्या पारस्परिक (आपसातील) संबंधाचे विवेचन करून, त्यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, सम्राट चंद्रगुप्तमौर्यानी भद्रबाहूपासून जिनदीक्षा घेतली होती व त्याप्रमाणेच शिलालेख नं. १ मध्ये त्यांचे

स्मारक आहे. याच संग्रहाची दुसरी आवृत्ति रावबहादूर आर. नर-सिंहाचार्य यांनी प्रकाशित केली. त्यात त्यांनी ५०० शिलालेख संग्रहित केले व प्रस्तावनेत त्याच्या ऐतिहासिक महत्वतेचे विवेचन केले आहे. परंतु हा संग्रह कानडी व रोमन लिपीत असल्यामुळे त्यांची एक आवृत्ति देवनागरी लिपीत प्रो. हिरालालजी व श्री, विजयमूर्ति यांच्याकडून श्री नथूराम प्रेमी यांनी संपादित करवून प्रकाशित केली आहे. त्याचप्रमाणे अबू, देवगड इ. ठिकाणीहि अनेक शिलालेख मुर्तिलेख वगैरेहि आढळतात. भारतीय इतिहासात अत्यंत महत्वपूर्ण असलेल्या खंडगिरी उदयगिरीच्या जैनशिलालेखांची चर्चा अगोदर केली आहे. याप्रमाणे जैनानी बहुसंख्य शिलालेख, प्रतिमालेख, ताम्रपत्र, ग्रंथप्रशस्ति, पुष्पिका, पट्टावली, गुर्वावली, राजवंशावली व ग्रंथ इ. रूपाने विपुल ऐतिहासिक सामुग्री उपलब्ध करून दिली आहे.

स्व. डॉ. के. पी. जायस्वाल यांनी आपल्या एका लेखात लिहिले आहे की, 'जैनामधील येथे २५०० वर्षाचा संवत् गणनेचा हिशेब सर्व हिंदुमात्रात सर्वात चांगला ( प्राचीन ) आहे. यावरून असे समजते की, प्राचीन काळी ऐतिहासिक परिपाटीची वर्षगणना आमच्या देशात चालू होती. जेव्हा ती इतर ठिकाणी लुप्त व नष्ट झाली, तेव्हा ती केवळ जैनातच राहिली जैनाच्या या गणनेच्या आधारावर पौराणिक व ऐतिहासिक अशा बुद्ध व महावीराच्या काळापासून घडलेल्या सर्व घटनांचा काल आम्ही निश्चित करू शकलो. व त्याचा मेळ चांगल्या रीतीने सर्व घटनांशी जमून आला. कित्येक ऐतिहासिक घटनांची माहिती जैनाच्या ऐतिहासिक लेख व पट्टावलीत मिळते. ( जैन साहित्य संशोधक खंड १–पृ. २११)

# प्रकरण ६ वे

# ( सामाजिक रूप )

## जैनसंघ

मुनि, आर्यिका, श्रावक व श्राविका यांच्या समुदायास जैनसंघ अशी संज्ञा आहे. त्यापैकी मुनि व आर्यिका हा गृहत्यागी वर्ग असून श्रावक व श्राविका गृहस्थी वर्ग आहे. जैनसंघात हे दोन्ही वर्ग बरोबर राहतात. जेव्हा हे वर्ग असणार नाहीत. तेव्हा जैनसंघहि उरणार नाही. व जैनसंघ नसेल त्यावेळी जैनधर्महि उरणार नाही.

हे दोन्हीं वर्ग निरनिराळे असले तरी आपआपसांत या दोघांचाहि संबंध एकमेकाशी इतका दृढ ठेवण्याचा प्रयत्न केला आहे की, एका-पासून दुसरा अलग राहू शकणार नाही असे दोघांचेहि एकमेकावर नियमित वा प्रभाव आहे. हिंदुधर्मामध्ये साधू-संतावर गृहस्थांचा कांहीच अकुंश राहू शकत नाही. तसा प्रकार जैनसंघात नाही. उलट शीलभ्रष्ट किंवा दुराचारी साधूंवर कडक नजर राहू शकते व कोणाचीहि स्वच्छंदता अधिक कालपर्यंत चालू शकत नाही. अलिकडे ही संघव्यवस्था कांहीशी वास्तव्य झालेली आहे व साधुवर्गातहि नियमनाचा अभाव झाला आहे. परंतु ही गोष्ट अगोदर नव्हती पूर्वी आचार्याची, स्वीकृति व परवानगी घेतल्याशिवाय साधू एकाकी विहार करीत नसे व एकाकीपणे विहार करण्याची आज्ञा त्याच साधूला दिली जात होती, की ज्याच्या चिरकालीन सहवासाने त्याची चांगली पारख झालेली आहे. मुनि-दीक्षाहि सर्वांना दिली जात नव्हती. प्रथम संघात ठेऊन त्याची पारख होत असे व कांही घरगुती राजकीय किंवा अन्य कांही कारणाने हा घर सोडून पळून तर आलेला नाही ना? जाणून घेण्याचा प्रयत्न केला जात असे आणि त्यांच्या मनांत जर खरोखरच वैराग्य भावना

प्रबल असेल तर त्यास सर्व संघासमोरच जिनदीक्षा दिली जात असे साधुसंघात एक प्रमुख आचार्य असत व कांही अवांतर आचार्यहि असत. ते सर्व मिळून संघाचे नियमन करीत असत. प्रायश्चित्त, विनय, वैयावृत्य, स्वाध्याय व ध्यान या गोष्टीकडे साधु-वर्गाचे खास लक्ष वेधले जात असे. प्रत्येक साधूंचे हे आवश्यक कर्तव्य असे की, आचार्यासमोर आपल्या अपराधाची आलोचना करून ते देतील ते प्रायश्चित्त आदर पूर्वक घ्यावे. प्रत्येक दिवशी साधूने प्रातःकाळी उठून आपल्यापेक्षा श्रेष्ठ असतील त्यांना नमस्कार करावा; रोगी किंवा असमर्थ साधू असतील त्यांची सेवांशुश्रूपा करावी असा नियम असे या सेवाशुश्रूपेस , वैयावृत्य' नांवाचे अभ्यंतर तप जैनशास्त्रात मानले आहे. त्याचप्रमाणें आर्यिकाचीहि व्यवस्था होती. दोघांचेहि राहणे वगैरे अगदी निराळे असे. कोण्या एका साधूस आर्यिकेशी किंवा आर्यिकेल साधूशी एकांतात गप्पागोष्टी करण्याची सक्त मनाई असे तसेच कांही विवक्षित अंत ठेवूनच वसण्याचा आदेश होंता.

साधूवर्ग राजकार्याशी कोणत्याच प्रकारचा संबंध ठेऊ शकत नसे साधूचे जे दहा आवश्यक आचार (कल्प) सांगितले आहेत, राज राजपिंड अर्थात् राजाचे भोजन ग्रहण करू नये, असाहि एक आचार सांगितला आहे, कारण राजपिंड घेण्यात अनेक प्रकारचे दोष असतात.

हिंदू धर्मात धार्मिक क्रियाकांड व धार्मिक शास्त्राचे अध्ययन-अध्यापन करणारा असा एक स्वतंत्र वर्ग मानला असल्यामुळे हिंदू धर्मानुयायी गृहस्थाचे धर्म-ज्ञान कांहीसे न्युनरूप आहे. व केवळ वर-वरचेवर आचार तेवढे शिल्लक राहिलेले आहेत. परंतु जैनधर्मात असा कोणताच स्वतंत्र वर्ग नसल्यामुळे व शास्त्र स्वाध्याय व व्यक्तिगत सदा-चार यावर जोर असल्यामुळे श्रावक श्राविका जैनधर्मतत्त्वज्ञान व

आचार यापासून वंचित झाले नाहीत. म्हणून साधू किंवा आर्यिकाच्या आचारात थोडीशीहि उणीव असली तर ती त्याच्या चटकन् लक्षात आणीत असत. असे दिसून येते की दिगंबर संप्रदायात भट्टारक कालीन मुनीमध्ये शिथिलाचार वाढू लागला व लोकांत मुनिसंबंधी इतकी अरूची उत्पन्न झाली की, श्रावक त्यांना आहारहि देत नव्हते. म्हणून तत्कालीन आचार्य श्री सोमदेवसूरी व पंडित आशाधरजी यांनी आप-आपल्या श्रावकाचारात गृहस्थांच्या या कडक दृष्टिकोनाचा विरोध केला. जसे:– सोमदेवसूरि लिहितात–

"भुक्तिमात्रप्रदाने तु का परीक्षा तपस्विनाम् ।
ते सन्त: सन्त्वसन्तो वा गृही दानेन शुद्धचति ।" यशास्तिलक० ।

फक्त आहार देण्यातूनच मुनीची काय परीक्षा करतोस ? कारण ते सज्जन असोत की असज्जन असोत; त्यांना दान दिल्याने गृहस्थ शुद्ध होतो पंडित आशाधरजी लिहितात–

"विन्यस्यैंदंयुगीनेषु प्रतिमासु जिनानिव ।
भक्त्या पूर्वमुनीनर्चेत् कुत: श्रेयोऽतिचर्चिनाम् ॥ :४॥" सागारधर्मा० ।

ज्याप्रमाणेच प्रतिमात तीर्थकरांची स्थापना करून त्यांची पूजा केली जाते, त्याप्रमाणेच या काळच्या साधूमध्ये प्राचीन कालीन मुनीची स्थापना करून भक्तीपूर्वक त्यांची पूजा करावी.कारण जे लोक निष्कारण क्षोदक्षेम करीत असतात त्यांचे कल्याण कसे बरे होऊ शकेल ?

गृहस्थीवर्ग अशाप्रकारे जागरूक असल्यामुळेच जैनधर्मात अना-चाराची वाढ होऊ शकली नाही व त्यास प्रोत्साहनहि मिळाले नाही. जैनगृहस्थ वर्गात नेहमी शास्त्रमर्मज्ञ विद्वान् होत आले आहेत. या विद्वा-नानी चांगल्या ग्रंथावर मोठमोठ्या हिंदी टीका लिहिल्या. तसेच आपल्या संप्रदायात पसरणाऱ्या शिथिलाचाराचाहि कडक विरोध केला. त्यामुळे

शिथिलाचार निर्मात्याचा जवळ जवळ लोप झाला. जैनसंघांत स्त्रियांनासुद्धा मानाचे स्थान मिळालेले होते. दिगंबर मताप्रमाणे स्त्री-मुक्ती मानली गेली नाही. तरी आर्यिका व श्राविकाचा चांगला सन्मान केला जातो जैनसंघांत विद्वानाचे अधिकार प्राप्त आहेत, ते हिंदु धर्मात नाहीत. जैन सिद्धांतानुसार पुत्र रहित विधवा स्त्री आपल्या पतीच्या संपत्तीची स्वामिनी होते व ती आपले मृत पति किंवा त्याच्या उत्तराधिकाऱ्यांच्या सम्मतिशिवाय दत्तक घेऊ शकते.

जैनसंघांत चार वर्णाचे लोक सामील होतात. शूद्रांनाहि धर्म-सेवनाचा अधिकार आहे. उदाहरणार्थः—

शूद्रोऽप्युपस्कराचारवपुः शुद्ध्याऽस्तु तादृशः ।
जात्या हीनोऽपि कालादिलब्धौ ह्यात्माऽस्ति धर्मभाक् ॥२२॥' सागारधर्म ७।

उपकरण, आचार व शरीरशुद्धि झाल्यामुळे शूद्रहि जैनधर्माचा अधिकारी होऊ शकतो. कारण काललब्धि वगैरे मिळाल्यावर जातीने हीन असा आत्माहि धर्माचा अधिकारी असतो.

परंतु मुनि दीक्षेला योग्य असे तीनच वर्ण मानलेले आहेत. [1]'कांही कांही आचार्यांनी तीन वर्णात आपआपसात रोटी बेटी व्यवहार करण्या-चीहि परवानगी दिली आहे. अहिंसाणुव्रताचे पालन करणाऱ्यामध्ये यमपाल चांडालाचे नांव जैनशास्त्रात अत्यंत कौतुकाने (आदराने) घेतले जाते ही गोष्ट जैनसंघाची विशेषता स्पष्ट करते. स्वामी समंत-भद्राचार्यांनी तर असेहि लिहिले आहे की—

" सम्यग्दर्शनसम्पन्नमपि मातङ्गदेहजम् ।
देवा देवं विदुर्भस्मगूढाङ्गारान्तरौजसम् ॥२८॥" रत्नकरंड श्रा० ।

---

१ 'परस्परं त्रिवर्णानां विवाहः पंक्तिभोजनम् ।— यशस्तिलक

सम्यग्दर्शनाने संपन्न असा चाण्डाळहि राखेत झाकलेल्या निखान्या-प्रमाणे अंतर्यामी तेजस्वी असा देवासारखा मानला जातो, असे जिनेद्र देवानी सांगितली आहे.

जैनसंघाची दुसरी एक अशी उल्लेखनीय विशेषता आहे की, गायीचे आपल्या पाडसावर जसे प्रेम असते, त्याच वात्सल्याने प्रत्येक जैनाने आपल्या साधर्मी बांधवाशी प्रेमानें व्यवहार करावा, असा जैन-शास्त्रांत उल्लेख आहे. त्याचप्रमाणे जर कोणी साधर्मी बन्धु कांही निमित्तानें धर्ममार्गापासून च्युत होत असेल तर, ज्या उपायाने शक्य असेल त्या उपायाने सन्मार्गापासून तो ढळणार नाही अशा रीतीनें प्रयत्न करावा, हे सम्यक्त्वाच्या आठ अंगातच समाविष्ट होते. त्याच बरोबर कोण्याहि साधर्मी बांधवाचा अपमान न करण्याची सक्त आज्ञा जैनधर्मात दिलेली आहे. उदाहरणार्थ-

"स्मयेन योऽन्यानत्येति धर्मस्थान् गर्विताशयः ।
सोऽत्येति धर्ममात्मीयं न धर्मो धार्मिकैर्विना ॥२६॥" रत्नकरंड श्रा० ।

जी व्यक्ती गर्वाने दुसऱ्या धर्मज्ञाचा अपमान करते, ती आपल्या धर्मांनाच अपमान करते. कारण धार्मिक लोकाशिवाय धर्म राहू शकत नाही.

याप्रमाणे जैनसंघास त्याची विशालता, उदारता व संघटनशक्ती या गुणामुळे अत्यंत बळ आलेले होते. त्याचा परिणाम असा झाला की, बौद्ध धर्म या देशातून लुप्त झाला असूनहि जैनधर्म मात्र आजपर्यंत टिकून आहे परंतु अशा गोष्टी आता दिसत नाहीत. साधर्मी वात्सल्याची भावना लोकातून लुप्त होऊ लागलेली आहे. गर्व वाढू लागलेला आहे व कोणाचा कोणावर तावा राहिलेला नाही. त्यामुळे ते संघटन आता शिथिल होऊ लागले आहे.

## २ संघभेद

जैन तीर्थकरांनी धर्मांचा उपदेश कोण्या एका संप्रदायाच्या दृष्टीने केलेला नाही. ज्या मार्गाने जाऊन त्यांनी स्वत: स्थायी सुख प्राप्त करून घेतले तोच मार्ग त्यांनी लोक-कल्याणासाठी प्रतिपादन केला. त्यांच्या उपदेश बाबत लिहिले आहे की–

"अनात्मार्थं विना रागैः शास्ता शास्ति सतो हितम् ।
ध्वनन् शिल्पिकरस्पर्शान्मुरजः किमपेक्षते ॥८॥" रत्नकरंड श्रा० ।

तीर्थकर रागद्वेष रहित होऊन दुसऱ्यांना हितोपदेश देतात. मृदंग वाजविणाऱ्याच्या हाताचा स्पर्श होताच, मृदु आवाज काढणारा मृदंग कधी कशाची अपेक्षा करतो काय ? अर्थात् ज्याप्रमाणें वादकाचा हात पडल्यावरोवर मृदंगांतून मंजुळ आवाज निघतो, त्याप्रमाणे श्रोत्यांच्या हितभावनेने प्रेरित होऊन वीतराग भगवान हितोपदेश देतात त्यामुळेच त्यांचा उपदेश एखाद्या विशिष्ट वर्गासाठी किंवा जाती-साठी नसून, तो सर्व प्राणीमात्रासाठी असतो. तो ऐकण्यासाठी मनुष्य देव, स्त्री, पुरुप, पशु, पक्षी इत्यादि सर्वजण येतात व आपआपली रुची श्रद्धा व शक्ती यास अनुसरुन ती हिताची गोष्ट ग्रहण करतात. परंतु जे लोक त्यांचा उपदेश मानतात अगर मानीत नाहीत त्या दोघांची आपआपसांत विभागणी होते व त्यांतून संप्रदाय निर्माण होतात.

भगवान् महावीराच्या अगोदर अडीचशे वर्षे भगवान् पार्श्वनाथ होऊन गेलें होतें. भगवान् महावीरांच्या वेळीहि त्याचे अनुयायी होतेच. त्यापैकीच भगवान् महावीराचे मातापिताहि होते. भगवान् महावीरांनीहि त्याच मार्गाने जाऊन तीर्थंकर पद प्राप्त केले व धर्मोपदेश दिला. याप्रमाणे त्यांच्यावेळी संपूर्ण जैनसंघ अभिन्न (एकजीव) होता व तसाच तो पुढे राहिलाहि, परंतु श्रुतकेवली भद्रबाहूंच्या वेळी मगधांत

नग्न राहू नय असे मत शिवभूतीने प्रगट केले व असेहि सांगितले की स्त्री मोक्षास जाऊ शकत नाही. याप्रमाणे महावीर निर्वाणानंतर ६०९ वर्षांनी बोटीकाची उत्पत्ति होऊन त्यातून दिगंबर संप्रदाय निर्माण झाला."

दिगंबद मताप्रमाणे श्वेतांबर संप्रदायाची उत्पत्ति विक्रम राजाच्या मृत्यूनंतर १३६ वर्षांनी झाली. दोन्ही मताच्या मान्यतेमध्ये फक्त ३ वर्षांचा फरक असल्यामुळे दोन्हीचा उत्पत्ति-काल जवळ जवळ एकच आहे. आता फक्त कथेची गोष्ट राहिली. श्री महावीरांनी सांगि-तलेला व आचरलेला दिगंबर धर्म त्यांच्यानंतर एकदम लुप्त व्हावा व एखादा रागीट साधू नग्न झाल्याबरोबर ही प्रथा पुनः सुरू व्हावी व इतकी विस्तृत व स्थायी रूपांत पसरावी ही गोष्ट फक्त कल्पना मात्र असू शकते. यांत वास्तविकता संभवत नाही. जे श्वेतांबर विद्वान ही गोष्ट खरी समजतात ते सुद्धा 'प्रथम साधू नग्न राहात होते व नंतर हळूहळू परिग्रह वाढू लागला' असे मानतात. उदाहरणार्थः- श्वेतांबर मुनि कल्याणविजयजी यांचेच खालील उद्‌गार पहा-

" आर्यरक्षितांच्या स्वर्गवासानंतर हळूहळू साधूंचा निवास वस्तीत होऊ लागला त्याचबरोबरच नग्नतेचाहि अंत झाला सुरवातीला शहरात जाण्याचे वेळी बहुधा लंगोटीचा उपयोग करीत. पुढे वस्तीत राहू लागल्यानंतर एकसारखेच ते तसे राहू लागले हळूहळू या कटिवस्त्रा-चाहि प्रकार बदलत गेला. सुरवातीस शरीराचा गुह्य भाग झाकण्या-पुरतेच लक्ष राहत असे पुढे पुढे संपूर्ण नग्नता झाकण्याची जरूरत वाटू लागली व म्हणून वस्त्रांचे आकार प्रकारहि बदलू लागले."

उपाधींची संख्या कसकशी क्रमाक्रमाने वाढू लागली ते मुनि कल्याण विजयजीच्या शब्दांत पहावे. " प्रारंभी प्रत्येक व्यक्ती एकच पात्र जवळ

संपूर्ण जैनसंघाचे नाही.' यावरून स्पष्ट होते की संघभेदाचे बीजारोपण वर सांगितलेल्या वेळीच झालेले होते.

श्वेतांबर साहित्यानुसार प्रथम: श्री जिन वृषभदेवांनी व अंतिम जिन श्री महावीरांनी अचेलक ( निष्परिग्रही ) धर्माचाच उपदेश केला परंतु मधल्या २२ तीर्थंकरांनी सचेलक व अचेलक अशा दोन्ही धर्माचा उपदेश केला. जसे पंचाशतकांत लिहिले आहे की,–

आचेलक्को धम्मो पुरिमस्य य पच्छिमस्य य जिणस्य ।
मज्झिमगाण जिणाणं होइ सचेलो अचेलो य ॥ १२ ॥'

आणि यांचे कारण असे होते की, प्रथम व अंतिम जिनेंद्रांच्या वेळचे साधू वक्रजड ( पक्के वक्र व जड ) होते. या ना त्या बहाण्याने त्याज्य वस्तूचेहि ते सेवन करीत असत. म्हणून त्या स्पष्टपणें अचेलक अर्थात् वस्त्ररहित (दिगंबर) धर्माचा उपदेश दिला. यांच्या मते पार्श्वनाथ यांच्या वेळचे साधू सवस्त्र असत. ते महावीरांच्या संघात मिळाल्या– वर त्यांना शिथिलाचारास प्रोत्साहन मिळाले व श्वेतांबर संप्रदाची उत्पत्ति झाली, असे कांही विद्वानाचे मत आहे. श्वेतांबर विद्वान् पंडित बेचरदासजीनी लिहिले आहे की–

' श्री पार्श्वनाथ व श्री वर्धमानांच्या शिष्यांच्या अडीचें वर्षाच्या मध्यंतरीच्या काळात केव्हा तरी पार्श्वनाथाच्या अनुयायावर तत्कालीन आचारहिन 'ब्राह्मणगुरूचा परिणाम झाला असावा व त्यामुळे त्यांनी आपल्या आचारातील कठीण भाग काढून सुलभ आचार सुरू केले असावेत. X X X X पार्श्वनाथानंतर वर्धमान हे श्रेष्ठ तपस्वी झाले. त्यांनी आपले आचरण इतकें कडक ठेवले की माझ्या कल्पनेप्रमाणे यापेक्षा कडक आचार दुसऱ्या कोणत्याहि धर्मचार्यांनी पाळला असेल असा उल्लेख आजपर्यंतच्या इतिहासात मिळत नाही. वर्धमानच्या

निर्वाणानंतर परमत्याग मार्गाच्या चक्रवर्तीचा लोप झाला व त्यामुळे त्यागी निर्ग्रंथाची स्थिति कोणी नायक नसल्याप्रमाणें झाली. परंतु श्री वर्धमानाच्या प्रभावामुळे त्यांच्यानंतर दोन पिढी पर्यंत तरी त्यांची कठीण तपश्चर्या व त्यागमार्ग पुढें चांगल्यारीतीने चालत राहिला असावा असे मी मानतो. ज्या आरामप्रेमी लोकांनी त्या त्यागमार्गाचा स्वीकार केला होता, त्यांच्याकरिता कांही सूट मिळाली होती व त्यांना 'ऋजुप्राज्ञ' असे संबोधून प्रसन्न ठेंवले होते. तरीहि माझ्या कल्पने–प्रमाणे ते कठीण तपश्चरण सहन करण्यास असमर्थ ठरले व श्री वर्धमान, सुधर्म, व जम्बु स्वामीच्या उग्र त्यागमय छायेत ते इतके दबले गेले होते की, कोणत्याहि प्रकारे हूं की चूं न करता एखादेवेळी आचारात ढिलेपणा राहूनहि ते वर्धमानाच्या मार्गाचे अनुकरण करीत होते. परंतु आता त्याच्यासारखा कोणीहि प्रतापी पुरुष हजर नसल्यामुळे त्यांनी लगेच म्हणावयास सुरूवात केली की 'जिनेश्वरांचा मार्गहि त्यांच्या निर्वाणाबरोबरच निर्वाणास गेला.' xx माझ्या कल्पने–प्रमाणे या संक्रमण कालांतच श्वेतांबर व दिगंबर या दोन संप्रदायाचे बीजारोपण झाले असावे व जम्बुस्वामीच्या निर्वाणानंतर त्याचे बरेच परिपोषण झाले असावे हे अधिक संभवनीय आहे. ही हकीगत माझी केवळ कपोलकल्पना नाही. परंतु वर्तमान ग्रंथहि ही गोष्ट सिद्ध करण्यास सबल प्रमाण देत आहेत. उपलब्ध सूत्रग्रंथ व त्या बरोबरच कित्येक ग्रंथांत प्रसंगोपात्त असे सांगितले आहे की, जम्बुस्वामीच्या निर्वाणानंतर पुढील दहा गोष्टी नष्ट झाल्या मनःपर्यय ज्ञान, परमावधिज्ञान, पुलाक–लब्धि, आहारक शरीर, क्षपकश्रेणी, उपशम श्रेणी, जिनकल्प, तीन–संयम, केवलज्ञान व सिद्धिगमन. यावरून ही गोष्ट स्पष्ट होते की, जंबुस्वामीनंतर जिनकल्पीचा लोप झाला. असे दाखवून आता यापुढे जिनकल्पी आचार बंद करावा व तशाप्रकारचे आचरण करण्याचा

उत्साह किंवा वैराग्य भंग करावे. याशिवाय या उल्लेखात दुसरा कोणताच हेतू मला दिसून येत नाही.' ×× 'जम्बूस्वामीच्या निर्वाणा-नंतर जिनकल्पाचा विच्छेद झालेल्या गोष्टीवर शिक्कामोर्तब करून त्याप्रमाणे आचरण करणाऱ्या जिनाज्ञेबाहेर वागणारे म्हणून समजण्याचा जो स्वार्थी व एकतर्फी ढोंगी धर्माचा डांगोरा पिटला जात आहे त्यातच श्वेतांबरत्व व दिगंबरत्व यांच्या विषवृक्षांची मुळे समाविष्ट झाली आहेत. (जैनसाहित्यमे विकार पृ. ८७–१०५)

जरी दिगंबर संप्रदाय मधल्या २२ तीर्थकरांनी सचेल व अचेल धर्माचे निरूपण केल्याचे मानत नाही आणि तो सर्व तीर्थकरांनी अचेल मार्गाचेच प्रतिपादन केल्याचे मानतो, तरीहि पं. बेचरदासजीच्या उक्त विवेचनावरून संघभेदाच्या मूळ कारणावर चांगला प्रकाश पडू शकतो.

श्वेतांबर साहित्यात दिगंबराच्या उत्पत्तीसंबंधी एक कथा आलेली आहे. त्याचा आशय असा. "रथवीरपुरांत 'शिवभूति' नांवाचा एक क्षत्रिय राहात होता. त्याने आपल्या राजासाठी पुष्कळशी युद्धे जिंकली. त्यामुळे राजा त्यांचा खूप सन्मान करीत असे. त्यामुळे त्याला बराचसा गर्व चढला. एकवेळ शिवभूति पुष्कळशी रात्र व्यतीत झाल्यावर घरी परतला. आई रागवली व तिने दार उघडले नाही. तेव्हा एक मठात जाऊन तेथेच तो साधू झाला. राजाला जेव्हा ही घटना समजली, तेव्हा त्याने त्यास अतिमूल्यवान् वस्त्र भेट दिले ते वस्त्र परत करण्यास आचार्यांनी सांगितले, परंतु शिवभूतींनी ती आज्ञा मानली नाही तेव्हा आचार्यांनी त्या वस्त्राचे तुकडे करून त्याची आसने बनविली. त्यावर शिवभूतीस अत्यंत राग येऊन महावीरा-प्रमाणेच सर्व वस्त्र न वापरण्याचा त्याने निर्धार केला व सर्व वस्त्रे सोडून दिली. त्याच्या बहिणीनेहि त्याचे अनुकरण केले. तेव्हा स्त्रियांनी

जो जंकर दुष्काळ पडला त्यातून संघभेद निर्माण झाले,

दिगंबराच्या मान्यतेप्रमाणे सम्राट चंद्रगुप्ताचे वेळी १२ वर्षांचा मोठा दुष्काळ पडला त्यावेळी जैनसाधूंची संख्या फार मोठी होती सर्वांना आहार मिळू शकत नव्हता. त्यामुळेच पुष्कळसे निष्ठावान् दृढव्रती साधु श्रुतकेवली भद्रबाहु बरोबर दक्षिण भारतात गेले व बाकीचे स्थूल–भद्राबरोबर तेथेच राहिले. स्थूल–भद्रांच्या नेतृत्वाखाली राहणाऱ्या साधूंनी तत्कालीन परिस्थतीमूळे संत्रस्त होऊन वस्त्र, पात्र· दण्ड वगैरे पदार्थ जवळ ठेवण्यात सुरवात केली. जेव्हा दक्षिणेत गेलेले साधु परत आले व त्यांनी या साधूजवळ वस्त्र,पात्र वगैरे असलेले पाहिले तेव्हा त्यांनी याना समजावून सांगितले. परंतु ते यांनी मानले नाही. तेव्हापासून संघभेद निर्माण झाला. नग्न राहणारे साधू दिगंबर व वस्त्र पात्रादिकाचे पोषक साधू श्वेतांबर म्हणविले गेले.

श्वेतांबराच्या मान्यतेप्रमाणे मगधात दुष्काळ पडल्यानंतर भद्रबाहु स्वामी नेपाळकडे गेलें. जेव्हा दुष्काळ संपला व पाटलीपुत्र येथे १२ अंगाचे संकलन करण्याचा प्रयत्न केला गेला, त्यावेळी भद्रबाहू तेथे उपस्थित नव्हते· तेंव्हापासूनच भद्रबाहू व इतर संघ यांच्यात कांहीं (ओढाताण)मतभेद झाला. यांचे वर्णन आचार्य हेमचंद्रांनी परिशिप्ट पर्वात केले आहे. ही घटना लक्षांत घेऊन डॉ० हर्मन जेकोबीनी आपल्या **जैन** सूत्राच्या प्रस्तावनेत लिहिले आहे की, ' पाटलीपुत्र येथे भद्रबाहूच्य गैरहजेरीत ११ अंग एकत्रित केले गेले. दिगंबर व श्वेतांबर हे दोन्हीहि भद्रबाहूना आपले आचार्य मानीत असत. असे असतांनाहि श्वेतांबर आपल्या श्रेष्ठ मुनीची पट्टावली भद्रबाहूच्या नावापासून प्रारंभ न करता, त्याचे समकालीन स्थविर (मुनि) 'संभूति–विजय' यांच्या नावापासूनच सुरू करतात, त्याचा परिणाम असा झाला की, पाटलीपूत्र येथे एकत्रित केले गेलेले अंग फक्त श्वेतांबर संप्रदायाचेच मानले गेले.

ठेवीत असे. परंतु आर्यरक्षित सूरीनी पावसाळ्यात एक मात्रक नामक दुसरे पात्रहि ठेवण्याची आज्ञा दिली. त्याचा परिणाम असा झाला की, मात्रकहि आवश्यक म्हणून जवळ ठेवण्याचे उपकरण झाले त्याच-प्रमाणे झोळीत भिक्षा आणण्याचा रिवाजहि साधारणत: याच सुमारास सुरु झाला. यामुळे पात्रनिमित्तक उपकरणाची संख्या वाढ वाढून स्थविरा-जवळ चवदा उपकरणे झाली.—पात्र, पात्रबंध, पात्रस्थापन, पात्र प्रमार्जनिका, पटल, रजस्त्राण, गुच्छक, दोन चादरी, ऊनी वस्त्र; (कांबळे) रजरोहण, मुखपट्टी, मात्रक व चोलपट्टक. या उपाधि "अवधिक" म्हणज सामान्य मानल्या गेल्या व पुढे जाऊन यात जी कांही उपकरणाची संख्या वाढली ती "औपग्रहिक" म्हणून समजली गेली. औपग्रहिक उपकरणात संस्तारक, उत्तरपट्टक, दंडासन व दण्ड हे खास उल्लेखनीय आहेत. ही सर्व उपकरणे अलीकडील सर्व श्वेतांबर जैन मुनि आपल्या जवळ ठेवतात." ('श्रमण भगवान महावीर')

अशा प्रकारे श्वेतांबर सप्रदायात एकीकडे साधूंच्या उपकरणात वाढ होत असतानाच, दुसरीकडे आचारांगात अचेलकत्वाव.वत उल्लेख होते ते 'जिनकल्पीचा आचार' म्हणून सांगितले गेले व जिनकल्पीचा विच्छेद झाल्याची घोषणा करून महावीरांच्या अचेलक मार्गास उखडून टाकण्याचा प्रयत्न केला गेला. तसेच पुढे पुढे साधूंच्या वस्त्र पात्रदिकाचे समर्थन इतकें जोरदार केले गेले की,नग्न विहार करणाऱ्या महावीरांच्या शरीरावरहि इंद्राकडून देव दूष्य (देवोपनीत वस्त्र) टाकविले गेले. जसें पण्डित वेचरदासजीनीं पुढील प्रमाणे लिहिले आहे ...

"या समाजातील कुलगुरूनी आपणास पसंत पडणाऱ्या वस्त्र पात्रादिकांच्या समर्थनार्थ प्राचीन महापुरुषांनाहि चीवरधारी बनविले व श्री वर्धमान महामुनीची नग्नता दिसून येऊ नये अशा प्रकारचा प्रयत्नहि केला गेला. या विषयात अनेक ग्रंथ लिहून वस्त्रपात्र-वादाचेच

समर्थन करण्याचा ते आजपर्यंत प्रयत्न करीत आले. त्यांच्या दृष्टीने अपवाद म्हणून मानलेला वस्त्रपात्रवादाचा मार्ग आता औत्सर्गिक मार्गासारखा झाला. यांनी या विषयात इतकी मजल मारली आहे की, अति अगम्य जंगलात, भीषण गुंफेत किंवा अति दुर्गम पर्वताच्या शिखरावर भावना भावीत असताना, केवलज्ञान प्राप्त झालेल्या स्त्री पुरुषाना जैनी दीक्षा देण्यासाठी शासन देव कपडे घालतात व वस्त्राशिवाय केवलज्ञानी हे अमहाव्रती व अचारित्री असे म्हण्यासहि त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. कोणी मुनींनी वस्त्ररहित राहावे ही गोष्ट त्यांना खपत नाही त्यांच्या मताप्रमाणे वस्त्र–पात्राशिवाय कोणाची गती सुधारत नाही,"

दुसरीकडे दिगंबर संप्रदायाच्या आचार्य श्री कुंदकुंदांनी स्पष्ट घोषणा केला की–

'ण '[1] वि सिज्झइ वत्थधरो जिणसासणे जइ वि होइ तित्थयरो ।
णग्गो विमोक्खमग्गो सेसा उम्मगया सव्वे ॥ २३ ॥

जिनशासनात प्रत्यक्ष तीर्थंकरहि असले तरी जर ते वस्त्रधारी असतील तर ते सिद्धीस जाऊ शकत नाहीत. नग्गताच मोक्षाचा मार्ग आहे बाकी सर्व उन्मार्ग आहे. त्या बरोबरच त्यांनी असेहि सांगितले की–

[2] णग्गो पावइ दुक्खं नग्गो संसारसायरे भमइ ।
नग्गो न लहइ बोहिं जिणभावणवज्जिओ सुइरं ॥ ६८ ॥

जिनभक्तीने रहित असलेला असा नग्न दुःख भोगतो, संसार–सागरात भटकतो व त्याला ज्ञानलाभ होत नाही.

याप्रमाणे एका बाजूस शिथिलाचार व दुसऱ्या बाजूस कट्टरता या

---

१. षट् प्राभृ० ६७ । २, षट् प्राभृता० पृ० २११ ।

दोन कारणामुळे संघभेदाच्या बीजास अंकुर फुटू लागले व हळूहळू त्या वृक्ष झाला व त्याने पुढे महावृक्षाचे रूप धारण केले. प्रारंभी श्वेतांबरत्व की दिगंबरत्व हा वाद फक्त मुनीपर्यंतच सीमित होता; कारण नग्नता व सवस्त्रता यावरूनच हा वाद उत्पन्न झाला होता, परंतु पुढे श्रावकांच्याहि क्रिया पद्धतीत तो सम्मिलित करून त्यांच्यातहि ही भांडणाची बीजे रोवली गेली व आज तर तीर्थक्षेत्रांच्या झगड्याच्या रूपाने ते विषफल देऊ लागले आहेत. प्राचीन काळी दिगंबरी व श्वेतांबरी प्रतिमेत कांहीच फरक नव्हता यागोष्टीचे पुरावे मिळतात. दोन्ही हि नग्न प्रतिमाचे पूजक होते. मुनि जिनविजयजी (जैन हितैषी भाग १३ अंक ६) लिहितात की,– मथुरेच्या कंकाली टीलेत (पुरातत्व अवशेष) ज्या सुमारे २००० वर्षाच्या प्राचीन प्रतिमा मिळाल्या आहेत, त्या सर्व नग्न आहेत व त्यावर जे लेख आहेत, ते श्वेतांबर कल्पसूत्राच्या स्थविरावलीस अनुसरून आहेत." याशिवाय १७ व्या शतकातील श्वेतांबर विद्वान् पण्डित धर्मसागर उपाध्यायजी आपल्या प्रवचय परीक्षा नामक ग्रंथात लिहितात–

गिरनार व शत्रूंजयवर एकेवेळी दोन्ही संप्रदायात झगडा झाला व शासन देवतेच्या कृपेने त्यात दिगंबर हरले, जेव्हा दोन्ही तीर्थावर श्वेतांबर संप्रदायाचा अधिकार सिद्ध झाला, तेव्हा अशा प्रकारे पुढे झगडा होऊ नये म्हणून श्वेतांबर संघाने हे निश्चित केले की, ह्यापुढे ज्या नवीन प्रतिमा बनविल्या जातील, त्यांच्या पादमूलात वस्त्राचे चिन्ह दाखविले जावे हे ऐकून दिगंबरींनी राग आला व त्यांनी आपल्या प्रतिमा उघडपणें नग्न बनविणे सुरू केले. या कारणामुळेच संप्रति राजा वगैरेनी बनविलेल्या प्रतिमेवर कोणतेच वस्त्र लाछन नाही व त्या सर्व नग्नहि नाहीत (जैनसाहित्य और इतिहास पृष्ठ २४१ पर

यावरूनच ही गोष्ट चांगल्या प्रकारे सिद्ध होते की, सुरवातीस दोघांच्याहि प्रतिमेमध्ये कांहीच फरक नव्हता. परंतु आतां दोघांच्याहि प्रतिमेत इतके अंतर पडले आहे की, ते पाहून आश्चर्य वाटतें पण्डित बेचरदासजी आपल्या 'जैन साहित्यमे विकार' या ग्रंथात लिहितात.

'हा संप्रदाय (श्वेतांबर) करदोडा असलेली मूर्तिच पसंत करतो तोच मुक्तीचे साधन समजतो, ज्याप्रमाणे एखाद्या मुलावर पुष्कळशा मोठमोठ्या अलंकारांनी मढविले जावे, त्याप्रमाणेच वीतरागतापूर्ण संन्यस्त योगीच्या प्रतिमेला आभूषणांनी शृंगारित करून त्याची शोभा वाढविली असे समजतो व परमयोगी वर्धमान किंवा इतर कोणत्याहि वीतरागी मूर्तीस विदेशी पोषाख, जाकीट, कॉलर, घड्याळ वगैरेनी सुशोभित करून व खेळण्याइतपत तिचे सौंदर्य नष्ट करून त्यातच ते आपल्या मानव जन्माची सफलता समजतात,' याप्रमाणे एकमेकाच्या ओढाताणीने जैनसंघामध्ये जो भेद पडला तो उत्तरोत्तर वाढतच गेला व त्यामुळे पुढे दोन्ही संप्रदायात अनेक निरनिराळे पंथहि उत्पन्न झाले.

### ३ संप्रदाय व पंथ.

दिगंबर व श्वेतांबर या दोन्हीहि संप्रदायाच्या उपलब्ध साहित्या-वरून असे दिसून येते की, विक्रमाच्या दुसऱ्या शतकात विशाल जैन संघ स्पष्टपणे दोन भागात विभक्त झाला, त्याचे मूळ कारण साधूंचे वस्त्र परिधान करणे हेच होते. जो पक्ष साधूंच्या नग्नतेला अनुकूल होता व तोच महावीरांचा मूल आचार आहे असे स्पष्ट मानीत होता. तो दिगंबर संप्रदाय समजला गेला व त्यालाच मूलसंघ असेहि नाव आहे व जो पक्ष वस्त्रपात्रादिकांचे समर्थन करीत असे श्वेतांबर संप्रदाय म्हणविला गेला. दिगंबर शद्बाचा अर्थ दिशा हेच ज्याचे वस्त्र म्हणजेच नग्न. व श्वेतांबर म्हणजे पांढऱ्या वस्त्राचा धारक; याप्रमाणे सुरवातीस साधूंच्या

वस्त्र-परिधानावरूनच जरी हे संघभेद निर्माण झाले तरी पुढें पुढें त्या भेदांना दुसरीहि अनेक कारणे मिळत गेली व हळूहळू दोन्ही संप्रदाया-मध्येसुद्धा अनेक अवांतर पंथ निर्माण झाले. या निरनिराळ्या पंथांच्या मूळ कारणाकडे सूक्ष्म दृष्टीने पहिल्यास असे दिसून येते की, जैन-धर्माच्या विभिन्न संप्रदायामध्ये तात्विक दृष्टीने भेद दिसून येत नाही. जो कांही भेद आहे तो बहुतांशी व्यावहारिक दृष्टीनेच झालेला आढळतो. सर्व जैन संप्रदाय व पंथ अहिंसा व अनेकांत-वादाचे अनु-यायी आहेत. आत्मा, परमात्मा, मोक्ष, संसार इत्यादि संबंधी त्यांच्यात कसलाच मतभेद नाही. सातहि तत्त्वांचे स्वरूप सर्वजण एकसारखेच मानतात. कांही पारिभाषिक शब्द सोडले तर कर्मसिद्धांतामध्येहि मौलिक भेद नाही. असें असूनहि जो कांही भेद आहे तो असाच आहे की जो निर्मूल होऊ शकत नाही. परंतु या भेदामुळे उभय पक्षाच्या मनामध्ये जी भेदांची मोठी भिंत उभी आहे ती मात्र नाहीशी होऊ शकते. असो! प्रत्येक संप्रदाय व त्याच्या अवांतर उपपंथांचा संक्षिप्त परिचय पुढील प्रमाणे आहे.

## १ दिगंबर संप्रदाय

दिगंबर संप्रदायातील साधू नग्न असतात. जीवजंतूंना हळुवारपणे दूर करण्यासाठी ते मोराच्या पंखाची पिंछी धारण करतात वमूलमात्रा दिकांची बाधा दूर करण्यासाठी प्राशुक (शुद्ध) पाण्याचा एक कमंडलु जवळ ठेवतात. दिवसातून एकवेळच उभे राहुन स्वतःच्या हातातच ते आहार घेतात. म्हणून त्यांना भोजनसाठी कोणत्याच पात्राची आवश्यकता नसते. दिगंबर साधूंचे हे स्वरूप सुरवातीपासून प्रायः असाच स्वरूपाचे चालत आले आहे. त्यात कसलाच फरक पडलेला नाही; परंतु आचार ग्रंथात जे सांगितले आहे की, मुनींनी शत्र

गावाबाहेर उद्यान किंवा शून्य घरात रहावे. त्या नियमात मात्र शिथिलता आली आहे. मुनी वनामधील निवास सोडून ते हळूहळू नगरात राहू लागले आहेत. हे पाहून जैनाचार्य श्री गुणभद्रांनी इसवीसनाच्या नवव्या शतकात आपल्या आत्मानुशासन ग्रंथात खालील प्रमाणे दुःखद उद्गार काढले आहेत.

'ज्याप्रमाणे रात्रीच्या वेळी भयभीत झालेली हरणे इकडे तिकडे उड्या मारूनच सरतेशेवटी आश्रयासाठी गावाच्या जवळ येवून राहतात त्याचप्रमाणे तपस्वी जनहि अरण्य सोडून गांवात येवून वसतात. ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे.'

हळूहळू हा शिथिलाचार वाढत गेला व परिस्थितीमुळे व मनुष्य च्या स्वाभाविक दुर्बल प्रवृत्तीमुळे या प्रवृत्तीस प्रोत्साहान मिळत गेले. म्हणूनच शिवकोटी आचार्यांनी आपल्या [२] रत्नमालेत कलिकालांत मुनींनी वनवास सोडून जिनमंदिरात रहावे असे स्पष्ट विधान केले आहे याला‌च चैत्यवास म्हणतात व त्यापासूनच श्वेतांबरात चैत्यवासी संप्रदायाची उत्पत्ति झाली; परंतु दिगंबर संप्रदायात या नांवाने संप्रदायाचा कसलाच उल्लेख आढळत नाही; तरीहि दिगंबर संप्रदायातहि हा पंथ होता व त्याचेंच एक विकसित रूप भट्टारक पद हे आहे व याच्याच विरोधामध्ये तेरा पंथी संप्रदाय आला.

## २ दिगंबर संप्रदायांतील संघभेद.

अर्वाचीन साहित्यात दिगंबर संप्रदायात मूलसंघ हा शब्द अधिक

---

१ 'इतस्ततश्च त्रस्यन्तो विभावर्यां यथा मृगा: ।
वनाद्विशन्त्युपग्रामं कलौ कष्टं तपस्विन: ॥ १९७ ॥ आत्मानु० ।

२ 'कलौ काले वने वासो वर्ज्यते मुनिसत्तमै: ।
स्थीयते च जिनागारे ग्रामादिषु विशेषत: ॥ २२ ॥

प्रमाणांत लावलेला आढळतो. या दिगंबर संप्रदायात किंवा मूल-संघात कालांतराने अनेक भेद प्रभेद झाले. आचार्य इंद्रनंदीनी आपल्या श्रुतावतारात लिहिले आहे की, पुंड्रवर्धन पुरात अर्हत्वली नांवाचे आचार्य झाले. ते दर ५ वर्षांनी १०० योजनामध्ये वस्ती करून असलेल्या मुनींना एकत्रित गोळा करून युगप्रतिक्रमण करीत असत एकेवेळी याप्रमाणे युगप्रतिक्रमण करीत असता मुनींना विचारले की, सर्व मुनी आले काय ? तेव्हा त्यांनी उत्तर दिले की, ' होय महाराज! आम्ही सर्व आपआपल्या संघासहित आलो आहोत. ' हे ऐकून आचार्यांनी सिचार केला की, 'आता हा जैनधर्म गणपक्षपाताच्या आश्रयानेच टिकू शकेल; उदासीन निःपक्षपात विचारधारा कायम ठेवून टिकणार नाही तेव्हा त्यांनी संघ किंवा गण स्थापित केले जे मुनि गुहामधून आले होते त्यापैकी कांहीना ' नंदी ' व कांहीना ' वीर ' असे नांव दिलें; जे अशोक वाटिकेतून आले होते त्यापैकी कांहीना 'अपराजित' व कांहीना 'देव' असे नांव दिले. जे मुनि पंचस्तूप्य निवासातून आले होते. त्यापैकी काहीना 'सेन' व कांहीना 'भद्र' असे नांव दिले. जे मुनि शाल्मली महावृक्षाजवळून आले होते, त्यापैकी कांहीना ' गुणधर ' व कांहीना ' गुप्त ' नांव दिले. जे खंडकेशर वृक्षापासून आले होते त्यांच्यातील कांही 'सिंह' व कांही 'चंद्र' या नांवानी ओळखले गेले. आचार्य इंद्रनंदीनी या बाबतीत खालील[1] श्लोक उद्धृत केला आहे—

या नांवाच्या बाबतीत कांही मतभेदहि आहेत. त्याचाहि उल्लेख

---

१ "आयातौ नन्दिवीरौ प्रकटगिरिगुहावासतोऽशोकवाटाद्
देवश्चान्योऽपराजित इति यतिपौ सेनभद्राह्वयौच ।
पञ्चस्तुप्यात्सगुप्तौ गुणधरवृषभः शाल्मलीवृक्षमूला-
न्निर्यातौ सिंहचन्द्रौ प्रथितगुणगणौ केसरात्खण्डपूर्वात् ॥९६॥"

आचार्य इंद्रनंदीनी केलेला आहे; कांहीच्या मताप्रमाणे जे गुंफेतून आले होते त्यांना ' नंदी व अशोक वनातून जे आले होते त्यांना 'देव' जे पंचस्तूपापासून आले होते ते 'सेन', तर जे शाल्मली वृक्षापासून आले ते ' वीर ' आणि खंडकेशर वृक्षाच्या मुळापासून आले होते ते 'भद्र' असे समजले जाऊ लागले. आणखी कांहीच्या मते गुहेमध्ये राहणारे 'नंदी' अशोक वनातून येणारे 'देव' पंचस्तूपवासी 'सेन' शाल्मलीवृक्षवाले 'वीर' व खण्डकेशरवाले 'भद्र' म्हणविले जाऊ लागले. या मतभेदावरुन असे दिसून येते की, आचार्य इंद्रनंदीनाहि या मतभेदाचे स्पष्ट ज्ञान नव्हते. त्यामुळे कोणाला कोणती संज्ञा दिली गेली याची निश्चित माहिती मिळू शकत नाही. या सर्व संज्ञापैकी 'नंदी', 'सेन' 'दे' व 'सिंह' ही विशेष परिचित आहेत. [1]भट्टारक इंद्रनंदीआदींनी अर्हत्‌वली आचार्यांच्या द्वारे या चार संघाची स्थापना केली असा उल्लेख मिळतो.

या चार संघांतुनहि पुढे अनेक भेद प्रभेद झाले. साधारणतः संघाच्या भेदास 'गण' व प्रभेद किंवा उपभेदास 'गच्छ' म्हणण्याची परंपरा आढळते. कोठेकोठे संघालाच ' गण ' म्हटलेले आहे. उदा० ' नंदीगण ', ' सेनगण ' इत्यादि; तर कोठेकोठे संघास 'अन्वय' असेहि म्हटले जाते. उदा० सेनान्वय,इ. गणांत बलात्कार गण, देशीय गण व

१ ' तदैव यतिराऽजोपि सर्वनैमित्तिकाग्रणी ।
अर्हद्वल्गिगुरुश्चक्रे संघसंघट्टनं परम् ॥६॥
सिंहसंघो नन्दिसंघः सेनसंघो महाप्रभाः ।
देवसंघ इति स्पष्ट स्थानस्थितिविशेषतः ॥७॥
गणगच्छादयस्तेभ्यो जाता स्वपरसौख्यदाः ।
न तत्र भेदः कोऽप्यस्ति प्रव्रज्यादिषु कर्मसु ॥८॥' नीतिसार ।

कानूरगण या तीन गणाचे व गच्छांमध्ये पुस्तकगच्छ, मन्म्वर्तागच्छ, वक्रगच्छ व तगरिलगच्छ ही नांवे आढळतात. या संघ, गण किंवा गच्छाच्या प्रव्रज्यादिक क्रिया (दीक्षा) इत्यादीमध्ये कसल्याच भेद नाही.

दर्शनसार या ग्रंथांत काही अशाहि संघाचा उल्लेख केला आहे, ज्यास त्याने 'जैनभास' म्हणून संबोधन केले आहे. असे संघ श्वेतांबर, यापनीय, द्राविड, माथुर व काष्ठा हे होत. यापैकी पहिल्या दोन संघाचे वर्णन पूर्वी आले आहे. कारण त्यांच्या आचाराव्यतिरिक्त त्यांचा दिगंबराशी सिद्धात भेदहि आहे. बाकी तीन संघ दिगंबर संप्रदायाचे अवांतर भेद असून दिगंबर तत्त्वज्ञानाशी त्यांचा कसलाच तात्त्विक भेदहि नाही. दर्शनसारांत[1] म्हटल्याप्रमाणे विक्रम संवत् ५२६ मध्ये दक्षिण मथुरेत द्राविड संघाची उत्पत्ति झाली; त्याचे संस्थापक पूज्य-पादाचार्यांचे शिष्य 'वज्रनंदी' हे होते. त्याचे मत असे आहे की, बीजात जीव असत नाही व कोणतींच वस्तु शुद्ध असत नाही. यांनी थंड पाण्याने स्नान करून व शेती व्यापार आदिकांनी उपजीविका करून पाप अधिक संचित केले.

वि. सं. ७५३ मध्ये काष्ठासंघाची उत्पत्ति झाली. या संघाचे संस्थापक 'कुमारसेन मुनि' होते. यांनी मोराच्या पंखांची पिंछी सोडून देऊन गाईच्या केसाची पिंछी घेतली व सर्व वागड देशात उन्मार्गाचा

१ 'सिरिपुज्जपादसीसो दाविड़संघस्य कारगो दुठ्ठो।
णामेण वज्जणंदी पाहुडवेदी महासत्थो ॥२४॥
वीएसु णत्थि जीवो उब्भसणं णत्थि फासुगं णत्थि।
सावज्जं ण हु मण्णइ ण गणइ गिहकप्पियं अट्ठं ॥२६॥
कच्छं खेत्तं वसहिं वाणिज्जं कारिऊण जीवंतो।
गहंतो सीयलणीरे पावं पउरं समज्जेदि ॥२७॥

प्रसार केला हे स्त्रियांना जिनदीक्षा देत असत. तसेच क्षुल्लकांना वीर-चर्येचा आदेश देत असत. स्वतः जटा धारण करीत व सहावे अणुव्रत रूढ करण्याचाहि यांनी प्रयत्न केला. यांनी जुन्या शास्त्रांचा विरूद्ध अर्थ लावून अज्ञानी लोकामध्ये मिथ्यात्वाचा प्रचार केला म्हणून श्रमणसंघातून यांना काढून टाकले. तेव्हा यांनी स्वतंत्र [1] काष्ठासंघाची स्थापना केली.

काष्ठासंघाच्या स्थापनेनंतर दोनशे वर्षांनी मथुरेत [2] माथुर संघाची स्थापना रामसेनानी केली होती या संघाचे साधु जवळ पिंछी बाळगत नसत म्हणून यांना निष्पिच्छ असेहि म्हणत असत.

जरी या संघाला देवसेन आचार्यांनी जैनाभास म्हटले आहे तरी त्याचे पुष्कळसे साहित्य उपलब्ध असून त्याचे पठन-पाठनहि दिगंबर संप्रदायात चालू आहे. हरिवंश पुराणाच्या कर्त्यांनी आचार्य देवनंदी नंतर वज्रसूरीचे स्मरण केले आहे व त्याच्या उक्ती धर्मशास्त्राचे प्रवक्ते श्री गणधर देव यांच्या इतक्याच प्रमाण मानल्या आहेत. हे वज्रसूरी तेच

---

१ " आसी कुमारसेणो णंदियडे विणयसेणदिक्खयओ ।
सण्णासभंजणेण य अगहिय पुणदिक्खओ जादो ॥ ३३ ॥
परिवज्जिऊण पिच्छं चमरं घित्तूण मोहकलिदेण ।
उम्मग्गं संकलियं बागणविसएसु सव्वेसु ॥ ३४ ॥
इत्थीणं पुण दिक्खा खुल्लयलोयस्य वीरचरियत्तं ।
कक्कसकेसग्गहणं छट्ठं च गुणव्वदं णाम ॥ ३५ ॥
सो समणसंघवज्झो कुमारसेणो हु समयमिच्छत्तो ।
चत्तोवसमो रुद्दो कट्ठं संघं परूवेदि ॥ ३७ ॥ "-दर्शन०
२ "तत्तो दुसयतीदे महुराए माहुराण गुरुणाहो ।
णामेण रामसेणो णिप्पिच्छं वण्णियं तेण ॥ ४० ॥ "--दर्शन०

असावेत की ज्यांना द्रवीड संघाने संस्थापक मानले जातें. असे असतांना असा प्रश्न उपस्थित होतो की दर्शनसारकांनी यांना जैनभास कां म्हटले? कारण दर्शनसाराची रचना हरिवंश पुराणानंतर वि. सं ९९० मध्ये झाली याचे समाधान असे होऊ शकते की, देवसेन सूरीच्या पूर्वीच्या आचार्यांच्या दृष्टीत द्रविड आदि संघाचे साधू जैनभासच राहिले असावेत. म्हणून देवसेनसूरी दर्शनसारात त्या गाथा. लिहून त्यांना जैनभास म्हटले असावे. ज्या शिथलाचारामुळे वरील संघास जैनभास म्हणविले जात असे तो शिथिलाचार मूलसंघी मुनीतहि कोणत्यांना कोणत्या रूपात प्रविष्ट झालेला होता. तेहि मंदिर वगैरेच्या अभारणी-साठी व त्याच्या योगक्षेमासाठी गाव, जमीन वगैरे दान घेऊ लागले होते. कांही प्राप्त शिलालेखावरून असे स्पष्ट दिसून येते की, मुनीच्या अधिकारातहि गाव बगीचे वगैरे राहात असत. ते मंदिराचा जीर्णोद्धार करीत असत व दानशालाहि स्थापन करीत. एकप्रकारे त्याचे स्वरूप मठाधीशासारखेच चालत आलेले होतें. परंतु याचा अर्थ असा नव्हे की, त्या काळी शुद्धाचारी दिगंबर तपस्वी मुनीचा सर्वथा अभाव झाला होता किंवा सर्वच त्याचे अनुयायी बनले होते. शास्त्रोक्त शुद्ध मार्गाचे पालन करणारे व त्यांना मानणारेहि होते. तसेच त्यांच्या उलट आचरण करणाऱ्या मठपतीची आलोचना करणारेहि होते. पण्डित आशाधारजीनी आपल्या अनगार-धर्मामृताच्या दुसऱ्या अध्यायात या मठाधीश साधूवर टीका करून लिहिले आहे की, 'बाह्यतः द्रव्य जिन लिंगधारी मठाधीश म्लेछा प्रमाणेच लोक व शास्त्रविरूद्ध आचरण करतात त्याच्याबरोबर मन, वचन व शरीर यांनी कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवू नये.' हे मठाधीश साधूहि नग्न रहात असत व याचे बाह्यरूप दिगंबर मुनीप्रमाणेच रहात असे व याचेच पुढे पुढे वाढविलेले स्वरूप म्हणजे भट्टारक पद होय.

## तेरापंथ व वीसपंथ

भट्टारक युगातील शिथिलाचाराच्या विरूद्ध दिगंवर संप्रदायात एक पंथ उदयास आला. तो तेरापंथ या नांवाने ओळखला जातो. असे म्हणतात की या पंथाचा उदय विक्रमाच्या सतराव्या शतकात पण्डित वनारसीदासजी यांच्याकडून आगऱ्यात झाला. या पंथास जेव्हा तेरापंथ असे नांव प्राप्त झाले तेव्हा भट्टारकाच्या जुन्या पंथास वीसपंथ म्हटले जाऊ लागले. परंतु अशी नावे कशी पडली या संबंधी एक कोडेच आहे. यासंवंधी अनेक उपपत्ती ऐकल्या जातात, पण त्यास काही आधार मिळत नाही.

श्वेतांवराचार्य मेघविजयजीनी वि. सं. १७५७ च्या आसपास आगऱ्यात युक्तिप्रबोध नांवाचा एक ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ पंडित वनारसदासजीच्या मताचे खंडन करण्यासाठी लिहिला गेला आहे. यात वनारसी मताच स्वरूप सांगताना ते लिहितात–

"तम्हा दिगंवराणं एए भट्टारगा वि णो पुज्जा
तिलतुसमेत्तो जेसिं परिग्गहो णेव ते गुरुणो ॥ ६॥
जिणपडिमाणं भूसणमल्लारुहणाइ अंगपरियरणं ।
वाणारसिओ वारइ दिगंवरस्सागमाणाए ॥२०।

दिगंवराचे भट्टारकहि पूज्य नाहीत. ज्याला तिलतुप मात्रहि परिग्रह आहे तो गुरु नाही. वनारसी मतवाले जिनप्रतिमाना हारभूषणे घालणे किंवा अंगशोभा करणे वगैरे गोष्टी दिगंवर परपरेच्या आज्ञेने निषिद्ध मानतात.

आजकाल जो तेरापंथ प्रचलित आहे तो भट्टारक किंवा मुनीना आपला गुरु मानीत नाही व प्रतिमांना पुष्पमाला चढविणे किंवा केशर लावणेहि ते निषिद्ध समजतात. त्याचबरोबर भगवंतांच्या

पूजन सामुग्रीत हिरवे पुष्प किंवा फळ चढवीत नाहीत. उत्तर भारतात या पंथाचा उदय झाला व तो हळुहळु सर्व देशभर पसरला. यांच्या प्रभावाने भट्टारक–युगाचा एक प्रकारे लोपच झाला.

परंतु या पंथभेदामुळे दिगंवर संप्रदायात फूट किंवा वैमनस्याचे वीजारोपण झाले नाही. दोन्ही पंथाचे अनुयायी आजहि अस्तित्वात आहेत. परंतु त्यांच्यात कसलाच वैरभाव आढळत नाही. दोन्ही पंथाचे लोक आपआपल्या विधीने मंदिरात प्रतिमाची भक्तिपूर्वक प्रार्थना करताना आढसतात. एक दोन ठिकाणी तर वीस व तेरा मिळून त्यांच्या अर्धे असलेला साडेसोळा पंथहि रूड झाला. अलीकडील अनेक निःपक्ष–पाती समंजस व्यक्तीना त्याचा पंथ विचारल्यास ते आपणास साडेसोळा पंथी म्हणवितात. हे सर्व दोघांच्या ऐक्याचे व प्रेमाचे सूचक आहे.

## तारण पंथ

इ. स. १५ व्या शतकाच्या शेवटी शेवटी तारण तरण स्वामीच्या नांवाने परवार जातीतील एका व्यक्तीने हा पंथ सुरू केला. त्याचा पंधराशे पंधरामध्ये ग्वालेर स्टेट मधील मल्लारगड स्थानी स्वर्गवास झाला. या ठिकाणी त्यांची समाधि आहे व तेथे त्यांची निपीदिका आहे हे ठिकाण तारण पंथीयाचे तीर्थस्थान समजले जाते. हा पंथ मूर्तिपूजा विरोधी आहे, यांचेहि चैत्यालय असते. परंतु तेथे शस्त्राची पूजा होता असते पण द्रव्य चढविले जात नाही. तारण स्वामीनी कांही ग्रंथहि लिहिले आहेत. त्याशिवाय दिगंवराचार्यांनी लिहिलेले ग्रंथहि तारण–पंथी मानतात. या पंथातील लोक चांगले श्रीमंत व प्रतिष्ठित आहेत. यांची संख्या जवळ जवळ १०००० असून ती मध्य प्रांतात आहे.

## २ श्वेतांवर संप्रदाय

पूर्वी लिहिलेच आहे की साधूने वस्त्र वापरावे की वापरू नये. य

मुद्यावर दिगंवर श्वेतांबर हे भेद निर्माण झाले. आजचे श्वेतांवर साधू पांढरी शुभ्र वस्त्रे धारण करतात. त्याच्या जवळ १४ उपकरणे असतात पात्र, पात्रबंध, पात्रस्थापन, पात्रप्रमार्जनिका, पटल, रजस्त्राण, गुच्छक, दोन चादरी, ऊनी वस्त्र (कांवळ), रजोहरण, मुख वस्त्र, मात्रक, चोलपट्टक, याशिवाय ते आपल्या हातात एक उंच दण्डहि ठेवतात. सुरवातीला हे नग्नहि राहात असत व पुढे वस्त्राच स्वीकार केल्या-नंतरहि वि. संवताच्या ८ व्या शतकापर्यंत फक्त जरूरी असेल तेव्हाच ते वस्त्र धारण करीत आणि तेहि केवळ लंगोटीसारखेच (कटिवस्त्र) विक्रमाच्या ८ व्या शतकांत श्वेतांवराचार्य हरिभद्रसूरीनी आपल्या संबोध प्रकरणात तत्कालीन साधूचे वर्णन करताना लिहिले आहे की ते निष्कारण सुद्धा कटिवस्त्रे बांधतात. व यांनी त्यांना क्लीव, भित्रे वगैरे रीतीने संवोधिले आहे. या प्रकारे ते सुरुवातीस फक्त विशिष्ट कारणानेच लंगोटी लावीत असत. पण पुढेपुढे ते शुभ्र वस्त्र नेसू लागले. नंतर जिनमूर्तींनाहि लंगोटी लावू लागले. त्यानंतर वस्त्रा-भूषणांनी प्रतिमा सुशोभित करण्याची प्रथाहि रूढ झाली. महावीर निर्वाणानंतर साधारणत: एक हजार वर्षानी साधूच्या स्मरण शक्तीच्या आधाराने अकरा अंगाचे संकलन करून ते सुव्यवस्थित केले गेले व नंतर ते लिपीवद्धहि केले. मात्र हे आगम दिगंवर संप्रदाय मानीत नाही.

श्वेतांवर संप्रदाय स्त्रियांनाहि मोक्ष मानतो. तसेच त्यांच्या मताप्रमाणे जीवन-मुक्त केवली भोजन ग्रहण करतात. परंतु दिगंबर संप्रदायास ही दोन्हीहि मते मान्य नाहीत. दिगंवर व श्वेतांबर संप्रदायात मुख्यत: या तीन मुद्यावरूनच भेद पडलेला आहे. इतर गौण भेद संक्षेपाने पुढीलप्रमाणे सांगता येतील :- १ केवलीचा कवलाहार २ त्यांचा विहार ३स्त्री-मुक्ती ४शुद्र-मुक्ती ५सवस्त्र-मुक्ती

६ गृहस्थावस्थेत मुक्ती ७ अलंकार व करदोडा सहित प्रतिमाचे पूजन ८ मुनीची चौदा उपकरणे ९ मल्लीनाथ तीर्थंकर स्त्री होती असे समजणे, १० अकरा अंगाचे विद्यमान असणे. ११ भरत चक्रवर्तींना आपल्या घरातच झालेली केवलज्ञानाची प्राप्ति १२ शूद्राच्या घरी मुनीनी आहार घेणे. १३ महावीराचे गर्भ–हरण १४ महावीर स्वामीनी तेजोलेश्यामुळें झालेला उपसर्ग १५ महावीरांचा विवाह व त्यांना–कन्या रत्नाची प्राप्ति १६ तीर्थंकरांच्या खांद्यावर देवदूष्य वस्त्र १७ मरूदेवीचे हत्तीवर चढलेल्या अवस्थेत मुक्तिगमन १८ साधूंनी अनेक घरी भिक्षा मागणे. ह्या गोष्टीना श्वेतांबर संप्रदायात मान्यता आहे. परंतु दिगंबर संप्रदाय या गोष्टी मानीत नाही

## श्वेतांबर चैत्यवासी

श्वेतांबर चैत्यवासी संप्रदायाचा इतिहास खालीलप्रमाणे मिळतो. संघभेद झाल्यानंतर वीर निर्माण संवत् ८५० च्या आसपास कांही शिथिलाचारी मुनीनी उग्र विहार सोडून मंदिरात राहण्यास सुरूवात केली हळूहळू यांची संख्या वाढत गेली व पुढे ते फारच प्रबळ झाले. त्यांनी निगम नांवाची शास्त्रे रचली (लिहिली). त्यात त्यांनी असे सागितले आहे की, सध्याच्या काळात मुनीनी मंदिरात राहणे हेच उचित आहे व त्यासाठी पुस्तके वगैरे लिहिण्यास आवश्यक तो पैसाहि संग्रहित करावा. हे वनवासी मुनीची निंदा करीत असत. या चैत्यवासी–यांच्या नियमाचे दिग्दर्शन त्याचे प्रबल विरोधी श्वेतांबरचार्य हरिभद्र–सूरीनी आपल्या ‘ संबोध प्रकरणा ’ च्या गुर्वाधिकारात सविस्तर केले आहे. ते पुढील प्रमाणे लिहितात.

‘हे चैत्य व मठात राहतात, पुजा आरती करतात, जिनमंदिर व शाळा बांधविता, देवद्रव्याचा उपयोग आपल्यासाठी करतात, श्रावकांना

शास्त्रातील सूक्ष्म तत्त्वे सांगण्याचा निषेध करतात. मुहूर्त काढतात. शकुनापशकुन दाखवितात. रंगित, सुगंधित व धूपादिकांनी सुवासित केलेले वस्त्र परिधान करतात, स्त्रियासमोर गातात,साध्वीने आणलेल्या पदार्थांचा उपयोग करतात, धनसंचय करतात, केशलोच करीत नाहीत, गरिष्ट आहारपान, दूधतूप, फळफळावळे इत्यादि सचत्ति पदार्थांचा उपभोग करतात. तेलाने मर्दन करवितात,मृत गुरूच्या समाधिस्थानावर स्तूप बनवितात. जिनप्रतिमाहि विकतात. इत्यादि.'

वि. सं. ८०२ मध्ये अणहिलपूर पट्टणचे राजे चावडा यांच्याकडून त्याचें गुरु शीलगुणसूरि यांनी अशी आज्ञा प्रगट करविली की, या शहरात चैत्यवासी साधू खेरीज दुसरे वनवासी साधू येऊं शकणार नाहीत. पुढे जिनेश्वरसुरि व वृद्धिसागरसूरि नांवाच्या दोन आचार्यांनी राजा दुर्लभदेवाच्या सभेत चैत्यवासी साधूच्या बरोबर वि. वं. १०७० च्या आसपास शास्त्रार्थ करून त्यांचा पराजय केला. तेव्हा कोठे ही आज्ञा रद्द होऊन इतर साधूना नगरात प्रवेश मिळू शकला. राजाने त्यांना खरतर असे नांव दिले. याप्रमाणे खरतरगच्छाची स्थापना झाली व तेव्हापासून चैत्यवासी साधूचा जोर कमी झाला.

श्वेतांवर संप्रदायात आज जे यती किंवा श्रीपूज्य म्हणवितात ते मठ-वासी किंवा चैत्यवासी शाखेचे अवशेष आहेत व जे 'संवेगी' मुनि म्हण-वितात ते वनवासी शाखेचे अवशेष होत ते आदणास शास्त्रोक्त मार्गाचे किंवा विधी मार्गाचे अनुयायी म्हणवितात.

श्वेतांबरात बरेचसे गच्छ आहेत. त्यांची संख्या ८४ होती असे म्हणतात परंतु, आज ही संख्या अधिक नाहीं. मूर्तिपूजक श्वेतांबराचे गच्छ पुढीलप्रमाणे आहेत.

(१) उपकेश गच्छ:— या गच्छाच्या उत्पत्तीचा संबंध भगवान् पार्श्वनाथाशी दाखविला जातो. त्यांचा एक अनुयायी केशी या गच्छाचा पुढारी होता. आजचें ओसवाल हे या गच्छाचे श्रावक म्हणविले जातात

(२) खरतर गच्छ:— या गच्छाचे प्रथम नेते वर्धमानसूरी होते म्हणून सांगितले जाते यांचे शिष्य जिनेश्वर सूरी यांनी गुजरात अपणहिल पट्टणचे राजे दुर्लभदेव यांच्या दरबारात जेव्हा चैत्यवासींना पराजित केले तेव्हा राजानी यांना खरतर असे नांव दिले. या नांवावरूनच यांचा गच्छ खरतर-गच्छ या नांवाने ओळखला जाऊ लागला. या गच्छाचे अनुयायी अधिक प्रमाणात राजपुताना व बंगालमध्ये आहेत. महाराष्ट्र राज्यातहि यांचे अनुयायी आहेत.

३) तपागच्छ:— या गच्छाचे संस्थापक श्री. जगद्च्चंद्रसूरि होते. यांनी सवत् १२८५ मध्ये उग्र तपश्चर्या केली. त्यावरून मेवाडच्या राजाने त्याना 'तपा' असे उपनाव दिले. तेव्हापासून याचा वृहद्गच्छ तपागच्छ नावाने प्रसिद्धीस आला. श्री. जगद्च्चंद्रसूरि व त्याच्या शिष्याचा दिलवारा ( अबू ) येथे कित्येक मंदिरे निर्माण करणारे वस्तुपाल बहुमान करीत असत. म्हणून गुजराथेत आजहि तपा-गच्छाचा बराच प्रभाव दिसून येतो. श्वेतांबर संप्रदायात हा गच्छ अति महत्वाचा समजला जातो. याचे अनुयायी मुंबई (महाराष्ट्र) पंजाब, राजपुताना, मद्रास वगैरे राज्यात आढळतात. श्री. जगद्च्चंद्र-सूरीचे दोन शिष्य होते. १देवेंद्रसूरी २ विजयचंद्रसूरी या दोघात मत-भेद झाला. विजयचंद्रसूरीनी कठोर आचारा ऐवजी शिथिलाचारास स्थान दिले. त्यानी असे जाहीर केले की, गीतार्थमुनि वस्त्राचे गाठोडे बाळगू शकतात. नेहमी दूध तूप खाऊ शकतात, कपडे धुवू शकतात, फळफळावळे शाकभाजी घेऊ शकतात, साध्वीने आणलेला आहार खाऊ शकतात.

व श्रावकाना संतुष्ट करण्यासाठी त्यांच्यासमोर वसून प्रतिक्रमणहि करू शकतात.

(४) पार्श्वचंद्रगच्छः– ही तपागच्छाची शाखा आहे. या गच्छाचे आचार्य पार्श्वचंद्र विक्रमसंवत् १५१५ मध्ये तपागच्छातून वाजूला झाले. याचे कारण असे की यानी कर्म विषयांत नवीनच सिद्धात उपस्थित केला. हे निर्युक्ति, भाष्य, चूर्णी व छेद ग्रंथांना प्रमाण मानत नसत. या गच्छांचे अनुयायी अहमदावाद जिल्ह्यात आढळतात.

(५) सार्धपौर्णमीयकगच्छः– या गच्छाची स्थापना चंद्रप्रभ–सूरींनी केली. प्रचालित क्रियाकांडशी त्याचा मतभेद होता. तसेच ते महानिशीथ सूत्राची गणना शास्त्र–ग्रंथीत करीत नव्हते, म्हणून हा गच्छ त्यांनी स्थापला. आचार्य हेमचंद्राच्या आज्ञेने राजा कुमारपाल यांनी या गच्छाच्या अनुयायाना आपल्या राज्यातून हाकलून दिलें. या दोघाच्याहि मृत्यूनंतर एक सुमतिसिंह नांवाचे मुनि कुमारपालाची राजधानी अणहिलपुर येथे आले व त्यांनी या गच्छास नवजीवन दिलें. तेव्हापासून हा गच्छ सार्धपौर्णमीयक या नांवाने ओळखला जातो. याचें अनुयायी आज दिवस नाहीत.

(६) अंचलगच्छः– या गच्छाचे संस्थापक उपाध्याय विजयसिंह होते, मागाहून ते आर्यरक्षितसूरी या नांवाने प्रसिद्धीस आले. या गच्छांत मुखपट्टी ऐवजी वस्त्राच्या सोज्याचा उपयोग करतात. म्हणून याचे अंचलगच्छ हे नांव पडले आहे.

(७) आगमिक गच्छः- याचे संस्थापक शीलगुण व देवभद्र होतें. प्रथम हे पौर्णमीयक होते. नंतर आंचलिक झाले हे क्षेत्रपालाची पूजा करण्याच्या विरुद्ध होते. विक्रमाच्या १६ व्या शतकांत या

गच्छाची एक शाखा कटुक नांवाने उत्पन्न झाली. या शाखेचे अनुयायी फक्त श्रावकच होते.

या गच्छापैकी आज खरतर-गछ, तपागच्छ व आंचलिक-गच्छ हे विद्यमान आहेत. प्रत्येक गच्छाची साधुसामाचारी अलग अलग आहे. श्रावकाच्या सामायिक, प्रतिक्रमण इत्यादि आवश्यक क्रिया-विधीहि निरनिराळ्या आहेत. असे असूनहि या सर्वांमध्ये जो फरक आहे तो एका दृष्टीने निर्जीवसा आहे. कोणी कल्याणिकाचे दिवस सहा मानतात तर कोणी पांच मानतात, कोणी पर्यूषणाचा अंतिम दिवस भाद्रपद शुद्ध चतुर्थी मानतात, तर कोणी पंचमी मानतात. याप्रमाणे किरकोळ बाबी घेऊन गच्छ निर्माण झाले आहेत.

## स्थानक वासी

सिरोही राज्यातील 'अरहतवाडा' येथील हेमाभाई ओसवाल यांच्या घरात वि. सं. १४७२ मध्ये लोकाशाहा याचा जन्म झाला. वयाच्या पंचवीसाव्या वर्षी लोकाशाहा हे आपल्या बायका मुलाबरोबर अहमदाबादला आले. त्यावेळी अहमदाबादच्या गादीवर महमदशहा बसलेला [होता. काही जवाहाराची खरेदी करण्याच्या निमित्ताने लोकाशाहाचा महंमद शहाशी परिचय झाला. त्यावेळी त्याने यांची हुशारी पाहून प्रसन्न होऊन यांना पाटणचे खजिनदार नेमले. विप प्रयोगामुळे महंमद शहाचा मृत्यु झाल्यावर लोकाशाहा यांना अत्यंत दुःख झाले. नोकरी सोडून देऊन त्यांनी लेखन-कार्य सुरू केले. त्यांच्या सुंदर अक्षरावर प्रसन्न होऊन ज्ञानश्री मुनिवर्यांनीं त्यांना दश-वैकालिक सूत्राची एक प्रत लिहिण्यास दिली. पुढे मुनिश्री जवळून इतर शास्त्रेहि लिहिण्यास मिळू लागली. ते प्रत्येक शास्त्रांच्या दोन दोन प्रति तयार करून प्रत्येकाची एक प्रत ते आपल्या जवळ ठेऊ

लागले. याप्रमाणे दुसऱ्या ग्रंथाचाहि संग्रह करून त्यांचा अभ्यास केला. यावरून त्याना असे वाटू लागलें की, आज मंदिरामध्ये जी मूर्तिपूजा चालू आहे तिचा उल्लेख या ग्रंथांत अजिबात नाही. याशिवाय आज जैनधर्मात जे आचार पाळले जातात त्यापैकी बरेचसे या ग्रंथाच्या दृष्टीने धर्मसंमत नाहीत म्हणून त्यांनी जैनधर्मात सुधारणा करण्याचे प्रतिज्ञेवर ठरविले.

अहमदाबाद ही गुजराथची राजधानी असून त्याबरोबरच ते व्यापाराचे केंद्र होतें. त्यामुळे लोकांचे येणे जाणे सुरूच असे. लोकाशाहाचा उपदेश ऐकून ते प्रभावित होत असत व ते त्यांना प्रार्थना करीत की तुम्ही आम्हास तुमच्या धर्माची दीक्षा द्या. तेव्हा ते म्हणत ' मी स्वतः गृहस्थ असताना तुम्हाला मी आपला शिष्य कसा बनवू शकतो? तेव्हा ज्ञानजी महाराजांनी त्या सर्वांना धर्माची दीक्षा दिली व त्यांनी लोकाशाहाच्या नावावर आपल्या गच्छाचे नांव लोंका-गच्छ असे ठेवले. याप्रमाणे लोकागच्छाची उत्पत्ति झाली.

पुढे पुढे या लोकमतातहि भेद प्रभेद झाले. सुरतेच्या एका जेन साधूनी या मतात सुधारणा करून एका ढुंढिया मताची ( संप्र-दायाची) स्थापना केली. यालाच ढुंढिया अथवा स्थानकवासी असेहि म्हणतात. व या गच्छाचे सर्व लोक या संप्रदायातर्गतच समजले जाऊ लागले. याचे सर्व धार्मिक व्यवहार मंदिरात न होता 'स्थानक' किंवा 'उपाश्रयात' होतात. या संप्रदायाचे लोक गुजराथ, काठेवाड, मारवाड, मालवा पंजाव व भारताचे अन्य भाग या ठिकाणी राहतात याची संख्या सामान्यपणे मूर्तिपूजक श्वेतांबराच्या इतकीच आहे. म्हणून हा जैनधर्मातील तिसरा संप्रदाय म्हटला जाऊ शकतो. हे आपणास श्वेतांबरहि मानतात.. कांही मतभेद सोडल्यास श्वेतांबराशी याचा मेळ

अधिक वसतो.

हा संप्रदाय श्वेतांबराच्या ४५ आगमापैकी ३३ आगमच मानतो. लोकाशाहा यांनी तर ३१ आगमच प्रमाण मानले होते. व्यवहार–सूत्रास ते प्रमाण मानीत नसत. पण नंतरच्या स्थानकवासीयांनी ते प्रमाण मानले. धर्माचरणात स्थानकवासी श्वेतांबरापेक्षा कांहीसे भिन्न वाटतात. ते मूर्तिपूजा करीत नाहीत. यांचे मंदिर नसते, तीर्थयात्रे–मध्येहि विशेष रस घेत नाहीत, या संप्रदायाचे साधु पांढरे वस्त्र धारण करतात, व तोंडावर पट्टी बांधून असतात. या अमूर्तिपूजक साधूपेक्षा श्वेतांबर साधू वेगळे आहेत हे दाखविण्यासाठी सत्यविजय पन्यास यांनी १८ व्या शतकात मूर्तिपूजक श्वेतांबर साधूना पिवळे वस्त्र धारण करण्याचा संदेश दिला. ही प्रथा आजहि दिसून येते. १८ व्या शतकाच्या शंवटी शेवटी भट्टारकांची पीठे स्थापन होऊ लागली आणि तपस्वी व तपस्विनीहि झाल्या. बराचसा विरोध होऊनहि आज यांचे कांही अवशेष पाहावयास मिळतात.

## मूर्तिपूजा विरोधी तेरापंथ

मूर्तिपूजा विरोधी संप्रदायातहि अनेक पंथ अस्तित्वात आले. यापैकी उल्लेखनीय एक तेरापंथ आहे. या पंथाची स्थापना मारवाड–मध्ये आचार्य भिक्षु ( भीखम ऋषी ) यांनी केली. यांचा जन्म जोधपूर राज्यातील कंटालिया गावात सं. १७८३ मध्ये झाला. संवत् १८०८ मध्ये यांनी जैन दीक्षा घेतली. त्यांना असे दिसून आले की, ज्या अहिंसेची साधना करण्यासाठी आपण सर्वस्वाचा त्याग करून घराबाहेर पडलो, वास्तविक दृष्टिने पाहिले तर आपण त्या अहिंसेच्या जवळहि पोहोचलेलो नाही. दैनंदिन जीवन व्यवहारात अहिंसेच्या नावावर हिंसेसच आश्रय दिला जातो. व धर्माच्या नांवावर अधर्म

चालविला जातो. तेव्हा याच्या विरोधात त्यांनी एका नवीन साधु-संघाची स्थापना केली त्याचेच नांव ' तेरापंथ ' असे पडले.

या पंथातील साधुसंघाचे अधिपति हे पूज्यजी महाराज असतात. साधूना त्याची आज्ञा मानावी लागते व रोज विधिपूर्वक त्यांचा सन्मान करावा लागतो. या पंथाचा प्रचार पश्चिम भारतात अधिक आहे. कलकत्यासारख्या शहरातहि या पंथाचे श्रावक आहेत.

३ यापनीय संघ

जैनधर्माच्या दिगंबर व श्वेतांबर संप्रदायाशी साधारणतः सर्वांचाच परिचय आहे परंतु या दोहोशिवाय तिसराहि संप्रदाय जैनधर्मीयांचा होता. व त्यास यापनीय किंवा गोप्यसंघ म्हणत असत. ही गोष्ट जैना-मधीलहि फारच थोड्या लोकांना माहित आहे. हा संप्रदाय अति प्राचीन आहे. दर्शनसाराचे कर्ते श्री. देवसेनसूरि यांच्या कथनानुसार वि. सं. २०५ मध्ये श्री कलश नांवाच्या श्वेतांबर साधूनी हा संप्रदाय स्थापला. दिगंबर, श्वेतांबर भेदाच्या निर्मिती नंतर जवळपास७ वर्षानी ह्या पंथाची स्थापना झाली. एके काळी हा संप्रदाय कर्नाटक व त्याच्या आसपास बराचसा प्रभावशाली होता, कंदब, राष्ट्रकूट व दुसऱ्या वंशातील राजानी यास व त्याच्या संघाच्या आचार्यांनी अनेक प्रकारे दान दिलेले होते

या संघाचे मुनि नग्न राहात असत. मोरांच्या पंखाची पिंच्छी ठेवीत असत व हातात भोजन करीत असत. हे नग्न मूर्तीची पूजा करीत असत. व त्यांना वंदना करणाऱ्या श्रावकाना ते ' धर्मलाभ ' असत. त्यांच्या या सर्व क्रिया दिगंबर साधू सारख्या होत्या. परंतु

---

१ " कल्लाणे वरणयरे दुण्णिसए पंच उत्तरे चादे ।
जावणियसंघभावो सिरिकलसादो हु सेवडदो ।। २९ ।।"

त्याबरोबरच ते त्याच भवांत (जन्मा) स्त्रियांना मुक्ति होऊ शकते व केवली भोजन करतात असे मानीत असत. प्रसिद्ध वैय्याकरणी शाकटायन (पाल्यकीर्ति) यापनीय होते. यांनी लिहिलेल्या अमोघ-वृत्तीतील कांही उदाहरणावरून असे दिसून येते की, यापनीय संघात आवश्यक, छेदसूत्र, निर्युक्ति, दशवैकालिक इत्यादि ग्रंथाचे पठन-पाठन होत असे म्हणजे या गोष्टीत ते श्वेतांबराशी समान होते. श्वेतांबर-मान्य असे बहुतेक आगम-ग्रंथ या संघात प्रायः मान्य असावेत. परंतु त्या आगमाची वाचना श्वेतांबर संप्रदायात मानल्या गेलेलेल्या वल्लभी वाचनेपेक्षा कांहीशी भिन्न होती. त्यावर त्यांच्या काही टीकाहि असाव्यात जसेः... अपराजितसूरीनी दशवैकालिक सूत्रावर टीका लिहिली होती.

आज या संप्रदायाचा एकहि अनुयायी नाही. या संघाचा लोप केव्हा व कां झाला हे सांगणें कठीन आहें. तथापि विक्रम-संवतच्या १५ व्या शतकापर्यंत हा संप्रदाय चालत आल्याची अनेक प्रमाणे मिळतात. कारण कागवाडमधील श. सं. १३१६ (वि. सं. १४५१ च्या) शिलालेखांत यापनीय संघाचे धर्मकीर्ति व नागचंद्र यांच्या समाधिलेखांचा उल्लेख मिळतो.

## ४ अर्धस्फालक संप्रदाय

श्री. रत्ननंदी आचार्यांनी आपल्या भद्रबाहू चरित्रात अर्धस्फालक संप्रदायाचा उल्लेख केला आहे. त्यांनी असे लिहिले आहे की, 'अद्‌भूत अर्धस्फालक मत कलिकालाच्या शक्तीमुळें पाण्यात तेलाच्या थेंब पसरावा त्याप्रमाणे सर्व लोकात पसरले.[१] त्यांनी हे मत भद्रबाहू

१ "अतोऽर्द्धफालक लोके व्यानसे मतमद्‌भुतम् ।
कलिकालेवलं प्राप्य सलिले तैलबिन्दुवत् ॥३०॥"

श्रुतकेवलीच्या वेळी बारा वर्षांच्या दुर्भिक्ष कालाच्या शेवटी शेवटी उत्पन्न झाल्याचे लिहिले आहे व शेवटी असे लिहिलें आहे की, वल्लभी–पुरात पूर्णपणे शुभ्र वस्त्र धारण करीत असल्यामुळे विक्रम राजाच्या मृत्यूनंतर १३६ वर्षानी श्वेतांबर मत प्रसिद्ध झाले. श्री. रत्ननंदीच्या मताप्रमाणे कांही दिगंबर मुनीनी आपली नग्नता झाकण्यासाठी जेव्हा खण्ड वस्त्र धारण केले तेव्हापासून अर्ध्रस्फालक संप्रदाय म्हणण्यांत येऊ लागले. या संप्रदायापासूनच श्वेतांबर संप्रदायाची उत्पत्ति झाली.'

मथुरेच्या कंकाली टीलेवरून प्राप्त झालेल्या जैनांच्या प्राचीन ऐतिहासिक सामुग्रीत कांही असे आयागपट ( ताम्रपट ) प्राप्त झाले आहेत. की ज्यात साधू नग्न असूनहि त्यांनी आपली नग्नता एका वस्त्र खंडाने झाकली असल्याचे कण्ह श्रमणांचे चित्र प्लेट नंबर २२ वर काढलेले दिसतें. त्यांच्या डाव्या हावाच्या मनगटावर एक खंड वस्त्र लटकलेले असून ते पुढे करून साधू आपली नग्नता झाकू लागल्याचे त्यावरून दिसून येते. हेच अर्धस्फालक संप्रदायाचे रूप दिसून येते.

तसेच श्वेतांबरहि[२] म्हणतात की, सहावे स्थविर भद्रबाहूच्या वेळी अर्धस्फलक संघाची उत्पत्ति झाली. त्याच्यातूनच इ. स. ८० मध्ये मूलसंघ म्हणविणारा दिगंबराचा उद्धव झाला. यावरूनहि या संप्र–दायाचे अस्तित्व सिद्ध होते. आता असा प्रश्न राहतो की अर्धस्फालक हे श्वेतावराचे पूर्वज की दिगंबराचें? याचे समाधानकारक उत्तर मथुरेस आढळलेल्या ऐतिहासिक सामुग्रीवरून मिळू शकते तेथील एका शिलापट्टात भ० महावीराच्या गर्भ–परिवर्तनाचे दृश्य काढलेले आहे. व त्याच्या जवळच एक लहानशी मूर्ति अशा साधूची आहे की, ज्याच्या

१ 'जैन सांस्कृतिका प्राणस्थळ, 'विश्वाणी' सप्टेंबर १९४२ ।'

मनगटावर खण्डवस्त्र लटकत आहे. गर्भापहार श्वेतांबर संप्रदायात मानलेला आहे. म्हणून त्यावरून असे स्पष्ट दिसते की, त्यावर काढलेल्या साधूचे रूपहि त्याच संप्रदायात मान्य असलेले आहे.

## उपसंहार.

सारांश असा की, मुख्यतः जैनधर्म दिगंबर श्वेतांबर या दोन शाखात विभक्त आहे. नंतर प्रत्येकात अनेक उपशाखा, गच्छ व उपसंप्रदाय वगैरे उत्पन्न झाले. असे असूनहि सर्व भ० महावीरांचे अनुयायी असून त्याच वीतराग देवाना मानणारे आहेत.

# प्रकरण ७ वे.

# विविध संकलन.

## १ कांही जैन वीर.

कांही लोकांची अशी कल्पना आहे की, जैन बनण्याने मनुष्य हा राष्ट्राच्या कांहीच कामाचा राहात नाही. उलट तो राष्ट्रास भार मात्र बनतो. परंतु ही कल्पना निखालस चुकीची आहे. देशाच्या रक्षणासाठी खरा जैन आपल्या सर्वस्वाचा त्याग करू शकतो. प्राचीन काळी देशाच्या रक्षणाचा भार क्षत्रियावरच होता; ते प्रजेच्या रक्षणा साठी युद्ध करीत असत व अपराध्याना प्राणदण्डहि देत असत. सर्व जैन तीर्थकराचा जन्म क्षत्रिय कुळात झालेला होता व जे कुमारा-वस्थेतच दीक्षित झाले त्या पांच तीर्थकराशिवाय बाकी सर्व तीर्थकरानी आपल्या वंशपरंपरागत चालत आलेल्या राजाचे संचालन व संवर्धन केले होते. त्यातील तीन तीर्थकरांनी तर दिग्विजय करून चक्रवर्तीपद सुद्धा प्राप्त करून घेतले. बावीसावे तीर्थकर श्री नेमिनाथभगवान हे श्रीकृष्णाचे चुलत भाऊ होते. गृहपरित्याग करण्यापूर्वी आपल्या तारूण्यावस्थेत महाभारताच्या युद्धात ते पांडवाकड्न लढले सुद्धा होते. जैन पुराणे युद्धाच्या वर्णनाने भरलेली आहेत. प्राचीन कालातील वैश्य हे केवळ युद्धात भाग घेत होते. एवढेच नव्हे तर त्यापैकी काही सेनापति-पदापर्यंतहि चढलेले होते. शिशुनाथवंशी राजा श्रेणिकाचे (बिंबिसार) समयी नगरशेट अर्हतदास याचे सुपुत्र जम्बुकुमार यांनी केलेल्या युद्धाचे वर्णन जसे शास्त्रामध्ये पाहावयास मिळते तसेच त्यांनी आपल्या तारुण्यावस्थेत जिनदीक्षा घेऊन ते अंतिम केवलीहि झाले हेहि पाहावयास मिळते, आज जरी जैनधर्माचे अनुयायी केवळ वैश्य

दिसत असले तरी ज्या वैश्य जातीत जैनधर्म आढळून येतो त्यापैकी अनेक जाती सुरवातीस क्षत्रिय होत्या. राजसत्ता निघून गेल्यामुळे व धंदा बदलल्यामुळे ते आता वैश्य जातीय बनलेले आहेत; म्हणून क्षत्रियाचा धर्म आज वैश्याचा धर्म बनला असे झाले आहे. याच पुस्तकाच्या 'इतिहास विभागात' जैन धर्मानुयायी राजाची माहिती धार्मिक दृष्टीने सांगितली आहे. आता येथे कांही दुसऱ्या जैनवीराचे वर्णन त्याच्या पराक्रमाच्या दृष्टीने करीत आहोत.

### राजा चेटक

भ० महावीराची माता ही राजा चेटकाची मुलगी होती राजा चेटक आपल्या शौर्यासाठी प्रसिद्ध होता. मगध सम्राट कुणिक (अजात् शत्रु) याने चेटक म्हातारा असताना त्यावर आक्रमण केले होते; त्यावेळी चेटकाने घनघोर युद्ध करून अजातशत्रूस दाती तृण धरावयास लावले.

### राजा उदयन

सिंधू–सौवीरचा राजा उदयन महावीर भगवंताचा अनुयायी होता. हा राजा जितका धर्मात्मा तितकाच पराक्रमीहि होता. एकेवेळी उज्जयनीचा राजा चंद्रप्रद्योत याने त्याच्यावर आक्रमण केले. त्यावेळी घनघोर युद्ध करून राजा उदयनने चंद्रप्रद्योतास पकडून आपले बंदिवान केले.

### मौर्य सम्राट चंद्रगुप्त

मौर्य सम्राट चंद्रगुप्ताचे नांव भारतीय इतिहासात सुवर्णाक्षरानी लिहिलेले आहे. सिकंदराच्या मृत्यूनंतर भारतवर्षास ग्रीकाच्या दास्यतेतून मुक्त करून व त्याचा सेनापति सेक्युकस याचा पराभव करून ज्या वीर सम्राटाने हिंदुकुश पर्वतापर्यंत आपल्या साम्राज्याचा विस्तार केला तोच हा पहिला भारतीय जैन सम्राट चंद्रगुप्त होय.

## कलिंग–चक्रवर्ती खारवेल

राजा खारवेलच्या शिलालेखावरून असे दिसून येते की, त्याने सात–कर्णीची कांहीहि तमा न बाळगता पश्चिमेकडे आपली सेना पाठविली व मूषिकावरहि आक्रमण केले. या दोघांवरहि विजय प्राप्त करून राष्ट्रिक व भोजक यांच्याकडून आपल्या पायांची पूजा करविली नंतर याने मगधावर आक्रमण केले. दक्षिणेकडील पांड्य राजाने हत्तीं, घोडे, माणिक, मोती इत्यादींचा नजराणा पाठवून खारवेलचे अधिपत्य स्वीकारले. खारवेलासारखा दुसरा पराक्रमी जैन राजा पुढे झाला नाही

## महाराजा कुमार–पाल

चितोडच्या किल्ल्यावर मिळालेल्या शिलालेखात लिहिले आहे की, 'महाराजा कुमार–पाल यांनी आपल्या अतुल पराक्रमाने सर्व शत्रूचे निर्दलन केले. पृथ्वीवरील सर्व राजांनी त्यांची आज्ञा शिरसा–वंद्य मानली शाकंभरीच्या राजास त्याने शरण आणून आपल्या चरणी नम्रीभूत केले. त्याने स्वत: शास्त्रास्त्रत घेवून सव्वालक्ष देश (मारवाड) पर्यंत चढाई केली व सर्व गढपतींना नमविले, सालपुरला अंकित केले.' हे महाराज कुमा–पाल गुजराथचे राजे होते·

## गंगनरेश मारसिंह

हा जसा धर्मात्मा होता तसाच तो शूर वीरहि होता. यानी कृष्ण राज ( तिसरा ) याचा भयानक शत्रू अल्लाह याचा गर्व जिरला व कृष्ण राजाच्या सेनेचे रक्षण केले. किरातांना पिटाळले. वज्जलांना हरविले. वनवासीच्या अधिकारी वर्गास पकडून त्यावर आपले आधिपत्य कायम केले. दक्षिण मथुरेचें राजे यांच्यापुढे नम्र झाले· यांनी नवलंब राजांना नष्ट केले. चालुक्य राजकुमार राजदित्य याचा पराभव केला. तापी, मान्यखेड, गोणूर, वनवासी इत्यादि ठिकाणच्या

लढाया जिंकल्या. यांना गंगचूडामणि, नोलंबांतक, मांडलिक त्रिनेज, गंग-विद्याधर, गंग-वज्र, इत्यादी अनेक पदव्या होत्या.

### समरकेसरी चामुंडराय

हा राजा राज मल्लाचा सेनापति होता याच्या पराक्रमावर राजा बेहद्द खुप असे. दज्जलदेवाचा याने पराभव केला तेव्हा 'समरधुरंधर' अशी पदवी त्यास मिळाली. नोलंब युद्धामध्ये विजय मिळाल्यामुळे यास 'वीर मार्तण्ड' असेहि म्हणत असत. उच्छंगाचा किल्ला जिंकल्यावर हे 'रणराज-सिंह' झाले. वाघपुरच्या किल्ल्यात त्रिभुज वीराला मारल्यानंतर याला 'वैरी-कुलकाल दण्ड' ही पदवी मिळाली. गंग-भट्टास युद्धात मारल्यावर हे 'समर-परशुराम' बनले. तसेच यांचा प्रामाणिकपणा पाहून यांना जनता 'सत्य-युधिष्ठर' म्हणत असे.

### सेनापति गंगराज

चोलवंशीय राजाकडून पराभूत झाल्यावर शेवटच्या गंगवंशीय राजाने होयसल वंशाचे राजे विष्णुवर्धन यांच्या सेनापतीचे कार्य केले. हे गंगराज सेनापति चामुंडराय यांच्या पेक्षाहि अधिक धर्मात्मा व वीर होते. जिनधर्म-रत्न, महासामंताधिपति, महाप्रचण्ड-दण्डनायक, इत्यादि यांच्या पदव्या होत्या. यांनी चालुक्य सेनेवर विजय मिळविला. नारसिंहास युद्धात मारले. चोलांचा पराजय केला. गगन मण्डळ महाराज विष्णुवर्धन यांना आपल्या कह्यात आणले.

### कलचूरि राजा

कलचूरि वंश हा सुरवातीस जैनधर्मास पोषक होता. पाचव्या सहाव्या शतकातील अनेक शिलालेखात लिहिले आहे की, कलचूरि राजानी चढाई करून चोल व पांड्य राजाचा पराभव केला व आपले राज्य गमिविले (वसविले)

## राजा अमोघ वर्ष

हा जैन धर्माचा कट्टर अनुयायी होता, 'अंग, वंग, मगध, मालवा चित्रकूट व वेङ्गी येथील राजे अमोघ–वर्षाच्या सेवेत राहात होते.' असे याच्या प्रशस्तीत लिहिले आहे. वेङ्गीच्या अगोदरच्या चालुक्य राजावरोवर याचे नेहमी युद्ध होत असे.

## वच्छावत् सरदार

वच्छ राजाच्या नांवाने हा वंश वच्छावत् म्हणविला गेला. वच्छराज हा मोठा धर्मात्मा होता. जैनधर्माच्या प्रभावनेसाठी याने वरेचसे कार्य केले. याच्या वंशात मोठमोठे अनुभवी व शूर निर्माण झाले. त्यांनी आपली बुद्धि, कार्यकुशलता आणि राज्य कारभारात मुत्सद्देगिरी व युद्ध कार्यात पराक्रम दाखविला. लेखणी व तरवार या दोन्हीवर त्याचा सारखाच अधिकार होता. त्यात वरसिंह व नागराज अत्यंत प्रसिद्ध पराक्रमी व वीर होते. त्यापैकी वरसिंह हा हाजीखान लोधीवरोवर लढाईत मारला गेला. परंतु नागराजसिंहानी लूनखानाच्या वेळी पडलेल्या वेढयात वराच पराक्रम दाखविला.

## धनराज

इ.स. १७८७ मध्ये अजमेरचे महाराजे विजयसिंह यानी मराठ्या–पासून अजमेर जेव्हा पुनः जिकलें, तेव्हा ओसवाल जैन धनराज सिंधी यास अजमेरचे राज्यपाल (गव्हर्नर) वनविले. चार वर्षानी मराठ्यानी पुनः मारवाडवर आक्रमण केले. चारहि वाजूनी त्यांनी अजमेरलाहि वेढा घातला. धनजयाने आपल्या छोटयाशा सैन्यासहित शत्रूस पराक्रमाने तोंड दिले. परंतु मराठ्याची शक्ति पाहून विजयसिंहाने धनराजास आज्ञा दिली की, 'मराठ्याना अजमेर देऊन तुम्ही जोधपूरला यावे.' धनराज स्वामीच्या आज्ञेचे उल्लंघन करू इच्छीत नव्हता. पण त्यावरोवरच अपमानित होऊन शत्रूच्या हाती देश सोपविणेहि त्यास

इष्ट वाटले नाही. तेव्हा त्यानें हिऱ्याची कणी खाऊन प्राणत्याग केला व मरताना म्हणाला 'महाराजांना म्हणावे की, मी त्यांच्या आज्ञेचे पालन केले आहे; पण मी जीवंत आहे तोपर्यंत मराठे अजमेरात प्रवेश करू शकत नाही.

जनरल इंद्रराज

जैन ओसवालात इंद्रराज हे महान् 'जनरल' (सेनापती) झाले. यांनी विकानेरच्या राजास हरविले व जयपूरच्या राजाचा मानभंग केला. यांचा सन १८१५ मध्ये जोधपूरात स्वर्गवास झाला.

वस्तुपाल तेजपाल

जैन मंत्री व सेनापतिमध्ये या दोघांचेहि नांव उल्लेखनीय आहे. हे दोन्ही भाऊ राजनिपुण, तरवार-बहादूर, शिल्पकला प्रेमी व जैन-धर्माचे अन्यन्य भक्त होते. हे पोरवाड जैन असून गुजराथचे वघेलवंशी राजा वीरधवल यांचे मंत्री होते.

देवगिरीचे यादव वंशीराजे सिंहन यांनी जेव्हा गुजराथवर आक्रमण केलें तेव्हा या वीरांनी त्यांच्याशी युद्ध खेळून त्यावर विजय मिळविला. त्याचप्रमाणे संग्रामसिंहाने खंवायतवर हल्ला केला होता. तेव्हा वस्तुपाल तेंथील राज्यपाल (गव्हर्नर) होता. उभयपक्षात तुंबळ युद्ध होऊन त्यात संग्रामसिंहास रणागणातून पळावे लागले.

सेनापति आभू

आभू श्रीमाळी जैन राजपूत होता. हा धर्माचरणात कट्टर होता. गुजराथचा शेवटचा सोलंकी राजा भीमदेव याचा हा सेनाध्यक्ष होता. या पदावर त्याची नुकतीच नेमणूक झाली होती व राजा भीमदेव अनूपथित होता. अशावेळी मुसलमानानी राजधानीवर आक्रमण केले. राणीस चिंता झाली. परंतु आभूच्या उत्साहजनक शब्दानी राणीस धीर येऊन तिने युद्धाची घोषणा केली व युद्धाचा सर्व भार आभूवर सोपविला.

आभू आपल्या दैनंदिन धर्मक्रिया व आचार पालनात पूर्ण नैष्ठिक होता. युद्ध मैदानात संध्याकाळ होताच तलवार म्यान करून हत्तीवरील अंबारीतच आत्मध्यान (सामायिक) करू लागला. हे पाहून 'हा जैन काय लढणार?' असे लोक म्हणू लागले. पण आपले नित्य-कृत्य आटोपताच सेनापतीनी आपली तलवार गाजविली व मुसलमानाच्या सेनापतीला आपली शस्त्रास्त्रें खाली ठेवून तहाची प्रार्थना करण्यास भाग पाडले.

## जयपुरचे जैन दिवाण

जयपुर-राज्याचे दिवाणपद बरीच वर्षेपर्यंत जैनानी भूषविले होते व राज्यात शिस्त लावून ते सुखी व समृद्ध करण्यास त्यानी बराचसा हातभार लावला व राज्यरक्षणासाठीहि त्यांनी बरेच श्रम घेतले. त्यापैकी एक दोन उदाहरणे खाली देत आहोत.

जेव्हा औरंगजेबाचा मुलगा बहादूरशहा दिल्लीचा बादशहा झाला तेंव्हा त्याने आमेर जिंकले व सवाई जयसिंहास राज्य सोडावे लागले. अशावेळी दिवाण रामचंद्र यांनी सैन्य संघटित करून आमेरवर चढाई केली व तेथे जयसिंहाचा अधिकार जमविला.

त्याचप्रमाणे दिवाण रामचंद्रजी छाबडा हे जयपुर नरेशाचे अत्यंत प्रिय विश्वासपात्र दिवाण होते. संवत् १८६२ मध्ये जयपुर व जोधपुर या राज्यात उदयपुरच्या राजकुमारीवरून जेव्हा भांडण सुरू झाले तेव्हा जोधपुरचे बक्षी सिंघी इंद्रराज व दिवाण रामचंद्र यांनी मिळून हे भांडण संपविलें. पण पुनः कांही कालांतराने लढाईची पाळी आलीच त्यावेळी दिवाण रामचंद्राने आपल्या बुद्धि व शास्त्र कौशल्याने हे युद्ध संपविले. हे दिवाण अत्यंत धर्मात्मा असून यांनी १८६१ मध्ये फार मोठी जिनबिंब प्रतिष्ठा करविली होती.

ही जैन वीराच्या थोर पराक्रमाची संक्षिप्त गौरव-गाथा आहे.

त्यावरून असे दिसून येते की. योग्य प्रसंगी जरूर तेव्हा जैनधर्मानुयायी मरण्यास व देशाच्या शत्रूनाहि मारण्यास तत्पर असत. कारण ' जे कम्मे सूरा ते धम्मे सूरा' म्हणजे 'जे कर्मवीर असतात तेच धर्मवीर असतात.' असे शास्त्र वचन आहे.

## २ जैनपर्व,

### दशलक्षण किंवा पर्यूषण पर्व.

जैनाचा सर्वात पवित्र पर्व दशलक्षण पर्व आहे दिगंबर संप्रदायात हा पर्व दरवर्षी भाद्रपद शुद्ध पंचमीपासून चतुर्दशीपर्यंत तसेच श्वेतांबर संप्रदायात श्रावण वद्य द्वादशीपासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यन्त मानला जातो. या दिवसात जैनमंदिरात सर्वत्र आल्हादपूर्ण मंगलमय वातावरण असते. दररोज सकाळपासुनच सर्व स्त्री पुरुष स्नान करून मंदिरात जातात व आनंदाने भगवंताचे पूजन करतात. पूजन संपल्यावर दररोज श्री तत्त्वार्थसूत्राच्या दहा अध्यायापैकी एका एका अध्यायावर प्रवचन व क्षमा, मार्दव, आर्जव, शौच, सत्य, संयम, तप, त्याग, आकिंचन्य, ब्रह्मचर्य या दहा धर्मापैकी एका एका धर्माचे स्वरूप-विवेचन केले जाते. या दहा धर्मामुळेच या पर्वास दशलक्षण-पर्व असें म्हणतात. कारण वरील दहा धर्माची या पर्वात मुख्यत: आराधना केली जाते. प्रवचन, व्याख्यान वगैरेसाठी अन्य ठिकाणाहून विद्वान पंडितास बोलाविले जाते व त्यांच्या ज्ञानाचा व उपदेशाचा बहुतेक सर्व स्त्री पुरुष फायदा घेतात. त्याग धर्माच्या दिवशी परोपकारी संस्थाना दान दिले जाते. भाद्रपद वद्य प्रतिपदेच्या दिवशी पर्वाची समाप्ति झाल्यावर सर्व लोक एकत्र जमून एकमेकास परस्पर आलिंगन देतात व गतवर्षातील आपल्या हातून झालेल्या अपराधाबद्दल क्षमा मागतात. जे लोक दुसऱ्या गांवी असतात त्याना क्षमापत्रे पाठवून क्षमा याचना केली

जाते. या दिवसात बहुधा सर्व स्त्री पुरुष आपल्या शक्तीनुसार व्रत उपवास वगैरे ग्रहण करतात. कोणी कोणी दहाहि दिवस उपवास करतात. बहुतेक जण दहाहि दिवस फक्त एकवेळच जेवण करतात. याच दिवसात भाद्रपद शुद्ध दशमीस सुगंध दशमी पर्व असतो. या दिवशी सर्वजण एकत्र जमून मंदिरात दशांग धूप वगैरे टाकतात व जिकडे तिकडे सुगंध दरवळलेला असतो. इंदूर सारख्या महत्वाच्या ठिकाणी तर हा उत्सव प्रेक्षणीय असतो. भाद्रपद शुद्ध चतुर्दशीस अनंतचतुर्दशी म्हणतात. जैन या दिवसाचे फार मोठे महत्व समजतात. जैनशास्त्राप्रमाणे या दिवशी व्रत केल्यामुळे बराच लाभ होतो दुसरे हा दशलक्षणिक पर्वाच शेवटचा दिवस असतो. म्हणून या दिवशी साधारणतः सर्व स्त्री पुरुष व्रत करून सर्व दिवस मंदिरातच व्यतीत करतात. अनेक ठिकाणी या दिवशी रथ-यात्रा व त्या निमित्ताने मिरवणूक काढीत असतात व मोठा उत्सव होतो. काही लोक इंद्ररूप धारण करून पाणी आणतात व त्या पाण्याने भगवताचा अभिषेक करतात. नंतर पूजा होते व पूजनानंतर अनंतचतुर्दशी व्रतकथा वाचली जाते. जे व्रती निर्जल उपवास करीत नाहीत ते कथाश्रवण करून नंतरच जलग्रहण करतात.

श्वेतांबर संप्रदायात या पर्वास ' पर्यूषण ' म्हणतात. साधू करिता दहा प्रकारचा कल्प म्हणजे आचार सांगितला आहे. त्यामध्ये एक पर्यूषण हा एक आचार आहे परि म्हणजे पूर्ण रूपाने, उपणा म्हणजे राहणे; सारांश, एकाच गावी स्थिर रीतीनें राहणे यास पर्यूषण म्हणतात. त्याचे कालमान तीन प्रकारचे आहे. जघन्यकाल ७० दिवस, उत्कृष्ट-काल ६ महिने. मध्यम चार महिने. कमीत कमी ७० दिवसाच्या स्थिर-वासाची सुरवात भाद्रपद शुद्ध पंचमीस होते. प्रथम ही परंपरा रूढ होती. परंतु असे म्हणतात की, कालिकाचार्य यांनी चतुर्थी पासूनची

परंपरा सुरु केली. या दिवसास 'संवछरी' किंवा सांवत्सरिक पर्व म्हणतात. सांवत्सरिक पर्व म्हणजे त्यागी साधूंचा वर्षावास निश्चित करण्याचा दिवस. सांवत्सरिक पर्वास मध्य करून त्याबरोबर त्या पर्वाचे सात दिवस धरून श्रावण वद्य द्वादशी पासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत आठ दिवसास श्वेतांबर संप्रदायात 'पर्यूपन' पर्व मानतात. दिगंबर संप्रदायांत आठ ऐवजी १० दिवस मानले जातात. श्वेतांबरांचा पर्यूपण पूर्ण झाल्यावर दुसऱ्या दिवसापासून दिगंबरांचा दशलक्षणिक पर्व सुरु होतो. संवत्सरिक पर्वात गत वर्षात जे कांही आपआपसात वैर विरोध असतील त्याबद्दल 'मिच्छामि दुक्कडं' माझे दुष्कृत्य मिथ्या होवो.' असे म्हणून क्षमा याचना केली जाते. या पर्वाच, सन्मान मोंगल बादशहा सुद्धा करीत असत. सम्राट अकबराने हीरविजय–सूरीच्या उपदेशाने प्रभावित होऊन पर्यूपण पर्वामध्ये हिंसा बंद करावी, असे आपल्या राज्यात सर्वत्र फर्मान काढले होते.

### अष्टान्हिक पर्व

दिगंबर संप्रदायांतील दुसरा महत्वपूर्ण पर्व 'अष्टान्हिक पर्व' आहे. हा पर्व कार्तिक, फाल्गुन व आषाढ महिन्याच्या शेवटी आठ दिवस मानला जातो. जैन मान्यतेप्रमाणे आठवा नंदीश्वर द्वीप आहे. या द्वीपात बावन्न जिनमंदिरे आहेत. त्यांची पूजा करण्यासाठी स्वर्गाहून देव लोक वर सांगितलेल्या दिवसात जातात. मनुष्य तेथें जाऊ शकत नसल्यामुळे ते या दिवसात येथेच राहून मनोभवाने त्यांची पूजा करून पर्व साजरा करतात. 'सिद्धचक्रपूजाविधान' नामक एक सांगोपांग पूजाविधान या दिवसात ठिकठिकाणी होत असतें. त्याचे दृष्य मोठे मनोहारी असते. श्वेतांबर संप्रदायातहि पर्यूपण पर्वाशिवाय या पूजा–विधानासहि महत्वाचे स्थान आहे. परंतु त्यांच्यात ही पूजा वर्षातून

दोन वेळ चैत्र व आश्विन महिन्यात करण्याचा परिपाठ आहे आणि ही पूजा सप्तमीपासून पौर्णिमेपर्यंत ९ दिवस चालू असते.

## महावीर जयन्ती.

चैत्र शुद्ध त्रयोदशी ही भ० महावीरांची जन्मतिथी आहे. या दिवशी भारत वर्षात सर्व जैन आपआपले दैनंदिन व्यवहार बंद ठेवून आपआपल्या गावी अत्यंत प्रभावक पद्धतीने ही जयन्ती साजरी करतात. प्रातःकाली प्रभातफेरी निघते. रात्री सार्वजनिक सभेचे आयोजन केले जाते. सर्व भारतवर्षात बहुतेक राज्य सरकारांनी आपआपल्या राज्यात महावीर जयंतीची सुट्टी जाहीर केलेली आहे व मध्यवर्ती सरकारकडेहि ही मागणी आहे.

## वीर-शासन-जयन्ती.

जैनांचे अंतिम तीर्थंकर भ० महावीर यांना पूर्ण ज्ञान (केवलज्ञान) प्राप्त झाल्यानंतर त्यांचा पहिला धर्मोपदेश मगधांतील राजगृही नगरात विपूलाचल पर्वतावर सकामी झाला. त्याची स्मृति म्हणून दरवर्षी आषाढ वद्य प्रतिपदेश वीर शासन जयंती मानली जाते. गत वि. सं. २००१ मध्ये प्रथमत; हा उत्सव राजगृहीमध्ये व नंतर कलकत्त्यामध्ये अडीच हजारावा वीर शासन जयन्ती महोत्सव अत्यंत उत्साहाने मोठ्या प्रमाणावर साजरा करण्या आला.

## श्रुतपंचमी.

दिगंबर संप्रदायाच्या मान्यतेप्रमाणे हळुहळू जेव्हां अंग ज्ञानाचा लोप होऊ लागला त्यावेळी अंग व पूर्वांचे एकदेश ज्ञाते आचार्य 'धरसेन' झाले, ते सौराष्ट्र देशांत गिरनार पर्वताच्या चंद्रगुफेत ध्यान करीत होते त्यावेळी 'आपल्यानंतर श्रुतज्ञानाचा लोप होणार' या अशा चिंतेने ग्रस्त

होते. तेव्हा महिमा नगरीत होणाऱ्या मुनि संमेलनास पत्र लिहिल्यावर तेथून दोन मुनी त्यांच्या जवळ आले. आचार्यांनी त्याचा बुद्धीची परीक्षा करून त्याना सिद्धांत विषय शिकविला व निरोप दिला. त्या दोन मुनीचे नाव पुष्पदंत व भूतवली होते. त्यांनी तेथून आल्यावर 'षट्खंडागम' नामक सिद्धांत-ग्रंथाची रचना केली. ती रचना झाल्यावर भूतवली आचार्यांनी त्या ग्रंथास शास्त्रनिबद्ध करून जेष्ठ शुद्ध पंचमीच्या[1] दिवशी चतुर्विध संघासहित त्या शास्त्राची पूजा केली त्यामुळे श्रुतपंचमी ही तिथी दि० जैनात प्रसिद्धीस आली. या दिवशी जैन लोक शास्त्राची पूजा करतात. श्वेतांबरात कार्तिक शुद्ध पंचमीस ज्ञान पंचमी मानतात व त्या दिवशी ते धर्म ग्रंथाची पूजा वगैरे करतात.

वरील पर्वाशिवाय प्रत्येक तीर्थंकराचे गर्भ, जन्म, दीक्षा, केवलज्ञान व निर्वाण कल्याणिक दिवस सांगितलेले आहेत. त्या दिवशीहि जागोजागी उत्सव मानले जातात. जसे– पुष्कळशा ठिकाणी प्रथम तीर्थंकर भ० वृषभदेव यांची ज्ञान–जयंती किंवा निर्वाण–तिथी साजरी केली. जाते.

### ३ दीपावली.

वर सांगितलेलें सणपर्व हे फक्त जैनधर्मानुयायीच साजरे करतात. परंतु या शिवाय असेहि कांही पर्व जैनात रूढ आहेत की, जे जैनाप्रमाणे इतर हिंदू लोकहि मानतात. अशा पर्वामध्ये सर्वात अधिक

---

१ ज्येष्ठसितपक्षपञ्चम्यां चातुर्वर्ण्यसंघसमवेतः ।
तत्पुस्तकोपकरणैर्व्यधात् क्रियापूर्वकं पूजाम् ॥ १४३ ॥
श्रुतपञ्चमीति तेन प्रख्याति तिथिरियं परामाप ।
अद्यापि येन तस्यां श्रुतपूजां कुर्वते जैना ॥१४४॥'' इन्द्रनन्दि-श्रुतावतार

उल्लेखनीय असा दीपावली किंवा दिवाळीचा सण आहे. हा सण आश्विन वद्य ३० (अमावस्या) दिवशी केला जातो. साफ-स्वच्छ केलेली व शृंगारलेली घरे या दिवशी संध्याकाळी जिकडे तिकडे दिव्यांच्या लख-लखाटाने व दीपमाळांनी विशेषच आकर्षण होतात. घरोघरी लक्ष्मी-पूजन होते. कित्येक शतकापासून हा सण चालत आला आहे परंतु हा सण केव्हा सुरू झाला कोणी सुरू केला याची माहिती पुष्कळास नाही. कांहीजण यांचा संबंध श्री. रामचंद्राच्या आयोध्यामधील पुनरागमनाशी लावतात. तर कांही सम्राट अशोकाच्या दिग्विजयाचे सूचक मानतात. परंतु रामायणात असा कोणताच उल्लेख नाही. इतकेच नाही तर कोणत्याहि हिंदू-पुराणात या बावतीत कांही खास उल्लेख मिळत नाहीत[1] बौद्ध धर्मात तर हा सण मानलेलाहि नाही. राहता राहिला जैन-धर्म या धर्मासंबंधीचे शक संवत ७०५, वि. सं. ८४० मध्ये लिहिलेलें एक हरिवंश पुराण आहे. त्यात भ० महावीरांच्या निर्वाणाचे वर्णन करताना लिहिले[2] आहे की, महावीर भगवान् भव्य जीवांना उपदेश

---

१ श्री वासुदेव शरण अग्रवाल यांनी मूळ लेखकास असे सांगितले की, वात्सायन कामसूत्रात दीपावलीला 'यक्ष रात्री महोत्सव' मानला आहे. तसेच बौद्धाच्या 'पुप्फरत जातक' यात कार्तिक महिन्याच्या रात्री होणाऱ्या उत्सवाचे वर्णन आले आहे. तसेच कार्तिक पौर्णिमेस होत असलेल्या उत्सवाचे महत्व 'धम्मपद अट्ठ कथा' यात आढळते. या उल्लेखावरून ऐवढेच दिसून येते की, कार्तिक महिन्यात रात्रीच्या वेळी कोणता तरी उत्सव होत होता. परंतु हा कां मानला जात होता व त्याचे काय स्वरुप होते याचा मात्र उलगडा होत नाही.(मूळ लेखक)

२ " जिनेंद्रवीरोऽपि विबोध्य सततं समंततो भव्यसमूहसंततिं ।
प्रपद्य पावानगरीं गरीयसीं मनोहरोद्यानवने तदीयके ।। १५ ।।
चतुर्थकालेऽर्धचतुर्थमासकैर्विहीनताविश्वचतुरब्दशेषके ।
सकार्तिके स्वातिषु कृष्णभूतसुप्रभातसन्ध्यासमये स्वभावतः ।। १६ ।।

देत देत पावापुरीत आले. तेथील एका सुंदर बागेत चतुर्थ काळ संपण्यास ३ वर्षे साडेआठ महिने बाकी राहिले असता आश्विन अमावास्येला प्रभाती योगांचा विरोध करून व कर्मांचा नाश करून त्यांनी मुक्ति प्राप्त केली. चारहि प्रकारच्या देवांनी येऊन यांची पूजा केली. दीपक लावले. त्यावेळी त्या दिव्याच्या प्रकाशाने पावापुरीचे सगळे नभोमंडळ प्रकाशमय झालेले होते. त्यावेळेपासूनच भक्त लोक जिनेश्वरांची पूजा करण्यासाठी सर्व भारत वर्षात दर वर्षी त्यांच्या निर्वाण दिवसाच्या निमित्ताने दीपावलीचा सण साजरा करतात.

जैनधर्मीयांची आजची स्थिती पाहिली असता वरील गोष्टीवर कोणाचा विश्वासहि बसणार नाही की, महावीर निर्वाणास अनुलक्षून दीपावली मानली जाते. परंतु त्यावेळच्या प्रसिद्ध प्रसिद्ध राजघराण्या–बरोबर भ० महावीरांचा जो कुलक्रमागत संबंध चालत आलेला होता व त्याच्यावर जो प्रभाव होता ते पाहून त्यात कांही असंभवनीय आहे असे म्हणता येत नाही. 'मज्झिमनिकाय'च्या सामगामसुत्तास अनु–सरून जेव्हा चुन्द महात्मा बुद्धाचा प्रिय शिष्य आनंद यांना भ० महावीरांच्या निर्वाणाचा समाचार सांगतो त्यावेळी अयुष्मान् आनंद म्हणतो 'आऊसचुंद? भगवान बुद्धांच्या दर्शनासाठी ही घटना भेटस्वरूप आहे.' यावरून स्पष्ट होते की, आपल्यावेळी भ० महावीरांचा प्रभाव निःसंशय मोठा होता.

---

अघातिकर्माणि निरुद्धयोगको विधूय घातीं घनवद्विबंधनं ।
विबन्धनस्थानमवाप शंकरो निरन्तरायोरुसुखानुबन्धम् ॥१७॥
ज्वलत्प्रदीपालिकया प्रवृद्धया सुरासुरैः दीपितया प्रदीप्तया ।
तदा स्म पावानगरी समंततः प्रदीपिताकाशतला प्रकाशते ॥१९॥
ततस्तु लोकः प्रतिवर्षमादरात् प्रसिद्धदीपालिकयात्र भारते ।
समुद्यतः पूजयितुं जिनेश्वरं जिनेन्द्रनिर्वाण विभूतिभक्तिभाक् ॥२०॥"

याशिवाय दीपावलीच्या पूजनाची जो पद्धति रुढ आहे त्यावरूनहि या प्रश्नावर चांगला प्रकाश पडतो. दीपावलीच्या दिवशी लक्ष्मीपूजन का होते याचे दुसरे संतोषकारक उत्तर मिळत नाही. ज्यावेळी भ० महावीरांचा निर्वाण झाला; त्याचवेळी त्यांचे मुख्य शिष्य गौतम गणधर यांनाहि पूर्ण ज्ञानाची (केवलज्ञानाची) प्राप्ति झाली. हे गौतम पूर्वाश्रमामध्ये ब्राह्मण होते. मुक्ती व ज्ञान या जैनधर्मात श्रेष्ठ लक्ष्मी मानली आहे व 'मुक्तिलक्ष्मी' किंवा 'ज्ञानलक्ष्मी' अशा वेत्रक शब्दाद्वारे शास्त्रात त्याचा उल्लेख आढळतो; म्हणून आध्यात्मिक लक्ष्मीच्या पूजनाची प्रथा हळूहळू सर्व लोकात बाह्य लक्ष्मीच्या पूजनाचे स्वरूप धारण करू लागली. असल्यास त्यात विशेष आश्चर्य नाही. हे बाह्यदृष्टिप्रधान सर्वसाधारण मानव समाजामध्ये प्रायः पाहावयास मिळते. लक्ष्मीपूजनाच्या वेळेस मातीची पणती व अनेक प्रकारची खेळणीहि ठेवली जातात. आमचे वाडवडील असे म्हणत असत की, ह्या पणत्या भ०महावीर व त्याचे शिष्य गौतम गणधर यांच्या उपदेश सभेच्या (समोवशरणाच्या) स्मृतिप्रीत्यर्थ आहेत व तो उपदेश ऐकण्यास मनुष्य, पशु पक्षी सर्वच जमत असत. त्याच्या त्या आठवणीसाठी ही चित्रे खेळणी त्यावेळी ठेवली जातात. याप्रमाणे दीपावलीच्या प्रकाशात आम्ही दरवर्षी भगवंताच्या निर्वाण लक्ष्मीचे पूजन करीत असतो व ज्याप्रकारे त्याचे समवशरण होते तशा प्रकारचा सर्व थाट उभा करतो.

दीपावलीच्या दिवशी प्रातःकाली सर्व जैन मंदिरात महावीर निर्वाणाच्या पुण्यस्मृतीनिमित्त मोठा उत्सव करून त्यांना नैवेद्य (लाडू) चढवून त्यांची पूजा केली जाते. अशा प्रकारच्या पूजेचा विधी फक्त या दिवशीच केला जातो. तसेच घरोघरी या दिवशी जे पक्वान्न तयार होते त्याचाहि उद्देश यावरून स्पष्ट लक्षात येतो.

## सलूनो किंवा रक्षाबंधन.

दुसरा उल्लेखनीय जैन लोक मानत असलेला सार्वजनिक सण म्हणजे रक्षाबन्धन पर्व किंवा सलूनो पर्व होय. साधारणतः या सणा- वारास ब्राह्मण लोक इतराच्या हातात राख्या बांधतात. यालाच रक्षा- बन्धन म्हणतात. या राख्या बांधून ब्राह्मण दक्षिणा घेतात. राखी बांधतांना ते एक[१] श्लोक म्हणतात. 'ज्या राखीनें दानवाचा इंद्र राजा महाबली बली राजा बांधला गेला त्या राखीनेच मीहि तुम्हास बांधतो. तुम्ही माझी रक्षा करावी.कसल्याहि संकटाना भिऊन परावृत होऊ नये.'

त्या बरोबरच उत्तर भारतात आणखीहि एक प्रथा रूढ आहे. या दिवशी सर्व हिंदूच्या दारावर दोन्ही बाजूस मनुष्याची चित्रे काढली जातात. त्यास 'सौन' म्हणतात. प्रथम त्यांना जेऊ घालून त्यांना राखी बांधतात व मगच घरचे लोक भोजन करतात. मूळ लेखकाने अनेक विद्वान व पौराणिकांना ह्या सणाबाबत माहिती विचारली की, हा सण केव्हा व कशारीतीने सुरू झाला. परंतु कोणा कडूनहि या गोष्टीची सुसंगत माहिती मिळू शकली नाही. बळी राजाची कथा वामनावताराच्या संबंधात येते परंतु तेवढावरून या पर्वाबाबत विशेष ज्ञात होत नाही. जैन पुराणात मात्र एक कथा या बाबतीत सापडते. ती संक्षेपतः खालीलप्रमाणे आहे.

कोण्या एकेवेळी उज्जयनी नगरात श्रीधर्म नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचे चार मंत्री होते.– बली, बृहस्पती,नमुची व प्रल्हाद एकेवेळी जैन मुनि अंकपनाचार्य सातशे मुनीच्या संघाबरोबर उज्जयनीस

---

१ 'येन बद्धो बली राजा दानवेन्द्री महाबली ।
तेन त्वामपि बध्नामि रक्ष मा चल मा चल ॥'

आले. मंत्र्यांनी नको म्हटले असताहि राजा मुनीच्या दर्शनास गेला. त्यावेळी सर्व मुनी ध्यानस्थ बसलेले होते. परत येत असताना मार्गात एका मुनीबरोबर मंत्र्यांचा शास्त्रार्थ झाला मंत्री त्यांत हरले व रागाने तलवार घेऊन मुनींना मारण्यास ते निघाले. मार्गात गुरूंच्या आज्ञेवरून तेच मुनी शास्त्रार्थ जेथे झाला त्या ठिकाणी ध्यानस्थ बसलेले आढळले. आपल्याशी वाद करणारे मुनी हेच आहेत हे पाहून त्यांच्यावर वार करण्यासाठी मंत्र्यांनी तलवार उपसातच त्यांचे हात वरच्यावर राहीले. सकाळी राजाला जेव्हा गोष्ट समजली तेव्हा त्यांनी मंत्र्याना आपल्या राज्यातून हाकून दिले. ते चारहि मंत्री तेथून पुढे हस्तिनापूरचा राजा पद्म याकडे गेले. तेथं बलीने मोठ्या कौशल्याने पद्म राजाच्या शत्रूस पकडून त्यांच्या स्वाधीन केले. तेव्हा पद्म राजाने प्रसन्न होऊन तो मागेल ते वरदान देण्याचे कबूल केले. तेव्हा योग्यवेळी हे वरदान मागू असे बलीने सांगितले.

कालांतराने अकंपनाचार्यांचा संघ विहार करीत करीत हस्तिनापूर येथे आला. तेथेच त्यांनी चतुर्मास करण्याचा निर्णय घेतला. जेव्हा बली वगैरेना ही गोष्ट समजली तेव्हा प्रथमतः ते फारच घाबरले. परंतु पुढे आपल्या अपमानाचा बदला घेण्याची युक्ती त्यांना सुचली. राजा पद्मास पूर्वीच्या वरदानाचे स्मरण देऊन त्याच्यापासून त्याचे राज्य सात दिवसासाठी आपल्याकडे मागून घेतले. ते मिळाल्यावर बलीने मुनीसंघाच्या चारहि बाजूस मोठ्या भिंती उभारून त्यांत पुरुषमेध यज्ञ करण्याची सर्व पूर्वयोजना केली.

इकडे मुनीवर हा उपसर्ग सुरू झाला. हे मिथिला नगरीतील एका निमित्तज्ञानी (शकुनज्ञ) मुनीस समजून आले. त्यावेळी त्याच्या मुखातून 'अरेरे अरेरे!' असे खेदप्रदर्शक उद्‌गार निघाले जवळच

असलेल्या एका क्षुल्लकाने याचे कारण विचारले. तेव्हा त्यांनी सर्व हकीकत सांगून विष्णुकुमार मुनींना विक्रीया ऋद्धि प्राप्त झाली आहे व मुनीवरील हे संकट ते दूर करू शकतात असे त्यांनी क्षुल्लकांना सांगितले क्षुल्लक तावडतोव विष्णुकुमार मुनीजवळ गेले व त्यांना सर्व हकीकत सांगितली. विष्णुकुमारमुनि हस्तीनापूरच्या पद्मराजाचे बंधुच होते. ह्यांनी पद्म राजाजवळ जाऊन त्यास विचारले 'पद्मराज हे तू काय आरंभिले आहेस! कुरुवंशांत असा अनर्थ कधीहि झालेला नाही. जर राजाच तपस्वी लोकावर असा अनर्थ करू लागला तर तो दूर कोण करणार? पाणीच जर आग वाढवू लागले तर मग ती आग विझवि-णारा तरी कोण'? तेव्हा पद्म राजाने वलीस राज्यदान केल्याचा सर्व वृत्तांत निवेदन केला व या बाबत कांही करू शकण्यास आपण असमर्थ असण्याचेहि त्यांनी सांगितले. तेव्हा विष्णुकुमार मुनींनी वामनरूप धारण करून वलीच्या यज्ञात प्रवेश केला व त्यांना प्रार्थना करून तीन पावले जमीन मागितली वलीने जेव्हा दानाचा संकल्प केला तेव्हा विष्णुकुमार मुनींनी विक्रिया ऋद्धीच्या प्रभावाने आपले शरीर मोठे केले. त्यांनी आपला एक पाय मेरु पर्वतावर दुसरा मानुष्योत्तर पर्वतावर व तिसरा पाय ठेवण्यास जाग नसल्यामुळे तो आकाशातच लोंवकळू लागला. तेव्हा जिकडे तिकडे हाः हाः कार माजू लागला. देव देवता धावू लागले व ते मुनिजवळ प्रार्थना करु लागले की, महाराज आपण आपली विक्रीया कमी करा. आपल्या तपाच्या प्रभावाने तीनहि लोक डगमगू लागले आहे. तेव्हा वली राजास हाकलून देऊन त्यांनी आपली विक्रिया ऋद्धीचा संकोच केला. याप्रमाणे मुनीचा उपसर्ग दूर झाला.

वलीच्या अत्याचाराने सर्वत्र हाः हाः कार माजलेला होता व लोकांनी अशी प्रतिज्ञा केली होती की, जेव्हा मुनीवरील संकट दूर होईल तेव्हा त्यांना आहार देऊनच भोजन करु संकट दूर झाल्यावर

सर्व लोकांना दूध शेवयाचे हलके भोजन तयार केले. कारण मुनींना कित्येक दिवसाचा उपवास होता. मुनि केवळ ७०० शेच होते व तेवढ्याच घरी ते जावू शकत होते. तेव्हा बाकीच्या घरात त्याची प्रतिकृति बनवून त्यांना आहार देऊन आपली प्रतिज्ञा पुरी केली व सर्वांनी परस्पर एकमेकाचे रक्षण करण्याचे बन्धन बांधले.त्याची स्मृती म्हणूनच रक्षाबंधनाचा हा सण आजपर्यंत चालत आलेला आहे. भिंतीवर जी चित्राची रचना केली जाते त्यास 'सौन' म्हणतात. हा सौन शब्द श्रमण शब्दाचाचा अपभ्रंश आहे. प्राचीन काळी जैन साधूना श्रमण म्हणत असत याप्रमाणे सलूना किंवा रक्षा बंधनाचा सण जैनसणाच्या रूपाने जैना-मध्ये अजूनहि चालू आहे. या दिवशी विष्णुकुमार व सातशे मुनीची पूजा केली जाते व त्यानंतर आपआपसात राखी बांधून व भिंतीवर श्रमणांची चित्रे काढून आहारदान दिले जाते व नंतर सर्वजण भोजन करतात. तसेच गरीब ब्राह्मणांना दानहि दिले जाते.

## ३ तीर्थक्षेत्र.

साधारणतः ज्या ठिकाणी लोक यात्रा करण्यास जातात ते ठिकाण तीर्थ म्हणविले जाते तीर्थ शब्दाचा अर्थ घाट. म्हणजे स्नान करण्याची जागा असाहि होतो. परंतु अशा प्रकारचें तीर्थस्नान व स्थान जैनात मानलेले नाही, नदीच्या पाण्याने पापाचा नाश होतो ही गोष्ट हिंदूनी मानली आहे पण जैनांनी मानली नाही. तसेच सती जाण्याची पद्धत हिंदू लोकांत असल्यामुळे ज्या ठिकाणी स्त्रिया सती गेल्या ती स्थानेहि तीर्थस्थाने समजली जातात. परंतु तीहि चाल जैनात रूढ नाही. जैन मताप्रमाणे तीर्थ शब्दाचा एकच अर्थ आहे. तो म्हणजे संसार समुद्रपार करण्याचे मार्ग दाखविणारे महापुरुषाचे जन्मापासून निर्वाण.पर्यंतची स्थानें या दृष्टीने ज्या ठिकाणी तीर्थंकराची जन्मादिक पाच कल्याणिके झाली असतील किंवा पूज्य व्यक्ती, मुनि वगैरेनी ज्या ठिकाणाहून

निर्वाण प्राप्ती करून घेतली असेल ते ठिकाण म्हणजेच तीर्थ मानले जाते.

अशा तीर्थांची संख्या जैनात पुष्कळ आहे. ती सर्व येथे सांगणें शक्य नाही कारण जैनधर्माच्या अवनतीमुळे अनेक प्राचीन तीर्थे आज विस्मृत झालेली आहे व कित्येक ठिकाणावर जैन मूर्ति किंवा देवतांची पूजा दुसऱ्याकडून केली जाते. उदा० – प्राख्यात बद्रीनाथाच्या मंदिरातील भ० पार्श्वनाथाची मूर्ति भद्रीविशाल यानांवाची सर्व हिंदू-कडून पूजली जाते त्यावर चंदनाचा मोठा लेप थोपून किंवा हात वगैरे लावून त्याचे स्वरूप बदलून दिले जाते. यासाठीच जेव्हा प्रात काळी मूर्ति शृंगार करविला जातो. तेव्हा कोणास तेथे येऊ दिले जात नाही.

जैनधर्माचे दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही संप्रदायात तीर्थस्थाने आहेत. त्यापैकी पुष्कळशी अशी तीर्थे आहेत जी दोघांनाहि पूज्य आहेत. तर पुष्कळसे असे आहेत की, ती केवळ दिगंबरांना किंवा फक्त श्वेतांबरांना मान्य आहेत. किंवा एक संप्रदाय एकच स्थानास पूज्य मानतो तर दुसरा संप्रदाय दुसऱ्या स्थानास कैलास, चंपापूर, पावापूर, गिरनार, शत्रूंजय, सम्मेदशिखरजी इत्यादि अशी तीर्थे आहेत की जी दोघानाहि पूज्य आहेत तर गजपंथ, मांगीतूंगी, पावागिरी, द्रोणगिरी, मेंढगिरी, कुथलगिर, सिद्धवरकुट, बढवानी इत्यादि तीर्थ फक्त दिगंबर संप्रदायांना मान्य आहेत. तर अबू, शंखेश्वर इत्यादि तीर्थ श्वेतांबर संप्रदाय मानतो. या ठिकाणी प्रसिद्ध प्रसिद्ध तीर्थक्षेत्राच्या सामान्य परिचय प्रांतवारीने दिला जात आहे.

## बिहार प्रदेश

सम्मेद शिखर:– हजारी बाग जिल्ह्यात जैनाचे हे एक अति प्रसिद्ध व अत्यंत पूज्य असे क्षेत्र आहे या क्षेत्रात दिगंबर व श्वेतांबर दोघेहि सारख्याच रीतीने मान देतात व पूजतात. श्री वृषभदेव, वासु-पूज्य, नेमिनाथ व महावीर यांच्या शिवाय बाकीच्या २० तीर्थकरांनी

या पर्वतावरूनच निर्वाणप्राप्ती करून घेतली. २३वे तीर्थंकर श्री पार्श्वनाथ यांच्या नांवावरून यास किंवा हा पर्वत पार्श्वनाथ हिल या नांवाने प्रसिद्ध आहे. पूर्व रेल्वेवरील या स्टेशनचे नांवहि कांही वर्षापासून पार्श्वनाथ असे ठेवले आहे. या पर्वताच्या शिखरावर असलेल्या अनेक मंदिराचे दर्शन करण्यासाठी दरवर्षी हजारो दिगंबर व श्वेतांबर स्त्री पुरुष येत असतात. या पर्वतावरील संपूर्ण मंदिराचे व टोकाचे दर्शन घेण्याकरीता १८ मैलांचा फेरा पडतो व त्यास आठ तास लागतात.

पुलूआ पहाडः– हा पहाड जंगलात आहे व येथे गयेवरून जाता येते. याची चढण २ मैल आहे व यावर शेकडो जैन प्रतिमा खंडीत झाल्या आहेत येथे अनेक जैन मदिराचे भग्नावशेषहि सापडतात. कांही जैन मंदीर व प्रतीमा अखंडीतहि आहेत. असे म्हणतात की, या पहाडावर १० वे तीर्थंकर शीतलनाथ यानी तप करून केवलज्ञानाची प्राप्ती करून घेतली. इंडियन ॲन्टीक्केरी मार्च १९०१, एका इंग्रजी लेखकाने असे लिहिले आहे की, प्राचीन काळी हा पहाड निश्चितपणे एक प्रसिद्ध जैन तीर्थ म्हणून असला पाहिजे, कारण दूर्गादेवीची एक नवीन मूर्ति व बौद्ध मूर्तिचा एक खंड या. शिवाय या पहाडावर जी चिन्हे सापडतात ती सर्व जैन तीर्थंकराचीच आहेत.

गुणावाः– हे भ० महावीराचे प्रथम गणधर गौतमस्वामी याचे निर्वाण क्षेत्र आहे. गया, पाटणा लाईनवर असलेल्या नवादा स्टेशनावरून हे दीड मैलावर आहे.

पावापूरः– गुणावावरून १३ मैलावर अंतिम तीर्थंकर भ० महावीराचे हे निर्वाण क्षेत्र आहे. त्याचे स्मारक म्हणून तलावाच्या मध्यभागी एक विशाल मंदिर असून त्यास जलमंदिर म्हणतात. या जलमंदिरात महावीरस्वामी, गौतमस्वामी व सुधर्मस्वामीच्या पादुका

स्थापन केल्या आहेत. आश्विन वद्य अमावश्येस भ० महावीरांच्या निर्वाणदिवशी या ठिकाणी फार मोठी यात्रा भरते.

राजगृही किंवा पंचपहाडी:- पावापुरीवरुन ११ मैल राजगृही आहे. एकेवेळी ही मगध देशाची राजधानी होती. येथे २० वे तीर्थंकर श्री मुनिसुव्रतनाथ यांचा जन्म झाला. राजगृहीच्या चारहि बाजूला पांच पर्वत आहेत. त्यांच्या मध्यभागी राजगृही वसलेली होती. यावरुन तिला पंचपहाडी असेहि म्हणतात. भ० महावीरांचा पहिला उपदेश या शहराच्या विपुलाचल पर्वतावर झाला होता. पांचहि पहाडावर जैनमंदिरे आहेत या सर्वांची वंदना करण्यास १५-१६ मैलाचा फेरा पडतो.

कुंडलपूर:- राजगृहीहून हे १० मैलावर आहे. भ० महावीरांचे हे जन्मस्थान असल्यामुळे हे एक पूजनीय क्षेत्र समजले जाते.

मंदारगिरी क्षेत्र:- भागलपूरहून ३० मैलावर हा एक छोटासा पहाट आहे. यासच १२ वे तीर्थंकर श्री वासूपूज्यस्वामी यांचे मोक्ष-स्थान मानले जाते. परंतु अलिकडे चंपापुरी हे पांचहि कल्याणिकाचे स्थान मानले जाते. भागलपूराहून चार मैल नाथनगर असून तेथून दोन मैलावर चंपापूर आहे.

पाटणा:- ही विहार प्रांताची राजधानी आहे. या शहरात गुलजार बाग स्टेशनाजवळ एका लहानशा टेकडीवर चरणपादुका आहेत येथून श्री सुदर्शन श्रेष्टीने मुक्तीलाभ करून घेतला. त्यांची जीवनकथा अत्यंत सुंदर व बोधप्रद आहे.

## उत्तर प्रदेश.

बनारस:-या शहराच्या भदैनीघाट मोहल्यात गंगेच्या किनाऱ्यावर दोन विशाल जैनमंदीरे व एक श्वेतांबर मंदीर आहे. सातवे तीर्थंकर भ० सुपार्श्वनाथ यांचे जन्मस्थान हेच मानले जाते. येथे जैनाचे अति

प्रसिद्ध स्वाद्वाद महाविद्यालय आहे यात संस्कृत व जैनधर्म विषयक अति उच्च स्वरूपानें चांगले शिक्षण दिले जाते. भेलुपूर मोहल्ल्यात दोन्ही संप्रदायाची मंदिरे आहेत. हे स्थान २३ वे तीर्थंकर भ. पार्श्वनाथ स्वामी यांची जन्मभूमि असल्यामुळे पूजनीय आहे. या प्रकारे बनारस हे दोन तीर्थंकरांचे जन्मस्थान असून शहरात आणखी पुष्कळशी जैन मंदिरे आहेत.

सिंहपूरी:- बनारस वरून ६ मैलावर सारनाथ नांवाचे एक गाव आहे. हे बौद्ध पुरातत्वाच्या दृष्टीने अति प्रसिद्ध आहे. या ठिकाणी एकेवेळी सिंहपूरी नावाची नगरी वसलेली होती व अकरावे तीर्थंकर श्री श्रेयांसनाथ यांचे हे जन्मस्थान होते. या ठिकाणी जैनमंदिर व धर्म शाळा आहे. दिगंबर जैनाचे मंदिर बौद्ध मंदिराच्या अगदी जवळ असून श्वेतांबर मंदिर थोडे दूर रेल्वें स्टेशनाजवळ बांधलेले आहें.

चंद्रपूरी:- सारनाथवरून ९ मैल दूर चंद्रवटी नावाचे गाव आहे. हे चंद्रपूरीचे भग्नावशेष म्हणून समजले जाते. या ठिकाणी ८ वे तीर्थंकर चंद्रप्रभू भगवान् यांचा जन्म झाला होता. गंगाकाठों दोन्ही संप्रदायाची मंदीर येथे निरनिराळी आहेत.

प्रयाग:- येथे त्रिवेणी संगमाच्या जवळच एक जुना किल्ला आहें किल्लयाच्या आत जमिनीत एक अक्षयवट (वडाचें झाड) आहे असे सांगतात की, श्री वृषभदेवांनी या ठिकाणी तप केले होते. किल्लयात प्राचीन जैन मूर्तीहि पुष्कळ आहेत.

फफौसा:- अलाहाबाद, कानपूर यांच्या मध्यभागी उत्तरीय रेल्वेवर भरवारी नावाचे स्टेशन आहे तेथून २०-२५ मैलावर हे एक छोटेसे गांव आहे. याच्या जवळच प्रभास नावाचा एक पर्वत आहे. वर चढ- ण्यासाठी ११६ पायऱ्या बांधलेल्या आहेत. असे सांगतात की, पहाडावर

६ वे तीर्थंकर पद्मप्रभु भगवंतानी तप केलें होते व येथेच त्यांना केवल-ज्ञानाची प्राप्ती झाली होती. येथे एक मंदिर आहे व मंदिराच्या समोरच कांही प्रतिमाहि आहेत.

कौशांबी:- फफौसापासून चार मैलावर गढवाय नांवाचे एक गांव आहे. त्याच्याजवळ कुशंवा हे गांव असून यास प्राचीन काळी कौशांबी नगरी म्हणत असत. या ठिकाणी भ० पद्मप्रभूच्या जन्म झालेला होता.

अयोध्या:- जैनशास्त्रास अनुसरून हे प्रसिद्ध शहर अति प्राचीन काळापासून जैनाचे मुख्य स्थान म्हणून समजले जाते. जैनांच्या पांच तीर्थंकरांचा जन्म या शहरीच झाला. येथे जैनांचे अनेक मंदिरे व धर्म-शाळा आहेत.

खस्वूंद:- गोरखपूराहून नॉर्थ इस्टर्न रेल्वेवर नोनखाड हे ३१ मैलावर एक स्टेशन आहे. येथून ३ मैल खखूंद गांव आहे याचे प्राचीन नांव किष्कीधा असे सांगितले जाते. हे श्री पुष्पदंत तीर्थंकरांचे जन्म-स्थान आहे व तेथील मंदिरात श्री पुष्पदंत भगवंताची मूर्ति विराजमान आहे.

सेटमेंट:- फैजाबादपासून गोंडा रस्त्यावर २१ मैल बलरामपूर आहे येथून १० मैलावर सेटमेंट आहे. याचे प्राचीन नांव श्रावस्ती असे सांगितले जाते. हे २०वेतीर्थंकर श्री संभवनाथ यांची जन्मभूमि आहे.येथे

रत्नपूरी:- हे ठिकाण फैजाबाद जिल्ह्यावरून सोहाबाल स्टेशना वरून दीड मैल आहे. ही धर्मनाथ स्वामीची ही जन्मभूमि आहे. येथे श्वेतांबर व दिगंबर या दोन्ही संप्रदायाची मंदिरे आहेत.

कंपीला:- हे तीर्थक्षेत्र फरूकाबाद जिल्ह्यात नॉर्थ इस्टर्न रेल्वेवर कायनगंज स्टेशनाहून ८ मैल आहे. येथे १३ तीर्थंकर श्री विमलनाथ यांची ४ कल्याणिके झाली दरवर्षी चैत्र महिन्यात येथे यात्रा भरून रथोत्सवहि होतो.

अहिक्षेत्र – एन०आर०च्या बरेली अलीगढ लाईनवर आवला स्टेशन आहे. तेथून ८ मैलावर रामनगर गांव आहे, त्याच्याजवळच हे क्षेत्र आहे. या क्षेत्रावर तपस्या करीत असतांना भ० पार्श्वनाथावर कमठाने घोर उपसर्ग केला होता व त्यांना येथेच केवलज्ञानाची प्राप्ती झाली. दरवर्षी फाल्गुन अष्टमीपासून द्वादशीपर्यन्त येथे यात्रा भरते.

हस्तिनापुरः– हे क्षेत्र मेरठहून २२ मैल आहे. येथे श्री. शांतिनाथ कुंथनाथ व अरहनाथ तीर्थकराचे गर्भ, जन्म, तप, ज्ञान अशी चारहि कल्पाणिके झाली. तसेच १९ वे तीर्थकर श्री मल्लिनाथ यांचेहि समवशरण येथे आले होते. या ठिकाणी दिल्लीचे लाला हरसुखदासजी यानी बनविलेलें एक जैन मंदीर व धर्मशाळा आहे.जवळच श्वेतांबराचेहि मंदिर आहे. धर्मशाळेपासून जवळ जवळ २–३ मैलांवर चारहि तीर्थकरांच्या चार अतिप्राचीन धर्मशाळा बांधलेल्या आहेत. दरवर्षी कार्तिक शुद्ध अष्टमी पासून पौर्णिमेपर्यंत येथे दिगंबर जैनाची मोठी यात्रा भरते.

चौरासीः– मथुरा शहरापासून अंदाजे १॥ मैलावर दिगंबर जैनाचे हे अत्यंत प्रसिद्ध असे सिद्धक्षेत्र आहे. परंपरेनुसार अंतिम केवली श्री जम्बुस्वामीची ही निर्वाणभूमि मानली जाते, येथे विशाल जैन मंदिर आहे व त्यांत त्यांच्या चरण पादुकांची स्थापना केलेली आहे दरवर्षी आश्विन वद्य २ पासून अष्टमीपर्यंत रथोत्सव होतो. येथे जवळच सुप्रसिद्ध कंकाली टीला (गढी)आहे व तेथूनच जैनपुरातत्त्व विभागाची जैन प्राचीन ऐतिहासिक सामुग्री बरीचशी उपलब्ध होते. या ठिकाणी भारत दिगंबर संघाचे संघभवन बनलेले आहे. त्यांत संघाचे मुख्य कार्यालय असून व एक विशाल सरस्वती भवन आहे. येथे श्री ऋषभ ब्रह्मचर्याश्रम ही एक चांगली शिक्षणसंस्था आहे.

सौरीपूरः– मैनपुरी जिल्ह्याच्या शिकोहाबाद या स्थानी तेरा मैलावर यमुना नदीच्या कांठी बटेश्वर नांवाचे एक प्राचीन गांव आहे.

गांवच्या मध्यभागी विशाल जैन मंदिर आहे. खाली धर्मशाळा आहे येथून एक मैल दूर जंगलात कांही प्राचीन मंदिरे व एक छत्री आहे. त्यांत श्री नेमिनाथ भगवंताच्या पादुका आहेत. या ठिकाणास श्री नेमिनाथाचे जन्मस्थान मानले जाते.

बुंदेलखंड व मध्यप्रांत.

ग्वाल्हेर:- हें तीर्थक्षेत्र नाही, परंतु येथील किल्ल्याच्या आसपास कड्यांच्या आधाराने पुष्कळशा दिगंबर जैनमूर्ती बनविलेल्या आहेत. श्री नेमिनाथ तीर्थंकरांची ३० फूट उंच व त्याहिपेक्षा भ० आदिनाथांची दुसरीहि विशाल मूर्ति आहे. लष्कर विभाग व ग्वाल्हेर मध्यें जवळ जवळ २५ दिगंबर जैन मंदिरे आहेत. यापैकी पुष्कळशी मंदिरे विशाल आहेंत.

सोनागिरि:- ग्वाल्हेर ते झांशी रेल्वे लाईनवर सोनागिरि नांवाचे एक स्टेशन आहे. त्याच्याजवळच २ मैलावर हें सिद्धक्षेत्र आहे. येथें एक लहानशी टेकडी आहे. टेकडीवर ७७ दिगंबर जैन मंदिरे आहेंत त्याची वंदना फक्त १॥ मैल फिरून पूर्ण होते. येथून पुष्कळसे मुनीश्वर मोक्षास गेले आहेत. खाली पायथ्याशी चार धर्मशाळा व १७ मंदिरे आहेत. येथें एक विद्यालयहि आहे.

अजयगढ:- हें स्थान अजयगढ संस्थानची राजधानी होती. याच्या जवळच एक टेंकडी आहें. त्यावर एक किल्ला आहें. त्याच्या भिंतीच्या दोन शिलाखंडामध्यें जवळ जवळ वीस दि० जैन मूर्ति कोरलेल्या आहेंत. जवळच तलाव आहें त्याच्याहि काठावर पुष्कळशा जैन प्रतिमा आहेंत. त्यापैकी एकीची उंची १५ फूट व दुसरीची १० फूट आहे. एक मानस्तंभहि असून त्यावर अनेंक मूर्ति कोरलेल्या आहेंत.

खजराहो:-पन्नापासून छतरापूरला जाताना २१ व्या मैलावर तीन वाटा एकत्र मिळतात. तेथून ७ मैलावर खजराहो आहे. हें लहानसे गांव

आहे, येथे दोन धर्मशाळा आहेत. सध्या येथे ३१ दिगंबर जैन मंदिरे असून येथील मंदिराची स्थापत्यकला अत्यंत प्रेक्षणीय आहे.

द्रोणागिरि:- छतरपूराहून सागर रस्त्याने ४० मैलावर साधनवा आहे तेथून उजवीकडे कच्च्या रस्त्याने ६ मैलावर सेंधवा नावाचे नाव आहे. गावाच्या जवळच एक पर्वत द्रोणगिरि म्हणून प्रसिद्ध आहे. येथूनच गुरुदत्त वगैरे वरेचसे मुनी मोक्षास गेले आहेत. पहाडावर २४ मंदिरे आहेत दरवर्षी चैत्र शुद्ध अष्टमीपासून चतुर्दशीपर्यंत मेळा भरतो

नैनागिरि:-हे क्षेत्र मध्यरेल्वेच्या सागर स्टेशनापासून ३० मैलावर आहे गावात एक धर्मशाळा व सात मंदिरे आहेत. धर्म शाळेपासून २ फर्लांगावर रेसेंदी-पर्वत आहे. येथून श्री वरदत्त वगैरें अनेक मुनी मोक्षास गेले आहेत. पर्वतावर २५ मंदिरें आहेंत. एक मंदिर तलावाच्या मध्यभागी आहे. प्रतिवर्षी शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत यात्रा भरते.

कुंडलपूर:- सेंट्रल रेल्वेच्या कटनी, वीना लाईनवर दमोह स्टेशन आहे तेथून जवळ जवळ २५ मैलावर हे क्षेत्र आहे. या ठिकाणी कुंडलाच्या आकाराचा एक पर्वत आहे. यावरूनच बहुधा याचे हे नांव पडले असावे. पर्वतावर व त्याच्या पायथ्याशी मिळून ५९ मंदिरे आहेत. पर्वतावरील मंदिराच्या मध्यभागी एक मोठे मंदिर असून त्यात एक पहाडातून कोरलेली अशी जैनमूर्ती आहे. ही मूर्तीपद्मासनावर असूनहि हीची उंची ९-१० फूटापेक्षा कमी नाही. येथे ही भ० महावीरांची मूर्ती आहे. या प्रांतात ह्या मूर्तीची मान्यता फार मोठी आहे व दर्शनपूजना-साठी दूरदूरून लोक येथे येतात. हिच्या महात्म्यासंबंधी अनेक दंत-कथा प्रचलित आहेत. महाराज छत्रसालांच्या वेळी त्याच्याच प्रेरणेने येथील जिर्णोद्धार झाला होता, असा शिलालेखहि अंकित आहे.

सागरपासून ४८ मैलावर वीणाजी क्षेत्र आहे. येथे तीन जैन मंदिरे

असून यात एक प्रतिमा शांतिनाथ भगवंताची १४ फूट उंच व दुसरी महावीर स्वामीची १२ फूट उंच आहे आणि दुसऱ्याहि पुष्कळ सुंदर मूर्ति आहेत. सागरहून ३८ मैलावर मालथौन गांव आहे. येथून एक मैलावर जैन मंदिर असून येथे १० यार्डापासून २४ यार्डापर्यंत उंचीच्या खड्गासनस्थ अनेक प्रतिमा आहेत. ललितपूराहून मैलावर सैरोन गांव आहे. तेथून अर्ध्या मैलावर ५-६ प्राचीन जैन मंदिरे आहेत. चारहि बाजूनी कोट आहे, येथे एक २० यार्ड उंचीची श्री शांतिनाथ भगवंताची मूर्ति असून ४-५ फूट उंचीच्या शेकडो खंडित मूर्ती आहेत.

देवगड:- मध्य रेल्वेच्या ललितपूर स्टेशनाहून १९ मैलावर एका डोंगरावर हे क्षेत्र आहे. खरोखरी नावाप्रमाणेच हे 'देवगड' आहे. येथे अनेक प्राचीन जिनालये असून अगणित खंडित मूर्तिहि आहेत. कलेच्या दृष्टीने येथल्या मूर्ती प्रेक्षणीय आहेत. कुशल कारागिरांनी आपल्या कौशल्याची पराकाष्ठा केली आहे. पाषाण मऊमेणासारखा झाला आहे जवळ जवळ दोनशे शिलालेख येथे कोरलेले आढळतात. सुंदर मानस्तंभ आहे. नैसर्गिक सौंदर्यहि अनुपम आहे. येथून सहा मैलावर चांदपूर ठिकाण आहे. येथेहि अनेक जैनमूर्ति असून त्यातील एक १४ यार्ड उंचीची शांतिनाथ तीर्थंकरांची मूर्ती आहे.

पपौरा:- विंध्यप्रांतात टीकमगड पासून कांही अंतरावर जंगलात हे क्षेत्र आहे. याच्या चारहि बाजूने कोट बनविलेला आहे. त्याच्या आत नव्वद मंदिरे असून तेथे एक वीर विद्यालयहि आहे कार्तिक शुद्ध चतुर्दशीपासून येथे प्रतिवर्षी एक यात्रा भरते.

अहार:- टीकमगडहून ९ मैलावर हे गांव आहे, येथून जवळ जवळ नऊ मैलावर एका उजाड ठिकाणी तीन दिगंबर जैन मंदिरे आहेत. एका मंदिरात २१ फूट उंचीची शांतिनाथ भगवंताची मूर्ति

मनोज्ञ मूर्ति आहे. ही मूर्ति खंडित होती व नंतर जोडून बरोबर केलेली आहे. वि. सं. १२३७ मध्ये तिची प्रतिष्ठा झाली. या मंदिराशिवाय येथे दुसरीहि अनेक मंदिरे आहेंत. परंतु बादशाही जमान्यात ती सर्व नष्ट केलेली आहेत. येथे अगणित खंडित मूर्ति अजूनहि दिसतात क्षेत्र व कलाप्रेमी गृहस्थाच्या दृष्टीने हे अत्यंत प्रेक्षणीय असून येथे एक पाठ–शाळाहि आहे.

चंदेरीः– हे ललितपूरहून २० मैलावर आहे. येथे एका जैन मंदिरात २४ वेदी बसविलेल्या आहेत व त्यात ज्या तीर्थकरांच्या शरी–राचा जसा रंग होता त्या रंगाच्याच २४ तीथकराच्या २४मूर्ती विराज–मान आहेत. अशा प्रकारची चौवीसी दुसरीकडे कोठेहि पाहावयास मिळत नाही. येथून ९ मैलावर बूढी चंदेरी आहे. येथे शेकडो जीर्ण शीर्ण जैन मंदिरे पाहावयास मिळतात, येथील प्रतिमा तर अति सौम्य व चित्ताकर्षक आहेत.

पचराईः– चंदेरीपासून ३४ मैलावर खनिपाधाना हे ठिकाण आहे. तेथून ८ मैलावर पचराई हे गांव आहे. येथें २८ जैन मंदिरे असून त्यांत जवळ जवळ १००० प्रतिमा आहेत. त्यातील अर्ध्या अधिक चांगल्या स्थितीत असून बाकीच्या खंडित आहेंत.

थूवनजीः– चंदेरीवरून ८ मैलावर हे क्षेत्र आहे. येथे २५ मंदिरे आहेत व बहुतेक प्रतिमा दगडातून कोरलेल्या आहेत. त्या खडगासनस्थ असून त्याची उंची २० ते ३० फूटापर्यंत आहे. बुंदेलखंडातील वर सांगितलेली ही सर्व क्षेत्रे दिगंबर जैनांचीच असून श्वेतांबराचा तेथे निवास नसल्यामुळे त्याचे एकहि तीर्थक्षेत्र तेथे नाही.

## विदर्भ व मध्यप्रदेश

अन्तरिक्ष पार्श्वनाथः– मध्य रेल्वेच्या आकोला (विदर्भ) स्टेशना–पासून सुमारे ४० मैलावर शिरपूर नांवाचे गांव आहे. गांवाच्या

गांवाच्या मध्यभागी एक मोठे अत्यंत प्राचीन दुमजली जैनमंदिर आहे व त्याच्या आजूबाजूस दोन्ही संप्रदायाच्या धर्मशाळा आहेत. तळ मजल्यावर एक शामवर्णाची २॥ फूट उंचीची पार्श्वनाथ स्वामीची प्राचीन प्रतिमा वेदीमध्ये अधर आहे. फक्त ऱ्जवीकडील गुडघ्याचा भाग कांहीसा जमिनीस टेकलेला आहे. यावरूनच ही प्रतिम. 'अंतिरिक्ष पार्श्वनाथ' या नांवाने प्रसिद्धीस आली आहे येथे दोन्ही संप्रदायांना आपआपल्या विधीनुसार पूजन करण्याची वेळ बांधून दिलेली आहे. सकाळी ६ ते ९ पर्यंत व दुपारी १२ ते ३ पर्यंत श्वेतांबर पूजन करतात तर ९ ते १२ व ३ ते ६ पर्यंत दिगंबर लोक पूजन करतात.

कारंजाः—आकोला जिल्ह्यात मुर्तिजापूर-स्टेशनापासून यवतमाळला जाणाऱ्या रेल्वेलाईनवर हे एक शहर आहे येथे तीन प्राचीन विशाल जैन मंदिरे आहेत. एका मंदिरात चांदी, सोने, हिरा, पोवळे, पन्ना वगैरे रत्नाच्या बहुमोल मूर्ती आहेत. येथे भट्टारकाच्या तीन गाद्या असून एक बालात्कार गणाची व दूसरी सेनगणाची व तिसरी काष्ठासंघाची आहे. बालात्कारगण व सेनगण मंदिरांत संस्कृत, प्राकृत जैन ग्रथांचें मोठे भांडार आहे. येथे श्री महावीर ब्रह्मचर्याश्रम नांवाची एक आदर्श शिक्षण संस्थाहि आहे.

मुक्तागिरिः— हे सिद्धक्षेत्र वऱ्हाडात एलिचपूरपासून १२मैलावर निर्जन अरण्यामध्ये पहाडावर आहे. पायथ्याशी धर्मशाळा आहे व जवळच एक छोटी टेकडी आहे. त्यावर चढण्यास पायऱ्या बनविलेल्या आहेत. डोंगरावर अनेक गुंफा असून त्यांत पुष्कळशा प्राचीन जैनप्रतिमा आहेत. गुंफाच्या आसपास ५२ मंदिरे आहेत. येथून अनेक मुनींनी मोक्षप्राप्ती करून घेतली आहे.

भातकुलीः— हे अतिशय क्षेत्र अमरावतीपासून १० मैलावर आहे.

येथे ३ दिगंबर जैन मंदिरे आहेत. त्यापैकी एकामध्ये श्री ऋषभनाथांची पद्मासनस्थ ३ फूट उंच मूर्ति विराजमान आहे या बाजूस या मूर्तीला फार मान्यता आहे. दरवर्षी कार्तिक वद्य पंचमीस मेळा भरतो.

रामटेकः– हे ठिकाण नागपूर पासून २४ मैलावर आहे. येथे दिगंबर जैनांची आठ मंदिरे आहेत. त्यापैकी एका प्राचीन मंदिरात १६ वे तीर्थंकर श्री शांतिनाथ स्वामी यांची १५ फूट उंचीची मनोज्ञ अशी प्रतिज्ञा विराजमान आहे.

राजपुताना व माळवा प्रांत.

श्री महावीरजीः– पश्चिम रेल्वेच्या नागदा–मथुरा लाईनवर श्री महावीरजी' नांवाचे स्टेशन आहे. येथून ४ मैलावर हे क्षेत्र आहे. येथे एक विशाल दिगंबर जैनमंदिर असून त्यांत महावीर स्वामीची मनोज्ञ प्रतिमा आहे, ही प्रतिज्ञा जवळच्याच एका टेकडीतून निघालेली होती. जैन व जैनेतर विशेषतः जयपूर येथील मीना व गुजर जातीची मंडळी अत्यंत श्रद्धेने व भक्तीने पूजा करतात. यात्रेकरूंची नेहेमी रीघ लागलेली असते. प्रतिवर्षी चैत्रवद्य प्रतिपदेस महावीर भगवंताच्या मूर्तीची संस्थानी इतमामासहित थाटाने मिरवणूक निघते. लाखो मीना लोकहि त्यावेळी जमतात व ते भगवतांची स्वारी नदीपर्यंत घेऊन जातात. तेथे मूर्तीचो वाट पाहात गुजर तयार असतात.मीना निघून जातात. मिरवणूक परत फिरतेवेळी गुजर भगवंताची ती सवारी परत आणतात. नंतर तेथे पुनः गुजराची यात्रा भरते.

चांदखेडीः– कोटा जिल्ह्यात खानपूर नावाचे एक प्राचीन शहर आहे. खानपूरहून दोन फर्लांगावर चांदखेडी नावाचे एक जुने खेडे आहे. येथे भूगर्भात अत्यंत मोठे असे जैनमंदिर आहे. त्या अनेक विशाल प्रतिमा आहेत. यांची संख्या ५७७ भरते. दरवाज्याच्या उत्तर

दिशेला एकाच पाषाणाचा १० फूट उंच असा कीर्ति-स्तंभ आहे याच्या चारहि बाजूला दिगंबर प्रतिमा खोदलेल्या असून तीन बाजूनी लेखहि आहेत

मक्सी पार्श्वनाथः– मध्य रेल्वेच्या भोपाल-उज्जैन लाईनवर या नावाचेच एक स्टेशन आहे हें पूर्वीच्या ग्वाल्हेर स्टेटमध्ये येते. येथून एका मैलावर एक प्राचीन मैन मंदिर आहे श्री पार्श्वनाथ स्वामीची पद्मासनी अशी अत्यंत मनोज्ञ २॥ फूट उंचीची एक मूर्ति विराजमान आहे. दोन्ही संप्रदायाचे लोक मूर्तीची पूजा करतात. परंतु त्यासाठी निरनिराळ्या वेळा नियुक्त केलेल्या आहेत. सकाळी ६ ते ९ पर्यंत दिगंबर संप्रदायाचे लोक पूजा करतात व इतर वेळ श्वेतांबरासाठी नियत आहे

विजोलिया पार्श्वनाथः- नीमचपासून ६८ मैलावर बिजोलिया संस्थान आहे. या गावाच्या जवळच पार्श्वनाथ स्वामीचे अत्यंत प्राचीन व रमणीय असे अतिशय-क्षेत्र आहे एका मंदिरात २३ प्रतिमा खोद–लेल्या आहेत. चारहि बाजूनी भिंतीवरहि अनेक मुनींच्याहि मूर्ति कोरलेल्या आहेत· एक विशाल सभा-मंडप, चार छत्र्या, दोन मानस्तंभ असून मानस्तंभावर प्रतिमा व शिलालेखहि आहेत.

श्री ऋषभदेव (केशरियाजी) उदेपूरहून सुमारे ४० मैलावर हे क्षेत्र आहे. येथे श्री ऋषभदेवाचे एक विशाल मंदिर आहे. त्याच्या चारहि बाजूनी कोट आहे. आत मध्यभागी एक मोठे संगमरवरी मंदिर असून त्यास उंच उंच ४८ शिखरे आहेत आंत गेल्यानंतर श्री ऋषभ–देवांचे मुख्य मंदिर आढळते. त्यामध्ये ६–७फूट उंचीची एक पद्मासनस्थ श्यामवर्णी दिगंबर जैन मूर्ति आहे, येथे केशर चढविण्याची इतकी अत्यधिक प्रथा आहे की, केशराने सर्व मूर्ति झाकली जाते. म्हणून या मूर्तीस 'केशरीयाजी' असेहि म्हणतात. श्वेतांबरी लोक या मूर्तीवर

कुंथलगिरिः– हे क्षेत्र बार्शी रेल्वेस्टेशनपासून जवळ जवळ २१ मैलावर एका छोटया पहाडावर आहे. येथून श्री. देशभूषण व कुलभूषण मुनी मोक्षास गेले आहेत. पर्वतावर मुनींच्या चरण पादुकांचे एक मंदिर आहे. (आता या ठिकाणी दोन मूर्तीहि प्रतिष्ठित झाल्या आहेत.) त्या सहित एकूण दहा मंदिरे आहेत. माघ पौर्णिमेस दरवर्षी येथे यात्रा भरते येथे एक गुरुकुलहि आहे.

धाराशिव-लेणी-(करकंडु गुंफा):– सोलापूराहून मोटारने कुंथल-गिरीस जात असताना मार्गात उस्मानाबाद नांवाचे एक शहर आहे. त्याचे जुने नांव धाराशिव असे आहे. येथून कांही मैल दूर 'तेर' नांवाचे गांव असून येथे प्राचीन जैनमंदिर आहे. धारशिवाच्या जवळच एक टेकडी असून तेथे कांही गुंफा आहेत. मुख्य गुंफा अत्यंत विशाल आहे. यामध्ये पांच फुटाची भ० पार्श्वनाथांची काळचा पाषाणाची एक बैठी मूर्ति विराजमान आहे व बाजूला एक सातफणी नागासहित पार्श्व-नाथांची मूर्ति आहे. तसेच आणखी दोन पाषाण तेथे आहेत, ज्यावर जैनमूर्ती खोदलेल्या आहेत. मुख्य गुंफेसहित येथे चार गुंफा आहेत. या सर्व गुंफात ज्या प्रतिमा आहेत. त्या मुख्यतः पार्श्वनाथ भगवानाच्या आहेत. महावीर स्वामीची एकहि प्रतिमा येथे नाही. यावरून हे क्षेत्र पार्श्वनाथ स्वामींच्या वेळी निर्माण केले गेले असावे. या गोष्टीस पुष्टि मिळते. करकंडु चरित्राप्रमाणे राजा करकंडूने ज्या गुंफा बनविल्या होत्या त्याच या गुंफा असल्याचे सांगितलें जाते.

विजापूरः– दक्षिण रेल्वेवर विजापूर नांवाचे एक जुने शहर आहे स्टेशनच्या जवळच एक चांगले संग्रहालय आहे. यांत अनेक जैनमूर्ती ठेवलेल्या आहेत. एक मूर्ति तीन हात उंचीची भ० पार्श्वनाथांची आहे. त्यावर संवत् १२३२ लिहिलेला आहे. येथून दोन मैलावर एक मंदिर आहे व त्यांतहि श्री पार्श्वनाथ भगवंतांची सहस्त्रफणयुक्त

प्रेक्षणीय मूर्ति आहे. येथून १७ मैलावर बावानगर आहे,येथे एक प्राचीन जैन मंदिर आहे. त्यांत भ० पार्श्वनाथांची हिरव्या पाषाणाची दीड हात उंचीची पद्मासनस्थ मूर्ति विराजमान आहे. या मूर्तीचा बराच अतिशय असून तिच्यासंबंधी अनेक दंतकथाहि प्रचलित आहेत.

बदामीचे गुंफा मंदिरः— विजापूर जिल्ह्यांत बदामी हे एक छोटे गांव आहे. याच्या जवळ दोन पहाडी किल्लें आहेत. दक्षिण पहाडाच्या बाजूस सहाव्या शतकांत बनविलेली हिंदूंची तीन व जैनांचे एक गुंफा मंदिर आहे. जैन गुंफा मंदिरांत अनेक प्रेक्षणीय मूर्त्या आहेत. हे मंदिर चालुक्य वंशाचा राजा पुलकेशी याने बांधविले आहे.

बेळगांवः— सदर्न रेल्वेवर हे शहर वसलेले आहे. शहराच्या पूर्वेस एक प्राचीन किल्ला आहे. असे सांगतात की येथे १०८ जैन मंदिरे होती. ती सर्व पाडून विजापूर बादशहाच्या सरदाराने येथे किल्ला बांधला होता. आता येथे फक्त तीन मंदिरें आहेत. त्यांची कारागिरी व नक्षीकाम आजहि प्रेक्षणीय आहे. बेळगांव जिल्ह्यात स्तवनिधी नांवाचे एक क्षेत्र आहे. येथे ५–६ जैन मंदिरे आहेत व त्यांत अनेक जैनमूर्ति आहेत.

श्रीबाहुबली–कुंभोजः— मिरज कोल्हापूर लाईनवर हातकणंगले स्टेशनपासून चार मैल अंतरावर एका पहाडावर हे क्षेत्र असून ३ मंदिरे आहेत. पायथ्याशी श्री बाहुबली भगवंतांची २८ फूट उंच नवीन मनोज्ञ प्रतिमा प्रतिष्ठित झाली आहे. येथे श्री बाहुबली ब्रह्मचर्याश्रम ही विशाल संस्था आहे.

## म्हैसूर–मद्रास–प्रान्त

हुम्मस पद्मावतीः— म्हैसूर प्रदेशांत शिमोगा शहर आहे. तेथून तीर्थहल्लीवरून 'हुम्मस पद्मावती' क्षेत्रास जातात. येथे कित्येक मंदिरे

आहेत. त्यांतील एक मंदिर अत्यंत विशाल व बहुमोल आहे. येथे मोठ-मोठ्या गुंफा आहेत, व प्रतिमाहि आहेत.

वरांगः- दक्षिण कॅनरा जिल्ह्यात हे एक लहानसे गाव आहे. येथून कांही अंतरावर तटाच्या आत एक विशाल मंदिर आहें. तेथे पांच वेदी आहेत व त्यात बऱ्याचशा प्राचीन प्रतिमा आहेत. तलावाच्या मध्ये एक मंदिर आहे. हें मंदिर लहान असले तरी अत्यंत सुंदर आहे.

कारकलः- वरांग पासून १५ मैलावर हे एक चांगले स्थान आहे. हे दिगंबर जैनाचे प्राचीन असे तीर्थस्थान आहे. येथे १८ जिनमंदिरे आहेत एका पर्वतावर श्री बाहुबली स्वामीची ३२ फूट उंचीची खड्गासनस्थ एक मंदिर आहे. त्यामध्ये चारहि बाजूनी खड्गासनस्थ तीन तीन विशाल प्रतिमा आहेत कारागिरीच्या दृष्टीनेहि हे मंदिर प्रेक्षणीय आहें

मुडबिद्रीः- कारकलहून १० मैलावर हे एक चांगले गाव आहे. येथे १८ मंदिरे आहेत. त्यापैकी एक अति विशाल आहे. त्याचे नाव त्रिभुवन-तिलक-चूडामणि हे आहे. याच्या भोवती एक कोट आहें हे मंदिर तीन मजली आहे. खाली आठ वेदी आहेत. त्यावर चार वेदी आणि त्याहिवर तीन वेद आहेत. एक मंदिर सिद्धांत - बस्ती या नावाने प्रसिद्ध आहें. हे दुमजली आहे. या मंदिरात दिगंबर जैनाचे प्रख्यात ग्रंथ श्री धवल, जयधवळ व महाबन्ध कानडी लिपीत ताडपत्र्यावर लिहिलेले असून ते अगदी सुरक्षित आहेत. याच मंदिरात ३७ मूर्ती पन्ना, पुखराज, गोमेध, पोवळा, नीलम इत्यादि रत्नांच्या आहेत जैन भट्टारक श्री चारुकीर्ति पंडिताचार्य यांची गादी आहें व प्राचीन जैन ग्रंथाचा येथे चांगला संग्रहहि आहें.

वेणूरः- नदीच्या कांठी हे एक अगदी लहानसे गाव आहे. गावाच्या पश्चिमेस एक कोट आहे त्याच्या आत श्री गोमट स्वामीची

३१ फूट उंचीची प्रतिमा आहे व गावात अनेक जैन मंदिरे आहेत.

वेलूर-हलेवीड:– म्हैसूर प्रदेशात हासन शहराच्या उत्तरेस ही दोन्ही गांवे एकमेकापासून १२ मैल अंतरावर आहेत. या ठिकाणची मूर्तिकला सर्व ठिकाणापेक्षा अपूर्व मानली जाते. एकेवेळी ही शहरे राजधानी म्हणून प्रसिद्ध होती, आज कलेचे आगर म्हणून प्रसिद्ध आहेत यांच्या जवळच अनेक मंदिरें आहेत. ती सर्व दिगंबर जैन संप्रदायाची आहेत त्यावर उच्च प्रकारची कलाकृति व कारागिरी दिसून येते.

श्रवणबेळगोळा:– हासन जिल्ह्याच्या अंतर्गत ज्या तीन स्थानानी म्हैसूर प्रदेश विश्वविख्यात बनलेला आहे ती ठिकाणं वेलूर, हलेवीड व श्रवणबेळगोळ होत हासनच्या पश्चिमेस श्रवणबेळगोळ आहे. हासन पासून येथे जाण्यास मोटाराने चार तास लागतात. श्रवणबेळगोळ येथे चंद्रगिरि व विंध्यगिरि नांवाचें दोन पहाड जवळ जवळ आहेत. या दोन्ही पर्वताच्या मध्यभागी एक चौकोनी तलाव आहे, याचे नांव 'बेळगोळ' म्हणजे 'पांढऱ्या स्वच्छ पाण्याच्यां तलाव' असे आहे. येथे श्रमण येऊन राहिल्यामुळे या गांवास श्रवणबेळगोळ असे नांव पडले हे दिगंबर जैनांचे एक मोठे तीर्थस्थान आहे येथे मौर्य सम्राट चंद्रगुप्त आपले गुरु भद्रबाहू यांच्याबरोबर स्वतःचे शेवटचे दिवस गुरुसमीप घालविण्यासाठी आलेले होते. गुरुच्या वृद्धावस्थेमुळे त्यांनी चंद्रगिरीवर सल्लेखना धारण करून शरीर त्याग केला. पुढे चंद्रगुप्ताने गुरुंच्या चरपादुकांची बारा वर्षे पूजा करून शेवटी समाधि धारण करून आपली जीवन-यात्रासंपविली.

विंध्यगिरि नांवाच्या पहाडावर गोमटेश्वरांची विशालकाय सुंदर मूर्ति विराजमान आहे. या पर्वताची उंची ४७० फूट आहे व वर जाण्यासाठी पायऱ्या पहाडात कोरलेल्या आहेत. काका कालेलकरांच्या शब्दांत 'मूर्तीचे सगळे शरीर भरीव, यौवनपूर्ण, नाजुक व कांतिमान

अंगी मुकुट व शेंदूर सुद्धा चढवितात. या देवस्थानाचीहि विशेष मान्यता आहे. दोन्ही संप्रदायाचे लोक या मूर्तीची अत्यादरांने पूजा करतात.

अबू–पर्वत:–पश्चिम रेल्वेवरील अबू रोड स्टेशनापासून अबू पहाडाकडे मोटारी जातात. पहाडावर सडकेच्या उजव्या बाजूस एक दिगंबर जैन मंदिरे आहे. तसेच डावीकडे दिलवाडाची प्रसिद्ध श्वेतांबर मंदिरे निर्माण झालेली आहेत, त्यापैकी एक मंदिर विमलशहाने वि. सं. १०८८ मध्ये १८ कोटी ५३ लाख रुपये खर्चून व दुसरे मंदिर वस्तुपाल तेजपाल यांनी १२ कोटी ५३ लाख रुपये खर्च करून बनविले आहे. संगमरवरी पाषाणावर टांकी चालवून जी नक्षी येथे केलेली आहे ती अत्यंत प्रेक्षणीय अशी आहे. दोन्ही विशाल मंदिराच्या मध्ये एक दिगंबर जैन मंदिरहि आहे.

अचलगड:– दिलवाडापासून ५ मैलावर अचलगड आहे. येथे तीन श्वेतांबर मंदिरे आहेत. त्यापैकी एका मंदिरात सप्त धातूंच्या १४ प्रतिमा विराजमान आहेत.

सिद्धवरकूट:–इंदौरहून खंडवा लाईनवर मोरटक्का नांवाचे स्टेशन आहे. जवळच नर्मदेच्या कांठी ओंकारेश्वर आहे. तेथून नांवेमध्ये बसून सिद्धवरकूटला जाता येते. हे क्षेत्र रेवा नदीच्या कांठावर आहे. येथून दोन चक्रवर्ती, दहा कामदेव व ३॥ कोटी मुनींनी मुक्तिलाभ करून घेतला आहे.

ऊन:– खंडव्याहून मोटारीने ऊनला जाता येते. तीन चार तासाचा रस्ता आहे. येथे एक प्राचीन मंदिर आहे. जे संवत १२१८ मध्ये बांधविलेले आहे. याशिवाय दुसरीहि दोन प्राचीन जैन मंदिरे जीर्णावस्थेत आहेत. कांही वर्षापूर्वीच या क्षेत्राची माहिती मिळालेली आहे. यास ‘ पावागिरि ’ सिद्धक्षेत्र असेहि म्हणतात.

वडवानी:- वडवानीहून ५ मैलावरील पहाडावर गेल्यावर वडवानी क्षेत्र मिळते. वडवानी गावाच्या जवळ हे असल्यामुळें या क्षेत्रास हे नांव पडले आहे. वास्तविक याचे नांव ' चूलगिरि ' हे आहे. या क्षेत्रावरून इंद्रजित व कुंभकर्ण यांनी मुक्ति मिळविली आहे. क्षेत्राच्या वंदनेस जाताना सर्वात अगोदर एका विशालकाय मूर्तिचे दर्शन घडते. ही खड्गासनस्थ मूर्ति भ० वृषभदेवांची असून ८४ फूट उंच आहे म्हणून या मूर्तीस ' बावनगजाजी ' असेहि म्हणतात. संवत् १२२३ मध्ये ह्या मूर्तीचा जीर्णोद्धार झाला असा उल्लेख सापडतो पहाडावर बावीस मंदिरे आहेत. दरवर्षी पौष शुद्ध अष्टमी पासून पौर्णिमेपर्यंत येथें वार्षिक यात्रा भरते.

## सौराष्ट्र–गुजराथ–प्रान्त

तारंगा:- हे प्राचीन सिद्ध-क्षेत्र गुजराथ प्रांताच्या महिकांठा जिल्ह्यांत पश्चिम रेल्वेवर तारंगाहिल् या नावाच्या स्टेशनापासून तीन मैल दूर पहाडावर आहे. येथून वरदत्त आदि ३।। कोटी मुनी मोक्षास गेले आहेत. येथे दोन्ही संप्रदायाची अनेक मंदिरे व छत्र्या आहेत.

गिरनार:- सौराष्ट्रांत जुनागडच्या जवळ हे सिद्धक्षेत्र विद्यमान आहे. जुनागड स्टेशनपासून ४-५ मैलावर गिरनार पर्वताचा पायथा लागतो. येथे दोन्ही संप्रदायाच्या धर्मशाळा असून पहाडावर चढण्या–साठी धर्मशाळेच्या जवळूनच बांधीव पायऱ्यांना प्रारंभ होतो. व त्या शेवटपर्यंत आहेत. २२ वे तीर्थंकर श्री नेमिनाथ भगवानांनी याच पहाडाच्या सहस्त्रांम्र वनांत दीक्षा घेऊन तप केले होते व येथेंच त्यांना केवलज्ञानाची प्राप्ति झाली असून येथूनच ते मोक्षासहि गेले. त्यांची वाग्दत्त वधू राजीमती यांनी सुद्धा त्याच ठिकाणी दीक्षा

घेतली होती. पहिल्या पहाडावर पोहोचल्यावर एका गुंफेत राजुल-देवीची मूर्ति आढळते. येथे दोन्ही संप्रदायाची अनेक मंदिरे आहेत. दुसऱ्या पहाडावर चरण पादुका असून येथून अनिरूद्ध कुमारांनी मोक्ष-प्राप्ति करून घेतली आहे. तिसऱ्या पहाडावरून शंभुकुमार मोक्षास गेले. चवथ्या पहाडावर चढण्यासाठी पायऱ्या नाहीत, त्यामुळे त्याच्यावर चढणे अत्यंत कठिण आहे. येथून श्रीकृष्णाचे पुत्र प्रद्युम्नकुमार हे मोक्षास गेले व पांचव्या पहाडावरून भ० नेमिनाथ हे मोक्षास गेले. सर्व ठिकाणी पादुका आहेत. कांही ठिकाणी पहाडात कोरलेल्या जैन-मूर्तीहि आहेत. जैन संप्रदायात शिखरजी प्रमाणेच या क्षेत्रास अत्यंत मान्यता आहे.

शत्रुंजयः— पश्चिम रेल्वेच्या पालीताना स्टेशनाहून १॥-२ मैल अंतरावर पहाडाचा पायथा आहे. तेथूनच पहाडाच्या चढाईस प्रारंभ होतो. रस्ता सरळ आहे. या पहाडावर श्वेतांबराच्या जवळ जवळ ३॥ हजार वेदी आहेत. ज्यासाठी करोडो रुपये खर्च झाले आहेत. श्वेतांबर संप्रदाय सर्व तीर्थापेक्षा या तीर्थास फारच मानतो. दिगंबराचे येथे फक्त एकच मंदिर आहे पालीताना शहरातहि श्वेतां-बराच्या २०-२५ धर्मशाळा व अनेक मंदिरे आहेत येथे एक आगम मंदिरहि नुकतेच तयार झाले आहे. त्यात पाषाणावर श्वेतांबराचे सर्व आगम खोदलेले आहेत. येथून तीन पांडुपुत्र व अनेक मुनी मोक्षास गेलेले आहेत.

पावागडः— वडोदापासून २८ मैलावर चांपानेरच्या जवळ पावागड हे सिद्धक्षेत्र आहे. हें पावागड म्हणजे एक मोठा विशाल पहाडी किल्लाच आहे. पहाडावरील चढण्याच्या मार्गावर खडेच खडे पसरलेले आहेत. पहाडावर आठ दहा मंदिराचे खंडावशेष आहेत. यांचा जीर्णोद्धार केलेला आहे. येथून श्री. रामचंद्रांचे पुत्र लवकुमार

व कुंथकुमार आणि इतर अनेक मुनी मोक्षास गेलेले आहेत.

## महाराष्ट्र

मांगीतुंगी:– हे क्षेत्र नाशिक जिल्ह्यातील गजपंथ क्षेत्राहून ८० मैलावर आहे. तेथे जवळ जवळ पर्वताची दोन टोके आहेत त्यापैकी एकाचे नांव 'मांगी' व दुसऱ्याचे नांव 'तुंगी' हे आहे. मांगी शिखराच्या गुंफेमध्ये साधारणपणे साडेतीनशे प्रतिमा व चरण पादुका आहेत. आणि तुंगी पहाडात जवळ जवळ तीस प्रतिमा आहेत. येथे साधूंच्याहि अनेक प्रतिमा आहेत. साधुप्रतिमांच्याजवळ पिछी कमंडलु असून त्या साधूंच्या खाली त्यांची नांवे लिहिलेली आहेत. दोन्ही पर्वताच्या मध्यभागी एक स्थान आहे. ज्या ठिकाणी बलभद्रांनी श्रीकृष्णाचा अंत्यसंस्कार केला होता, अशी दंत कथा आहे. येथूनच श्री रामचंद्र, हनुमान, सुग्रीव वगैरेंनी निर्वाण प्राप्ती करुन घेतली आहे

गजपंथ:– नाशिकच्या जवळ म्हसरूळ नामक खेड्याच्या जवळ लहानशा टेकडीवर हे सिद्ध–क्षेत्र आहे. चढण्यास पायऱ्या असून येथून बलभद्र व यदुवंशीय राजानी मोक्षप्राप्ति करुन घेतली आहे.

एलोरा (वेरूळ):– मनमाड जंक्शन स्टेशनहून ६० मैलावर (औरंगाबादपासून १८ मैलावर) वेरूळ गांव आहे. गांवाजवळच पहाडात कोरलेल्या विशाल जैन अजैन गुंफा कोरीव लेण्याबद्दल विश्वा मध्ये हे क्षेत्र प्रसिद्ध आहे. येथील ३१, ३२, ३३ व ३४ नंबरच्या जैन लेण्या वैशिष्टचपूर्ण दर्शनीय आहेत. जवळच श्री पार्श्वनाथाचे स्वतंत्र मंदिर असून त्यामध्ये १२॥ फूट उंच मनोज्ञ प्रतिमा विराजमान आहे. खाली उतरताना इतर गुंफाहि लागतात. त्या जीर्णावस्थेत आहेत ( येथेहि श्री पार्श्वनाथ ब्रह्मचर्याश्रम गुरुकुल नवीनपणे सुरु झालेले आहे. )

आहे. एकाच पाषाणातून तयार केलेली इतकी दुसरी सुंदर मूर्ति जगांत दुसरीकडे कोठेहि नाही, इतकी ही मोठी मूर्ति अति स्निग्ध आहे व भक्तिभराने लोकांचे मन आपल्याकडे आकृष्ट करून घेते. ऊन, हवा व पाणी यांच्यामुळे मागच्या व वरच्या बाजूस कांहीसा पातळ थर निघू लागला असूनहि या मूर्तीचे लावण्य कमी झालेले नाही. या मूर्तीची स्थापना १००० वर्षापूर्वीच गंगवंशाचे सेनापति व मंत्री चामुंडराय यांनी करविली होती. या पर्वतावर लहान मोठी सर्व दहा मंदिरे आहेत.'

चंद्रगिरीवर चढण्यासाठीहि पायऱ्या आहेत. पर्वतावर मध्यभागी एक कोट बांधलेला आहे. त्याच्या आंत मोठमोठी अति प्राचीन १४ मंदिरें आहेत. मंदिरांत मोठमोठ्या विशाल प्राचीन जैन प्रतिमा आहेत. एका गुंफेत श्री भद्रबाहूच्या चरण पादुका साधारण १ फूट लांबीच्या आहे. ऐतिहासिक दृष्टीने हा पहाड अति महत्वपूर्ण आहे. कारण यावर पुष्कळसे प्राचीन शिलालेख आढळतात. त्यांचे मुद्रण झालेले आहेत. पर्वताच्या पायथ्याशी वसलेल्या गांवांत ७ मंदिरे व १३ चैत्या- लये आहेत. एका मंदिरात चित्रकलेने सुशोभित असे कसोटी पाषाणाचे स्तंभ आहेत. येथे श्री भट्टारक चारूकीर्ति महाराजांची गादी आहे. यांच्या मंदिरातहि कांही रत्नाच्या प्रतिमा आहेत व शास्त्रभांडारहि चांगला समृद्ध आहे, येथे एक दिगंबर जैन पाठशाला आहे. या प्रांतांत दुसरीहि अनेक ठिकाणे आहेत, या ठिकाणची जैन मंदिरे व मूर्ती प्रेक्षणीय आहेत.

### ओरीसा प्रांत.

खंडगिरिः- ओरीसा प्रदेशाची राजधानी कटक आहे. या शह- राच्या आसपास हजारो जैन प्रतिमा आहेत. परंतु ओरीसात जैनाची संख्या कमी झाल्यामुळे त्यांच्या रक्षणाचा कांहीच प्रबंध नाही. कटक- हूनच सुप्रसिद्ध खंडगिरी व उदयगिरीस जाता येते. भुवनेश्वराहून

५ मैलावर पश्चिमपुरी जिल्ह्यात खंडगिरि व उदयगिरि नांवाच्या दोन टेकड्या आहेत. दोन्हीवर पाषाणांना कोरून अनेक गुंफा व मंदिरे बनविलेली आहेत. ती इसनापूर्वी पन्नास (५०) वर्षापासून ते तदनंतर ५०० वर्षापर्यंत बनविलेली आहेत. उदयगिरीच्या हत्ती गुंफेत कलिंग चक्रवर्ती जैन सम्राट खारवेल यांचा इतिहास–प्रसिद्ध शिलालेख अंकित आहे.

## जैनधर्म व इतर धर्म.

जैनधर्माच्या आवश्यक गोष्टीच्या परिचय करून दिल्यावर त्याचा इतर धर्माशी कांही संबंध आहे काय व तो कसा? या गोष्टीवर एक ओझरता दृष्टिक्षेप टाकणे अयोग्य ठरणार नाही, कारण त्यामुळे वर सांगितलेल्या गोष्टीवर अधिक प्रकाश पडून जैन धर्माच्या परिस्थितीचे यथार्थ आकलन होण्यास व त्या संबंधीच्या असलेल्या अनेक चुकीच्या कल्पना दूर सारण्यास अधिक मदत होऊ शकेल.

भारत वर्षातील अनेक धर्मापैकी हिंदुधर्म व बौद्धधर्म हे दोनच धर्म असे आहेत की, ज्यांच्या बरोबर जैनधर्माचा अनुकूल वा प्रतिकूल संबंध आला आहे. भारतीय या नात्याने हे तीनहि धर्म परस्परांच्या आवती भोवती राहिले आहेत. प्रत्येक धर्माने इतर दोनहि धर्मावरील उत्कर्षापकर्षाचे दिवस पाहिले आहेत व परस्पराने एकमेकांवर प्रहार केले व झेललेहि आहेत आणि असे असूनहि एकमेकांचा एकमेकावर प्रभाव पडल्याशिवाय राहिलेला नाही.

## १ जैनधर्म व हिंदुधर्म.

हिंदुधर्म म्हणजे वैदिक धर्म असून त्यास सनातन धर्म असेहि म्हटले जाते. कारण हा शब्द या अर्थानेच सर्वत्र रूढ झालेला आहे. कांही कांही लोक ‘ हिंदू ’ शब्दाची अशीहि व्याख्या करतात की, त्यांत

जेनत्र ी सुद्धा समाविष्ट केला जाऊ शकतो. परंतु रूढ अर्थाच्या प्रभावा पुढे यौगिक शद्बाकडे सहसा कोणी लक्ष देत नाही व दुसरे असे की, अशा व्याख्या करण्याच्या पाठीमागे वहुधा असा उद्देश असतो की, जैनधर्म हा हिंदुधर्म या नावाने समजल्या जाणाऱ्या वैदिक धर्माचे वंडखोर अपत्य आहे. परंतु ज्या निःपक्षपाती विद्वानांनी जैनधर्माचे मूलग्राही अध्ययन केले आहे, ते प्रामाणिकपणे जैनधर्मास भारताचा एक स्वतत्र धर्म मानतात आणि दोन्ही धर्माच्या तत्वांवर दृष्टिक्षेप केला असता ह्राच निष्कर्ष निघतो. तसेच या गोष्टीचा निर्णय दोन्ही धर्मांची शास्त्रे काय निर्णय देतात त्यावरत्र अधिक निर्भर आहे कारण दुसरें कोणतेहि इतर प्रमाण असे मिळू शकणार नाही की, जे या समस्येवर अधिक प्रकाश टाकू शकेल.

अगोदर आपण वैदिक साहित्यांच्या क्रमिक विकासाचा परिचयच पाहू. हा परित्रय अशा भारतीय तात्त्विक साहित्याच्या आधारावर पाहू की जे उपनिषदानाच सर्व दर्शनांचे मूल आधार समजतात.

इतिहासज्ञांनीच भारतीय दर्शनाचा कालविभाग पुढील प्रमाणे केला आहे. पहिला वैदिक काल इ. सन पूर्वी १५०० पासून ते इ. स. पूर्व ६०० पर्यंत. दुसरा पौराणिकगाथा काल– इ. स पूर्वी ६०० पासून इ स. २०० पर्यंत, तिसरा सूत्रकाल– इ. स. २०० पासून पुढे,

हिंदूधर्माचे सर्वात प्राचीन शास्त्र वेद आहेत. हे वेद ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे चार प्रकारचें आहेत. पौराणिकांचे असे म्हणणे आहे की, या चारहि वेदाचे संकलन वेदव्यासानी यज्ञाच्या आवश्यकताना दृष्टिसमोर ठेवून केलेले आहे. यज्ञानुष्ठानासाटी चार ऋत्विजांची आवश्यकता असते. १ होता २ उग्दाता ३ अध्वर्यु व ४ ब्रह्मन्. 'होता' मंत्राचे उच्चारण करून देवताना आवाहन करतो,या मंत्र समुदायाचे संकलन ऋग्वेदांत आहे. ' उद्गाता ' वेदांतील ऋचा

मधुर स्वरांत गातो व त्या दृष्टीने सामवेदाचे संकलन केले गेलेले आहे. यज्ञाच्या विविध अनुष्ठानाचें संपादन करण्याचे काम अध्वर्यूचे आहे. त्यासाठी यजुर्वेद तयार झाला. ब्रह्मा संपूर्ण योगांचा निरीक्षक–द्रष्टा असतो; अनुष्ठानांत कोणत्याहि प्रकारची चूक राहूं नये, विघ्नेहि येऊ नयेत यासाठी अथर्व–वेद संकलित केला गेला. या प्रमाणे यज्ञानुष्ठान चांगल्या तऱ्हेने करण्यासाठी भिन्न भिन्न वेदांचे संकलन भिन्न भिन्न ऋत्विजाकरिता केले गेले आहे.

वेदाचे तीन विभाग आहेत–मंत्र, ब्राह्मण व उपनिषद. मंत्राच्या समुदायास 'संहिता' म्हणतात. ब्राह्मण ग्रंथांत यज्ञयागादिकांच्या अनुष्ठानादिकांचे विस्तृत वर्णन आहें. यांना वेंद मंत्रांचा 'व्याख्या ग्रंथ' म्हणतात. ब्राह्मण ग्रंथांचा शेवटचा भाग आरण्यक व उपनिषद् आहे. यांत दार्शनिक तत्त्वाचे विवेचन आहे. उपनिषदांनाच वेदान्त म्हणतात.

विषय विभागाच्या दृष्टीने वेदाचे कर्मकांड व ज्ञानकांड असे दोन विभाग आहेत. संहिता, ब्राह्मण व आरण्यक यांचा अंतर्भाव कर्मकांडात होतो व उपनिषदांचा ज्ञानकांडांत होतो. कारण पहिल्यांत मुख्यतः क्रिया-कांडाची चर्चा असून दुसऱ्यांत मुख्यतया ज्ञानाची चर्चा आहे.

वेदांचा मुख्य विषय देवतांची स्तुति आहे व त्या देवता म्हणजे अग्नि, इंद्र, सूर्य वगैरे. पुढे पुढे देवतांच्या या संख्येत वृद्धि–ऱ्हासहि होत गेला. विद्वानांच्या मताप्रमाणे वैदिक आर्यांचा असा विश्वास होता की, या देवतांच्या कृपेमुळेच जगाची सर्व कामे चाललेली आहेत व त्यामुळेच ते यांची स्तुति करीत असत. जेव्हा हे आर्य लोक भारत वर्षात आले. तेव्हा आपल्या बरोबर त्यांनी त्या देवतांची स्तुति-स्तोत्रेहि आणली व जेव्हा या नव्या देशांत त्यांचा अन्य देवतांच्या पूजकां–बरोबर परिचय वाढत गेला. तेव्हा त्यांना आपल्या गीतांचा संग्रह

करण्यासंबंधी उत्साह वाढू लागला. संग्रहच ऋग्वेद[1] आहे.

असे म्हणतात की, जेव्हा वैदिक आर्य भारतवर्षात आले तेव्हा त्यांचा पहिला सामना असंस्कृत व जंगली जमातीशी झाला. ऋग्वेदांत गौरवर्ण आर्य व श्यामवर्ण दस्यू यांच्या विरोधाचे वर्णन मिळते, तर अथर्ववेदामध्ये आदानप्रदानाच्या रूपाने दोघेहि मिळून मिसळून रहात, असाहि उल्लेख मिळतो. या तडजोडीचा परिणाम म्हणजे अथर्व-वेद हा जादू टोण्याचा ग्रंथ बनला. जेंव्हा आपण ऋग्वेद व अथर्ववेद यावरून यजुर्वेद, सामवेद व ब्राह्मण ग्रंथाकडे दृष्टिक्षेप टाकतो तेव्हा त्यात आपणास एक विलक्षण परिवर्तन दिसून येते. यज्ञयागादिकांचा त्यात विशेष पुरस्कार आढळतो. ब्राह्मण ग्रंथ वेदाचे आवश्यक भाग बनलेले असतात. कारण त्यात यागादिकांच्या विधीचे वर्णन आहे. पुरोहितांचे राज्य असून ऋग्वेदातील ऋचांचा उपयोग यज्ञानुष्ठानासाठी केलेला आहे.

[2]ब्राह्मण साहित्याकडें जेव्हा आपण वळतो तेव्हा वेदांना ईश्वरीय ज्ञान असल्याची मान्यता यथार्थत: स्वीकारल्याचे आढळून येते. याचे कारण असे होते की, वेदांचा उत्तराधिकार स्मृतीच्या आधारावर एक-मेकाशी मिळत गेला व आदरभाव कायम ठेवण्यासाठी त्यामध्ये कांही पवित्र्याचा संबंध असणें जरूरहि होते. असो! ब्राह्मण साहित्याच्या दृष्टीने वैदिक ऋचांचा धर्म केवळ यज्ञ हाच होता व मनुष्याचा देवताशी संबंध केवळ यांत्रिक स्वरूपाचा होता. ‘ इस हात दे उस हात ले’ हे त्याचे रूप होते.

आरण्यकासंबंधी असे सांगतात की, वनात राहणाऱ्या लोकासाठी

---

१ इंडियन फिलॉसॉफी (सर् एस्० राधाकृष्णन्) पृ० ६४ भाग १

२ इंडियन फिलॉसॉफी (सर् एस्० राधाकृष्णन्) पृ० १२९

त्याची रचना केली गेलीं होती. त्यावरून दृष्टि फिरविली तर त्यात यज्ञादिकार्यांनी मिळणाऱ्या फळावद्दल अश्रद्धा निर्माण होत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते व असेहि वाटते की, केवळ शुष्क क्रियाकांडावरील लोकांची अभिरूचि कमी कमी होऊ लागलेली होती. कारण यज्ञयागादिकांनी मिळणारे स्वर्गसुख स्थायी स्वरूपाचे नसल्यामुळे यज्ञादिकांना आत्यंतिक सुख मिळवून देणारे म्हणून समजले जाऊ शकत नव्हते.

उपनिषदावर जर नजर वळविली तर[1] उपनिषदाची स्थिति वेदानुकूल नाही असे आपणास दिसून येते. युक्तिप्रामाण्य मानणाऱ्या उत्तरकालीन विद्वानाप्रमाणे त्याचें वेदांच्या मान्यतेसंबंधी दुटप्पी धोरण होते. एका बाजूने ते वेदांची मौलिकता स्वीकार करतात तर दुसऱ्या दृष्टीनें ते असेहि म्हणतात की, वैदिक ज्ञान त्या सत्य दैवी परिज्ञानापेक्षा बरेचसे कमी दर्जाचे आहे व आम्हास मुक्ती प्राप्त करून देऊ शकत नाही. नारद म्हणतात ' मी ऋग्वेद ' सामवेद व यजुर्वेद हे जाणतो परंतु यावरून मी केवळ मंत्र व शास्त्र एवढेंच जाणतो. आपणा स्वतःस जाणत नाही.' मांडुक्य उपनिषदांत लिहिले आहे– ' विद्या दोन प्रकारच्या आहेत हें अवश्य लक्षात घ्यावयास हवे एक परा विद्या व दुसरी अपरा विद्या वेदातून प्राप्त होणारी विद्या ही अपरा म्हणजे जघन्य दर्जाची विद्या असून ज्या पासून अविनाशी ब्रह्मतत्त्वाची प्राप्ति होते ती परा वा श्रेष्ठ विद्या होय,'

वैदिक साहित्याच्या या विवेचनावरून ही गोष्ट आहे की, वैदिक आर्य जेव्हा भारतवर्षात आलें तेव्हा त्यांचा संघर्ष येथील मूळ निवासी लोकावरोवर झाला. जरी कठोपनिषद' (१-१-२०) ते उपनिषद् कालात वैदिक धर्माशी तात्त्विक विरोध करणारे सैद्धांतिक विद्यमान होते. तथापि याचा अर्थ असा नाही की, उपनिषद् कालाच्या

---

१ इंडियन फिलॉसॉफी (सर् एस्० राधाकृष्णन्) भाग १ पृ० १४९,

अगोदर वैदिक धर्माशी विरोध करणारे येथे नव्हते. परदेशातून येऊन येथे राहणारे व नंतर हळु हळू त्या देशावर अधिकार जमविणारांची साधारणतया अशी प्रवृत्ति असते की, ते त्या देशाच्या आदिवासीना संस्कृतिहीन व अज्ञानी लेखण्याचाच प्रयत्न करतात. हेच सुरवातीस इंग्रजानी केले व वैदिक आर्य आणि त्याचे उत्तराधिकारी यांनी सुद्धा असेच केले अस'वे. तें अजूनहि अशा प्रकारचा सोयीस्कार समज बाळगून चालतात की, जैनधर्माची उत्पति बुद्ध धर्माच्या बरोबर किंवा त्याच्या कांही अगोदर पण उपनिषदांच्या तत्त्वावर आधारलेला आहे हे मत ते अशाहि परिस्थितीत कायम ठेवतात की, जेव्हा बहुतेक सर्व इतिहासज्ञ हे मानतात की, जैनाचे २३ वे तीर्थंकर श्री पार्श्वनाथ हे इ. स. पूर्वी ८०० मध्ये झाले व ते ऐतिहासिक महापुरुष होते पण ते जैनधर्मांचे संस्थापक नव्हते.

सर् राधाकृष्णन् आपल्या भारतीय दर्शनात[1] असे लिहितात की, 'जैन मान्यतेप्रमाणे जैन धर्माचे संस्थापक श्री वृषभदेव होते. ते कित्येक शतके अगोदर होऊन गेले. या बाबत पुरावाहि मिळतो की, इ. स. पूर्वी पहिल्या शतकात प्रथम तीर्थंकर वृषभदेवाची पूजा होत होती. वर्धमान किंवा पार्श्वनाथ यांच्याहि अगोदर जैनधर्म प्रचलित होता यात कांही शंका नाही. यजुर्वेदात वृषभदेव, अजितनाथ व अरिष्टनेमि या तीन नाही. यजुर्वेदात वृषभदेव, अजितनाथ व अरिष्टनेसि या तीन तीर्थंकराच्या नांवाचा उल्लेख आहे. भागवत पुराणावरूनहि असे स्पष्ट होते की ऋषभदेव जैनधर्माचे संस्थापक होते.'

अशा परिस्थितीमध्ये उपनिषदांच्या तत्त्वावर जैनधर्म उभारला गेला हें म्हणणे कितपत उचित आहे? आरण ज्याला उपनिषद् काल

---

१. इंडियन फिलॉसॉफी १पृ० २८७.

म्हणतात. त्या कालात भ० पार्श्वनाथांचा जन्म वाराणसी नगरी
झाला होता. एक दिवस आपल्या बाल्यावस्थेतच पार्श्वनाथ गं
कांठी फिरण्यास गेले असता तेथे कांही तपस्वी पंचाग्नि तप
असल्याचे त्यांनी पाहिले. आत्मज्ञानहीन अशा कोऱ्या तपाश्चर
त्यांनी विरोध केला व असे दाखवून दिले की, जी लाकडे जळत अ
त्यात नाग नागोणीचा जोडा आहे व ते लाकूड चिरले असता
प्राण कंठाशी आले आहेत असे ते नागाचे जोडपे बाहेर निघाले
घटनेनंतरच पार्श्वनाथांनी दीक्षा घेतली व केवलज्ञानाची प्राप्ति झाल
त्यांनी जैनधर्मीय सिद्धांतांचा जनतेस उपदेश दिला. भ० पार्श्वनाथ
सुमारे २॥ शे वर्षांनी भ० महावीर झाले. या दोघांच्यापूर्वी पुष्
अगोदर भ० ऋषभदेव झालेले होते. सारांश, ज्या वेळी वैदिक
भारतवर्षात आले होतें त्यावेळीहि ऋषभदेवाचा धर्म येथे प्र
होता व त्याच्या अनुयायांचा वैदिक आर्यांशी संघर्ष झाला अ
द्रविड वंश मूळतः भारतीय आहे व द्रविड संस्कृति ही भारतीय
कारण द्रविडभाषा फक्त भारतवर्षांतच आढळते. ही द्रविड सं
निश्चितपणे जैनधर्माने प्रभावित झालेली होती आणि जैनधर्मात
नावाने एक संघहि होता याचेहि हेच कारण आहे. द्रविड
दक्षिण भारत हें एक मात्र घर आहे. म्हणून त्यांच्या संपर्कात
आर्य बऱ्याचशा काळानंतर आले असावेत. ऋग्वेदानंतर सं
केल्या गेलेल्या यजुर्वेदात कांही तीर्थकरांची नावे सांपडतात त्य
कारण हेच असावे.

जेव्हा वैदिक धर्म यज्ञप्रधान बनला व पुरोहितांचे प्राबल्य
त्यावेळी लोकास त्यासंबंधी स्वाभाविक वीट आला, याचा उल्ले
आलाच आहे. ही एखादी आकस्मिक घटना नसून शुष्क क्रियाकां

आहे की, ज्या संस्कृतीचे प्रणेते भगवान् ऋषभदेव होते व त्यामुळेच उपनिषदांची रचना केली गेली. हे करताना वेदांचे प्रामाण्य तर मानले गेले. परंतु त्यातून प्राप्त होणारी विद्या ही पराविद्या नव्हे ती अपरा, म्हणजे निम्न श्रेणीची आहे हें सांगून आत्मज्ञान हीच पराविद्या होय हेंच उच्च स्वरूपाचें ज्ञान होय असे त्यातून सांगितले गेले. याप्रमाणे उपनिषदांनी उच्च आध्यात्मिक सिद्धांताचे प्रतिपादन तर केले, परंतु वैदिक क्रियाकांडांचा विरोध मात्र केला नाही सर राधाकृष्णन् याच्या मताप्रमाणे[१] 'ज्यावेळी समाज आध्यात्मिक सिद्धांतांत अकाटच श्रद्धा ठेवावी असे इच्छित होता त्यावेळी उपनिषदांतून त्यास बगल देण्याच्या नीतीचे अवलंबन झालेले दिसून येते. ते आत्म्यास सर्व बाह्य प्रवृत्तीच्या बंधनातून स्वतंत्र करण्याच्या इच्छेने प्रारंभ तर करतात. परंतु अखेर मात्र त्याच त्या जुन्या पुराण्या बाह्य प्रवृत्तीचा फास आवळण्यात होते जीवनाचा नवीन आदर्श स्थापित करण्याऐवजी ते जुनाट मार्गाचाच प्रसार करीत असलेले दिसून येतात. आध्यात्मिक साम्राज्याचा उपदेश देणे वेगळे व अध्यात्माची स्थापना करणे हे आगळेच. ह्या दोन्ही एकमेकापासून अगदीच भिन्न गोष्टी आहेत. उपनिषदांनी प्राचीन वैदिक क्रियाकांडास उच्च अध्यात्म–वादाशी जोडण्याचा प्रयत्न केला; परंतु तत्कालीन पिढीने त्यामध्ये कांहीच अभिरुची दाखविली नाही. म्हणूनच उपनिषदांचा उच्च अध्यात्मवाद लोकप्रिय होऊ शकला नाही. त्याने संपूर्ण समाजाच्या मनाची पकड कधीच घेतली नाही. एलीकडे अशी परिस्थिति असताना दुसरीकडे याज्ञिक धर्म अजूनहि बलशाहि होता. त्याचा परिणाम असा झाला की, पराविद्या अर्थात् उच्च ज्ञान हे अपराविद्येकरवी संपूर्ण पराभूत झाले.'

भारतांतील एका सर्वमान्य तत्वेत्त्याच्या वरील विवेचनावरून

१ इंडियन फिलॉसॉफी भा० १ पृ० २६४-६५.

हें स्पष्ट दिसून येते की, उपनिषदांचे तत्त्वज्ञान वैदिक आर्यांची निजी-स्वकीय निधि नव्हता; तर उलट ते भारतांतील मूल निवासी जें द्रविड वगैरे होते त्यांच्या पासून घेतलेली उसनवार होती. इतकेच नव्हे तर परिस्थितिवश त्यांना ते घेणे भाग पाडले. यामुळेच हे तत्त्वज्ञान घेऊन त्याचा केवळ उपदेश तर वैदिक आर्य देऊ लागले. परंतु वैदिक क्रिया-कांडाच्या ऐवजी त्यांची प्रस्थापना ते करू शकले नाहीत. कारण वैदिक क्रियाकांड ही त्यांची निजी-स्वकीय बाब होती. त्याचा मोह ते कसा सोडू शकतील ?

त्याचा अवश्यंभावी परिणाम राधाकृष्णन् यांच्याच शद्वात सांगा-वयाचें [1]झाल्यास 'तोतयाकडून मूळ खरा संपूर्ण नागवला गेला व उपनिषद् काळानंतर ब्राह्मण धर्माचा हा विद्रोह आपल्या सर्व परस्पर विरोधी मतमतांतराचा गलबला बरोबर घेऊन लवकरच शिखरावर जाऊन पोहोचला.' या काळाचे वर्णन करतांना सर् राधाकृष्णन् लिहि-तात- 'ही वेळ आध्यात्मिक दृष्टीने सर्वत्र शुकशुकाट असलेली होती. यांवेळी सांप्रदायिक परंपरांनी सत्याभोवती गळफास आवळलेले होते. मनुष्याचा मेंदू ठराविक् क्रियाकांडाच्या मर्यादित सीमेतच घाण्याच्या बैलसारखा फिरत होता. सर्व वातावरण विधिविधानांनी भारलेले होते. मंत्राचा उच्चार केल्याशिवाय किंवा कांही विधि वा अनुष्ठान केल्या-शिवाय कोणीहि जागृत होऊ शकत नव्हता, उठू शकत नव्हता, स्नान करू शकत नव्हता, स्मश्रु करू शकत नव्हता. मुखमार्जनहि करू शकत नव्हता, किंवा कांही खाऊ पिऊहि शकत नव्हता. ही ती वेळ होती की, ज्यावेळी क्षुद्र व निष्फळ धर्मात अंधविश्वासांनी व तथ्यहीन निस्सार वस्तूंनी आपला खजिना भरलेला होता. परंतु असे शुष्क व हृदयशून्य

१ इंडियन फिलॉसॉफी १ पृ० १६५-६६.

दर्शन की, ज्याच्या मुळाशी अहंकार, अतिशयोक्ति व दुराभिमान यांनी व्याप्त धर्म असतो ते विचारशील पुरुषांना कधीच संतुष्ट करू शकत नाही, किंवा जनतेलाहि दीर्घकाळपर्यंत संतुष्ट ठेऊ शकत नाही यानंतर अशा प्रकरचा काळ आला की, जेव्हा या विद्रोहास (बंडास) आणखी चांगल्या रीतीने सफल करण्याचा प्रयत्न केला गेला. उपनिषदांचा ब्रह्मवाद किंवा वेदांचा बहुदेवतावाद, उपनिषदांचे आध्यात्मिक जीवन किंवा वेदांचे याज्ञिक क्रियाकांड, उपनिषदांचा मोक्ष व संसार आणि वेदांचा स्वर्ग व नरक हा तर्कविरुद्ध संयोग अधिक दिवस पर्यन्त चालू शकत नव्हता. त्यामुळे पुनर्निर्माणाची अत्यंत जरूरी होती. काळ अशा प्रकारच्या धर्माची चातकासारखी प्रतिक्षा करू लागला होता की, जो वास्तविक गंभीर व अधिक आध्यात्मिक असेल आणि सर्व साधारण मनुष्यांच्या दैनंदिन जीवनांत उतरू शकेल वा प्रवेश करू शकेल. धार्मिक सिद्धांतांचे उचित संमिश्रण करण्यापूर्वी हे आवश्यक होते की. सिद्धांताचे विषयक ते बनावटी नकली संबंध तोडले जावेत की जे परस्पर अत्यंत विसंगत असल्याचे सुस्पष्ट झाले होते. बौद्ध, जैन व चार्वाक यांनी प्रचलित धर्माच्या बनावटी स्थितीवर हल्ला चढविला. त्यापैकी पहिल्या दोघांनी आत्म्याच्या नैतिक आवश्यकतेवर भर देऊन नवनिर्मितीचा प्रयत्न केला. तोहि त्यांचा प्रयत्न क्रांतिकारी स्वरूपाचा होता. पहिली गोष्ट त्यांनी उपनिषदांच्या ब्रह्मवादास (ethical universalism) पूर्णत्व आणण्याचा प्रयत्न केला व दुसरी गोष्ट म्हणजे त्यांचे असे ठाम मत होते की. ब्राह्मणांच्या प्रभुत्वापासून म्हणजे याज्ञिक क्रियाकांड किंवा प्रचलित धर्मापासून सर्वतंत्र स्वतंत्र व्हावयास हवे. भगवद्गीता व तदनंतरच्या उपनिषदांनी पूर्वीचा ढांचा कायम ठेवण्याचा व पहिल्या पेक्षाहि अधिक कट्टरतेने तर्कविरूद्ध सिद्धांतांचे संमिश्रण करण्याचा प्रयत्न केला, याप्रमाणे उपनिषद् कालानंतर प्रचलित

धर्मांचे एक उग्रपंथी व दुसरे स्थिति–पालक अशा प्रकारे विरोध करणा–रांची केंद्रे भारताच्या निरनिरळ्या भागात स्थापन झाली. पूर्वेकडे बौद्ध व जैनधर्माने आपले पाय पक्के रोवले व भगवद्‌गीतीने आपला प्राचीन बालेकिल्ला असलेल्या पश्चिमेकडे आपला पाय पक्का रोवला.'

वरील चित्रणांत जैनधर्म व बौद्धधर्माच्या उत्थापनाचा मुद्दा येतो त्यावेळी सर् राधाकृष्णन्‌हि त्याच म्हणजे 'जैनधर्माने उपनिषदांतील तत्त्वांचा स्वीकार केला आहे.' या जुन्या प्रतिपादनाची पुनरावृत्ति करीत आहेत असे वाटते. परंतु वैदिकधर्म व उपनिषदांच्या सिद्धांताचे मिश्रण हे तर्कविरुद्ध असल्याचे दाखवून पार्श्वनाथ हे जैनधर्माचे तीर्थंकर होते व त्यांचा निर्वाणकाल इ.स.पूर्वी ७७६ आहे, हे मानून शिवाय जैनधर्म त्याहि अगोदर होता हेहि मानून जें उपनिषदांचे सिद्धांत जैनधर्माशी मेळ खातात पण वैदिक धर्माशी मेळ खात नाहीत. ते जैनधर्माचे सिद्धांत असल्याचे मानण्यास डॉक्टर संभवतः तयार नाहीत; परंतु त्यांनीच वैदिक कालाचा जो आराखडा काढला आहे, त्यावरूनच हे सिद्ध होते की, वैदिक क्रियाकांडाचा विरोध झाला व जनतेस ते क्रियाकांड आवडेनासे झाले तेव्हा वैदिकांनी आपली स्थिति कायम ठेवण्यासाठी आपल्या विरोधी धर्मांतील– ज्यांत जैनधर्म प्रमुख होता त्या धर्मांच्या–आध्यात्मिक तत्त्वावर उपनिषदांची रचना केली. परंतु अध्यात्माच्या गोष्टी करीत असतानाच समर्थन मात्र वैदिक क्रिया-कांडाचें करीत होते. त्यामुळे त्याचे विरोधी गट कायम होते. फलतः विरोध वाढू लागला. अशाच सुमारास भ० पार्श्वनाथ झाले. त्यांनी आपल्या उपदेशानी आपला प्रभाव बराचसा दाखविला. त्यांच्यानंतर जवळ जवळ २०० वर्षांनीच बिहारमध्ये भ० महावीर व बुद्धाचा जन्म झाला. वैदिक धर्मकाळी विचारशास्त्र ही केवळ उच्च विद्वानांचीच वस्तु झालेली होती परंतु या काळी त्याचा प्रचार साधारण जनतेत

होऊ लागला होता. भ० पार्श्वनाथांनी ७० वर्षेपर्यंत ठिकठिकाणी विहार करून सर्व साधारण जनतेत धर्माचा उपदेश दिला त्याचेच अनुकरण भ० महावीर व बुद्धांनी नंतर केले. आपल्या आध्यात्मिक विचारांना व्यावहारिक रूप देण्याकडे व आपल्या विचाराप्रमाणे जीवन व्यतीत करण्याच्या प्रवृत्तीकडेच या काळात विशेष लक्ष दिले गेले. कारण वरील महापुरुषांनी तेच केलेले होते. वैदिक–युगांत इंद्र,वरुण इत्यादींची देवता समजून पूजा होत होती; परंतु वरील धर्मामध्ये मनुष्याचे जीवन उन्नत बनवून त्यामध्ये देवत्वाची प्रतिष्ठा करवून त्याचीज पूजा केली जात होती. विरोधकांच्या या सिद्धांतांनी वैदिक धर्माची स्थिति एकदम डामाडोल झाली. ती स्थिति टिकविण्यासाठी पुन: कांही नवीन गोष्टी आत्मसात् करण्याची अशीच आवश्यकता त्यांनां प्रतीत होऊ लागली की, जशी आवश्यकता उपनिषदाची रचना होण्यापूर्वी प्रतीत होऊ लागली होती. अशा वेळेला रामयण व महाभारताचा उदय[1]

---

१ सर राधाकृष्णन् लिहितात– ज्यावेळी सर्वसामान्य लोकांची आध्यात्मिक चेतना व जिज्ञासा उपनिषदाच्या नि:शक्त विचारसरणीने, वेदांच्या दिखावटी देवतांनी तसेच जैन व बौद्धाच्या नैतिक सिद्धांताच्या संदिग्ध आदर्शवादाने तृप्त होऊ शकली नाही त्यावेळी नवनिर्मितीच्या आवश्यकतेने एका धर्मास जन्म दिला; जो पूर्णपणे काटेकोर नियमबद्ध तर नव्हता पण उपनिषदांच्या धर्मापेक्षा मात्र अधिक संतोषप्रद होता. त्या धर्माने संदिग्ध आणि शुष्क ईश्वराच्या मोबदल्यात एक जिवंत व मानवाच्या आटोक्यातील परमात्मा दिला. भागवत्गीता, जी मध्ये कृष्णांना विष्णूचे अवतार व उपनिषदाचे ब्रह्म मानलेले आहे. पंचरात्र संप्रदाय व श्वेताश्वतर व अनंतरच्या अन्यान्य उपनिषदांचा शैवधर्म याकाळी झालेल्या धार्मिक क्रांतीची फळे आहेत.'' ( इंडियन फिलॉसॉफी पृष्ठ २७५–७.)

दिवाणबहाद्दूर कृष्णस्वामी अय्यंगार यानी सुद्धा याच प्रकारची विचार–

झाला. राम आणि कृष्णांना ईश्वराचा अवतार मानून मनुष्यामधील देवत्वाच्या प्रतिष्ठेकडे आकर्षित होणाऱ्या सर्वसाधारण जनतेला त्यापासून परावृत्त केले. जैन व बौद्ध धर्मात स्त्री किंवा शूद्रांनाहि धर्माचरणाचा अधिकार होता. परंतु वेदाचे पठण पाठण सुद्धा या दोघां-करिताहि त्याज्य होते. त्यांची पूर्ति महाभारताने केली. जनतेची रुची अहिंसेकडे स्वतःच नव्हे तर वेदविरोधी वर सांगितलेल्या कारणामुळे वाढू लागलेली होती व त्याच कारणामुळे पशुयज्ञ ही बाब टीकेचा व घृणेचा विषय बनू लागली होती. अशा वेळी महाभारतात एका कथेने पशुयज्ञ वाईट असल्याचे सांगून हवी-यज्ञ श्रेष्ठ असल्याचे दाखविले आहे. नारायण खंडात सांगितले आहे की, वसुनें हवी-यज्ञ केला व त्यावर प्रसन्न होऊन विष्णूनी यज्ञ यज्ञ द्रव्याचा प्रत्यक्ष स्वतःहून स्वीकार केला. हे सर्व पाहून निःपक्षपाती विद्वानांचे असे मत झाले की,

---

धारा प्रगट केली, ते लिहितात– "त्यावेळी एका अशा धर्माची जरूर होती, जो ब्राह्मणधर्माच्या या पुनर्निर्माण काळात बौद्ध धर्माच्या विरोधामध्ये जनतेला अधिक प्रभावित करण्यास समर्थ होता. त्यासाठी एक मानवी देवता आणि त्या देवतेच्या पूजाविधिची आवश्यकता होती." Ancient India P. 588.

प्रसिद्ध इतिहासज्ञ स्व. ओझाजी यांनी सुद्धा लिहिले आहे की,- "बौद्ध व जैनधर्माच्या प्रचाराने वैदिकधर्माला फार मोठी ठेस पोहचली इतकेच नव्हे तर त्यामध्ये परिवर्तन करणे भाग पडले. त्यास कालमानानुसार नव्या सांच्यामध्ये ओतणे भाग पडल्यामुळे त्याचे रूप पौराणिक धर्म असे बनले. त्यामध्ये बौद्ध व जैनांशी मेळ खाणाऱ्या धर्मासंबंधी पुष्कळशा नवनवीन बाबींचा प्रवेश केला गेला, इतकेच नाही तर बुद्ध देवाची विष्णूच्या अवतारामध्ये गणना झाली. व मांसाशनाचा थोड्याफार प्रमाणात निषेध करावाच लागला." राजपूतानेका इतिहास प्र. खं. १०-११

महाभारत हे श्रमण संस्कृतीने प्रभावित झालेले होते.

धर्मात आचार विचारांच्या आदान–प्रदानांची प्रथा पुष्कळ काळपासून सारखी चालूच राहिलेली आहे. एकेवेळी 'हिंद तत्त्वज्ञाननो इतिहास' या ग्रंथाचे लेखक श्री नर्मदाशंकर देवशंकर मेहता यांनी '' जैन व हिन्दूच्या आपआपसांतील संस्कारांचे आदान प्रदान '' या विषयावर गुजराथीमध्ये बोलत असतांना सांगितले होते की, 'भारत वर्षाचे मुख्य तीन धर्म एक ब्राह्मणधर्म (हिंदूधर्म) दुसरा बौद्धधर्म व तिसरा जैनधर्म. यापैकी बौद्धधर्म आपल्या जन्मभूमीतून नाहीसा झाला व शिल्लक दोन धर्म कोणत्या कारणांनी टिकून राहिले यावर विद्वानांनी अनेक प्रकारे विचार केला आहे. मीहि आपल्या बुद्धिनुसार जो विचार केला त्यावरून मला असे वाटते की, दुसऱ्या धर्माचे आचार विचार आपल्यांत सामावून घेण्याची अद्भुत शक्ति ब्राह्मणांत आहे. या शक्तीच्या प्रभावाने ते दुसऱ्याची वस्तु आपलीशी करून टाकतात. ज्याप्रमाणे एखादी मोठी वेल छोटयाशा झाडावर लागली असेल तर ती त्या झाडाचे सर्व रस स्वतःच शोपण करून सर्वत्र पसरते. व त्याला आधार देणाऱ्या वृक्षाचे दर्शनहि होऊ शकत नाही, इतको त्यास ती आवळून टाकते. त्याचप्रमाणे ब्राह्मणांच्या आचार विचारांच्या गुंतागुंतींत जेव्हा दुसऱ्या धर्माचा आचार विचार प्रवेश करतो तेव्हा तो ब्राह्मणांचा होऊन बसतो. व नंतर तो मुळात कोणाचा होता याचा निर्णय करणेहि अशक्य होऊन जाते. ब्राह्मणांच्या या आत्मसात् करण्याच्या शक्तीपुढे बौद्ध धर्म टिकू शकला नाही. बौद्ध धर्माने आपले स्वत्व व व्यक्तित्व जमविण्यासाठी ब्राह्मण धर्माच्या खण्डनार्थ अधिक यत्न केले. त्यामुळे दोन्ही धर्माच्या अनुयायांत द्वेष व निंदाभाव पसरला. दुसरे, ब्राह्मणांनी त्या धर्मातील ग्रहण करण्यायोग्य गोष्टी ग्रहण केल्या व सामान्य अशिक्षित जनतेस असे

भासविलें की, बौद्ध धर्माचा मुख्य सार ज्याला म्हणतात तो आपल्या वैदिकांपासूनच बौद्धांनी घेतलेला आहे. ब्राह्मणांचे हें 'व्याप्तिजाल' समजून घ्यावयाचे असेल तर खालील मुद्यावर विचार करावा.

(१) भगवान बुद्धा विष्णूचा अवतार मानले. व आपोआपच त्याचा दया-धर्म वैष्णवांत समाविष्ट झाला.

(२) ब्राह्मणांच्या यज्ञ व श्राद्धात गोवध केला जात असे, त्यास त्यांनी 'कलिवाह्य' ठरवून सोडून दिले.

(३) बुद्धाच्या शरीराचें अंश घेऊन जे रथयात्रादि उत्सव होत होते ते वैष्णवाच्या रथयात्रारूपानें परिणत झालें

(४) बौद्धाचे जातपातींच्या खंडना संबंधीचे आचार-विचार ब्रह्मवादात समाविष्ट केलें गेलें.

(५) बौद्ध धर्माचे पंचबुद्ध शैवधर्माच्या पंचमुख शिवांत समाविष्ट झाले.

(६) अश्वघोषाचें 'वज्रसूचि प्रकरण' जें जातिभेदाचे विध्वंसक आहे, तें कळत न कळत ब्राह्मणांच्या उपनिषदात उपनिषदरूपाने समाविष्ट झाले.

(७) ब्राह्मणांचे परिव्राजक व बौद्ध भिक्षु ब्राह्मण-शरमण (श्रमण) रूपाने एकमेक झाले.

या प्रकारे बौद्ध धर्म अनेक तऱ्हेने सध्याच्या हिंदूधर्माच्या अंगप्रत्यंगामध्ये सर्वत्र जाऊन बसला असे झाले. तसेच शंकरवेदांताच्या मायावादात बौध्द विज्ञानवादीयांचा मायावाद इतक्या गुप्त रीतीने समाविष्ट केला की जणु मायावाद अगदी उपनिषदातूनच निघालेला असावा; असा दृढ समज हिंदु वेदांतीयांचा झाला आणि जे आचार विचार पचले जाऊ शकत नव्हते, जसे " क्षणिक-वाद, अपोह-वाद वगैरे त्यांना बौध्दांचा पाखंड म्हणून निरूपण करण्यात आले व

पौराणिक रूपांत हिंदुधर्माचे नवीन दुकान उघडले गेले परिणाम असा झाला की, बौद्धधर्म आर्यावर्तातून लुप्तप्राय झाला. जे अभ्यासू आहेत ते ही वस्तुस्थिति सहजरीतीने समजू शकतील"

याप्रमाणे बौद्ध धर्माचा लोप होण्याबाबत आपले विचार प्रगट केल्यानंतर मेहताजींनी ब्राह्मण धर्मीय हिंदूंनी कोणते ग्राह्यांश किंवा गुण जैनापासून घेतले, हे सांगताना ते म्हणतात "यज्ञ हिंसेबद्दल अरुचि दाखविणारे प्रथम सांख्याचार्य कपिल होते, त्यांनी यज्ञकर्म सदोषकर्म असल्याचे सांगितले व विशिष्ट यज्ञापासून स्वर्ग मिळत असला तरी स्वर्गसुखाचा काल संपल्यानंतर तो हिंसेचे फल दिल्याशिवाय राहात नाही असे सांगितले." त्यानंतर भागवत संप्रदायांत वासुदेव श्रीकृष्णांनी अहिंसेचे कथन केलें परंतु भ० श्रीकृष्णांच्या यादव कुळांत मदिरापान चालत आल्यामुळे मद्याच्या अनुषंगाने होणारी हिंसा सर्वप्रकारे दूर होऊ शकली नाही. कुरुपांचाल युद्धाचे वेळी आपआपसांतील वैरामुळे रौद्रध्यान व आर्तध्यानाशिवाय इतर धर्मध्यान व शुक्लध्यानास जागाच नव्हती. सरते शेवटी हिंसा पूर्ण वेगाने वाढू लागली. भागवत धर्म अहिंसेचा पक्षपाती असूनहि हिंसा रोकू शकला नाही. यावेळी अहिंसेचे पालन करणारे यतिजन सुद्धा होते. परंतु ते वनांत राहात असत. अहिंसेवर जोर देणाऱ्या यतींचा एक वर्ग मुंडक शाखेचा होता; परंतु तोहि हे मानण्यास तयार नव्हता की, वेदांतील हिंसा ही वेदप्रतिपादित असूनहि गौण स्वरूपाची किंवा हलक्या धर्म स्वरूपाची आहे

"हिंसा अथवा प्राणातिपात हा दोषरूप आहे. ज्या जीवास मोक्ष मार्गाकडे जावयाचे आहे त्याने या दोषाचा परिपूर्ण त्याग करण्यासाठी अधिक प्रमाणांत प्रयत्न केले पाहिजेत व प्राणिवधाच्या योगाने देवतांना संतुष्ट करण्याची भावना ही अपधर्म किंवा विधर्म

अथवा अधर्म आहे असे स्पष्ट कथन करणारे जैन तीर्थंकरच होते.”

“ परंतु त्या चोवीस तीर्थंकरांपैकी पार्श्वनाथ २३ वे व महावीर २४ वे तीर्थंकर वास्तविक ऐतिहासिक महापुरुप आहेत. ते वासुदेव श्रीकृष्णानंतर झालेले आहेत. या दोन महापुरुपांपैकी पार्श्वनाथ भगवान् बुद्धाच्या अगोदर झालेले आहेत. व महावीर बुद्ध समकालीन होते. या दोन्ही महापुरुपांनी स्पष्टपणे सांगितले की, हिंसा व शुद्ध-धर्म या दोन्हीचा मेळ संभवत नाही. त्याचप्रमाणे धर्माच्या नांवावर पशुवध करण्यात पुण्य नसून पाप आहे. हा निश्चय त्यांनी आपल्या शुद्ध चारित्र्याने व संघाच्या प्रभावाने जनतेत पसरविला. त्याचा हिंदू समाजावर इतका खोल प्रभाव पडला की, यज्ञामध्ये हिंसा करणे धर्म आहे असे सांगण्यास कोणी हिंदु अंतःकरणापासून तयार नाही. कांही विद्वान् व धर्मचिंतक शास्त्रीगण त्या हिंसेचे प्रतिपादन तेवढे करू शकतील, परंतु प्रत्यक्ष कोणी एखादा वैदिक धर्मानुसार श्रौतकर्म करणारा सोमयाग करण्यास तत्पर झाला तर हिंदु त्याचे तिरस्कारपूर्वक निष्कासन करतील व कत्तलखान्यामध्ये पशुवध करणाऱ्या कसायाप्रमाणे त्याची संभावनाच करतील.”

मेहताजींच्या वरील विवेचनावरून हे स्पष्ट आहे की, ब्राह्मण धर्मात दुसऱ्यांच्या गोष्टी आत्मसात् करण्याची अद्भुत शक्ति आहे. उत्तरकालीन उपनिषदांनी बौद्धांची अनेक तत्त्वे अशा प्रकारे आपल्या तत्त्वांत समाविष्ट करून घेतली की, जणु त्या उपनिषदांच्याच मौलिक वस्तु आहेत. (सर् राधाकृष्णन् यांचेहि मत असे आहे की, कांही उपनिपदांची रचना बुद्धानंतर झाली आहे.) यावरून आमच्या वरील विधानाची पुष्टि होते. म्हणून उपनिषदामध्ये जे जैन आचार-विचारांचे पूर्वरूप आढळून येते, त्यावरून असा निर्णय करणे की,

"जैनधर्म उपनिषदापासून[1] निघाला आहे व व म्हणून तो हिंदूधर्माचे 'वंडखोर पोर' आहे" ही कल्पना संपूर्णपणे चुकीची आहे. जैनधर्म एक स्वतंत्र धर्म आहे, त्याचे आद्य प्रणेते तीर्थंकर श्री ऋषभदेव होते व ते राम आणि कृष्णाच्याहि अगोदर झाले होते की, ज्यांना हिंदूंनी विष्णूचा अवतार मानलेले आहे. त्यांच्या विचारांची छाया उपनिषदात पाहावयास मिळते. ही गोष्ट 'उपनिषद्-विचारणा' या पुस्तकाच्या खालील शद्बावरून अधिक स्पष्ट होते (पान २०१)

"उपनिषदोना छेवटना भागमाँ वेदबाह्य विचारवाला साधुओना आचारविचारी अरण्यवासीओमाँ पेठेला जणाय छे, अने तेमाँ जैन अने बौद्ध सिद्धान्तोना प्रथम बीजे उग्याँ होय एम जणाय छे। उदाहरण तरीके 'सर्व जीव ब्रह्मचक्रमाँ हंस एटले जोव भमे छे, जीवघन परमात्मा छे, 'केटलाक परमहंसी अने निर्ग्रन्थ शुल्कध्यान परायण हता' आ विगेरे उपनिषद् वाक्यो श्रीमहावीर पूर्वभावी निर्ग्रन्थ साधुओना विचारोना पूर्व रूप छे। जैनोना आद्य तीर्थङ्कर ऋषभपेव आ वर्गना निर्ग्रन्थ साधु हता। अने पाछळथी तेमने हिन्दुधर्मीओए विष्णुना अवतार मान्या छे।"

हिंदूधर्म व जैनधर्माच्या सिद्धातामध्ये मूलभूत पुष्कळच फरक आहे. जैन वेदाना प्रमाण मानत नाहीत. स्मृतिग्रंथ किंवा ब्राह्मणाचे दुसरे कोणतेहि ग्रंथ प्रमाणभूत मानत नाहीत. याशिवाय दोघातहि महत्वाचा भेद असा आहे की, जैनधर्माची धार्मिक तत्त्वे व त्यांची

---

१ जर्मन विद्वान् ग्लैजपेन यांनी आपल्या जैनधर्म नामक ग्रंथामध्ये नमूद केले आहे की, प्रो० हर्टलेचे म्हणणे आहे की ब्रह्मलोक आणि मुक्तिलोक आणि मुक्तिविषयक जैनमान्यता उपनिषदांच्या भावनेपेक्षा निराळींच आहे. या दोन बाबी समान असू शकत नाहीत. दोन्ही मधील जे साम्य आहे ते केवळ शाद्बिक आहे.

मांडणी सरळ व निश्चित आहे. परंतु हिंदुधर्मात परस्पर विरोधी अनेक सिद्धांत आहेत व ते सर्व आपलेच विचार सत्य असल्याचा दावा करतात. हिंदु ईश्वरास सृष्टि-नियन्ता व सृष्टिकर्ता मानतात. तसे जैन मानत नाहीत. हिंदू युगायुगात जगाची सृष्टि व प्रलय या गोष्टी मानतात तर जैन हे जग अनादिअनंत असल्याचे मानतात. हिंदू असे मानतात की, हा सनातन धर्म ईश्वराच्या प्रेरणेने ब्रह्मदेवाने प्रगट केला आहे तर जैनी असे मानतात की युगायुगात तीर्थंकर होतात व ते आपल्या जीवाच्या अनुभवावर अधिष्ठित अशा सत्य धर्माचा उपदेश देतात. हिंदु कल्पनाप्रमाणे देवता मोक्ष प्राप्त करू शकतात तर जैनमताप्रमाणे मुक्ति ही केवळ मानवीय अधिकाराची वस्तु आहे. जर देवतांना मोक्ष प्राप्त करण्याची इच्छा असेल तर त्यांना मनुष्य योनीत जन्म घेतला पाहिजे व कर्माचा नाश करण्यासाठी तप केलें पाहिजे असे आहे. हिंदु कर्मास अदृष्ट सत्ताक या स्वरूपात मानतात, तर जैन मताप्रमाणे कर्म हें सूक्ष्म पौग्दलिक तत्त्व असून ते जीवाच्या क्रियेने जीवाकडे आकृष्ट होऊन त्याचा जीवाशी बंध होतो असे आहे. हिंदुधर्म मताप्रमाणे ईश्वराची भक्ति केल्याने त्याच्या कृपेने मनुष्यास सुखलाभ होतो. तर जैन मान्यतेप्रमाणे आपल्या चांगल्या किंवा वाईट कर्मांना अनुसरून जीव स्वतःच सुखी किंवा दुःखी होतो असे आहे. हिंदु असे मानतात की, मुक्त झालेला जीव वैकुंठात दीर्घ कालपर्यंत सुख भोगतो किंवा ब्रह्मात लीन होतो पण जैनाचे असे मत आहे की, मुक्तजीव लोकाच्या अग्रभागी कायमचे विराजमान असतात. जैनधर्मात धर्म–द्रव्य, अधर्म द्रव्य, गुणस्थान, मार्गणा वगैरे अनेक तत्त्वे अशी आहेत की, ती हिंदु–धर्मात मुळीच नाहीत. तसेच जैनन्यायातहि स्याद्वाद, नय, निक्षेप इत्यादि पुष्कळशी अशी तत्त्वे आहेत की, जी जैनेतर न्यायात पाहण्यास मुळीच मिळत नाहीत. अशा प्रकारचे हे सर्व भेद असतानाहि दोन्ही

धर्माच्या अनुयायाच्या मध्ये सांस्कृतिक दृष्टीने आज एकरूपता दिसून येते व कांही जाती अशा आहेत की, ज्यांत दोन्ही धर्मांचे अनुयायी आढळतात व त्यांचा आपआपसांत रोटी-बेटी व्यवहार सुद्धा चालू असतो.

## २ जैनधर्म व बौद्धधर्म.

सुरवातीस अनेक विद्वानांचे असे मत होते की, जैनधर्म बौद्ध-धर्मांची शाखा आहे. परंतु स्वर्गीय याकोबी यांनी हा भ्रम दूर केला व असे स्पष्टपणे सिद्ध केले की, हे दोन्ही स्वतंत्र धर्म आहेत व या दोहोंत जी कांही समानता आहे त्यावरून असे सिद्ध होऊ शकत नाही की, एका धर्मातून दुसरा धर्म निघालेला आहे

### दोहोतील समानता.

जैनधर्म व बौद्धधर्मात अनेक प्रकारची समानता दिसते. दोघेहि वेद प्रमाण मानीत नाहीत दोघेहि यज्ञ हिंसेचे विरोधी आहेत. दोघेहि जगन्नियंता या स्वरूपांत ईश्वराची सत्ता मानीत नाहीत. पुरुषामध्ये देवत्वाची स्थापना करून त्याची पूजा करावी असे दोघांचेहि मत आहे. दोघेहि अहिंसा सिद्धांताचे अनुयायी आहेत. दोघांच्याहि संघांत साधू व साध्वींना महत्वपूर्ण स्थान प्राप्त आहे. या वरील समानतेशिवाय आणखीहि महत्वाची समानता अशी आहे की, महावीर व बुद्ध हे दोघेहि समकालीन होते व दोघांचाहि जन्म विहारमध्ये झाला होता, तसेच महावीरांच्या वडीलांचे नांव सिद्धार्थ होते व हेच नांव कुमारा-वस्थेत बुद्धाचेंहि होते. बुद्धाच्या पत्नीचे नांव यशोधरा होते व श्वेतांबर संप्रदायाच्या मान्यतेनुसार महावीरांच्या पत्नीचे नांवहि यशोधरा होते. परंतु या सर्व समानता असूनहि दोन्ही धर्मात जो मौलिक फरक आहे त्यावरून हे दोन्ही धर्म अलग अलग असल्याचे स्पष्ट दिसते.

## दोघांतील भेद.

दोघाचे धार्मिक ग्रंथ निराळे आहेत. इतिहास निराळा आहे. कथाहि निराळ्या आहेत. इतकेच नव्हे तर धार्मिक सिद्धांतहि अगदी निराळे आहेत. जैनधर्म नित्य व अभौतिक जीव तत्त्वाचे अस्तित्व मानतो व असेहि मानतो की जोपर्यंत हा जीव पौग्दलिक कर्माशी बांधला गेला आहे तोपर्यंत तो संसारात राहतो व नंतर मुक्त होऊन वर सिद्धशिलेवर जाऊन विराजमान होतो व अनंत कालपर्यंत आत्मिक गुणांत मग्न राहून शाश्वत सुख भोगतो परंतु बौद्ध जीव तत्त्वाला मानत नाहीत. त्यांच्या मताप्रमाणे ज्यास आत्मा किंवा जीव म्हणतात तो नित्य पदार्थ नसून क्षणिक धर्मांची एक संतान–परंपरा आहे व या संतान परंपरेचा विनाश हाच मोक्ष आहे. जसे तेल व वत्ती ही जळल्यावर दीपकांचा आपोआप नाश होतो, त्याचप्रमाणे या संतान परंपरेचाहि नाश होतो. बौद्धधर्माचा हा सिद्धांत जैनधर्माच्या सिद्धांतापेक्षा अगदी उलट आहे.

‘ महावीर केवळ साधूच नव्हते तर ते तपस्वीहि होते; परंतु बोध प्राप्त झाल्यानंतर बुद्ध हे तपस्वी राहिले नाहीत केवळ साधूच राहिले व त्यांनी आपला सर्व पुरुषार्थ जीवनधर्माकडे लावला. महावीरांचे लक्ष्य (ध्येय) आत्मधर्म राहिले तर बुद्धाचे लक्ष्य लोक–धर्म बनलें. त्यामुळे बुद्ध अधिक प्रसिद्धीस आले. याचा अर्थ असा नाही कीं, महावीर लोक–समाजापासून दूर राहात होते. अर्हत झाल्यानंतर त्यांनीहि लोक–समाजासाठी विहार केला. बुद्धाप्रमाणेच त्यांचे अनेक शिष्य होते. त्यांचा एक संघहि होता व हा संघ पसरलाहि. परंतु भारताच्या सीमेच्या बाहेर याचा फैलाव झाला नाही.’

महावीर व बुध्दांच्या जीवनांतील वरील विश्लेषण करून जर्मन विद्वान् प्रो० लुईमन पुढे लिहितात– ‘भ. महावीर विशेषतः अंतर्मुख

प्रवृत्तीचें होते व बुद्ध जनताभिमुख स्वभावाचे होते. महावीर लोक-समाजात मिसळण्यापासून दूर राहात असत व बुद्ध लोक-समाजाची-सेवा करीत असत; ही गोष्ट या प्रसंगावरून अधिकच स्पष्ट होते की, जर कोणी बुद्धांचा शिष्य त्यांना जेवण्याचे आमंत्रण देई उर ते त्याचा स्वीकार करून त्याच्या घरी जात असत. परंतु महावीर असे मानत होते की; समाज-जीवनाबरोबर साधूंचा अशा प्रकारचा संबंध ठीक नाही. आणखी असे की, बुद्ध रस्त्याने जात असता कोणाशीहि बोलणी करीत असत व ते आपल्या आचार विचारात फेरफार करीत करीत लोकांना उपदेश देत असत व आपल्यात मिसळून घेण्याच्या पद्धतीतहि फेरफार करीत असत. परंतु महावीरांच्या बाबचीत ही गोष्ट दिसून येत नाही, आध्यात्मिक उपदेश करण्यासाठी किंवा पाठ देण्यासाठी त्यांनी कधी कोणास बोलाविले असे दिसून येत नाही. जर कोणी मनुष्य धार्मिक चर्चा करण्यासाठी त्यांच्याजवळ गेला तर महावीर आपल्या नाफेर सिद्धाताना अनुसरून त्याचे उत्तर देत होते; परंतु ते त्यापासून अपेक्षा करीत नसत.' म्हणून वर सांगितलेल्या कारणावरून जैनधर्म व बौद्ध-धर्म हे दोन्ही स्वतंत्र आहेत, एकातून दुसरा निघालेला नाही; असे असले तरी दीर्घकालपर्यंत दोन्हीहि धर्म एकाच क्षेत्रात दीर्घकालपर्यंत नावरूपाला आले. म्हणून एकाचा दुसऱ्यावर परिणाम झाला नसेल असें असे म्हणवत नाही.

## ३ जैनधर्म व मुसलमान धर्म

मुसलमानी धर्मांचा उदय अरबस्थानात झाला तरी कित्येक शतकेपर्यंत दोन्ही धर्माचा भारतातंर्गत या नात्यानें निकट संबंध राहिला व एकाचा दुसऱ्यावर कांही प्रभावहि पडला आहे मुसलमानांचा सर्वात अधिक परिणाम जैनांच्या स्थापत्यकला व चित्रकलेवर झाला. तसेंच

जैनांच्या स्थापत्य कलेचा प्रभाव मुसलमानांच्याहि स्थापत्य कलेवर पडला आहे. परंतु येथे त्याचे प्रयोजन नाही. आमचे प्रयोजन जैन–धर्माच्या धार्मिक क्षेत्रामध्ये जैन धर्मावर मुसलमान धर्माचा काय प्रभाव पडला त्याबद्दल आहे; मुसलमान धर्माचा जैनधर्मावर महत्वाचा परिणाम तर हा झाला की, जैनधर्मांत मूर्तिपूजा–विरोधी अशा संप्रदा–यांचा जन्म झाला मुसलमानांचा मूर्तिपूजा विरोध व मूर्तिखंडन यामुळेच लोकशाहा वगैरेच्या मनात ही भावना निर्माण झाली व त्यांतूनच स्थानकवासी संप्रदाय व तारण पंथ यांची स्थापना झाली.

मुसलमान धर्मावर जैनधर्माचा पडलेला प्रभाव दाखविताना प्रोफेसर ग्लेजनप यांनी आपल्या 'जैनिझम्' या नांवाच्या ग्रंथांत A. furher V. Kremer यांच्या निबंधाचा हवाला देऊन असे लिहिले आहे की, अरब कवी व तत्त्ववेत्ते अबूल् अला यानी (९७३ ते १०५८) आपले नैतिक सिद्धांत जैनधर्माच्या प्रभावाने स्थापित केले होते. त्याचे वर्णन करताना क्रेमर यांनी पुढील प्रमाणे लिहिले आहे की, 'अबूल् अला केवळ अन्नाहारच करीत असत. दूध सुध्दा पीत नव्हते, कारण ते असे मानत की, गाईम्हशीच्या कांसेतून वासरांच्या हिश्शाचे देखील दूध काढले जाते त्यामुळे ते पापच आहे. जोपर्यंत शक्य असेल तोपर्यंत ते आहारहि करीत नव्हते. त्यांनी मधाचा त्याग केलेला होता व ते अंडीहि खात नव्हते. आहार व वस्त्राच्या दृष्टीने ते संन्याशा-प्रमाणेच राहात होते. पायात लाकडच्या खडावा घालीत असत. कारण पशु मारणे व त्याचे कातडे उपयोगात आणणे हे पाप समजत असत. एके ठिकाणी नग्न राहण्याचीहि त्यांनी प्रशंसा केली आहे व म्हणत की, 'ऋतु हेच तुमच्यासाठी संपूर्ण वस्त्र आहे.' त्याचे असेहि म्हणणे आहे की, भिकाऱ्यास पैसा देण्यापेक्षा माशीस जीवदान देणे अधिक श्रेष्ठ आहे.'

नग्नता, जीवरक्षा, अन्नाहार, मधुत्याग इत्यादि विषयासंबंधीचा

त्यांचा पक्षपात असे दाखवितो की, त्यांच्या विचारावर जैनधर्माचा विशेषत: दिगंबर संप्रदायाचा प्रभाव पडलेला होता. अबुल्अलाह पुष्कळ दिवसपर्यन्त बगदाद येथे राहिले होते. हे शहर व्यापाराचे केन्द्र होते व तेथे गेलेल्या जैन व्यापाऱ्याशी या कवीचा चांगला घनिष्ट संबंध जोडला गेला असावा हे अधिक संभवनीय आहे.

त्यांच्या लेखावरून असे दिसून येते की, त्यास भारतातील अनेक धर्मांचे ज्ञान होते. भारतातील साधू नख काढीत नाहीत. या गोष्टीचा त्यांनी उल्लेख केलेला आहे. प्रेत जाळण्याची पद्धत त्यास आवडत असे. भारतातील साधू चितेच्या अग्निज्वालेत उडी घेतात ही गोष्ट त्यास आश्चर्यकारक वाटत असे. अशा प्रकारच्या मरणास जैन अधर्म मानतात 'शक्य झाल्यास आहारांचा त्याग करावा.' या त्याच्या वचनावरून असे अनुमान करण्यात येते की, त्यास जैनांच्या सल्लेखना व्रताचे ज्ञान होते. परंतु हे व्रत तो स्वत: पाळू शकत नव्हता या सर्व गोष्टीवरून असे वाटते की, त्याचा जैनाशी परिचय झाला होता व त्यांचे पुष्कळसे धार्मिक सिद्धांत या कवीने मानलेले होते.



# ५ जैन-सूक्ती.

प्राकृत—

१ णो लोगस्सेसणं चरे । — आचारांग

अर्थः—लोकैषणेचे अनुकरण करू नये. म्हणजे दुसऱ्यांच्या वरवर चांगल्या भासणाऱ्या गोष्टींचे अंधानुकरण करू नये.

२ सव्वे पाणा पियाउआ, सुहसाया दुक्खपडिकुला अप्पियवहा ।
पियजीविणो जीविउकामा, सव्वेसिं जीवियं पियं । —आचारांग.

अर्थः— सर्व जीवांना आपापले प्राण प्रिय आहेत, सुख प्रिय वाटते, दुःख कोणी इच्छित नाहीत; आपला वध व्हावा असे कोणासहि वाटत नाही. सर्व जगण्याची इच्छा करतात. ( म्हणून सर्वांचे रक्षण करावयास पाहिजे. )

३ सव्वे जीवा वि इच्छंति जीविउं न मरिज्जिउं ।
तम्हा पाणवहं घोरं णिग्गंथा वज्जयंति णं ॥ —दशवैकालिक.

अर्थः— सर्व प्राणिमात्रांची जगण्याची इच्छा असते. मरावे असे कोणासही वाटत नाही. म्हणून निर्ग्रंथ मुनी घोर प्राणिवधाचा त्याग करतात.

४ णिस्संगो चेव सदा कसायसल्लेहणं कुणदि भिक्खू ।
संगाह उदीरंति कसाए अग्गीव कट्ठाणि ॥ —शिवार्य.

अर्थः—परिग्रह रहित साधूच कषाय कमी करण्यास नेहमी समर्थ असतात. ज्याप्रमाणे वाळलेली लाकडे अग्नी उत्पन्न करतात व वाढवितात त्याप्रमाणे परिग्रहच कषायांची निर्मिती करतो व वाढवितो.

५ समसत्तुबंधुवग्गो समसुहदुक्खो पसंसणिदसमो ।
समलोट्ठकंचणो पुण जीविदमरणे समो समणो ॥ —कुन्दकुन्द.

जे शत्रू–मित्र, सुख–दुःख, प्रशंसा–निंदा, मातीचे ढेकूळ–सोनें तसेच जीवन व मृत्यू इ. गोष्टी समान मानतात, तेच श्रमण–जैनसाधू होत.

६ भावरहिओ न सिज्झइ जइवि तवं चरइ कोडिकोडीओ।
जम्मंतराइ बहुसो लंबियहत्थो गलियवत्थो ॥–कुन्दकुन्द

अर्थः– जरी कोणी नग्न झाला किंवा हात लांब करून करोडो जन्मपर्यंत अनेक प्रकारचे तप केले, जर हे सर्व भावरहित असेल तर त्यास सिद्धीची प्राप्ती होत नाही.

७ जेसि विसयेसु रदी तेसि दुःखं वियाण सब्भावं ॥
जदि तं ण हि सब्भावं वावारो णत्थि विसयत्थं ॥ –कुन्दकुन्द

अर्थः– ज्यांची ऐंद्रियिक विषयात आसक्ती आहे त्यांनाच स्वाभाविक दुःख होते असे समजावे. कारण असे दुःख होत नसते तर ते विषयोपभोगांच्या प्राप्तीचा प्रयत्नच कशास करतील?

८ वउ तउ संजमु सीलु जिय ए सव्वइं अकयत्थु।
जाव ण जाणइ इक्क परु सुद्धउ भाउ पवित्तु ॥ – योगीन्दु

अर्थः– जोपर्यंत या जीवास आपल्या पवित्र शुद्ध स्वभावाचा बोध होत नाही तोपर्यंत व्रत, तप, संयम व शील इ० चे पालन निरर्थक आहे,

९ राए रंगिए हियवडए, देउ ण दीसइ संतु ॥
दप्पणि मइलइ बिंबु जिम, एहउ जाणि णिभंतु ॥ –योगीन्दु

अर्थः– ज्याप्रमाणे मलिन आरशात तोंड स्पष्टपणे दिसत नाही त्याप्रमाणे रागादी भावांनी बरबटलेल्या हृदयात वीतराग शांत देवांचे दर्शन होत नाही, हे निश्चितपणे जाणावे.

१० जो ण विजादि वियारं तरुणियणकडक्खबाणविद्धो वि ।
सो चेव सूरसूरो रणसूरो णो हवइ सूरो ॥ - स्वामी कार्तिकेय

अर्थः— जे रणांगणांत शौर्य गाजवितात ते खरे शूर नसून, तरूण स्त्रियांच्या नेत्रकटाक्षाने ज्याचे हृदय विद्ध होत नाही तर उलट निर्विकार राहते, तेच खरे शूरवीर आहेत.

११ जहिं भावइ तहिं जाहि जियं जं भावइ करि तं जि ।
केम्वइ मोक्खु ण अत्थि पर चित्तइ सुदिध् ण ज जि ॥ योगीन्दु

अर्थः— ( बा ) जीवा ! तू कोठेही जा व कांहीही, कर पण जोपर्यंत तुझे चित्त शुद्ध होत नाही, तोपर्यंत कोणत्याही प्रकारे तुला मोक्ष मिळू शकणार नाही.

१२ जीववहो अप्पवहो जीवदया होइ अप्पणो हु दया ।
त्रिसकंटको व्व हिंसा परिहरिदव्वा तदो होदि ॥ शिवार्य

अर्थः— वास्तविक जीवांचा वध हा आपलाच वध आहे व जीवांवर दया ही आपल्यावरच दया आहे. म्हणून विषारी काटयाप्रमाणे हिंसेचा दूरूनच त्याग करावयास पाहिजे.

१३ रायदोसाइदीहि य डहुलिज्जइ णेव जस्स मणसलिलं ।
सो णिय तच्चं पिच्छइ ण हु पिच्छइ तस्स विवरीओ ॥ देवसेन

अर्थः— ज्याचे हृदय रागद्वेषादी विकारांनी दोलायमान होत नाही तो आत्मतत्त्वाचे चिंतन करू शकतो. उलट रागद्वेषादी विकारांनी ज्याचे चित्त प्रक्षुब्ध होते, त्यास आत्मतत्त्वाचे दर्शन होत नाही.

**संस्कृत—**

१४ आपदा कथितः पन्था इन्द्रियाणामसंयमः ।
तज्जयः संपदा मार्गो येनेष्टं तेन गम्यताम् ॥

अर्थः- इंद्रियांचा असंयम हा आपत्तीचा-दुःखांचा मार्ग आहे. व इंद्रियांना वश करणें हा संपत्तीचा-सुखाचा मार्ग आहे. यापैकी तुला जो रुचेल, तो मार्ग तू स्वीकार.

१५ हेयोपादेयविज्ञानं नो चेद् व्यर्थः श्रमः श्रुतौ । – वादीभसिंह.

अर्थः- जर शास्त्रे वाचून हेयोपादेय गोष्टींचे ज्ञान झाले नाही,- कशात आत्म्याचे हित आहे व कशात अहित आहे हे समजले नाही, तर श्रुताभ्यासाचे कष्ट व्यर्थच म्हणावयाचे !

१६ कोऽन्धो योऽकार्यरतः को बधिरो यः श्रुणोति न हितानि ।
को मूको यः काले प्रियाणि वक्तुं न जानाति ॥ – प्रश्नोत्तर रत्नमाला

अर्थः- आंधळा कोण? न करण्यायोग्य वाईट कार्यात जो लीन असतो तो. बहिरा कोण? आपल्या हिताची गोष्ट जो ऐकत नाही तो. मुका कोण? ज्यास योग्य वेळी गोड वचन बोलणे समजत नाही तो.

१७ पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति मानवाः ।
फलं नेच्छन्ति पापस्य पापं कुर्वन्ति यत्नतः ॥ – गुणभद्राचार्य.

अर्थः- मनुष्य पुण्याचे फल तर भोगू इच्छितात. पण कर्म मात्र करू इच्छित नाहीत. तसेच पापाचे फळ दुःख कधीच भोगू इच्छित नाहीत. परंतु पापकार्यात मात्र अगदी प्रयत्नशील असतात.

१८ तत्त्वज्ञानविहीनानां नैर्ग्रन्थ्यमपि निष्फलम् ।
न हि स्थाल्यादिभिः साध्यमन्नमन्यैरतण्डुलैः ॥ – क्षत्रचूडामणि.

अर्थः-जे लोक तत्त्वज्ञानशून्य आहेत, त्यांनी निर्ग्रंथ होणें, व्यर्थ आहे. कारण आहाराची इतर तांदूळ वगैरे सामुग्री नसतांना केवळ भोजन शिजवण्याची भांडी असल्याने भोजन तयार होऊ शकत नाही.

अर्थः- जे गृहस्थ असूनहि निर्मोही आहेत, ते मोक्षमार्गात स्थिरप्रवृत्त आहेत. परंतु जे मुनि असूनहि मोही आहेत ते मोक्षमार्गानें जात नाहीत. (मोक्षमार्गात स्थित नाहीत.) म्हणून मोही (मिथ्यात्वी) मुनीपेक्षा निर्मोही गृहस्थ श्रेष्ट आहे.

१९ गृहस्थो मोक्षमार्गस्थो निर्मोहो नैव मोहवान् ।
अनगारो गृही श्रेयान् निर्मोहो मोहिनो मुने. ॥ रत्नकरंड श्र०

अर्थः- जसा जसा शुद्ध आत्म्याचा अनुभव येत जातो, तसतसे ऐंद्रियिक विषय भोगणे सुलभ असतानाही आवडत नहीं, तसेच इद्रियांचे विषयभोग भोगणे सुलभ असतानाही ते भोगण्याची प्रवृत्ती कमी कमी होत जाते, तसतसे आत्म तत्त्वांचा अनुभव अधिकाधिक येत जातो.

२० यथा यथा समायाति संवित्तौ तत्त्वमुत्तमम् ।
तथा तथा न रोचन्ते विषयाः सुलभा अपि ॥

२१ यथा यथा न रोचन्ते विषयाः सुलभा अपि ।
तथा तथा समायाति संवित्तौ तत्त्वमुत्तमम् ॥ - पूज्यपाद.

अर्थः- जर अपकार करणाऱ्यावर राग करावयाचा, तर मग क्रोधावरच का क्रोध करू नये? कारण क्रोध हा धर्म, अर्थ काम, मोक्ष व जीवनाचाहि नाश करणारा आहे.

२२ अपकुर्वति कोपश्चेत् किं न कोपाय कुप्यसि ।
त्रिवर्गस्यापवर्गस्य जीवितस्य च नाशिने ॥ - वादीभसिंह.

अर्थः- जो दुसऱ्यांच्या दोषाबरोबर आपलेही दोष पाहतो, त्याच्या सारखा दुसरा कोण आहे? तो सशरीरी असूनही खरोखर मुक्त आहे.

२३ अन्यदीयमिवात्मीयमपि दोषं प्रपश्यता ।
कः समः खलु मुक्तोऽयं युक्तः कायेन चेदपि । - वादीभसिंह.

२४ आशागर्तः प्रतिप्राणि यस्मिन् विश्वमणूपमम् ।
तत्कियद् कियदायाति वृथा वै विषयैषिता ।। – गुणभद्र

अर्थ:– प्रत्येक प्राण्याची आशेची दरी इतकी मोठी आहे की, त्याच्यामध्ये हे संपूर्ण विश्वही परमाणूसारखे आहे. अशा परिस्थितीत जर या विश्वाची वाटणी केली तर प्रत्येकाच्या हिस्स्यास काय बरे येईल? म्हणून विषयांची इच्छा करणे व्यर्थ आहे.

# हिन्दी–

२५ राग उदै जग अन्ध भयो सहजहिं सब लोगन लाज गँवाई ।
सीख विना नर सीखत है विषयादिक सेवनकी सुघराई ।।
तापर और रचै रसकाव्य, कहा कहिये जिनकी निठुराई ।
अन्ध असूझनकी अँखियानमें डारत है रज राम दुराई ।। भूधरदास

२६ राग उदै भोग भाव लागत सुहावनेसे,
विना राग ऐसे लागै जैसे नाग कारे हैं ।
राग ही सो पाग रहे तनमें सदीव जीव,
राग गये आवत गिलानि होत न्यारे हैं ।
राग सो जगतरीति झूठी सब साँची जानै,
राग मिटै सूझत असार खेल सारे हैं ।
रागी बिनरागीके विचारमें बडोई भेद,
जैसे भटा पच काहू काहूको बयारे हैं । - भूधरदास

२७ ज्यो समुद्रमे पवन तै चहुदिसि उठत तरंग ।
त्यो आकुलता सो दुखित लहैं न समरस रंग ।। – वृन्दावन

२८ चाहत है धन होय किसी विधि तो सब काज सरैं जियरा जी ।
गेह चिनाय करूँ गहना कुछ, व्याहि सुता सुत बाँटिय भाजी ।।
चिंतत यो दिन जाहिं चले जम आनि अचानक देत दगा जी ।
खेलत खेल खिलारि गयें रहि जाय रुपी शतरंजकी बाजी ।। भूधरदास

# कांही जैनपारिभाषिक शब्द.

या ग्रंथामध्ये ज्यांची परिभाषा दिलेली आहे अशाच शब्दांची येथें सूचि दिली आहे.

*

# श्री जैन संस्कृति संरक्षक संघ

## जीवराज जैन ग्रंथमाला

*मराठी विभाग*

| | | |
|---|---|---|
| १ | रत्नकरंड श्रावकाचार | (अप्राप्य) |
| २ | महामानव सुदर्शन | रु. २–०० |
| ३ | कुंदकुंदाचे रत्नत्रय | ,, १–५० |
| ४ | आर्यादर्श भक्ति | ,, १–०० |
| ५ | नित्यनैमित्तिक जैनाचार | (अप्राप्य) |
| ६ | जीवंधर चरित्र | ,, १–७५ |
| ७ | पांडव कथा | ,, २–०० |
| ८ | अंतिम उपदेश | ,, ०–४० |
| ९ | रत्नाची पारख | ,, ०–६० |
| १० | सम्यक्त्व कौमुदी कथा | ,, ३–५० |
| ११ | भ. नेमिनाथ चरित्र | ,, २–०० |
| १२ | भ. ऋषभदेव | ,, ३–०० |
| १३ | जसोधर रास | ,, ४–०० |
| १४ | जिनसागर कविता | ,, ४–०० |
| १५ | जीवंधर पुराण | ,, २–०० |
| १६ | धर्मामृत | ,, ३–०० |
| १७ | परमहंस कथा | ,, २–०० |
| १८ | चक्रवर्ती सुभौम | ,, २–०० |
| १९ | जैन धर्म | (अप्राप्य) |
| २० | श्रेणिक चरित्र (पद्य) | ,, ४–०० |
| २१ | भ. पार्श्वनाथ भ. महावीर | (अप्राप्य) |
| २२ | पवनपुत्र हनुमान | ,, २–०० |
| २३ | यशोधर चरित्र | ,, २–०० |
| २४ | कुमार प्रीतिंकर | ,, २–०० |
| २५ | भारतीय जैनसम्राट | (अप्राप्य) |

| | | |
|---|---|---|
| २६ | तत्वार्थ सूत्र | रु. ३–०० |
| २७ | भारतीय संस्कृतीस जैन धर्मांची देणगी | ,, १५–०० |
| २८ | विश्व समस्या | ,, ०–७५ |
| २९ | स्वयंभू स्तोत्र | ,, २–५० |
| ३० | सती चैलना | ,, २–०० |
| ३१ | पराक्रमी वरांग | ,, २–०० |
| ३२ | सद्‌वोध दृष्टांत भाग १ | ,, २–०० |
| ३३ | प्राचीन कथा पंचक | ,, २–०० |
| ३४ | प्रद्युम्न चरित्र | ,, ६–०० |
| ३५ | इष्टोपदेश | ,, २–०० |
| ३६ | सद्‌वोध दृष्टांत भाग २ | ,, २–०० |
| ३७ | अनंतव्रत पूजा | ,, १–०० |
| ३८ | दशलक्षण धर्म | ,, ३–०० |
| ३९ | श्रेयोमार्ग | ,, ६–०० |
| ४० | समाधि शतक | ,, ३–०० |
| ४१ | षोडश कारण भावना | २–०० |
| ४२ | भद्रकथा कुंज भाग १ | ,, ३–०० |
| ४३ | भ. महावीर उपदेश परंपरा | ,, २–५० |
| ४४ | भरतवर्ष नामकरण | ,, २०–०० |
| ४५ | महापुराण (भाग १) | ,, २५–०० |
| ४६ | कोटिभट श्रीपाल | ,, २–०० |
| ४७ | हरिवंश पुराण | छापत आहे |
| ४८ | पद्मपुराण | ,, २–०० |
| ४९ | सामायिक पाठ | ,, ०–५० |
| ५० | पंचपूजा | ,, ०–५० |

❋❋❋

# JIVARAJ JAINA GRANTHAMALA

GENERAL EDITORS :

**Dr. A. N. Upadhye & Dr. H. L. Jain.**

1. Tiloyapannatti of Yativrsabha ( Part I, Chapters 1-4 ): तिलोयपण्णत्ति ( श्री. यतिवृषभाचार्यकृत ) भाग १ ला. An Ancient Prakrit Text dealing with Jaina Cosmography, Dogmatics etc. prakrit Text authentically edited for the first time with the Various Readinga, Preface & Hindi Paraphrase of Pt. Baachandra by Drs. A. N. Upadhye & H. L. Jain. Published by Jaina Samskriti Samraksaka Sangha, Sholapur (India). Double Crown PP. 6-38-532, Solapur 1943. Price Rs. 12-00. Second Edition, Sholapur 1956. Price Rs. 16-00.

1. Tiloyapannatti of Yativrisabha ( Part II, Chapters 5-9 ). तिलोयपण्णत्ति ( श्री. यतिवृषभाचार्यकृत ) भाग २ रा. As above, with Introductions in English and Hindi with an alphabetical Index of Gathas, with other Indices ( of Names of works mentioned, of Geographical Terms, of proper Names, of Technical Terms of Differences in Tradition, of Karanasutras and of Technical Terms compared) and Tables of of ( Naraka-jiva, Bhavana-vasi Deva, Kulakaras, Bhavana Indras, Six Kulaparvatas, Seven Ksetras,

Twentyfour Tirthankaras, Age of the Salaka-purusas, Twelve Cakravartins Narayanas, Nine Pratisatrus, Nine Baladevas, Eleven Rudras Twentyeight Naksatras, Eleven Kalpatita, Twelve Indras, Twelve Kalpas and Twenty Prarupanas ) Double Crown PP. 6-14-108-529 to 1032, Sholapur 1951 Price Rs 16-00.

2 Yasastilaka and Indian Culture, यशस्तिलक व भारतीय संस्कृति or Somdeva's Yasastilaka and Aspects of Jainism and Indian Thought and Culture in the Tenth Century, by Professor K. K Handiqui, Vice-Chancellor, Gauhati University, Assam, with Four Appendices, Index of Geographical Names and General Index. Published by J. S S. Sangha, Sholapur. Double Crown PP. 8-540 Sholapur 1949. Price Rs 16-00.

3. Pandavapuranam of Subhachandra; पाण्डवपुराण ( श्री शुभचंद्राचार्यकृत ) A Sanskrit Text dealing with the Pāndava Tale. Authentically edited with Various Readings, Hindi Paraphrase, Introduction in Hindi etc. by Pt. Jinadas Published by J. S. S. Sangha, Sholapur. Double Crown PP. 4-40-520. Sholapur 1954 Price Rs 12-00

4. **Prakrita-sabdanusasanam** of Trivikrama witn his own commentary: प्राकृतशब्दानुशासनम् (त्रिविक्रमाचार्यकृत) Critically Edited with Varicus Readings, an Introduction and Seven Appendices ( 1. Trivikrama's Sutras; 2. Alphabetical Index of the Sutras; 3 Metrical Version of the Sutrapatha; 4. Index of Apabhramsa Stanzas; 5. Index of Desya words; 6. Index of Dhatvadesas, Sanskrit to Prakrit and vice versa; 7. Bharata's Verses on Prakrit ) by *Dr. P. L. Vaidya, Director, Mithila Institute,* Darbhanga. Published by the J S. S. Sangha, Solapur. Demy PP. 44-478. Solapur, 1954. Price Rs. 10-00

5. **Siddhanta- sarasamgraha** of Narendrasena: सिद्धांत-सारसंग्रह (आ. नरेंद्रसेनकृत) A Sanskrit Text dealing with Seven Tattvas of Jainism. Authentically Edited for the first tims with Various Readings and Hindi Translation by the J. S. S. Sangha, Solapur Double Crown PP. about 300. Solapur 1957. Price Rs. 10-00

6. **Jainism. in South India and Some Jain Epigraphs:** (जैनिझम् इन् साऊथ इंडिया (इंग्लिश) A learned and well-documented Dissertation on the career of Jainism in the South, especially in the areas in which Kannada, Tamil and Telugu Languages are spoken by P. B. Dasai,

M A., Assistant Superintendent for Epigraphy, Ootacamund. Some Kannada Inscriptions from the areas of the former Hyderabad State and round about are edited here for the first time both in Roman and Devanagari characters, along with their critical study in English and Saranuvada in Hindi. Equipped with a List of Inscriptions edited, a General Index and a number of illustrations Published by the J. S. S. Sangha, Sholapur 1957. Double Crown pp. 16-456. Price Rs. 16-00

7 **Jambudiva-pannatti-Samgaha** of Padmanandi: जंबुद्वीप पण्णत्ति संग्रह [ आ. पद्मनंदी कृत ] –A prakrit Text dealing with Jain Geography. Authentically edited for the first time by Drs. A. N Upadhye and H. L. Jain, with the Hindi Anuvada of P. T. Balachandra The Introduction institutes a careful study of the Text and its allied works. There is an Essay in Hindi on the Mathematics of the Tiloyapannatti by Prof. Lakshmichanda Jain, Jabalpur Equipped with an Index of Gathas, of Geographical Terms and of Technical Terms, and with additional Variants of Amera Ms. Published by the J S S Sangha, Solapur. Double Crown pp. about 500 Solapur 1957. Price Rs. 16.00

8. **Bhattaraka-sampradaya** : भट्टारकसंप्रदाय A History of the Bhattaraka Pithas especially of Western India, Gujarat, Rajasthan and Madhya Pradesh, based on Epigraphical Literary and Traditional sources, extensively reproduced and euitably interpreted, by Prof V. Johrapurkar, M. A, Nagpur Published by J. S. S. Sangha, Solapur. Demy PP. 14–24–326. Solapur 1960. Price Rs 8/-

9. **Prabhritadi-Samgraha** : प्राभृतादिसंग्रह This is a presentation of topic–wise discussions compiled from the works of Kundakunda, the Samayasara being fully given. Edited with Introduction and Translatiou in Hindi by Pt. Kailashchandra Shastri, Varanasi. Published by the J. S. S. Sangha, Solapur. Demy PP. 10–106–10–288 Solapur. 1960. Price Rs. 6 0

10. **Panchavimshati** of Padmanandi (c. 1136 A D.) पंचविंशति (आ. पद्मनंदीकृत) This is a collection of 26 prakaranas (24 in Sanskrit and 2 in Prakrit), small and big, dealing with various topics: religious, spiritual, ethical, didactic, hymnal and ritualistic The text along with an anonymous Sanskrit commentary critically edited by Dr. A. N. Upadhye and Dr. H. L. Jain, with the Hindi Anuvada of Pt. Balachandra Shastri The edition is equipped with a detailed Introduction

shedding light on the various aspects of the work and personality of the author, both in English and Hindi. There are useful Indices. Printed in the N. S Bombay.

11. **Atmanusasana** of Gunabhadra आत्मानुशासन (आ. गुणभद्रकृत) (middle of the 9th century A. D.) This is a religio didactic anthology in elegant Sanskrit verses composed by Gunabhadra, the pupil of Jinasena, the teacher of Rashtrakuta Amoghavarsha. The Text critically of Prabhachandra and a new Hindi Anuvada by Dr, A N. Upadhye, Dr. H. L. Jain and Pt. Balchandra Shastri. The edition is equipped with Introductions in English and Hindi some useful Indices.

# IN PRESS

12. **Ganitasarasamgraha** of Mahaviracharya (c. 9th century A. D.) : This is an important treatise in Sanskrit on early Indian mathematics, composed in an elegant style and practical manner. Edited with Hindi Translation by Prof. L. C. Jain, M Sc. Jabalpur.

13. **Lokvibhaga** of Simhasuri : A Sanskrit digest of a missing ancient Prakrit text dealing with Jaina cosmography. Edited with Hindi Translation by Pt. Balachandra Shastri.

14 **Punyasrava-kathakosa** of Ramchandra : It is a collection of religious stories in simple Sanskrit. The Text critically edited Dr. A. N. Upadhye and Dr. H. L. Jain with the Hindi Anuvada of Pt. Balchandra Shastri.

15. **Jainism in Rajasthan** : This is a dissertation on Jainas and Jainism in Rajasthan and round about area from early times to the present day, based on epigraphical, literary and traditional sources by Dr. Kailaschandra Jain, Ajmer.